

# मित्रभेद

[ १७ ]

**को**ल्हा सिंहाकडे गेला आणि म्हणाला— "प्रभो! आम्ही सर्व जंगल चाळून काढले. हिंडून हिंडून आम्ही दमलो, एक पाऊलदेखील पुढे टाकणे अशक्य झाले आहे, आम्हांला. आपणांलासुद्धां भूक लागली असेल. आपण मान्य केलेत तर विकटाला ठार करून त्याचे मांस पोटभर मिळेल."

ते ऐकून सिंहाला राग आला. म्हणाला— "काय म्हणतोस, मूर्खा? पुन्हां ते दुष्ट वचन तुझ्या तोंडातून बाहेर येऊ दे तर, तत्काळ मी तुला त्या पापाचे प्रायःश्चित्त देतो. मी विकटाला अभयदान दिले आहे. त्याचा काही विचार? अभयदान हे गोदानाहून, भूदानाहून आणि अन्नदानाहून थोर आहे, असे सांगतात!"

"अभयदान देऊन आपणच त्याला ठार केलेत तर ते पापच ठरेल, हे मी मानतो. परंतु त्याने स्वतः होऊन आपल्या पायांवर पडून, 'मला ठार करा, प्रभो', अशी विनवणी केली तर आपण त्याला ठार करण्यास काय हरकत आहे? महाराजांना ते पसंत नसेल तर आम्हां तिघां पैकी कोणा एकाला खाऊन महाराजांनी जिवंत रहावे. कारण महाराजांनी उपाशी राहणे बरोबर नाही. आपणच भुकेने या जगाचा निरोप घेतलात तर आम्ही तिघे आपल्या चितेवर आपला देह ठेवून प्राणत्याग करू!" कोल्हा म्हणाला.

"बरं बावा!" सिंह म्हणाला.

कोल्हा बाकी तिघांकडे जाऊन म्हणाला—"आपल्या धन्याचा जीव राहीलसे दिसत नाही. भुकेने पहा त्यांची काय दशा झाली आहे ती. त्यांचा जीव वांचविण्यासाठी आपला जीव द्यायला

पाहिजे."

त्याप्रमाणे चौघे मिळून सिंहाकडे गेले आणि नमस्कार करून समोर उभे राहले. त्यांचे डोळे भरून आले होते. आपले सेवक परत आलेले पाहून सिंहाने त्यांना विचारले—"शिकार मिळाली वाटते एखादी?"

"महाराज, सर्व रान चाळले, परंतु एक तरी जनावर नजरेस आले असेल तर शपथ! म्हणून मलाच आपण आहार म्हणून स्वीकारावे. आपले जीवित जास्त मोलाचे आहे, त्याचे रक्षण करावे. त्यामुळे माझे इहपरलोक दोन्ही सुधारतील!" कावळा म्हणाला.

ते ऐकून कोल्हा म्हणाला—"काय रे तुझा जीव केवढा? तुला खाऊन आपल्या महाराजांची भूक कशी काय मिटणार? याशिवाय तुझी हत्या केल्यास फार मोठे पाप लागते असे शास्त्रे सांगतात. कावळ्याचे मांस असो, कुत्र्याचे मांस असो, ते खाल्याने आरोग्यनाश होतो असे सांगतात. तुझी स्वामिभक्ती वाखाणण्यासारखी आहे, एवढे मी मानतो. तुझी कीर्ती त्रिलोकात व्याप्त होईल. तेव्हां तू बाजूला हो. मी धन्याच्या चरणी निवेदन करावे म्हणतो." असे सांगून कोल्ह्याने, त्याचा जीव घेऊन स्वतःचा जीव वांचविण्याची विनंती सिंहाजवळ केली.



कोल्हा म्हणाला ते ऐकून चित्ता पुढे सरसावला. तोदेखील कटात सामील होताच. म्हणाला—"काय रे कोल्ह्या! काय पण गप्पा मारतोस रे? तुझा जीव तरी केवढा आहे रे? याशिवाय तू नखे असलेला प्राणी असल्याने तू सिंहाच्या जातीतलाच प्राणी झालास. तुला तो कसा काय खाईल?" असे कोल्ह्याला सांगून चित्ता सिंहाला म्हणाला—"मालक! आपला अनमोल जीव वांचविण्यासाठी आपण मला खावे आणि मला इहलोकी शाश्वत कीर्ती व परलोकी शाश्वत सुखप्राप्ती होईल असे करावे."

इतर प्राणी जे म्हणाले ते ऐकून उंट विचार करू लागला—"या तिघांनी मनाचा

केवढा थोरपणा दाखविला? तरी सिंहानें त्यांच्या पैकी एकाला देखील ठार केले नाही. म्हणून आतां मी धन्यांजवळ विनंती करतो की त्यांनी माझा जीव घ्यावा!"

असा विचार करून उंट उघड म्हणाला—"अरे ए चित्त्या! तू फार काहीतरी बोलून गेलास. तूदेखील नखे असलेलाच प्राणी नाहीस का रे? आपले धनी मग तुला कसे काय खातील? तू हो बाजूला. मीदेखील विनंती करावी म्हणतो." असे म्हणत उंट पुढे येऊन नमस्कार करून सिंहाला म्हणाला—"हे तिघे आपल्याला पुरेसा आहार होऊच शकत नाहीत म्हणून आपण माझा जीव घेऊन आपला अनमोल जीव वांचवावा. धन्यासाठी प्राणार्पण करणाऱ्यांना ज्या स्वर्गसुखाचा लाभ होतो, तो यज्ञ करून, योगसाधना करून देखील मिळणे अशक्य आहे असे सांगतात."

उंटाने ते म्हटल्याबरोबर सिंहाने खूण केली. लगेच कोल्हा व चित्ता उंटावर तुटून पडले व त्याला ठार केले. त्याचे [illegible]
सेवक सर्वांनी आपला जीव वाचविला.

संजीवकाने दमनकाला ती गोष्ट सांगितली व म्हणाला—"तेव्हां कोणीतरी कट करून दुष्ट हेतूने सिंहाचे कान माझ्याविरुद्ध भरले असावेत अशी मला शंका वाटते. चांगले मंत्री असलेल्या वाईट राजापेक्षा वाईट मंत्री असलेला चांगला राजा अगदी निरुपयोगी व कुचकामाचा असतो. घारींना मंत्री नेमणाऱ्या हंसापेक्षा, हंसांना मंत्री नेमणारी घार पुष्कळ बरी! कोणीतरी दुष्टांनी माझ्याविरुद्ध पिंगळकाच्या मनात विष कालविले आहे. आतां मी काय करायचे हा माझ्यासमोर प्रश्न आहे. झुंज देण्याव्यतिरिक्त मला दुसरा उपाय दिसत नाही. गोड बोलणे, भेटी देणे, कट करणे अगदी निरुपयोगी ठरले आहे. साम, दाम, भेद निरुपयोगी ठरले आहेत तेव्हां झुंज किंवा युद्ध होणार, चुकत नाही. त्यांत हारलो तर स्वर्ग मिळेल, जिंकलो तर सुखाने पुढील आयुष्य घालवीन."





# तिळ्या बहिणी

[ ५ ]

[दानशील महाराजांनी आपल्या तिळ्या मुलींना लागोपाठ तीन वर्षं भूगृहात ठेवून त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था केली. आतां फक्त चोवीस तासात असं काय घडणार आहे, असें समजून थोडी घाई केली आणि त्यांना बाहेर आणले. लगेच तीन घारींनी येऊन तिघां राजकन्यांना उचलून नेले. राजा व राणी शोक करू लागलीं. पुढे—]

**का**ही वेळानें दानशील राजाचा दुःखावेग थोडा ओसरला. परंतु राणी, ती कठोर वार्ता ऐकून जी बेशुद्ध होऊन पडली ती शुद्धीवर आली नाही. मुलींबरोबर राणीच्या जिवाचे काही बरेवाईट होते की काय या विचाराने राजा काळजीत पडला. दुष्ट ग्रहांपासून मुलींना वांचविण्यासाठी राजाने केलेला उपाय फार उपयोगी ठरला होता. कोणत्याही प्रकारचे अनपेक्षित संकट ओढवले नव्हते. दुष्ट ग्रहांना दोष देण्यासारखे, दैवाला नावे ठेवण्यासारखे, काही घडलें नव्हते. म्हणून राजा स्वतःलाच दोषी मानीत होता.

"तीन वर्षं कशीतरी दिवसरात्र मोजून घालविली आणि मुलींच्या मनाचे समाधान करून निर्विघ्नपणे सर्व कष्टाचे दिवस घालविले; परंतु ऐन वेळी बुद्धी भ्रष्ट कशी झाली? त्यांना घरी आणून त्यांच्या



आईची भेट घालून बायची दुर्बुद्धी कशी काय झाली? या सर्व पापाला मीच एकटा कारण झालो! मी स्वतः होऊन मूर्खासारखा वागलो आणि आपल्या हाताने आपल्या मुलींना आणून चारींच्या हातात दिले. किती हा मूर्खपणा? दुर्दैव माझं! राणीला सुद्धां मी या मूर्खपणामुळे घालवून बसतो की काय?" वगैरे विचार करून राजा पश्चात्ताप करू लागला. चारी बाजूला राजपरिवारांतील लोक, मंत्री वगैरे मंडळी तासन्तास परस्परांची तोंडे पहात किंकर्तव्यविमूढ स्थितीत बसून होती. कित्येक तास लोटले तरी राणीला शुद्ध न आलेली पाहून सर्व काळजीत पडले.

निरनिराळ्या प्रकारे औषधोपचार करून त्यांनी राणी शुद्धीवर येते का पाहिले व शेवटी त्यांच्या प्रयत्नाला यश आले. सर्वांना हायसे वाटले. परंतु तो आनंद फार वेळ राहला नाही. राणी शुद्धीवर आली खरी, परंतु त्या असह्य दैवाघाताने तिला बुद्धिभ्रम झाल्यासारखे झाले. ती ओरडू लागली–"कोठे आहेत मुली? कोठे लपवून ठेवले आहेत त्यांना? बोला, सांगा!"

"यापुढे मी कधी खोटे बोलेन का तुझ्या जवळ? मी मुलींना कोठे लपवून ठेवले नाही. चारी त्यांना उचलून घेऊन गेल्या. माझ्या बोलण्यावर तुझा विश्वास नसेल तर, पहा, हे सर्व नोकरचाकर तुझ्यासमोर आहेत, त्यांना विचार!" राजा राणीची समजूत घालू लागला.

परंतु राणी कोणतीही गोष्ट समजून घेण्याच्या मनःस्थितीत नव्हतीच. म्हणाली–"तुम्ही सर्व एक आहांत! मला तुमच्याशी काही काम नाही. मीच जाते, मी आपल्या मुलींना शोधून हुडकून काढते. जाऊं द्या मला!" असे म्हणत उठून ती चालू लागली.

राजाला राणीचा प्रत्येक शब्द हृदयाला चटके दिल्यासारखा वाटत होता. त्याला

राजा त्यांच्याकडे पाहू लागला.

राजवैद्याने बराच विचार करून राणीला एक औषध दिले. त्यानंतर राणी शांत होऊन एकाद्या मूर्तीसारखी स्वस्थपणे पडून राहली.

त्यानंतर राजवैद्याने राजाला एका बाजूला बोलावून नेले व म्हणाला–"महाराज! राणी सरकारांना कोणत्याही प्रकारचा शारीरिक आजार नाही. जो आजार आहे, सर्व मानसिक आहे. त्यासाठी आपण सर्वांनी मिळून प्रयत्न करून राजकन्यांना परत आणणे हा एकच उपाय आहे. आपण हे काम जमेल तितक्या लौकर केले पाहिजे. राणी सरकारांची तब्येत मुलींना पाहतांच सुधारेल. म्हणून काय वाटेल तो प्रयत्न करून किंवा वाटेल तो खर्च करून मुलींना शोधून काढले पाहिजे. यासाठी आपण प्रयत्नांची पराकाष्ठा केली पाहिजे. राणी सरकारांच्या प्रकृतीची सर्व जबाबदारी महाराजांनी माझ्यावर टाकावी."

"ठीक! मी आताच दवंडी पिटवून जाहीर करतो. तुम्ही राणीच्या प्रकृतीकडे लक्ष द्या. म्हणजे मी निश्चिंतपणे बाकी कामें करू शकेन." राजा म्हणाला.



राजाने म्हटल्याप्रमाणे आपली सर्व धन जन शक्ती मुलींच्या शोधार्थ लावण्याचे ठरविले. पुन्हां देशदेशांतर फिरून मुलींच्या शोधार्थ लोक निघाले. मुली कोठे आहेत हे येऊन जो कळवील त्याला आपले राज्य देण्याचे वचनदेखील राजाने दिले.

* * *

दिवसामागून दिवस आणि महिन्यामागून महिने लोटले. परंतु मुलींच्या शोधार्थ गेलेल्यापैकी एक जणही परतला नाही. दवंडी ऐकूनही कोणी ते काम पुरे करण्याची हमी द्यायला पुढे आला नाही. ते सर्व पाहून राजाला वेड लागल्यासारखे



झाले. तिकडे राणीच्या प्रकृतीतही काही सुधारणा झाली नाही.

एके दिवशी उजाडतांच राजा आपल्या तिसऱ्या मजल्यावर येरझाऱ्या घालीत विचार करीत असतां दूरून त्या अंधुक उजेडात कोणी तरी तिथे एकाच सारखे दिसणारे महालाच्या बाजूला येत असलेले राजाला दिसले. ती तिघं मुलेच होती. तिघांची उंची एकच, बांधा एकच, जणुंकाही एकाच साच्यातून काढलेल्या तीन मूर्ती.

अंधुक प्रकाशात राजाला स्पष्ट दिसले नाही आणि त्या तिघी आपल्याच मुली असाव्या असे राजाला वाटले आणि राजा लगबगीने खाली उतरून ती मुलें येत होती

पाहतो तर त्या मुली नव्हत्या, मुले होती. त्यांच्या रूपात साम्य पाहून राजाच्या मनात एक विचित्र शंका आली.

"कदाचित माझ्या मुली त्या दुष्ट ग्रहांच्या दुष्टपणाने मुले तर झाली नसतील?" असा विचार करून राजा त्यांच्याकडे जास्त बारकाईने पाहू लागला.

आशा व निराशा या दोन्ही भावनांच्या बदलत्या लहरी राजाच्या चेहऱ्यावर विचित्रपणे उमटत असलेल्या पाहून त्या तिघांपैकी एक जण राजाकडे चकित होऊन कुतूहलाने पाहू लागला. शेवटी राजालाच राहवले नाही व विचारू लागला-"कोण रे बाळांनो तुम्ही? कोठून आलांत, इकडे कसे काय आलात?" वगैरे एकामागून एक प्रश्न राजा करू लागला.

आपल्याला प्रश्न विचारणारा स्वतः राजाच असेल याची कल्पनादेखील त्या मुलांना नव्हती. कारण त्या वेळी राजाच्या अंगावर राजवस्त्रे किंवा राजचिह्ने नव्हती. त्या शिवाय तोंडावर तेज किंवा ओज काहीच उरलेले नव्हते. त्या वेळी तो एखाद्या साध्या माणसासारखा दिसत होता. कोणी असो, परंतु त्याने विचारलेल्या प्रश्नांची उत्तर द्यायलाच हवी, असा विचार करून मुले म्हणाली-"इकडून

आम्ही त्या गावचे राहणार. तुमच्या राजाने दवंडी पिटविली ती ऐकून आम्ही आलो."

"अस्सं! तर चला, मला त्यांच्याकडेच जायचे आहे. मी महाराजांकडे तुम्हांला घेऊन जातो." असे सांगून राजा त्यांना बरोबर घेऊन राजवाड्यात आला.

नंतर त्याने तिघांना बसायला आसने दिली आणि स्वतः सिंहासनावर बसून म्हणाला-"बाळांनो! तुम्हांला महाराजांना भेटायचे आहे, म्हणालात नाही का? बोला तर महाराज तयार आहेत." असे म्हणत राजाने बाजूला ठेवलेला राजमुकुट उचलून स्वतःच्या डोक्यावर ठेवला.



ते पाहून त्या तिघां पैकी एक जण म्हणाला-"म्हणजे, आपणच महाराज होय?" असे म्हणत तो उभा राहला आणि त्याने नम्रपणे राजाला नमस्कार केला. पाठोपाठ इतर दोघांनी उठून लवून नमस्कार केला.

"होय बाळांनो! तुम्ही भेटायला आलात तो दुर्दैवी राजा, मीच! मला तुम्ही ओळखले नाहीत त्यात तुमची काहीच चूक नाही. माझी अशीच विचित्र परिस्थिती आहे. बरं ते असू द्या, प्रथम तुम्ही कोण, कशासाठी आलात वगैरे गोष्टी सांगा." राजा म्हणाला.

राजाने विचारले त्या प्रश्नाचे उत्तर द्यायला, राजाला सर्वांत प्रथम नमस्कार



करणारा मुलगा उभा राहला. म्हणाला–"भद्रपुरीच्या एका गरीब बाईची आम्ही मुलं आहों. माझे नाव उजेड; याचे नाव काळोख आणि याचे नांव सायंकाळ."

राजाला ते उत्तर ऐकून आश्चर्याबरोबर हंसू आले. त्याने विचारले–"अशी काय रे ही नावे? सायंकाळ, काळोख आणि उजेड म्हणालास नाही का? विचित्रच वाटली बुवा! ही नावे ठेवायला काही कारण होते का?"

ते ऐकून उजेड म्हणाला–"महाराज! आमचा जन्म आमच्या आईच्या पोटी एकाच दिवशी झाला. हा संध्याकाळी जन्मला. त्यानंतर हा मध्य रात्री जन्मला आणि मी उजाडल्यावर जन्मलो. तिने एकाच साच्यात ओतून काढल्यासारखे असल्यामुळे आमच्या आईने कोणते नाव ठेवले तर बरं होईल असा विचार करून शेवटी आम्ही जन्मलो त्या वेळेला अनुकूल असे नाव तिने ठेवण्याचे ठरविले आणि सायंकाळ, काळोख व उजेड अशी नावे ठेवली."

"छान! चांगली नावे आहेत. म्हणजे तुम्ही तिळी मुलं आहांत तर! काय पण योगायोग! तिळच्या मुलींना शोधायला तिळी मुलं आली आहेत. दैवयोगच असावा!" असे म्हणत राजाने त्या तिघांना जवळ बसवून घेतले व म्हणाला–"बरं तर तुम्ही इकडे निघाल्याचे तुमच्या आईला माहीत आहे का?"

ते ऐकून उजेड नाव असलेला मुलगा म्हणाला–"माहीत कां नसेल? आम्ही आपल्या विचारल्याशिवाय कोणतेही काम करीत नाही. तिने मान्य केल्यावरच आम्ही निघालो आणि इकडे आलो. परंतु आपल्या वृद्ध मातेला घरी एकटीला सोडून तुम्ही कसे काय आलात असे आपण साहजिकच विचाराल. त्याला देखील कारण आहे. आम्ही जन्मलों त्या त्या वेळचे विशेष की काय कोण जाणे, सायंकाळी जन्मला त्याला जास्त उजेडात किंवा जास्त काळोखात दिसत नाही. [illegible] काळोख पडेपर्यंत हा निर्धास्तपणे हिंडू फिरू शकतो. त्याला तेवढ्या अंधुक प्रकाशातच दिसते. इतर वेळी त्याला जवळ जवळ मुळीच दिसत नाही.

"आतां काळोख नांवाच्या माझ्या भावाला उजेड मुळीच सहन होत नाही. प्रकाशात त्याला मुळीच दिसत नाही. म्हणजे काळोख्या रात्री याला छान दिसते व सर्व कामे करतां येतात. आतां माझे असे आहे, चांगले उजाडल्याशिवाय मला बाहेर निघणे अशक्य असते. काळोख पडण्या पूर्वी घरी परतावे लागते. आमच्यातल्या या तीन विचित्र अवगुणांचा विचार करूनच आम्ही तिघांनी इकडे येण्याचे धाडस केले. याशिवाय राजकन्यांना शोधून काढणे तितके सोपे नाही हे आम्हांला कळते. आमच्या पैकी एकाच्याने ते असाध्यच आहे हे देखील ओळखून आम्ही तिघे परस्परांना मदत करू शकू या विचाराने तिघे आलो. तिघे तीन वेळां डोळ्यात तेल घालून पहात राहलो तर येईल कदाचित यश आम्हांला. आम्ही नक्कीच यशस्वी होऊ असेच आम्हांला वाटते आहे. म्हणून आम्ही आपल्या आईला एकटी सोडून आलो, नव्हे, आम्हांला तिला सोडून यावे लागले."

राजा म्हणाला–"छान! तू बोललास ते ऐकून मला आनंद झाला. तुम्ही आपल्या आईची फिकिर करण्याचे कारणच नाही.



मी तिला बोलवून घेतो. आमच्या बरोबर ती या महालात राहील."

"याहून ज्यास्त आम्हांला काय पाहिजे?" तिघे आनंदाने म्हणाले. राजाने आपल्या नोकरांना पाठवून त्या मुलांच्या आईला बोलवून घेतले. राजाचे औदार्य पाहून त्या म्हातारीला देखील परमानंद झाला.

राजा म्हातारीला म्हणाला–"ताई! तुमच्या मुलांच्या तोंडी तुमच्या घरची सर्व हकीगत मला कळली. यांच्यासारखी धैर्यवान व साहसी मुले तुम्हांला आहेत, भाग्यवान आहात तुम्ही!" असे म्हणत राजाने त्या म्हातारीला धीर दिला.

तिच्या परवानगीने राजाने मुलांची नावे थोडी बदलून संध्याकुमार, निशीथ आणि उदयन अशी ठेवली. मुलाच्या आईने आनंदाने ती गोष्ट मान्य केली. दुसऱ्याच दिवशी त्या तिघां मुलांना राजाने वेताच्या तीन तलवारी व कटारी दिल्या आणि तिघांना प्रत्येकी एक घोडा द्यायला घोड्यांची निवड करण्यासाठी अश्वशालेत गेला.

घोड्यांची निवड केली. उदयनला सूर्य-कान्तीसारखा चकाकणारा पांढरा शुभ्र-घोडा दिला. निशीथला कृष्णवर्ण घोडा दिला आणि संध्याकुमाराला तांबूस रंगाचा घोडा दिला.

एका सुमुहूर्तावर पांढऱ्या घोड्यावर उदयन, कृष्णवर्ण घोड्यावर निशीथ आणि तांबूस घोड्यावर संध्याकुमार बसून सुहा-सिनी, सुभाषिणी आणि सुकेशिनी या तिळ्या राजकन्यांच्या शोधार्थ निघाले.

ते निघण्यापूर्वी राजाने तीन काळे झेंडे मागविले आणि ते घोड्याच्या समोरच्या भागाला बांधविले. राजा म्हणाला–"माझ्या मुलींना घेऊन तुम्ही तिथे ज्या वेळी याल त्या वेळी हे झेंडे काढून फेकून द्या."

त्या नंतर मुलांनी आपल्या आईला आणि राजाला नमस्कार केला आणि दोघांचा आशीर्वाद घेऊन ते निघाले.

(क्रमशः)





# पैशाचा धनी

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही आणि तो पुन्हा झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी-प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू एवढे श्रम करीत आहेस, त्याचे फळ म्हणून तुला कोणी वर द्यायला आला तर निरर्थक वर मागू नकोस. तसे तू केलेस तर वसुगुप्ता-सारखी तुझी गत होईल. त्या वसुगुप्ताची गोष्ट मी तुला सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

उद्दानपुर नावाच्या गावी वसुगुप्त नावाचा एक कोट्याधीश रहात असे. त्याच्या घरी अनेक लोखंडी पेट्या तिजोऱ्या होत्या. त्या सर्व भरून सोने व हिरे माणिक्ये होती. त्याने लक्ष्मीला आपल्या घरी बांधून ठेवले आहे हो, असे लोक

## वेताळाच्या गोष्टी




म्हणत. त्याचा मुलगा बापासारखाच व्यापारधंद्यातच पडला आणि बापाचा अर्धाअधिक भार संभाळू लागला.

वसुगुप्ताला पैसे मिळवून जमा करण्यापलीकडे या जगात दुसरे काही दिसत नसे. त्याला इतर कोणत्याही गोष्टीची आवड म्हणून नव्हती. एक पैदेखील व्यर्थ खर्च करणे त्याला पटत नसे. प्रत्येक लहानसहान गोष्टीकडे तो बारकाईने लक्ष ठेवी व पैसे वाचवी. वसुगुप्त, त्याची बायको, मुलगा व सून अशी चार जणेच त्याच्या कुटुंबात होती. त्यांचे जेवणखाण अगदी साधे असे. वसुगुप्त, शक्य होईल तितका मितव्यय राखण्याचा आग्रह करी. खाण्या[illegible] त्याला पैसा खर्च करणे मुळीच आवडत नसे.

त्याच्या कुटुंबियांनी ह्या सर्व गोष्टी निभावून घेतल्या. परंतु वसुगुप्ताला नातू झाल्यावर काही कोडकौतुक करण्याचे आजीच्या मनात आले. बारसे थाटांत करण्याचे तिने ठरविले. परंतु तिने ती गोष्ट वसुगुप्ताजवळ काढली तेव्हां तो चिडून म्हणाला—"मेजवान्या आणि देखावा हवा कशाला? त्यांत होणारा खर्च सर्व व्यर्थच नाही का? नातू झाला आपल्याला, आनंद झाला. आपण चौघे होतों, आतां पांच जण झालों. त्याबरोबर खर्च वाढला की नाही? म्हणजे मिळकतदेखील वाढली पाहिजे. जो व्यापार चालू आहे मुलगा पाहील. मी कोठेतरी जाऊन मिळकत वाढवितां आली तर पाहतो."

आपली सुनबाई हुशार आहे, हे त्याला माहीत होते, म्हणून त्याने तिलाच विचारले—"सुनबाई! काय वाटते तुला?"

ती आपल्या सासऱ्याला म्हणाली—"कोठेतरी जाऊन जास्त पैसे मिळवून आणतों, म्हणतां आहां तर ते पुरे केल्याशिवाय तुम्ही राहणार नाही. तुम्हांला मी सल्ला काय देणार? लहान तोंडी मोठा घास होईल तो. वाटेत खायलाप्यायला मी काही फराळाचे करून देते."

[illegible] सासऱ्यासाठी, केशर, वेलची वगैरे घालून साखरभात करून दिला आणि प्यायला नुसते पाणी काय द्यायचे असा विचार करून सरबत तयार करून एका बुदल्यात घालून दिले.

सुनबाईने तयार करून दिलेले फराळाचे सामान व बुदली घेऊन वसुगुप्त प्रवासाला निघाला. त्याला पायी चालायची संवय नसल्यामुळे थोडे चालून गेल्यावर तो दमला. रस्त्यात घडीभर विश्रांती घ्यावी म्हणावे, तर कोठे झाडदेखील नव्हते. ओसाड वाळवंट होते. तरी चार पावले पुढे कशीबशी टाकली आणि सुदैवाने दूर एक झाड दिसले तेथपर्यंत तो चालत गेला. आतांमात्र एक पाऊलदेखील पुढे टाकणे त्याला अशक्य वाटू लागले. तहानेने जीव कासावीस झाला होता. म्हणून तो त्या झाडाच्या सावलीत बसला. आतांच कशाला खायचे, थोडे पाणी पिऊन घ्यावे या विचाराने त्याने बुदल्यातले पाणी एक घोटभर तोंडांत हलकेच ओतले. 'हे काय, पाणीं गोड कसे? हे तर सरबत दिसते आहे. झाला की नाही व्यर्थ खर्च!' त्याने बुदली बाजूला ठेवून दिली आणि फराळ करण्याच्या विचाराने पुरचुंडी सोडून पाहिली तर साखरभात. केशराचा व वेलचीचा वास



मन मोहून टाकीत होता. तो विचार करू लागला—'सुनबाई हुशार असेल असे वाटत होते मला. पण अनाठायी खर्च केला की तिने. माझ्यासमोर तिने सरबत साखरभात करून पैसा पाण्यासारखा खर्च केला तर माझ्या मागे काय करील, देवच जाणे.' त्याने तो साखरभात कावळ्याला घातला आणि बुदलीतले सरबत झाडाखालच्या बिळात ओतले.

दुसऱ्या क्षणाला त्या बिळातून एक काळा नागसाप बाहेर आला व आपली फडा उभी करून त्याच्याकडे एकाग्र होऊन पाहू लागला. वसुगुप्ताच्या सर्वांगाला घाम सुटला. एकाएकी त्याच्या अंगात कोठून



शक्ती आली कोणास ठाऊक तो उठला आणि खूप जोराने पळू लागला. अगदी दम लागला तेव्हां तो एका जागी धापा-टाकीत थांबला. तो साप त्याचा जणुंकाही पाठलाग करीत येत असलेला वसुगुप्तला दिसला. जिवाची आशा सोडून तो डोळे मिटून उभा राहला.

"अहो, जरा उठाना! तुम्हांला एक वर देऊन जावे, म्हणतो." असा आवाज त्याला ऐकू आला.

मागेपुढे करीत त्याने किलकिल्या डोळ्यांनी पाहिले तर त्याला त्याच्या अगदी शेजारी एक अत्यंत सुंदर तरुण दिसला. सापाचा पत्ताच नव्हता.

[illegible] आणि त्याने त्या तरुणाला विचारले—"कोण रे तू?"

"मी नागराजाचा मुलगा आहे. त्या झाडाखालच्या बिळात मी राहातो. तहानेने माझा जीव कासावीस झाला होता तेव्हां तुम्ही गोड सरबत बिळात घालून माझा जीव वांचविलात. तुम्ही काय मागाल तो वर मी देईन." तो युवक म्हणाला.

"माझ्या आयुष्यात मला एकच एक इच्छा आहे. मी सुखरूप घरी परत पोचूं शकलो तर तोच मोठा वर होईल!" वसुगुप्त म्हणाला.

"तसं नाही चालायचे. तुम्ही कोणता तरी वर माझ्याकडून मागून घेतल्याशिवाय मी तुम्हांला येथून जाऊ देणार नाही." तो तरुण युवक म्हणाला.

वसुगुप्त थोडा विचार करून म्हणाला—"एक काम करु या का? आमची सुनबाई फार हुशार आहे. तू माझ्याबरोबर माझ्या घरी चल. आमची सुनबाई म्हणेल तो वर मी मागून घेईन. तो वर देऊन मग तू आपल्या वाटेने जा."

तो तरुण युवक "बरं!" म्हणाला. दोघे वसुगुप्ताच्या घरी आले.

वसुगुप्ताने आपल्या सुनबाईला बोला-वून घडलेली सर्व गोष्ट सांगितली व [illegible] सरबत करून दिले होतेस ना, म्हणून हा मुलगा एक वर मागून घ्या असा आग्रह करतो आहे."

सुनबाई काही उत्तर देणार तेवढ्यात मध्येच तिची सासू म्हणाली—"काय हो; खूप दौलत मागून घ्यावी, नाही का?"

वसुगुप्ताला थोडा राग आला. म्हणाला—"धनदौलतीला काही मर्यादा? त्याशिवाय धनदौलतच मागून घेतली तर धनदौलत मिळविण्याच्या प्रयत्नात जो आनंद मिळतो तो काय मिळणार?"

इतक्यात त्याची सून म्हणाली—"मामंजी! तुम्हांला हरकत नसेल व पसंत पडले तर मी सुचविते."

"बोल मुली, बोल, काय मागू?" वसुगुप्ताने विचारले.

"आपल्या धनाचे मालक तुम्ही व्हावे, असा वर मागून घ्यावा." वसुगुप्तची सून म्हणाली.

वसुगुप्ताला हंसू आले. त्याच्या धनाचा मालक तोच तर आहे. तो नाही तर इतर कोण मालक आहे, त्याचा? तरी त्याने त्या तरुणाजवळ सुनेने सुचविलेला वर मागितला.

"तथास्तु!" म्हणत तो तरुण अंतर्धान पावला.



काही दिवस लोटल्यावर वसुगुप्ताच्या स्वभावात बदल होत गेल्याचे दिसू लागले. पैशाचा लोभ व हावरेपणा त्याच्या स्वभा-वात कमी होत गेल्याचे स्पष्ट दिसू लागले. त्याने आपल्या किल्लयांचे जुडगे आपल्या बायकोला दिले व म्हणाला—"घरात गृहिणीचे राज्य असले पाहिजे. घरांत कशासाठी किती खर्च करायचा वगैरे गोष्टी तूच पहात जा. घरात कोणत्याही गोष्टीची उणीव राहता कामा नये. पैसा मिळवायचा तो सुखासाठी खर्च करायचा नाही तर त्याची गरजच काय?"

काही काळ लोटल्यावर त्या प्रदेशात दुष्काळ पडला. वसुगुप्ताने आपले धान्याचे

कोठार खुले करून गोरगरिबांना धान्य वाटले. पोटासाठी मूठभर तांदूळ मागायला आलेल्याला त्याने रिकाम्या हाताने पाठवू नका, असे घरातल्या सर्व लोकांना बजावून सांगून ठेवले. थोड्याच दिवसांत तो एक थोर दानी म्हणून प्रसिद्ध झाला.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा! मला अनेक गोष्टींची शंका आहे. वसुगुप्ताची सून हुशार असती तर तसा निरर्थक वर मागून घ्यायला तिने सांगितले नसते. तरमग वसुगुप्ताने तो वर कां मागून घेतला? त्या वराचा आणि त्याच्या स्वभावात झालेल्या बदलाचा परस्पर काय संबंध होता, मला नाही कळले. या सर्व शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून ही तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

ते ऐकून विक्रमार्क म्हणाला–"सुनेने मागायला सांगितलेला वर निरर्थक आहे, [illegible] आहे. तरी तरुण युवकाला काहीतरी करून निरोप द्यावयाचा होता, म्हणून त्याने तो वर मागितला. परंतु तो निरर्थक वर होता असे मात्र नाही. वसुगुप्त वर मागेपर्यंत आपल्या धनाचा दास-गुलाम-होता. आपल्या आयुष्यात त्याला धनाशिवाय दुसरे काही दिसतच नव्हते. जमविलेल्या धनाचा तो रक्षक शिपाई, एक नोकर तर होता. धनच त्याच्यावर मालकी गाजवीत होते. त्याने आपल्या सेवकाला गोड धोड खाऊ दिले नाही की, पोटभर जेवू दिले नाही. स्वस्थपणे झोपदेखील येऊ दिली नाही. वर मिळल्यानंतर तो आपल्या धनाचा मालक झाला. वर मिळतांच त्याच्या मनावरची धनदौलतीची बंधने तटातट तुटली व तो मुक्त झाला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# काळी मुलगी

रत्नपूरचा राजा बोपदेव हा एक थोर राजा होऊन गेला. त्याची राणी इंदुमती उत्तम गृहिणी होती. त्यांना अपत्य नव्हते. पंधरा वर्षे काही मूलबाळ झाले नाही तेव्हां राणी पुत्र प्राप्तीसाठी अनेक व्रते अनुष्ठाने करून ही यश न मिळाल्यामुळे फार दुःखी झाली. प्रजेने देखील नवस केले की गादीला कोणी तरी वारस व्हावा. परंतु सर्व प्रयत्न अयशस्वी ठरले.

त्याच सुमारास राजवाड्यात एक साधू आला. तो राजाला एकांतात भेटून म्हणाला–"राजा, तू गेल्या जन्मी केलेल्या पापाचे फळ म्हणून तू निपुत्रिक झाला आहेस. त्या पापाचे प्रायःश्चित्त म्हणून तू दोन वर्षे राज्य सोडून हिमालयात जाऊन तपश्चर्या केलीस तर खात्रीने देवाची कृपा होऊन तुला संतानप्राप्ती होईल."

साधूने दिलेल्या उपदेशाप्रमाणे बोपदेवाने राज्यकारभार राणीला पहायला सांगितले आणि साधूबरोबर हिमालय पर्वतात जाऊन तपश्चर्या करू लागला. ऊन, वारा, पाऊस कशाची पर्वा केल्याशिवाय त्याने दोन वर्षे तपश्चर्या केली.

दोन वर्षे पुरी झाल्यावर बोपदेवाकडे तो साधू आला व म्हणाला–"राजा! तुझी तपश्चर्या पूर्ण झाली. आतां तू घरी परत जा. मी देतो ते धनुष्य व बाण घेऊन जा. तुझ्या वाटेवर तुला एक पुष्पवाटिका लागेल. तीत तुला रंगारंगाची रानडुकरे आढळतील. त्यापैकी कोणत्यातरी एका डुकराची या बाणाने शिकार करून त्याचे मांस आपल्या राणीला खायला दे. तुला अपत्यलाभ होईल."

बोपदेव ते धनुष्यबाण घेऊन निघाला. तो पुष्पवाटिकेच्या मधून जाऊ लागला

तेव्हां त्याला पांढरी, काळी रानडुकरे कळपाने धावत असलेली दिसली. त्याने सोडलेला एक बाण एका काळ्या रानडुकरीला लागला. त्याने तिचे मांस राणीला खायला दिले. थोड्याच दिवसात राणी इंदुमती गरोदर असल्याचे कळले.

राजाला आनंद झाला. त्याला मुलगा होणार अशी स्वप्नेदेखील पडु लागली. त्याच्या राज्यात सर्व लोक गोरे पान, चंपई रंगाचे होते, परंतु त्याला मुलगी झाली, ती काळी होती.

तिला पाहून सर्व राजाप्रजा निराश झाले. फक्त वडीलधारी मंडळी म्हणाली— "राजाला इतक्या उशिरां का होईना, एक अपत्य झाले ना, ते पुरे नाही का?"

सोमदेव मात्र फार दुःखी होऊन म्हणाला— "दोन वर्ष तपश्चर्या केली ती याच काळ्या मुलीसाठी का?"

राणी इंदुमतीने आपल्या मुलीचे तोंड पहायला देखील नाकारले. राजाचे प्रमुख सल्लागार परस्परांशी विचार करू लागले.

एकजण म्हणाला—"महाराज निराश झाले आहेत. हल्ली राज्यकारभारातदेखील त्यांचे लक्ष नाही. परंतु यात त्या बिचाऱ्या मुलीचा काय अपराध? ती काळी कां झाली, हे देवाला माहीत! राजा व राणी निराश होऊन बसले तर काहीतरी दुसरा उपाय नको का करायला?"

परंतु उपाय कोणता, कोण करणार हे मात्र कोणी बोलला नाही. तेव्हां दरबारी जादूगार सोमनाथ म्हणाला—"मी काही जादू करून पाहिली तर?"

"पहाच! तुझी गोष्ट आम्ही सर्व विसरूनच गेलो होतो. तुझ्या इंद्रजाल विद्येने राजाचे व राणीचे मन पालटले तर आणखी काय पाहिजे?" प्रधान म्हणाला.

दुसऱ्या दिवशी सकाळी सोमनाथ आपल्याबरोबर आवश्यक सर्व सामुग्री घेऊन राजवाड्यात आला. ते सामान म्हणजे, एक लोखंडी नळी ती उभी धरण्यासाठी एक स्टँड आणि एक पांढरा चेंडू, एवढेच.

त्याने राजा व राणीसमोर त्या स्टँडला ती नळी उभी बसवून ठेवली व म्हणाला— "महाराज, महाराणी! आपल्यासारखी मी तपश्चर्या केली नाही की काही व्रते अनुष्ठाने करून पुण्य संपादन केले नाही. मी अगदी सामान्य मनुष्य आहे. तरी मी एक अत्यद्भुत गोष्ट आपणांला करून दाखवितो. लक्षपूर्वक पाहण्याची कृपा करावी."

असे सांगून सोमनाथने आपल्या हातातला पांढरा चेंडू त्या नळीत वरून घातला आणि आपल्या जादूच्या कांडीने तो त्या नळीत खुपसून दाबला. तो नळीच्या खालच्या बाजूने येऊन खाली टेबलावर पडला. त्याने तो उचलून नळीच्या वरच्या बाजूने पुन्हा तसाच जादूच्या कांडीने आत खुपसला: चेंडू खाली टेबलावर पडला. परंतु या खेपेस तो पांढरा नव्हता काळा होता.

"पाहिलेत महाराज! महाराणी! पांढरे होते ते कसं काळं झालं ते. पांढरं किंवा





…ळं खरं पाहिले तर खरं नसतंच. केवळ …ो आपला भ्रम असतो. आणखी एकदां लक्षपूर्वक पहा!" असे सांगून सोमनाथने तो काळा चेंडू नळीच्या वरच्या बाजूने नळीत खुपसला. या खेपेस नळीतून खाली टेबलावर काळा चेंडू पडला, पांढरा पडला नाही.

"पाहिलेत रंगात काही नाही. तो शाश्वत नसतो. राजकन्या आज काळ्या दिसत असल्या तरी उद्यां नाही तर आणखी काही काळाने गोऱ्या होतील, हे कोणाला काही सांगतां येईल का? त्यांचा जन्म देवाच्या कृपेने झाला आहे. देव त्यांचा पाठीराखा आहे." सोमनाथ म्हणाला.

सोमनाथाच्या जादूचा परिणाम झाला, असेच म्हटले पाहिजे. कारण, त्या दिवसापासून राजा व राणी दोघांनी आपल्या मुलीला प्रेमाने वागविले.

त्या दिवशी संध्याकाळी. सोमनाथाच्या बायकोने त्याला विचारले—"काय हो, चेंडूचा रंग पालटला कसा?"

ही चेंडूच्या मानाने थोडी चिंचोळी आहे. म्हणून चेंडू नळीबाहेर आपोआप पडणे शक्य नाही. जादूच्या कांडीने आत थोडा खुपसावा लागतो. त्यात आणखी दोन चेंडू असले तर आणखी सहजी होणारे हे काम आहे. जादूचा प्रयोग करण्यापूर्वी या नळीत प्रथम एक पांढरा व त्यानंतर एक काळा चेंडू घालून ठेवला होता. मी वरून पांढरा चेंडू सर्वांसमक्ष आत खुपसल्यावर खाली जो पांढरा चेंडू होता तो टेबलावर पडला. नंतर तो पांढरा चेंडू नळीतून खुपसला तेव्हां खाली काळा चेंडू पडला. तो काळा चेंडू नळीतून खुपसला तेव्हां पांढरा चेंडू खाली पडायला तयार होता व तो पडला." सोमनाथ म्हणाला.

"म्हणजे ही लबाडी अगदीच सोपी की हो!" सोमनाथची बायको म्हणाली.

"सांगितली तर सोपी, परंतु पाहणाराला अत्यद्भुत वाटणारी!" सोमनाथ म्हणाला.



# चौथा शिष्य

कृष्णशास्त्री नावाचे एक गुरु होते. त्यांच्या गुरुकुलात पुष्कळ शिष्य होते. कृष्णशास्त्री उत्तम गुरु म्हणून जवळपासच्या पंचक्रोशीत प्रसिद्ध होते. त्यांना वार्धक्य आले तेव्हां गुरुकुलाची जबाबदारी कोणावर टाकावी, हा विचार त्यांच्या मनात आला. कोणत्यातरी शिष्याची निवड करण्याचे त्यांनी ठरविले. त्यांना आपली गादी संभाळण्याची योग्यता असणारे चौघे आढळले. त्यांच्या पैकी एकाची निवड करावयाची होती.

त्यांनी त्यांना बोलावून विचारले—"या गुरुकुलाची जबाबदारी मला कोणावर तरी टाकणे भाग आहे. तुमच्यापैकी जो कोणी आत्मविश्वासाने पुढे येईल त्याला मी हे काम द्यावे, म्हणतो. बोला तर कोण घेणार जबाबदारी?"

"माझी परीक्षा घ्यावी, मी जबाबदारी घेऊं शकेन." एकामागून एक तिघे म्हणाले.

"तुझं म्हणणे नाही कळलं?" गुरूने चौथ्याला विचारले.

तो म्हणाला—"मी आपला शिष्य आहे. माझ्या लायकीची माहिती आपणांस माझ्यापेक्षां जास्त आहे! म्हणून मी पुढे येण्याचे धाडस केले नाही!"

गुरूने त्याच शिष्याची निवड करून त्याला आपला वारस नेमले.





# छोटूची मोठी करामत

फार पूर्वी एका डोंगराळ प्रदेशात एक छोटेसे खेडे गाव होते. ते खेडे गाव अनादिकाळापासून एका जमिनदाराचे इनाम गाव होते. ते पिढ्यान्‌पिढ्या त्या जमिनदाराच्या कुटुंबियांकडेच होते. त्या गावातले खेडूत भोळेभावडे होते तसा तो इनामदारदेखील भोळा भावडाच होता. शेतात पीक निघे त्यातला काही भाग खेडूत जमिनदाराकडे पोचता करीत. तसाच भाजीपालासुद्धां पोचता करीत. इनामदार त्यांना त्याची किंमत देत नसे की काही इनाम बक्षिसदेखील देत नसे. सर्व गावकरी त्या इनामदाराची कुळे होती.

इनामदाराला मांस फार आवडे. मांसाशिवाय त्याला एक दिवसदेखील चैन पडत नसे. गावकरी पाळीपाळीने इनामदाराच्या घरी एक शेर मांस पोचते करीत. तो नियम मोडणाऱ्याला इनामदार शिक्षा करी किंवा त्याला दंड भरावा लागे. त्या गावात एका टोकाला छोटू नावाचा एक गरीब मनुष्य रहात असे. त्याला त्याचे असे कोणीच नव्हते. तो कोंबड्या व बदके पाळून त्यांची अंडी विकी. त्यावर त्याचा उदर निर्वाह चाले.

एकदां इनामदाराकडे मांस पाठविण्याची पाळी छोटूवर आली. तो मांसासाठी जंगलात शिकारीला गेला. त्याच्या नशिबाने फार फिरल्याशिवाय त्याला एक मोठे हरण दिसले. त्याला धरण्यासाठी छोटूला फार कष्ट सहन करावे लागले. ते इनामदाराला नेऊन देणे त्याला मुळीच आवडले नाही. इनामदाराची ती सवय मोडण्याचे त्याने आपल्या मनाशी ठरविले. त्याला एक युक्तीदेखील सुचली.

छोटू त्या दिवशी गावात परतलाच नाही. त्याने हरणाचे डोके कापून छान [illegible] त्याने सर्व पोटभर खाल्ले आणि छान झोप काढली. त्या दिवशी इनामदाराला मांस मिळाले नाही. संतापून त्याने छोटूची चामडी लोळवायचे ठरविले.

दुसऱ्या दिवशी छोटूला खांद्यावर हरणाचे धड घेऊन येताना पाहून इनामदाराचा पारा एकदम उतरला. छोटूने आपल्यासाठी किती कष्ट सहन केले असतील, असा विचार करून इनामदाराने मनातल्या मनात छोटूची फार वाखाणणी केली.



छोटूने ते हरीण इनामदारासमोर ठेवले आणि धापा टाकीत बाजूला उभा राहला. त्याच्याकडे पाहून इनामदाराला त्याची कीव आली. म्हणाला—"काय रे छोट्या! तू काल आला नाहीस! ह्याने तुला काल दिवसभर फार कुथवले असेल नाही?"

छोटू नम्रपणे मान खाली करून नकारार्थी मान हलवीत म्हणाला—"नाही मालक! ती एक लांब कथा आहे. मी एक ससा मारून तो घेऊन येत असतां एका वडाच्या झाडाखाली थांबलो. तेव्हां खांद्यावरचा मेलेला ससा एकदम उडून झाडावर गेला. मी चकित होऊन वर पाहू लागलो तर मला डोळे दिपवून सोडणारे एक ज्योतिर्वलय दिसले. त्या ज्योतिर्वलयात मला एक स्त्री दिसली. ती स्त्री एकाएकी ओरडून मला दटावीत म्हणाली—'काय रे गुलामा! इनामदार म्हणजे काय रे वाटले तुला? तो देव आहे देव! तुम्ही ज्या जमिनीवर राहतां, तुम्ही जे अन्न खाता जे पाणी पिता ज्या हवेत श्वासोच्छ्वास घेतां ते सर्व त्याचे आहे. अशा इनामदाराच्या उपकाराचे ऋण फेडण्यासाठी तू हा एवढासा ससा घेऊन जातो आहेस? अशा लोकांना मी या जगात जिवंत सोडणार नाही. ही गोष्ट सर्वांना सांग.' एवढे कशाला परवाची गोष्टच घ्या, तो लखू गवळी मेला नाही का, त्याने तुम्हांला म्हशीचे दूध पाठविले नाही आणि स्वतः



घ्याला म्हणून त्या देवीनेच त्याला ठार केले. आपल्या मळ्यातली पडवळे आपल्याकडे रामूने पाठविली नाहीत म्हणून त्याने अंथरूण धरले आहे, म्हणे. कोणी कधी लबाडी केली तर ती देवी त्यांचा समाचार घेतल्याशिवाय राहणार नाही. मी लगेच रानात परत गेलो आणि हे हरण घेऊन आलो. त्या देवीने माझी वाखाणणी करीत हरणाचे मुंडके मागितले; मी देऊन टाकले." छोटूने ही कपोलकल्पित कथा सांगितली.

इनामदाराला परमानंद झाला. छोटूकडे अत्यंत प्रेमाने पहात त्याने त्याची पाठ थोपटली.

ती गोष्ट गावभर पसरली. गावकरी पूर्वीपेक्षा मोठमोठ्या भेटी इनामदाराला देऊ लागले. त्यांना देवीचे भय वाटू लागले. छोटू आतां गावात मोठा मानला जाऊ लागला. इनामदाराच्या सेवेतच त्याचा सर्व काळ जाऊ लागला. आता त्याने घरी जाणेच सोडले.

इनामदाराने एके दिवशी छोटूला दोन कोंबडे देऊन ते त्या देवीला बळी द्यायला सांगितले. तो रानात गेला आणि ते कोंबडे भाजून खाऊन दुसऱ्या दिवशी इनामदाराकडे परत आला.

"देवीने आणखी काही सांगितले का रे?" इनामदाराने विचारले.

"देवीने आपल्या भक्तीची फार प्रशंसा केली मालक! माझ्यासाठी एक देऊळ बांधून द्यायला सांग, मालकाला, म्हणाली. परंतु ते देऊळ बांधण्यासाठी कुळांचा पैसा खर्च करू नकोस, स्वतःचा खर्च करायला सांग, म्हणाली!" छोटूने थाप मारली.

"त्या देवीची कृपा असली म्हणजे पुरे, किती का पैसे खर्च होईना!" इनामदार म्हणाला आणि मनोभावे हात जोडून त्याने नमस्कार केला.

गावात कोणाला काही झालं की ते त्या देवीचा कोप आहे असे सांगून छोटू गावकऱ्यांना घाबरवून सोडी. इनामदार [illegible] गेला. त्याने मनमोकळेपणाने खर्च करून गावाबाहेर त्या देवीचे देऊळ बांधले. देवी व इनामदार यांच्यामध्ये ह्या परस्पर प्रेमाभक्तीला कारण छोटूच. देवालयात काय काय, केव्हां व कसे झाले पाहिजे, छोटू देवीला विचारून इनामदाराला सांगे आणि इनामदार त्याप्रमाणे करी. छोटूने देवळात एका अति भयंकर शक्ति व रूप असलेल्या देवीची मूर्ती करवून तिची स्थापना केली.

देवालय बांधून तयार झाले त्या दिवशी एक मोठा उत्सव साजरा झाला. प्रजेला जेवणे देण्यात आली. सर्व खर्च इनामदाराने स्वतःच केला. त्याप्रमाणे कुळाकडून येणारी त्याची प्राप्ती पण वाढली.

दुर्दैवाने त्या प्रदेशात त्या वर्षी दुष्काळ पडला. पाऊस पडला नाही. पिके वाळून गेली. लोक उपाशी मरतात काय, वाटू लागले. इनामदाराची कोठारे भरलेली होती. तरी त्याने दुष्काळाची स्थिती पाहून कोठारांना कुलपे लावली.

एके दिवशी छोटू फाटके मळके कपडे घालून लंगडत धापा टाकीत इनामदाराकडे आला. त्याला पाहून इनामदाराने विचारले– "काय रे झाले तुला?"

"देवीचा कोप झाला आहे, मालक! म्हणाला, 'एक माणूसदेखील उपाशी मेला तर पहा'" छोटू म्हणाला.

"तर मग आपण काय करावे, म्हणते ती?" इनामदाराने विचारले.



"सर्वांना धान्य वाटलं पाहिजे!" छोटू म्हणाला.

"तसं झालं नाही तर काय होईल, म्हणे?" इनामदाराने विचारले.

"सर्व गाव बेचिराख होऊन जाईल, म्हणे!" छोटू म्हणाला.

"धान्याच्या कोठारांनासुद्धां आगी लागतील कदाचित! अरे, छोटू, बरं झालं तर. देवीने सांगितले तसंच करू या तर!" इनामदार म्हणाला.

"थांबा हो, देवीच्या त्या फुकटच्या धमकावण्या नसतील कशावरून? मी ती गोष्ट तिच्याजवळ बोललो होतो सुद्धां! इनामदारांनी वर्षानुवर्षे जमा करून ठेवलेले धनधान्य वांटून टाकावे म्हणतेस? ते म्हणताच तिने माझा गळा दाबला. तुम्ही गप्प रहा, पाहूं तर या काय करते ती!" इनामदारांने आणखी जास्त घाबरून जावे या हेतूने छोटू म्हणाला.

इनामदाराचे सर्व अंग थरारले! इतक्यात दूर कोठून तरी धुराचे लोट आकाशात [illegible] होती. ती पाहून इनामदार छोटूला म्हणाला—"काय रे, तुला अक्कल, बुद्धी आहे का? देवी म्हणजे काही ती महासक्ती रागावली तर तुझा माझा, सर्वांचाच शेवट होईल! एवढे नको का कळायला तुला? काय वाटते काय तुला? या घे किल्ल्या आणि नीघ! कोठारांतले सर्व धान्य गांवकऱ्यांना वांटून टाक!

छोटू काहीच बोलत नाहीसे पाहून इनामदार म्हणाला—"तू आतां काही बोलायचे कारणच नाही!"

छोटूची युक्ती यशस्वी झाली. गावकरी दुष्काळाच्या संकटांतून वांचले. इनामदार जिवंत होता तितके दिवस कोणाच्या हातून चूक झाली तर त्याला देवी सांगेल ती शिक्षा करू लागला. गावकरीसुद्धां देवीला भिऊन रहात आणि आपापली कामे बिनचूक करीत. प्रजेच्या तोंडी इनामदाराचे गुणानुवाद ऐकू येऊ लागले. इनामदाराला तोंड उघडल्याशिवाय बराच फायदा होऊ लागला.





# प्रायःश्चित्त

एका गावी किशनशेट नावाचा एक सावकार रहात असे. तो अव्वाच्या सव्वा व्याज घेऊन कर्जदारांना पिळून काढी. दयादाक्षिण्य नावाची वस्तूच त्याला माहीत नव्हती. त्याचे नांव ऐकूनच गांवकऱ्यांच्या कपाळाला आठ्या पडत.

एके दिवशी गावातल्या काही प्रमुख लोकांनी पार्वतीकाकूंच्या घरी जमून किशनशेटची खोड मोडायचे ठरविले व एक उपाय करण्याचे योजले. त्यांनी योजलेल्या उपायात पार्वतीकाकूचे पात्र मुख्य होते. त्या गोष्टीस त्यांनी होकार दिला.

काही दिवस लोटल्यावर त्या गावात खंडोबाची एक मोठी जत्रा भरली. जत्रेला लोक दूरदुरून दिंड्या घेऊन आले होते. त्या वेळी पार्वतीकाकू नखशिख सोन्याच्या दागिन्यांनी मढून जत्रेला आल्या होत्या. लोकांच्या डोळ्यात खुपेल अशा तऱ्हेनें त्या जत्रेत मोकळेपणी स्वतःला मिरवीत हिंडत होत्या. जत्रेला आलेल्या सर्वांची नजर पार्वतीकाकूंच्या दागिन्यावर खिळून होती. ते सर्व दागिने गावकऱ्यांनी तिला घालायला उसने दिले होते.

तिला ओळखणारे सर्व लोक म्हणू लागले—"पाहिलंत का, उपाशी राहून या वयेंने किती सोने जमविले आहे!" सर्व चकित होऊन तिच्याकडे पहात होते. इतक्यात काही अट्टल चोरांची नजर तिच्या दागिन्यांवर पडली.

जत्रा संपल्यावर रात्री चोर पार्वतीकाकूच्या घरात शिरले व पार्वतीकाकूच्या झिज्या ओढीत विचारू लागले—"काय ग म्हाळसा काकू? कोठे लपवून ठेवले आहेस सर्व दागिने? तोंड उघडून बोल, नाही तर गळा दाबून जीव घेऊ तुझा!"

श्री सुधाकर ना. जाधव

पार्वतीकाकू थरथर कापत म्हणाली– “बाबांनो! घरात दागिने सुरक्षित राहणार नाहीत म्हणून मी सर्व दागिने किशनशेट सावकाराकडे ठेवून दिले आहेत. सणावारी जाऊन घेऊन येते आणि पुन्हां त्यांच्याकडे परत नेऊन ठेवून देते.”

“आत्तां जाऊन पाहतो, सावकाराचे घर चाळून काढतो. तेथे दागिने सापडले नाहीत तर तुला जिवंत सोडणार नाही. लक्षांत ठेव!” पार्वतीकाकूला धमक्या देऊन आणि तिचे हात पाय बांधून ठेवून चोर किशनशेटच्या घरी गेले.

चोर घरात शिरलेले पाहून किशनशेटला धडकीच भरली.

चोरांनी त्याला फरपटत ओढीत तिजोरी जवळ नेले आणि तिजोरी उघडायला सांगितली.

किशनशेटने हात जोडून पाया पडून विनवण्या केल्या–“बाबांनो! माझ्या जवळ काही नाही रे! कोणी सांगितले, तुम्हांला? काही नाही माझ्याकडे!”

“... नाही. प्रथम तिजोरी उघड!” चोरांनी धमकावून सुरा दाखविला. किशनशेटने कापऱ्या हातांनी कनवटीला अडकविलेल्या किल्लच्या काढल्या आणि तिजोरी उघडली. गावकऱ्यांनी गहाण ठेवलेले सर्व दागिने त्या तिजोरीतच होते.

चोरांनी सर्व तिजोरी रिकामी करून पिशव्या भरल्या आणि पार्वतीकाकूच्या घरी जाऊन म्हणाले–“म्हातारे! तू खरं सांगितलेस, हे ठेवून घे!” असे सांगून काही दागिने तेथे ठेवून दिले आणि निघून गेले.

पूर्वी ठरलेल्या योजनेप्रमाणे चोरांचे पात्र धरणाऱ्यांनी आपले काम बेमालूम पार पाडले. चोर गावाबाहेर जातांच ठरल्याप्रमाणे काही लोकांनी त्यांचा पाठलाग करून त्यांना धरले आणि किशनशेटकडून आणलेले सर्व दागिने काढून घेऊन ज्यांनी ज्यांनी किशनकडे ते गहाण ठेवले होते त्यांना गुप्तपणे परत केले. पार्वतीकाकूनेदेखील ‘चोरांनी’ तिला दिलेले दागिने ज्यांचे त्यांना परत केले.



# १५५. डो डो

डो डो नावाचा पक्षी आता या जगात उरला नाही. १६३८ मध्ये काही नावाड्यांना तो मारीशस द्वीपात दिसला. १६८१ मध्ये शेवटचा डो डो मेला. त्यानंतर तसा पक्षी जगात आहे का या गोष्टीची शंका लोकांना वाटू लागली. १८६५ मध्ये डो डो पक्षाचा एक सांगाडा सापडला. तो सांगाडा पाहील्यावर तज्ज्ञांनी असे मत दिले की डो डोचे पंख उडण्या लायक नव्हतेच.”





# अपात्राला वरदान

एका गावी रंगा नावाचा एक उडाणटप्पू निरुपयोगी मुलगा होता. त्याची आई आंबोळ्या बोंडे, वडे वगैरे करून विकी व त्यावर त्या दोघांचे पोट भरे. रंगाला विद्येचा स्पर्श देखील नव्हता. परंतु तो स्वतःला फार हुशार मानी. वडे बोंडे करायला तरी मुलाची मदत होईल अशी आईला फार आशा होती. परंतु तिला निराशच व्हावे लागले. कारण रंगा वडे बोंडे विकत घ्यायला येणाऱ्याशीच भांडत बसे. शेवटी आईने मुलाला शिव्या देऊन घराबाहेर हाकलले.

तेव्हां रंगाचे पौरुष जागे झाले. आपली हुशारी लोकांना कळेल असे काही तरी महत्कार्य करून दाखवायचे असे मनाशी ठरवून तो घराबाहेर पडला आणि गावालगतच्या जंगलात शिरला. जंगलात त्याला थोडी थोडी भीती वाटू लागली. त्यात अंधकार पडू लागला. तो एका झाडावर चढून ते सुरक्षित आहे असे समजून बसला.

त्या झाडावर पुष्कळ दिवसांपासून एक भूत रहात असे. त्या भुताला एक बहीण होती. एका मांत्रिकाने तिला धरून एका बाटलीत कोंबले होते आणि त्या झाडाच्या बुंधात ती बाटली पुरून ठेवली होती. झाडावरच्या भुताने हिंमत करून बहिणीला सोडविले नाही. त्यासाठी कोणाची मदत मिळते का ते भूत वाट पहात होते. रंगा झाडावर चढलेला पाहून त्या भुताने त्याला विचारले–"कोण रे, तू ?"

आपल्यासारखाच कोणीतरी झाडावर चढून बसला असावा असे समजून रंगा म्हणाला–"माझं नाव म्हणशील तर रंगा आहे; फार हुशार आहे बरं का मी !"

"होय का ? तरमग माझं एक लहानसे काम करतोस का ? तुझी मदत मागतो [illegible] कोणी मदत मागतो आहे ह्या विचारानेच रंगा फुलला. म्हणाला–"होहो ! करीन की ! कोणत्या तऱ्हेचीमदत पाहिजे म्हणतोस ?"

"झाडावरून खाली उतर. झाडाच्या बुंधात एक बाटली आहे, ती खणून बाहेर काढ." भूत म्हणाले.

रंगा झाडावरून खाली उतरला आणि बोटांनी जमीन खणता येते का पाहिले. जमीन टणक होती.

"खणायला कुदळ पहार काहीतरी हवं की रे !" रंगा म्हणाला.

"आपल्या अकलेचा थोडा उपयोग करून पहा !" भूत म्हणाले.

रंगाने चारीबाजूला एकदां नजर फिरवून पाहिले. दूर एका जागी दिव्याचा उजेड दिसला. तिकडे कोणीतरी रहात आहे, वाटते ? पहार घेऊन येतो." असे म्हणत रंगा तिकडे निघाला.

तिकडे खरोखरच एका रानटी जातीच्या लोकांची एक झोपडी होती. त्याने त्या झोपडीतल्या रानटी जोडप्याला विचारले–"तुमच्याकडे पहार असली तर देतां का ?"

त्यांना पहार म्हणजे काय हे माहीत नव्हते.

"प्रथम हे सांग, तू कोण ? आणि कशाला आला आहेस ?" त्यांनी त्याला विचारले.



"मी कोण ? विचारतां ? एक हुशार माणूस आहे. एक पहार द्या मला !" रंगा म्हणाला.

त्यांनी दोघांनी त्याला आपल्या बरोबर चलायला सांगून जवळ एका जागी एक साधू रहात होता त्याच्याकडे रंगाला नेले. साधूने त्याला पाहतांच तो एक अक्कलशून्य असल्याचे ओळखले. म्हणाला–"बाबा रे, तू अगदी भोळा भावडा दिसतो आहेस ! तुझं बरे व्हावे, यासाठी तू इच्छिली गोष्ट होईल असा वर मी देतो."

"मला वर बीर काही नको. मला पहार पाहिजे." रंगा म्हणाला.



"पहारसुद्धा देतो रे." असे सांगून साधूने त्याला एक पहार दिली.

रंगाने जणुकाही जग जिंकून आल्या-सारख्या आनंदाने येऊन झाडाच्या बुधांत खणून एक बाटली बाहेर काढली.

झाडावरचे भूत म्हणाले–"शाबास! आतां ती बाटली दगडावर आपट!"

"इतकी मेहनत करून बाहेर बाटली काढली ती फोडण्यासाठीच का? मला अक्कल नाही असे वाटले का रे तुला?" रंगाने भुताला विचारले.

"त्यांत सोनें आहे रे! त्यातलं मी तुला अर्धे देईन!" भूत म्हणाले. मी आपल्या अकलेचा उपयोग करून सोने मिळविणार [illegible] रंगाने ती बाटली दगडावर आपटून फोडली. एक मोठा आवाज झाला आणि बाटलीतून एक बाईचे भूत बाहेर आले.

"कोठे रे आहे माझं सोने?" रंगाने ओरडून विचारले. झाडावरच्या भुताने त्याच्या समोर काही सोन्याची नाणी टाकली. ती आईला नेऊन द्यायचे ठरवून तो घरी निघाला.

वाटेत जोराचा पाऊस सुरू झाला. पावसात इतके दूर चालत जाणे त्याला आवडले नाही. साधूने दिलेला वर त्याला आठवला. त्याने तो वर आठवून मी राहीन त्या प्रदेशात पाऊस पडू नये असा वर मागितला.

झाले, पाऊत तावडतोब थांबला. रंगाला फार आनंद झाला. मनात म्हणाला–'याला म्हणतात, अक्कल, तो आनंदाने घरी गेला आणि आईला ती सोन्याची नाणी देऊन त्याने आपल्या पराक्रमाचे वर्णन करून सांगितले. साधूने दिलेल्या वरदानामुळे मुलाने पाऊस थांबविल्याचे ऐकून त्याची आई घाबरून गेली. ती गोष्ट कोणाला कळली तर लोक येऊन त्याला ठार करतील की काय अशी भीती तिला वाटली. नंतर तिने विचार केला, आपला मुलगा आहे खुळा. त्याला त्याच्या वर प्रसादाने पाऊस थांबल्यासारखे वाटत असेल कदाचित असा विचार [illegible] तिने मनाशी [illegible] केले.

परंतु त्या दिवसापासून त्या देशात पाऊस पडायचा बंद झाला. फार मोठा दुष्काळ पडला. परंतु राजाचा खजिना भरलेला होता व राजाची कोठारे धान्याने भरलेली होती म्हणून राजाने प्रजेला अन्न वाटले. इतर देशातून धान्य मागविले आणि ते वर्ष कसे तरी लोटले. दुसऱ्या वर्षीसुद्धां पुन्हां पाऊस नाही. विचित्र गोष्ट अशी की शेजारच्या देशात पाऊस खूप पडत होता आणि रंगा रहात असे त्याच राज्यात पाऊस पडत नव्हता.

तेव्हां रंगाच्या आईला रंगाने मागितलेले वरदान खरे असल्याचे वाटले. ती आपल्या मुलाला घेऊन तो साधू रहात होता. त्या जागी गेली. परंतु तो साधू तेथे नव्हता. तो कोठे निघून गेला होता हे त्या रानटी जातीच्या जोडप्याला माहीत नव्हते.

रंगाची आई राजाला जाऊन भेटली व म्हणाली–"महाराज! माझ्या मुलाला आपण अभय वचन दिलेत तर पाऊस न पडण्याचे कारण मी आपणांला सांगेन. देशाचे रक्षण कसे करावयाचे आपणच पहावे."

"मी अभयवचन देतो. बोल काय ते!" राजा म्हणाला.

घडलेली गोष्ट निवेदन करून ती म्हणाली–"माझ्या निरुद्योगी मुलाने आपला देशसुद्धा कुचकामाचा करून टाकला. आतां मी तरी काय करू?"



राजाचे डोकेच चालेना. त्याने प्रधानाला बोलावून विचारले–"मी अभय वचन देऊन बांधलो गेलो आहे. आतां आपली अपकीर्ती होऊ नये आणि देशाचे रक्षण व्हावे, यासाठी काहीतरी मार्ग काढा. या पोराला ठार करून काही उपयोग आहे का?"

प्रधानाने क्षणभरच विचार केला आणि म्हणाला–"महाराज! रंगा निरुपयोगी आहे असे कसे म्हणतां येईल? तो जिवंत असला तर आपण चक्रवर्ती महाराजाधिराज देखील व्हाल?"

"ते कसं काय प्रधान?" राजाने विचारले.

रंगा ज्या प्रदेशात किंवा राज्यात राहील त्या देशात पाऊस पडणार नाही. तेव्हां त्याला दोनदोन वर्षे एकेका राज्यात जाऊन रहायला सांगायचे, म्हणजे आपल्या राज्यात पाऊस पडेल व त्या देशात दुष्काळ पडेल. तो देश जिंकणे आपल्याला शक्य होईल." प्रधानाने ती युक्ती सुचविली.

फायदा झाला. काही वर्षांतच शेजार-पाजारची सर्व राज्ये जिंकली गेली व रंगाच्या देशातला राजा, एक चक्रवर्ती राजा झाला.

परंतु त्यानंतर रंगाला पाठवायचे कोठे हा प्रश्न उभा राहिला. कारण चक्रवर्तीच्या साम्राज्यात सर्वत्र दुष्काळाचे संकट येण्याची भीती उत्पन्न झाली. कारण रंगा हा सर्व साम्राज्याचाच नागरिक झाला.

तेव्हां प्रधानाने पुष्कळ विचार करून एक युक्ती काढली. त्याने एक छोटे से राज्य रंगाच्या नावी करून देऊन त्याला त्या राज्याचा राजा केले. त्या राज्यात पाऊस पडेनासा झाला. परंतु चक्रवर्ती रंगाच्या राज्यात अन्न धान्याचा पुरवठा करून त्याची अडचण भरून काढू लागला.

अशातऱ्हेने एका आळशी उडाणटप्पू नालायक माणसाचा सुखाने व आनंदाने संसार थाटला. त्याचे लग्नदेखील झाले आणि तो एक राजा म्हणून प्रसिद्ध झाला.





# दुरून नमस्कार

जनार्दनाचा बाप व्यापार करण्यासाठी एका मोठ्या नगरात रहात असे. त्याने जनार्दनासाठी पुष्कळ धन व ऐश्वर्य मिळवून आपल्या मागे सोडले आणि मरण समयीं त्याला बोलावून म्हणाला–"बाळा, जनार्दना! मीं गेल्यावर तू नगरात राहू नकोस! चांगलीशी जागा पाहून तेथे जाऊन स्थाहिक होऊन रहा. मी जे मिळवून तुझ्यासाठी ठेवले आहे, तुलाच नव्हे, तुझ्या मुलांबाळांना सुद्धा आयुष्यभर पुरेल एवढेआहे." असे सांगून त्याने डोळे मिटले. बाप गेल्यावर जनार्दनाच्या समोर एक प्रश्न उभा राहिला. कोठे जाऊन रहायचे? त्याच्या स्वतःच्या गावात त्याला हिताच्या चार गोष्टी सांगणारे अनेक लोक होते. परंतु ते गाव तितकेसे चांगले नव्हते. पाऊस पाणी त्या गावाला बेताचेच होते.

त्याने आपल्या सर्व इस्टेटीतले थोडे काही विकून थोडे सोने व रोख पैसेबरोबर घेतले व चांगल्या जागेच्या शोधार्थ निघाला. सुमारे एका पंधरवड्याने त्याला एक जागा फार आवडली. ते समुद्र काठचे एक सुंदरसे खेडे होते. जिकडे पहावे तिकडे सुरूची झाडे होती आणि वाळूचे ढिगारे जागोजागी होते. ती जागा उघडी समुद्र काठची, थंड व शांत अशी होती. जनार्दनाचे मन भुरळून गेले. त्याने सुरूच्या झाडांतच एक समतल जागा पाहून एक झोपडे बांधले. रहाण्याचे ठरवून राहिला. तो दररोज एका होडीत बसून समुद्रात विहार करायला जाऊ लागला.

ते खेडेगाव मासे धरणाऱ्या कोळ्यांचे होते. त्यांनी सुखाने ऐष आरामात राहणाऱ्या एका माणसाला पाहिले तेव्हां त्यांना त्याचा हेवा वाटू लागला.

एके दिवशी जनार्दन, दुपारच्या वेळी कडक ऊन पडले असतां सुरूच्या दाट झाडीत



गार सावलीच्या जागी खाट टाकून पडला होता. बाजूला उन्हाच्या झळा लागत होत्या. परंतु जनार्दन बसला होता त्या जागी गार वारा होता. कोणीतरी हाक मारल्याचा भास झाला आणि जनार्दनाची झोप मोडली.

खाटेजवळ एक माणूस उभा होता. उभ्या आडव्या अंगाचा तो माणूस तांबूस दाढी असलेला होता. त्याचे धोतर काळ्या रंगाचे होते. त्याच्या गळ्यात कावळ्याच्या पिसांची माळ होती. तो जनार्दनाला म्हणाला–"ए मुला! तांब्या भरून प्यायला गार पाणी तर घेऊन ये!"

जनार्दन पाणी आणायला निघाला आणि पुन्हां हाक मारून म्हणाला–"आणि हे बघ

का प्यायला! घसा कोरडा पडला आहे!"

"बरं हो!" असे म्हणत जनार्दन निघून गेला.

"त्यांत एक लिंबू पिळून आण, काय?" असे जोराने त्या दाढीवाल्याने सांगितले.

जनार्दन त्या माणसाने सांगितल्याप्रमाणे तांब्याभर पाणी आणि एका भांड्यात मीठ घालून व लिंबू पिळून ताक घेऊन आला.

तोंपर्यंत तो मनुष्य जनार्दनाच्या खाटेवर आडवा झाला होता. त्याने उठून गटागटा सर्व ताक पिऊन टाकले. "भांडे चांगले आहे की रे, कोणी चोरून नेईल बरं का, आत ठेवून ये!" तो जनार्दनाला म्हणाला.

जनार्दन झोपडीत भांडे ठेवून आला. तोंपर्यंत तो मनुष्य पुन्हां खाटेवर आडवा होऊन घोरू लागला होता. जनार्दन आल्याची चाहूल लागतांच म्हणाला–"काय पण ऊन पडले आहे. डोळ्याची झापडे उघडतच नाहीत! एक झोंप घेऊन उठतो बरं का?" असे सांगून त्याने ताणून दिली.

जनार्दनाच्या तोंडातून एक शब्द फुटेल तर शपथ. त्याला त्या माणसाची दहशतच बसल्यासारखे झाले होते. तो झोपडीच्या बाहेर ओटचावर 'हरि हरि' म्हणत संध्याकाळपर्यंत बसून राहला. काळोख पडल्यावर त्या माणसाने उठून जांभई दिली व

एकटा पडलो आहे या जगात! घरात कोणी दिवा लावायला सुद्धा राहिला नाही." असे म्हणत सरळ जनार्दनाच्या झोपडीत गेला आणि त्याने दिवा लावला.

त्याचा तो अधिक प्रसंग पाहून जनार्दनाला थोडासा राग आला. तरी राग गिळीत थोडचाशा नाखुशीच्या स्वरात म्हणाला–"चांगला काळोख पडला आहे. तुला आतां गेले पाहिजे!"

त्या माणसाने जनार्दनकडे जराशा करड्या नजरेने पहात म्हटले–"कोण रे तू, माझ्या घरात शिरून मलाच बाहेर जा म्हणून सांगायला? आदर दिला तरच मिळतो. मर्यादा संभाळून बोल." असे म्हणत त्याने जनार्दनचा दंड धरून त्याला दारातून बाहेर ढकलले व आतून दाराला कडी लावून घेतली.

रात्रभर जनार्दन दार वाजवीत राहला. "माझ्या घराचे दार मोडले फुटले तर तुलाच भरून द्यावे लागेल, सांगून ठेवतो." असा उलटा दम देत तो माणूस झोपला.

दुसऱ्या दिवशी उजाडले.

गावकरी मासे धरायला आपापली जाळी घेऊन निघाले. जनार्दनने त्या सर्वांना बोलाविले आणि घडलेली गोष्ट सांगून म्हणाला–"पहा, हा अन्याय!"



इतक्यात तो माणूस दार उघडून बाहेर आला आणि म्हणाला–"हा कोठून आला बुवा? कोणी वेडा पीर दिसतो आहे. माझ्या घरासमोर उभा राहून रात्रभर मलाच म्हणतो आहे, हे माझं घर आहे, म्हणून."

आतां मात्र जनार्दन स्वतःला आवरू शकला नाही. त्याने लोकांना विचारले–"तुम्हीच सांगा, हे घर माझे की त्याचे? तुम्ही सर्व दररोज या वाटेने येतां जातां आहां, म्हणून विचारतो आहे. या भामट्याची थोडी कान उघाडणी करा!"

सर्व गावकऱ्यांनी जनार्दनाला पायापासून डोक्यापर्यंत पाहिले व विचारले–"कोण रे

तू? चोर दिसतो आहेस! हे घर या दाढी वाल्याचेच तर आहे. आम्ही दररोच यालाच तर या घरात पाहतो आहो. आम्ही आजपर्यंत तुला पाहण्याचे पाप केले नाही. स्वत:चा जीव तुला हवा असेल तर आलास तेथे निघून जा. नाहीतर तुझ्या सर्वांगाची हाडेच मोडतील, लक्षात ठेव."

जनार्दन चकित झाला. गावकरी सर्व एक होऊन आपलं झोपडं आणि झोपडचातले सामान व ऐवज लुबाडण्यासाठी हा डाव टाकीत आहेत तर! तेव्हां त्याने एक दोनदां वेडयासारखं डोके हलविले वेडयासारखे डोळे गरगर करून एक दोनदां त्यांच्याकडे पाहिले आणि विचारले—"आज माझे डोळे उघडले, आजपर्यंत मी हे आपलेच घर आहे, असे समजत होतो. तर मग माझ्या पेटीत जो ऐवज आणि सोने आहे तेदेखील माझे नाही म्हणतां का?"

या माणसाचे डोके आतां नक्कीच फिरले आहे. बुद्धी ठिकाणावर नाही असे समजून ते म्हणाले—"तुझे कोठून असेल, आमचेच [illegible] सांग तर!"

जनार्दन दूर एका जागी वाळूचा एक मोठा ढिगारा होता त्याच्याकडे बोट दाखवीत म्हणाला—"माझं लोखंडी पेटी भरून सोने त्या ढिगाऱ्यात आहे."

ते ऐकूताच कोण कोणाला जास्तच जास्त सोने मिळते या विचाराने ते सर्व काळी घाईघाईने तिकडे धावले. त्या दाढीवाल्यासह सर्वच्या सर्व तिकडे निघून गेल्यावरोबर जनार्दनाने निश्चितपणे समाधानाचा श्वास सोडला आणि एका सुरूच्या झाडाच्या बुंधात त्याने पुरून ठेवलेली पेटी काढून घेऊन होडक्यात बसून त्या दुष्टांच्या दृष्टीआड झाला.

चांगलीशी जागा पाहून रहायला वडिलांनी सांगितले होते त्याचा अर्थ चांगली माणसे हा त्याला कळला. तो स्वत:च्या गावी गेला आणि त्याच्याशी प्रेमादराने वागले त्यांच्यामध्ये राहून त्याने पुढील आयुष्य आनंदाने घालविले.





# डाव फसला

एका खेडेगावात शिवू नांवाचा एक मध्यम स्थितीतला शेतकरी रहात असे. त्याच्या जवळ चार-पाच एकराची शेती होती आणि चार गुरे होती.

एके दिवशी त्या गावाचा कुलकर्णी विष्णुअण्णा शिवूला येऊन म्हणाले—"आपल्या गावच्या एका ब्राह्मणाने आपली पाच एकर जमीन विकायला काढली आहे. एकरी दोनशे वराहप्रमाणे विकायला तयार आहे तो. पहा तुला हवी तर!"

शिवू ती जमीन विकत घ्यायला तयार झाला आणि त्या ब्राह्मणाला एक हजार वराह देऊन त्याने विक्रीखत करून घेऊन जमीन ताब्यात घेतली. तो ब्राह्मण पैसे घेऊन परगावी निघून गेला.

एक महिना जेमतेम गेला असेल, विठू नावाचा त्याच गांवचा एक लोभी शेतकरी ब्राह्मणाने स्वस्तात शिवूला जमीन विकल्याचे ऐकून विष्णुअण्णाकडे आला व म्हणाला—"अहो! विष्णुअण्णा, तुमच्या सारख्या कुलकर्ण्याला मी कोठे जगात पाहिले नाही. ती पांच एकर जमीन शिवूला देवविलीत आणि या कानाची गोष्ट त्या कानाला कळू नये! आश्चर्यच आहे बुवा! माझ्याकडून चार पैसे मिळाले नसते असे वाटलं होय तुम्हांला?"

कुलकर्णी लोभी होता. तो शिवूच्या हातची जमीन विठूला मिळवून देण्याचा विचार करू लागला. दोघांनी एक कारस्थान करायचे ठरविले.

एके दिवशी शिवूने आपल्या माणसांना शेत नांगरायला आपल्या नव्या शेतात पाठविले. तेव्हां विठूने त्यांना अडविले व म्हणाला—"खबरदार! आत पाऊल ठेवाल तर! तंगड्या मोडीन एकेकाच्या! हे शेत माझे आहे!" शिवूचे लोक निघून गेले.

श्री व्यं. श्री. बापट



दुसऱ्या दिवशी शिवू विठूच्या घरी गेला आणि विचारू लागला—"काय रे विठू! माझ्या लोकांना तू माझ्या शेतात जाऊ दिले नाहीस म्हणे?"

"होय! भिती कोणाची रे? मी विकत घेतलेल्या शेतात तुझे लोक शिरले तर गप्प बसेन होय? मीच येणार होतो ही गोष्ट तुला विचारायला!" विठू म्हणाला.

ते ऐकून शिवू थक्क झाला. म्हणाला—"मला कुलकर्ण्यांनी ते शेत देवविले, मी एक हजार वराह मोजले आहेत, फुकट नाही घेतले!"

शिवू विठूला घेऊन कुलकर्ण्यांकडे गेला. त्याने कुलकर्ण्यांना विचारले—"काय हो [illegible] विठूला विकलेत म्हणे?"

कुलकर्ण्यांनी कागदपत्र काढून उलटून सुलटून पाहल्याचे सोंग केले व म्हणाला—"होय बुवा! चूक झाली खरी! त्या ब्राह्मणाकडे हे शेत दान म्हणून आले होते. पण त्यांच्या नांवी करून दिल्याचे कागदपत्र नव्हते. त्यांच्याकडून ते तुम्ही विकत घेतलेले लक्षात नाही राहले. यांनी त्याच्याकडून विकत घेतल्याची नोंद आहे, जुन्या हिशोबात. मी नवीन आलो ना, त्या ब्राह्मणाने मला फसविले हो!"

शिवू म्हणाला—"ठीक आहे, तरमग माझे पैसे परत करवा! नाहीतर मला शेत नांगरू द्या! ब्राह्मणाने मला शेत विकल्याचे तुम्हीच नाही का मला लिहून दिलेत?"

"माझी जमीन तू विकत घेतलीस हा तुझाच अपराध! आतां कसा नांगरील रे? आपले पैसे त्या ब्राह्मणाकडून वसूल करून घे! नाही तर, जा न्यायाधिशाकडे फिर्याद कर!" विठू म्हणाला.

"ठीक! तरमग न्यायाधिशाकडेच जाऊन न्याय निवाडा करवून घेतो!" असे सांगून शिवू निघून गेला. त्या दोघांनी आपल्या विरुद्ध तो डाव टाकल्याचे शिवूला कळले.

शिवू निघून गेल्यावर कुलकर्णी विठूला म्हणाला—"महाराजांच्या कचेरीत माझ्या ओळखीचा एकजण आहे [illegible] शेत [illegible] असल्याचे व सारा भरीत असल्याचे लिहून घेऊन मी येतो. तोच जमिनीचा सारा वगैरेचा हिशोब ठेवतो. ठेवील तो लिहून कोठेतरी! म्हणजे ती जमीन तुझी झालीच समज!"

दुसऱ्याच दिवशी दोघे कचेरीच्या गावी त्या अधिकाऱ्याला भेटून त्याच्या हातावर शंभर वराह ठेवीत म्हणाले—"हे काम कसं ते पुरे का!"

तो अधिकारी लबाडीचा हिशोब बाहेर काढून ते फार धोक्याचे काम असल्याचे सांगीत म्हणाला—"काम पुरे झाल्यावर आणखी निदान पन्नास वराह द्यावे लागतील."

विठूने होकार दिला. आपला डाव साधल्याच्या आनंदात दोघे आपल्या गावी परतले.

दुसऱ्या दिवशी शिवू, कुलकर्णी आणि विठू न्यायाधिशाकडे गेले आणि त्यांना जे काही सांगावयाचे होते ते सांगितले.

न्यायाधिशाने शिवूला विचारले—"काय रे, तू शेत विकत घेतल्याचे काही प्रमाण आहे का तुझ्याकडे?"

"या कुलकर्ण्यांनीच माझ्याकडून त्या ब्राह्मणाला एक हजार वराह देववून त्यांच्याकडून त्यांनी मला शेत विकल्याचे विक्री खत करून दिले." विठू म्हणाला.



न्यायाधिशाने विठूला विचारले—"काय रे, मग तू ते शेत विकत घेतल्याचे कागदपत्र कोठे आहेत?"

विठू खोट्या पावत्या न्यायाधिशाला दाखवून म्हणाला—"मी शेत नागरीत असून जमिनीचा सारा नियमितपणे भरीत असल्याच्या या पावत्या आहेत, पहा!"

न्यायाधीश म्हणाला—"तुम्ही आणखी दोन दिवसांनी या. मी सर्व कागदपत्र पाहून कचेरीतून नोंद वगैरे मागवितो व काय तो न्याय निवाडा करतो. सर्व नोंद कचेरीत असतेच!" असे सांगून त्याने त्यांना निरोप दिला.

न्यायाधिशाकडून परत येतांना विठू कुलकर्ण्यांना म्हणाला—"या व्यवहारात शिवूला एक हजार वराहांचा फटका बसणार आणि शेतसुद्धां हातातून जाणार! काय पण तुमचे डोके आहे?"

"न्यायाधीश माहिती मागविणार ती त्या आपल्या माणसाकडेच जाणार. तो आपल्याला अनुकूल असलेल्या गोष्टीच लिहून पाठविणार!" कुलकर्णी म्हणाला.

तिसऱ्या दिवशी महाराजांच्या कचेरीतून दोघां जणांनी येऊन न्यायाधिशाला काही कागदपत्र आणून दिले. ते कागदपत्र वाचून न्यायाधीश कुलकर्ण्याला, विठूला आणि शिवूला बोलावून म्हणाला—"तुमच्या फिर्यादी संबंधीचे कागदपत्र कचेरीतून आले आहेत!"

ते ऐकून विठू व कुलकर्णी परस्परांकडे पाहू लागले, परंतु काही बोलले नाहीत. शिवूला आपल्या तर्फेच निवाडा होणार या गोष्टीची खात्री होती.

[illegible] जमीन शिवूचीच आहे. ती जमीन महाराजांच्या वडिलांनी शिवूच्या आजोबांना दान केली होती. शिवूच्या वडिलांनी ती जमीन गरीब ब्राह्मणाला दान केली. तीच जमीन शिवूने आतां त्या ब्राह्मणाला एक हजार वराह देऊन विकत घेतली. त्यात त्याची काही चूक नव्हती. आतां शिवूला नुकसान भरपाई म्हणून कुलकर्ण्यांनी आणि विठूने मिळून एक हजार वराह द्यावेत!"

दोघांनी एकदम विचारले—"ते कां?"

"कारण तुम्ही दोघांनी मिळून खोटचा पावत्याच तयार नाही करविल्यात तर महाराजांच्या कचेरीतल्या एका अधिकाऱ्याला लांच देऊन त्याच्याकडून ही लबाडी करविलीत. म्हणून महाराजांनी स्वतः ही शिक्षा तुम्हांला केली आहे." न्यायाधीश म्हणाला.

कुलकर्ण्यांनी व विठूने दोघांनी मिळून शिवूला एक हजार वराह दिले. हेरांकडून कचेरीत झालेल्या लांचलुचपतीची गोष्ट महाराजांच्या कानावर आली होती.






इंद्र पाठीशी आहे तेव्हां भिण्याचे काय कारण या घमेंडीत राहू साहस करून आंजनेयावर धावून गेला. आंजनेयाने राहूला पाहिले व त्याला वाटले, चांगले फळ आहे खायला. तो ते धरायला पुढे सरसावला. आंजनेयाला पुढे येत असलेला पाहून राहूची अक्षरशः गाळण उडाली. त्याने तेथून पाय काढला आणि इंद्राकडे धावला आणि म्हणाला—"हा मुलगा मला खायला येतो आहे, मला वांचव!"

"घाबरू नकोस!" असे म्हणत इंद्राने आपल्या ऐरावताला पुढे केले.

कर्कश आवाज काढीत पुढे येत असलेल्या मदोन्मत्त ऐरावताला पाहून व त्याला एक पांढरे शुभ्र फळ समजून ऐरावताला धरायला आंजनेय पुढे येऊ लागताच ऐरावताला देखील पाय मागे घ्यावा लागला.

तेव्हां मात्र इंद्राला राग आला. त्याने आपले वज्रायुध आंजनेयावर टाकले. वज्राघाताने आंजनेयाच्या हनुवटीला लागले. तो उदयाचलावर बेशुद्ध होऊन पडला.

ते पाहून वायुदेवाला राग आला व त्याने आपला संचार बंद केला.

मध्यंतरी अंजना आपल्या झोपडीत परत येऊन पाहते तर तेथे अंथरुणावर आंजनेय नव्हता. ती मुलाला शोधीत रडू लागली.

तेव्हां केसरी येऊन तिला धीर देत म्हणाला—"रडू नकोस! तुझा मुलगा उगवत्या सूर्याला फळ समजून खायला आकाशात उडाला. ती गोष्ट राहूकडून इंद्राला



कळली. इंद्राने आपले वज्रायुध टाकून तुझ्या मुलाला घायाळ केले आहे. ते ऐकून वायूला राग आला व त्याने वाहणे बंद केले. तुझ्या मुलाला कोणताही अपाय घडणे शक्य नाही, तो सुरक्षित परतेल."

अंजनेच्या मनाचे समाधान झाले.

वायुदेवाने वाहणे बंद करताच देव घाबरले. ते ब्रह्मदेवाकडे धावले. त्यांनी वज्रायुधाने आंजनेयाच्या हनुवटीला लागले असल्याचे व त्यामुळे वायूने रागावून संचार बंद केल्याचे सांगितले व या संकटातून सोडविण्यास ब्रह्मदेवाजवळ विनंती केली.

ब्रह्मदेव आपल्या हंसवाहनावर वायुदेवाकडे म्हणाला—"बाबा रे! तूच सर्व प्राणि- ... प्राण स्वरूप आहेस. तूच रागावलास तर ही सृष्टी कशी चालेल?"

वायुदेव आंजनेय बेशुद्ध होऊन पडला होता तेथे गेला व त्याने त्याला उचलून आणून ब्रह्मदेवासमोर ठेवले व म्हणाला— "पाहिलेत, हा कोणत्या स्थितीत आहे तो?"

ब्रह्मदेवाने त्याच्या अंगाला हाताचा स्पर्श केल्याबरोबर आंजनेयाच्या देहात चैतन्य निर्माण झाले.

ते पाहून वायुदेवाला आनंद झाला व तो त्रिलोकात संचार करण्यासाठी निघाला. ब्रह्मदेव देवांना म्हणाला—"हा मुलगा सामान्य नसून त्रिलोकास सुखी करण्याचे सामर्थ्य याच्या अंगी आहे. याला आपण निरनिराळे वर देऊन याला सर्व तऱ्हेने समर्थ केले पाहिजे. हा साक्षात् शंकराचा अवतार आहे!"

तेव्हां भूदेवीने आंजनेयाला सर्व वेदशास्त्रात प्राविण्य प्राप्त करण्यास शक्ती दिली. त्याला पाण्याचे भय राहणार नाही, असा वरुणाने वर दिला. कुबेराने त्याला युद्धात अजेय होण्याचा वर दिला. विश्वकर्म्याने कुंडले दिली. इंद्राने आंजनेयाला हनुमान हे नवे नाव दिले. वज्रायुधाने देखील त्याच्या देहाला अपाय होणार नाही, असा वर देऊन त्याला वज्रदेही केले. ब्रह्मदेवाने हनुमानाला चिरंजीवी केले.

... मुलाची निष्कलंक कीर्तिचंद्रिका त्रिलोकाला सुखी करील. तो अद्वितीय पराक्रमी होईल. अणिमागरिमादिक अष्टसिद्धी त्याला सहजी प्राप्त होतील. मनात विचार येतांच त्याला विश्वदर्शन होऊ शकेल. कामवासनेचा लवलेशही त्याच्या मनात राहणार नाही. त्याला इच्छा रूप प्राप्त होईल. असामान्य शौर्य, साहस व पराक्रम, दया इत्यादि गुण सर्वदा त्याच्या अंगी वास करतील." असा आशीर्वाद देऊन ब्रह्मदेव निघून गेला. हनुमानाचे सूर्याला धरण्यासाठी केलेले अद्भुत कार्य ऐकून व त्याच्या शौर्य पराक्रमाची वाखाणणी करीत देव निघून गेले.

वायुदेवाने हनुमानाला उचलून नेऊन अंजनेच्या हातात दिले. मुलगा परत आलेला पाहून त्या मातेच्या डोळ्यांत आनंदाश्रू आले. त्या प्रदेशात तपश्चर्या करणारे तपस्वी मुनी हनुमानाचे अद्भुत कार्य ऐकून आश्चर्य करू लागले. सर्व हनुमानाच्या शौर्याची वाखाणणी करू लागले.

आपल्या मुलाला सर्व देवांनी वर दिल्याचे ऐकून अंजनेला परमानंद झाला.

हनुमान लहानाचा मोठा होऊ लागला. त्याला सर्व गोष्टींचे ज्ञान असून ही तो आपला खटचाळपणा करीतच राहिला. मर्कट चेष्टा करणे सोडण्याची बुद्धी त्याला



झाली नाही. आईवडिलांनी किती समजावून सांगितले तरी बालस्वभावाप्रमाणे तिकडे दुर्लक्ष करून हनुमानाने आपल्या मर्कट चेष्टा चालू ठेवल्या.

त्रिलोकाचे रक्षण करण्यासाठी जन्म घेतलेल्या हनुमानाने लहानपणी इतका खटचाळपणा सुरू केलेला पाहून ब्राह्मणांना काळजी वाटू लागली. त्याला रागावून गप्प करणे तर अशक्यच होते. त्याला शाप देणे अशक्य होते. कारण ब्रह्मदेवाने त्याच्यावर कोणत्याही शापाचा परिणाम होणार नाही, असा वर दिला होता. या शिवाय तो वज्रदेही व महाबली होता. त्याला कोणी अडविणारा, थांबविणारा



नसला तर तो त्रिलोक उध्वस्त करील की काय अशी भीती वाटू लागली. म्हणून ब्राह्मणांनी त्याला वर दिला की हनुमानाला त्याच्या अंगात किती शक्ती आहे त्याची कल्पनाच असू नये!

त्या दिवसापासून हनुमंताच्या स्वभावात व वागणुकीत एकदम बदल झाला. त्याच्या वागणुकीत सात्विकपणा आला. अंजना व केसरी दोघांनी मुलाच्या मनात झालेला तो बदल पाहिला. त्यांना आनंद झाला.

एके दिवशी अंजना हनुमंताला म्हणाली– "बाळा! तुला माहीत नाही, किष्किंधा नगरीत वाली व सुग्रीव नावाचे दोघे भाऊ आहेत. माझी आई अहिल्या हिच्या इंद्रापासून व सूर्यापासून ते दोघे जन्मले. आईच्या या गुप्त प्रेमाची गोष्ट कळल्यावर माझे वडील गौतम यांना राग आला व त्यांनी दोघांना 'वानर व्हा' असा शाप दिला. तरी ते तुझे मामा आहेत. तेव्हां तू किष्किंधेला सुग्रीवाकडे जाऊन रहा. ते दोघे आपसांत भांडले तर तू वालीला ठार करू नकोस, एवढे सांगून ठेवते."

हनुमंताने आईला नमस्कार करून तिचा निरोप घेतला आणि किष्किंधेला आला. वाली व सुग्रीवाने आपल्या भाच्याला प्रेमाने ठेवून घेतले. हनुमान सुग्रीवाचा मंत्री म्हणून त्याच्याकडे राहू लागला. त्याच्या मनात वेदशास्त्राचा अभ्यास करण्याची इच्छा उत्पन्न झाली.

एक दिवशी हनुमान सूर्योदयाच्या वेळी आकाशात उड्डाण करून सरळ सूर्याकडे गेला व हात जोडून समोर उभा राहिला.

"संकल्पसिद्धिरस्तु!" असा आशीर्वाद देऊन सूर्याने त्याला विचारले– "काय रे बाबा, कशासाठी आला आहेस?"

"भास्करा! मी आपणांकडे वेदशास्त्र शिकून घेण्यासाठी आलो आहे." हनुमान म्हणाला.

"तू म्हणालास ते बरोबर! पण ते जमायचे कसे? मी मेरु पर्वताभोवती अति [illegible] शास्त्र शिकून घेणे तुला फार जड जाईल!" सूर्य म्हणाला.

त्यावर हनुमानाने विचारले– "महात्मन्! तरमग उदयाचलावर एक पाय आणि अस्ताचलावर एक पाय ठेवून उभा राहून शिकू म्हणता का? की आपल्या पुढेपुढे चालत शिकू म्हणता?"

ते ऐकून सूर्याला फार आनंद झाला. म्हणाला– "बाळा! तुझ्यासारखा थोर पराक्रमी त्रिलोकात दुसरा कोणी नाही. दोन्ही पर्वतांवर पाय ठेवून उभा रहा! तुझे ते रूप पाहून देवादिकांना आनंद होईल!"

हनुमंताने सूर्याला प्रदक्षिणा घालून नमस्कार केला आणि आपले शरीर एवढे वाढविले की ते नक्षत्रांच्या पलीकडे गेले आणि दश दिशा व्याप्त झाल्या. सर्व ब्रह्मांड भरले. हनुमंताचे ते विराट रूप पाहून ब्रह्मदेवदेखील चकित होऊन पहात उभा राहिला. ऋषी मुनींनी व देवांनी हनुमंताला पाहून नमस्कार केला.

सूर्यदेखील ते विराट रूप पाहून थक्क झाला व म्हणाला– "तू प्रत्यक्ष रुद्रावतार आहेस! माझी कीर्ती वाढविण्यासाठी आला आहेस, मी तुला काय शिकविणार किंवा उपदेश देणार?"



हनुमान नम्रपणे म्हणाला– "महात्मन्! आपण असे बोलून मला लाजवू नये! आपण वेदांचे मूल कारण आहां, मला आपला शिष्य मानून तिन्ही वेदांचा उपदेश करावा." असे म्हणत हनुमानाने आपले सामान्य रूप धारण केले आणि सूर्याच्या रथासमोर हात जोडून उभा राहिला.

सूर्याचा वेग एका घडीला नऊ लक्ष चाळीस हजार योजन असा आहे. इतक्या वेगाने उडत हनुमानाने सूर्यासमोर उभा राहून सूर्याकडून शिकण्यासारखे जे काही होते ते सर्व शिकून घेतले. संगीत शास्त्रात त्याने प्राविण्य संपादन केले आणि षड्शास्त्र व चौसष्ट कला शिकून घेतल्या.



विद्याभ्यास पूर्ण करून हनुमानाने सूर्याला प्रणाम केला व त्याचा निरोप घेऊन किष्किंधेला परतला. हनुमंताने वेदशास्त्रात प्राविण्य मिळविल्याचे कळल्यावर सुग्रीवाला फार आनंद झाला. नंतर त्याने हनुमंतला आपल्याचकडे ठेवून घेतले.

वाली व सुग्रीव दोघे भाऊ परस्परांच्या सल्ल्याने सर्व कामे करीत असत. दोघां भावांचे परस्परावर फार प्रेम होते. त्यांना ऋक्षविरज याने वाढविले होते. तो वारल्यावर वानर राज्याच्या गादीवर वाली बसला व सुग्रीव युवराज झाला.

वालीचा पराक्रम अद्वितीय होता: त्याच्याशी युद्ध करून कधी कोणाला जय [illegible] नाही. [illegible] राज्य जिंकल्याच्या घमेंडीत रावणाने वालीकडे येऊन त्याला युद्धाला आव्हान केले. वालीने रावणाशी युद्ध करून त्याचा पराभव केला व त्याची घमेंड उतरविली. त्याला त्याने जिवंत सोडला, एवढेच. त्यानंतर रावण वालीच्या वाटेस कधी गेला नाही. त्याच्याशी सख्य ठेवण्यातच शहाणपण मानू लागला

त्यानंतर वालीला युद्धासाठी आव्हान केले ते दुंदुभी नावाच्या राक्षसाने. त्याने प्रथम घमेंडीत हिमवंताला युद्धासाठी आव्हान केले होते. हिमवंत त्याला म्हणाला–"बाबा रे! मला तुझ्याशी युद्ध करण्याची ताकद नाही. तुझ्याशी युद्ध करण्याची शक्ती एकट्या वालीत आहे. तु मधुवनात जाऊन त्याला युद्धाला आव्हान कर. तो नक्की येईल."

ते ऐकून दुंदुभी मधुवनात गेला आणि ते वन ध्वंस करून त्याने वालीला आव्हान केले. मधुवन किष्किंधेच्या परिसरातले एक सुंदर वन होते. वाली कोणाचे आव्हान ऐकून त्याच्यासमोर मान वाकविणारा नव्हता. त्याने दुंदुभीचा युद्धात वध करून त्याचा देह आकाशात फेकला. तो देह दूर ऋष्यमूक पर्वतावर जाऊन पडला. त्याचे रक्त वहात जाऊन त्या पर्वतावर तपश्चर्या करीत बसलेल्या मतंग मुनींना लागले. मतंग मुनींनी रागाने शाप दिला कि वालीने

कधी ऋष्यमूक पर्वतावर पाऊल ठेवले तर त्याच्या डोक्याशी शकले होऊन त्याच्याच पायावर लोळू लागतील.

त्यानंतर वालीचे दुंदुभीचा मुलगा मायावी याच्याशी वैर आले. वालीने मायावीचा बाप दुंदुभीचा फक्त वध केला. एकाच कारणास्तव दोघांचे वैर झाले. नाहीतर आणखी एका कारणामुळे दोघांचे भांडण झाले. ते एका स्त्रीमुळे.

एकदां रात्री मायावी मध्यरात्रीच्या सुमारास किष्किधा नगरीवर येऊन धडकला आणि त्याने वालीला आव्हान केले. तो त्या वेळी झोपलेला होता. त्याला भयंकर राग आला. त्याला शत्रूचा तो दर्प सहन झाला नाही. तो युद्धास निघाला. वालीला त्याची बायको तारा व सुग्रीव दोघांनी युद्धास न जाण्यासाठी किती सांगून पाहिले, परंतु वालीने त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष केले.

वालीला थांबवू न शकल्यावर सुग्रीव देखील भावाच्या मदतीला त्याच्या पाठोपाठ निघाला. दोघां भावांना युद्धाला

करीत निघाले. मायावी त्यांना बराच दूर घेऊन गेल्यावर कांटेरी झुडपाआड लपलेल्या एका गुहेत निघून गेला.

तेव्हां वाली सुग्रीवाला म्हणाला–"मी त्या दुष्टाला ठार करून येईपर्यंत तू बाहेर पाहारा देत रहा. सुग्रीवाला असे सांगून वालीदेखील मायावीच्या पाठोपाठ त्या गुहेत शिरला.

बराच काळ लोटला तरी वाली परतला नाही, तेव्हां तो युद्धांत मरण पावला तर नाही, असे वाटून सुग्रीव भ्याला. इतक्यात गुहेतून फेसाळलेले रक्त वहात बाहेर आले. गुहेतून येणारा आवाज राक्षसाचा असावा, असा सुग्रीवाला भास झाला.

तेव्हां आपल्या भावासाठी शोक करीत सुग्रीवाने एक मोठी शिळा गुहेच्या तोंडावर ठेवली आणि भावाला तिलोदक वगैरे देऊन किष्किंधेला परतला. वानरांनी त्याला गादीवर बसवून त्याचा राज्याभिषेक केला.





# अमरवाणी

रजतम् वा, सुवर्णम् वा
वस्त्राण्याभरणानि च,
अविभक्तानि साधूना
मवगच्छन्ति साधव: ॥ १ ॥

[जे मित्र असतात ते आपल्या मित्राकडे चांदी आहे की सोने आहे किंवा सुंदर उंची वस्त्रालंकार आहेत हा भेदभाव मानीत नाहीत.]

आढ्यो वापि, दरिद्रो वा,
दु:खित, स्सुखितोपि वा,
निर्दोषो वा, सदोषो वा,
वयस्य: परमागति: ॥ २ ॥

[धनी असो, दरिद्र असो, दुःखी असो की सुखात आरामात असो, दोषी असो निर्दोष असो, शेवटी मित्रच मोक्षवत् सुखी करतो.]

धनत्याग, स्सुखत्यागो,
देहत्यागोपि वा पुन:,
वयस्यार्थे प्रवर्तते
स्नेहम् दृष्ट्वा तथा विधम् ॥ ३ ॥

[स्नेह्याच्या प्रेमाखातर मित्र आपले धन, सुख व शेवटी देहदेखील त्याग करतात.]



# मित्रभेद

[ १८ ]

दमनक विचार करू लागला, 'म्हणजे या संजीवकाच्या अंगात बरीच शक्ती आहे. याची शिंग बळकट आहेत. हा माझ्या धन्याला युद्धात ठार देखील करू शकेल. तेव्हां याचे मन युद्धापासून दूर राहील अशी युक्ती काढली पाहिजे ? तो संजीवकाला म्हणाला—"मित्रा! आपल्या शत्रूच्या बलाबलाची कल्पना करून घेतल्याशिवाय पाऊल पुढे टाकणे धोक्याचे आहे. तुझ्यासारख्या बैलाला पिंगळका सारख्या सिंहाशी युद्ध करून त्यात यश मिळविणे शक्य आहे का ? त्यासाठी शक्तिशाली अशा आणखी कोणाच्या मदतीची गरज आहे. मागे एका टिटवीला अशाच तऱ्हेने नाही का समुद्र पार करता आला होता ?"

"काय रे गोष्ट आहे ती, एकू दे तरी!" संजीवकाने दमनकाला विचारले.

दमनक गोष्ट सांगू लागला :

**समुद्राला जिंकणारी टिटवी**

एका महासागराच्या किनाऱ्यानजीक एक टिटवीचे जोडपे रहात होते. मादीला अंडी घालण्याची वेळ जवळ येत असल्याचे वाटल्यावर तिने आपल्या नवऱ्याला चांगलीशी जागा शोधण्यास सांगितले.

तिला तिचा नर म्हणाला—"समुद्राच्या किनाऱ्यावरच अंडी घाल. ही अनादि कालापासून आलेली जागा आहे!"

"नको, नको रे! समुद्राच्या लाटा किनाऱ्यावर उसळून येतील आणि माझी अंडी वाहून जातील." मादी म्हणाली.

"अग वेडे समुद्र असा अत्याचार करण्याचे साहस कधी करील का? त्याला माझ्या शक्तीची पुरी कल्पना आहे. लक्षावधी मासे व मगरी त्याच्या पोटात सुखाने रहात असतां समुद्र असला वेडेपणा कां करील?" नर म्हणाला.

परंतु मादी त्याला म्हणाली—"असल्या गप्पा माझ्यासमोर? तुझ्या अंगात किती पराक्रम आहे त्याची कल्पना मला नाही का? बडबड करूनच नाही का त्या कासवाचा जीव गेला."

"कोणती बरे ती गोष्ट?" नराने विचारले.

मादीने कासवाची गोष्ट सांगितली.

एका तळ्यात कंबुग्रीव नांवाचे एक कासव रहात असे. संकट व विकट नावाच्या दोन बगळ्यांशी त्याची मैत्री होती. काही काळ पाऊस पडला नाही व तलावातले पाणी आटू लागले. तेव्हां बगळ्यांनी दुसऱ्या एका तलावाच्या काठी जायचे ठरविले. त्यांनी ती गोष्ट कासवाला सांगितली.

ते म्हणाले—"मित्र हो! मीच तुमच्यापेक्षा जास्त वेळ तलावात राहतो. पाण्याच्या अभावी मला जगणेच अशक्य होईल. मला देखील इकडून तिकडे घेऊन जा."

"बाबा रे, तुला उडता येत नाही, मग काय करणार? तुझ्या नशिबी लिहिले असेल तेच होणार!" बगळे म्हणाले.



"मित्र हो! संकट येऊन कोसळले की निराश होऊन कसे चालेल? साहसी शूरांनाच कोणता तरी मार्ग काढता येतो. विवेकवानांनी व शहाण्यांनी स्वतःचा जीव वाचविण्यासाठी प्रयत्न करायला हवा, असे मनुस्मृतीचे म्हणणे आहे!" कासव म्हणाले. तिघांनी बराच वेळ विचार केल्यावर कासवालाच एक युक्ती सुचली. एक काठी आणून त्याने त्या काठीची दोन टोके चोचीने धरायला बगळ्यांना सांगितले आणि स्वतः काठी तोंडाने घट्ट धरून बगळ्यांना उडायला सांगितले.

परंतु बगळ्यांनी कासवाला बजावून सांगितले की बाबा रे, हा उपाय किती चांगला असला तरी त्यात तुझ्याच जिवाला

शेवटच्या मलपृष्ठावरील चित्र

धोका आहे. तू चुकून तोंड उघडलेस तर खाली जमिनीवर आदळून मरशील. परंतु कांसवाने वाटेत तोंड न उघडण्याची शपथ घेतल्यावर दोन्ही बगळयांनी काठीची दोन्ही टोके चोचीत धरली. नंतर कासव चुकून खाली पडले तरी त्याला फार लागू नये असा विचार करून दोघे बगळे बेताच्या उंचीवरून उडू लागले.

बगळे एका गावावरून उडत जात असतां गांवकऱ्यांनी त्यांना व कांसवला पाहिले आणि हंसू लागले. कांसवाला राग आला. त्याने "या लोकांना काही अक्कल आहे का?" असे म्हणण्यासाठी तोंड उघडतांच जमिनीवर आदळले. गावकऱ्यांनी त्याला ठार करून मेजवानी उडविली.

मादी कांसवाची गोष्ट सांगून पुढे म्हणाली—"जंगलात एका डबक्यात अनागत विधाता, प्रत्युत्पन्नमती आणि यद्भविष्यती नांवाचे तीन मासे रहात असत. त्यांचे परस्परांवर फार प्रेम होते. एकदां काही कोळी आपली जाळी घेऊन त्या तळयाच्या

उद्यां येऊन ते धरले पाहिजेत? ते अनागत विधानाने ऐकले. तो घाबरून गेला व मित्रांना बोलावून म्हणाला—'आपण एकाद्या दुसऱ्या डबक्यात गेले पाहिजे.'

ते ऐकून प्रत्युत्पन्नमती म्हणाला—'पुढे केव्हां तरी येणाऱ्या संकटासाठी आतांपासून काळजी करण्यात काय अर्थ आहे? मी येथे वर्षानुवर्षे सुखाने रहात आलो आहे. कित्येक संकटांतून स्वतःचा जीव वांचविला. ते काही बहुतेक येणार नाहीत. आले तरी मी युक्ती काढून स्वतःला वांचवीन.' यद्भविष्यती देखील म्हणाला—"मलादेखील येथून जावेसे वाटत नाही. आणखी कोठेही मासे मिळाले नाहीत, तर ना ते कोळी या कोपऱ्यातल्या डबक्याकडे वळणार? तसेच आपल्या नशिबी लिहिले असेल तर त्यातून कधी सुटका मिळेल का?"

ते ऐकून अनागत विधाता दुसऱ्या डबक्यात निघून गेला.





# तिळ्या बहिणी

[ ६ ]

[ तिळ्या बहिणींना घारी उचलून घेऊन गेल्यानंतर त्यांना शोधून घेऊन येणाऱ्याला आपले राज्य देईन अशी राजाने दवंडी पिटविली. ती ऐकून भद्रपुरीचे निवासी तिळे भाऊ, उदयन, निशीथ व संध्याकुमार राजाकडे येऊन त्याला भेटले आणि त्याने दिलेल्या घोडयांवर बसून तिळया बहिणींच्या शोधार्थ निघाले. पुढे– ]

पांढऱ्या घोडयावर उदयन पुढे पुढे निघाला. दिवस असल्या कारणाने उदयनला चांगले दिसत होते. परंतु निशीथ व संध्याकुमाराची स्थिती काय बरं झाली असेल? त्यांनी काय केले असेल? कारण डोळे असूनही त्यांना दिवसां मुळीच दिसत नव्हते. म्हणजे दिवसां ते आंधळयासारखेच होते. म्हणून वाट माहीत नसूनही पुढे पुढे उदयन घोडयावरून चालत असल्यामुळे घोडयाच्या टापांच्या आवाजाच्या अनुरोधाने ते चालत होते.

हळूहळू सूर्य पश्चिमेला वळला आणि सायंकाळ होण्याची वेळ आली. तेव्हां उदयन म्हणाला—"माझे काम संपुष्टात आल्यासारखं आहे. संध्या! आतां तूच वाट दाखवीत पुढे चल. आम्ही दोघे तुझ्या मागून येतो." त्याप्रमाणे पुढे संध्याकुमार चालू लागला. त्याच्या पाठीमागून प्रथम



निशीथ व अगदी शेवटी उदयन दोघे चालू लागले.

काही वेळाने गडद अंधकार पडला. तोंपर्यंत ते एका दाट अरण्यात येऊन पोचले होते. रात्र झाल्यामुळे उदयन व संध्या-कुमार दोघे निकामे झाले. आतां खरोखरी ते सर्वच जण दमले होते व त्यांना विश्रांतीची गरज होती. परंतु त्या दाट अरण्यात विश्रांती घ्यायला जागा कोठून मिळणार? म्हणून निशीथने आपल्या दोघां भावांना एका झाडावर बसवून ठेवले व म्हणाला—"तुम्ही येथे थांबा थोडा वेळ, मी जाऊन रात्री कोठे अंग टाकायला जागा आहे का, पाहून येतो." असे सांगून त्याने

बांधून ठेवले आणि स्वत: आपल्या काळ्या घोड्यावर बसून निघाला.

निशीथ बराच दूर चालून गेल्यावर त्याला एका जागी एक जुनाट पडके घर दिसले. दाराजवळ जाऊन त्याने दाराची कडी एक दोनदां वाजवून पाहिली, परंतु आतून उत्तर आले नाही. त्याने खिडकीतून डोकावून आत पाहिले, परंतु आत कसली हालचाल ही दिसली नाही. म्हणून त्याने साहस करून दार उघडले व आंत गेला. जिकडे पहावे तिकडे त्याला घरात रेशांचे ढीग दिसले. त्याला थोडे आश्चर्यच वाटले. त्या शिवाय घरात विचित्र असे काहीच दिसले नाही. घराचा मालक कोण बरे असावा, पहात तो काही वेळ थांबला.

बराच वेळ वाट पाहल्यावर ही कोणी न आलेला पाहून त्याला वाटले की हे पडके घर आहे व कोणी येथे रहात नसावा. रात्र काढायला ही जागा बरी आहे, असे वाटून तो घोड्यावर उदयन व निशीथला बसवून आला होता त्या झाडाकडे निघाला.

निशीथ झाडावर आपल्या दोघां भावांना बसवून निघून गेल्यानंतर थोड्याच वेळाने त्या झाडाखाली कोणीतरी चालल्याची हालल्याची चाहूल झाली. जंगलच ते,

जनावर, असा विचार करून दोघे थोडे चिंतित झाले. कारण निशीथ एकटा गेला होता. तो कोठे जातो? काय करतो कोणास ठाऊक? या काळजीत दोघे त्याची बराच वेळ वाट पाहात राहले.

उदयनने त्या मनस्थितीत आपल्या कंबरेला हात लावून पाहिले आणि संध्या-कुमाराला सांगू लागला—"संध्या! काहीतरी कंबरेला रेशांसारखे लागते आहे रे! काय बरे असेल...हे...?"

उदयनचे ते वाक्य पुरे होण्यापूर्वीच संध्याकुमार म्हणाला—"होय रे! माझ्या कंबरेलासुद्धा तसेच काहीतरी लागते आहे. विळखा पडू लागल्यासारखा वाटतो आहे. तू म्हणालास तसेच रेशांचे किंवा सुंभासारखे काहीतरी आहे. काय असेल बरं?"

दोघे असे परस्परांशी बोलत असतां त्यांच्या कंबरेला घट्ट विळखा बसला व दोर-खंडाने बांधले गेल्यासारखे त्यांना आढळले. त्यांनी दोन्ही हातांनी आजूबाजूला चाचपून पाहिले, पण कोणी मनुष्य जवळ असल्याचे दिसेना.

"अरे, मोठमोठ्यांना मी कधी दृष्टीस पडलो नाही, तुमच्या दृष्टीस पडणार होय?" असे कोणीतरी म्हटले.





तो आवाज ऐकल्यावर त्यांना कोणीतरी भूत किंवा पिशाच्च दोरीने बांधीत असेल असे दोघांना वाटले. परंतु काय करावे, दोघांना सुचेना. "ऐन वेळी निशीथ येथे नाही तर तुझा समाचार घेतला असता. अजून काही बिघडले नाही म्हणा. आमचा भाऊ परत येत असेल. तो परत येण्यापूर्वी शहाणपणाने तू आम्हांला सोडलेस तर ठीक, नाहीतर तुला ताबडतोब यमलोकी पाठवून देईल तो, लक्षात असू दे!" अशी धमकी देऊन पाहिली दोघांनी.

परंतु तो त्यांना बांधणारा कोणी सामान्य होता का? तो म्हणाला—"काय रे! या धमक्या कोणाला रे, मला का? [illegible] शंभर जण आले तरी माझं काही करू शकणार नाहीत. शिवाय मी तुमचा भाऊ येईपर्यंत वाट पहात राहलो तरच ना?" असे म्हणत त्याने आपल्या दाढीचे टोक त्यांच्या कंबरेच्या दोरीला बांधले आणि त्यांना फरपटत ओढून घेऊन गेला. त्याने जातां जातां आणखी एक काम केले. झाडाखाली त्यांचे घोडे होते त्यांच्या अंगावर कसले तरी भस्म टाकले. त्याबरोबर घोडे अदृश्य झाले.

आणखी काही वेळाने निशीथ झाडाजवळ येऊन पाहतो तर झाडावर दोघे भाऊ नव्हते. झाडाखाली त्यांचे घोडे नव्हते. त्याला काहीच सुचेना. कदाचित आपल्याला यायला उशीर झाला म्हणून आपल्याला शोधीत ते दोघे कोठे भटकले तर नसतील, असा विचार करून तो आपल्या भावांच्या शोधार्थ आपल्या काळ्या घोड्यावर परतला.

असा शोध काढीत निशीथ त्या जंगलात बराच फिरला. परंतु त्याला त्याचे भाऊ दिसले नाहीत की कोठे त्यांची खूणसुद्धा आढळली नाही. तोंपर्यंत रात्र बरीच उलटली होती. आणखी प्रहर दोन प्रहरच रात्र उरली होती. त्यानंतर उजाडले तर आपल्याला एक पाऊलदेखील पुढे टाकण [illegible] काढले. परंतु कांही उपयोग झाला नाही.

परंतु एक विचार त्याच्या मनात आला, कदाचित ते दोघे मी पाहून आलो, त्याच पडक्या घरात तर गेले नसतील! तो विचार मनात येताच तो घोड्यावर चढून त्या जुनाट घराजवळ परत आला. त्याच्या भावांनी घोडे बाहेर बांधून ठेवले असतील असे वाटत होते त्याला. परंतु त्याप्रमाणे घोडे बाहेर दिसले नाहीत तेव्हां तो थोडा निराश झाला. तरी एकदां आत जाऊन पाहू या तरी, असा विचार करून दार ढकलून तो आत गेला आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्याला त्याचे दोघे भाऊ उदयन आणि संध्याकुमार एका सुंभाच्या दोरखंडाने बांधलेल्या स्थितीतच एका कोपऱ्यात झोपलेले दिसले. याहून आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांच्या जवळच जमिनीवर रक्ताचे डाग त्याला दिसले. या सर्व गोष्टींहून त्याच्या अंगाला शहारे येण्यासारखी आणखी एक गोष्ट त्याच्या दृष्टीस पडली, उदयनचा एक हातच अदृश्य झाला होता. परंतु हात कापून टाकल्यासारखा देखील दिसत नव्हता.

ते सर्व पाहून त्याचे डोकेच चालतनासे झाले. थोड्या वेळाने स्वतःला सावरून त्याने आपल्या दोघां भावांना जागे केले. निशीथला पाहल्यावर त्यांना जिवात जीव आल्यासारखे वाटले. म्हणाले—"अरे, तू





त्या दुष्टाच्या हातातून निसटून कसा काय आलास बुवा? पुन्हां आपली भेट होईल, असे आम्हांला वाटत नव्हते." असे म्हणत निशीथला दोघे भाऊ भेटले. तिघांच्या डोळ्यांत प्रेमाश्रू झळकत होते.

"परंतु तुम्ही इकडे आलातच कसे? माझ्यांवर नाही काही संकट ओढवले. हे कोणी व का बांधले तुम्हांला? आणि दादा! तुझा हात काय रे झाला? आणि हे रक्ताचे डाग कसले?" निशीथने उदयनला विचारले.

"हे सर्व आपलं दुर्दैव समज." असे सांगून उदयन त्याच्यावर गुदरलेला प्रसंग सांगू लागला–"तू आम्हांला त्या झाडावर बसवून निघून गेल्यावर काही वेळाने

आणून टाकले. तो दुष्ट कोण, आम्हांला कोठें घेऊन चालला आहे, वगैरे आम्हांला मुळीच दिसत नसल्यामुळे काही एक कळले नाही. केव्हां उजाडेल पाहतो आहो, आम्ही. आतांच उजाडू लागलं आहे म्हणून मला थोडे थोडे दिसू लागत आहे. आम्हांला धरून आणणारा तो दुष्ट एक विचित्रच प्राणी दिसला. त्याला पाहून तर आम्हांला हंसूच आले. तो जमिनीपासून फार फार तर आपल्या ढोपराएवढा उंच असेल. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे, त्याची दाढी शंभर हात लांब आहे. त्याने आपली दाढी आमच्या कंबरेला दोरी सारखी बांधली. तो आत्ता आत्तापर्यंत आमच्या बाजूलाच पडून होता. थोडयाच वेळापूर्वी कोठे तरी निघून गेल्यासारखा दिसतो आहे. तो उठल्याबरोबर तुझ्या पावलाच्या खुणा पाहून तो म्हणाला–"अरे हो, तुमचा मोठा भाऊ इकडे येऊन गेल्यासारखा दिसतो आहे! ठीक, तर त्यालादेखील धरून घेऊन येतो." असे म्हणत घाईघाईने उठून जाऊ लागला. तेव्हां त्याने आम्हांला आपल्या दाढीने बांधून ठेवले होते ती गोष्ट घाईत विसरला होता. मला राग आला म्हणून मी त्याची दाढी ओढली, तेव्हां त्याचे काही केस उपटले गेले आणि थोडे रक्त

काही आग पाखडीत म्हणाला–"अरे गुलामा! तुला इतका गर्व चढला आहे का? बरं तर तर बरं, सगळी दाढी नाही उपटलीस!

"त्यानंतर तो तावा तावाने उठत म्हणाला–'माझी ही दाढीच मला पंच-प्राणासारखी आहे. एक केस जरी गळला किंवा काढून टाकला तर एक प्राण गेल्यासारखा होतो मला. आता या सैता-नाने माझे चार लांब केस उपटले. ते पुन्हां उगवून येणे शक्य नाही. कसे सहन करायचे हे?' असं आपल्याशीच पुटपुटत तो म्हणाला–'अरे तू केलेल्या मूर्खपणाची तुला ही शिक्षा देतो।' आणि त्याने आपल्या खिशातून डबी काढून कसले तरी अंजन माझ्या हाताला लावले. त्या बरोबर माझा हात अदृश्य झाला. नंतर त्याने आपली दाढी आम्हांला बांधून ठेवली होती तेवढ्या लांबीची कातरून टाकली आणखी उठून उभा राहला. परंतु आश्चर्य हे की दाढीचे कातरलेले केस पुन्हां जसेच्या तसे लांब उगवले." असे सांगून उदयन गप्प बसला. ते सर्व ऐकून निशीथला फार आश्चर्य वाटले.

तोंपर्यंत उजाडू लागले होते. उदयन म्हणाला–"आतां उशीर करता कामा नये.



तो तुझ्या शोधार्थ हिंडून कंटाळून परत येत असेल. आतां उजाडण्याची वेळ झाली आहे तेव्हां तुला काही करतां येणार नाही म्हणून मी तुला आपल्या जागी संध्या-कुमाराबरोबर बांधून ठेवतो. फक्त एकच हात दिसेल असा बसून रहा म्हणजे झाले. पुढे काय करायचे ते पाहून ठरवू या."

निशीथने त्या दोघांना सोडविले. उद-यनने निशीथला व संध्याकुमाराला एकत्र बांधून ठेवले. निशीथाच्या घोड्याला जवळच्या एका गुहेत बांधून लपवून ठेवून स्वत: जवळच लपून बसला.

ठीक दुपारच्या सुमारास तो लांब दाढीवाला बुटका असे गुणगुणत आला–

"पाहतो तो कोठे जातो. आज नाही तर उद्यां सांपडेलच!"

बुटका घरात जाईपर्यंत उदयन बाहेर लपून बसला होता आणि मांजराच्या पावलाने जाऊन खिडकीतून बुटका काय करतो आहे, हे पहात उभा राहिला होता. त्याला एक विचित्र गोष्ट दिसली. त्या लांब दाढीवाल्या बुटक्याने कसले तरी भस्म काढले आणि ते निशीथ व संध्याकुमारावर टाकले. त्या पाठोपाठ दोघे अदृश्य झाले. नंतर त्याने आपल्या गळ्यातली माळ काढून एका खुंटीला टांगून ठेवली आणि आश्चर्य म्हणजे तो बुटका एकदम सामान्य माणसासारखा दिसू लागला आणि त्याची ती विचित्र दाढीदेखील अदृश्य झाली. डोळ्यांवर विश्वास न होण्यासारखी गोष्ट होती ती.

उदयन आश्चर्यचकित होऊन हे सर्व खिडकीतून पहात होता. गळ्यातली माळा काढून ठेवल्यानंतर तो बुटका झोपला आणि छान घोरू लागला. ते पाहून उदयन

त्याबरोबर उदयन स्वत: एक लांब दाढीवाला बुटका झाला. ते विचित्र पाहून तो मनात म्हणाला–"हे या दुष्टाचे गुपित आहे तर! हा कोणी मांत्रिक तर नसेल?"

उदयनने आपल्या खिशात हात घालून पाहिले तेव्हां त्याला कसले तरी भस्म हाताला लागले. त्याला आठवलें कीं, याच भस्माने त्या बुटक्या दाढीवाल्याने झाडाखालच्या घोड्यांना आणि घरातल्या माणसांना अदृश्य केले होते नाही का? दुसऱ्या खिशातल्या डबीत तांबडे अंजन होते. हे अंजन लावल्यानेच उदयनचा हात अदृश्य झाला असावा. तिसऱ्या खिशात तसल्याच एका डबीत एक हिरवे अंजन होते. आणखी एका खिशात एक पंचा आणि कसले तरी काळे भस्म होते. त्याचा कसा व कशासाठी उपयोग करायचा, हे उदयनला माहीत नव्हते. या सर्वांचे गुपित कसे काय उकलणार?"

(क्रमश:)





# खजिन्याचा चोर

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू कोणाला वचन देऊन इतके कष्ट सहन करीत आहेस, कोणास ठाऊक? परंतु केव्हां केव्हां वचनाचे पालन करण्यासाठी देखील अनीतिकर किंवा धर्मरहित काम करावे लागते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला विक्रमसेन नावाच्या राजाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी भावनगरी राज्याच्या गादीवर विक्रमसेन नावाचा राजा राज्य करीत असे. तो एक योग्य व प्रजावत्सल राजा होता. युद्धात पराभव म्हणून त्याने कधी पाहिला नाही. जवळपासच्या राज्याचे

वेताळाच्या गोष्टी



सामंत राजे त्याला खंडणी देत. विक्रमसेनाच्या खजिना नेहमी भरलेला असे.

परंतु आश्चर्य असे की पुढे खजिन्यातले धन कमी होत गेल्याचे कळले. कोणी तरी खजिन्यात गुप्तपणे शिरून धन चोरून नेत असावा, असा राजाला संशय आला. चोराला पकडण्यासाठी राजाने अनेक उपाय करून पाहिले. परंतु खजिन्यातले धन नाहीसे होण्याचे थांबले नाही.

शेवटी राजाने खजिन्यातल्या धनाची चोरी करणाऱ्याला जो कोणी पकडून देईल त्याच्याशी राजकन्येचे लग्न करून देईन. अशी दवंडी पिटविली. राजकन्येशी विवाह होईल या आशेने कित्येकांनी प्रयत्न करून [illegible] नाही आणि चोरीसुद्धा थांबली नाही.

काही दिवसांनी महाराज आपल्या सभेत बसले असता एक अत्यंत सुंदर तरुण युवक महाराजांना भेटण्यासाठी आला व म्हणाला—"महाराज! आपण पिटविलेली दवंडी ऐकून मी आलो आहे. चोराला धरून देण्यास मी आपणांस मदत करू शकेन असे मला वाटते."

राजा म्हणाला—"ठीक! तू मागशील तितक्या शिपायांना मी बरोबर पाठवून देतो. तू चोराला पकडून घेऊन ये. मी तुझ्याशी आपल्या मुलीचे लग्न करून देतो."

"महाराज माझ्या मदतीला शिपायांची किंवा कोणाचीही गरज नाही. आपण स्वतः बरोबर येऊ शकाल तर तेवढे पुरे. आपण माझ्यावर विश्वास ठेवून मी सांगेन त्या जागी चलावे." तो तरुण युवक म्हणाला.

राजा शूर व साहसी होता. थोडा वेळ विचार करून म्हणाला—"ठीक! मी तयार आहे, केव्हां निघायचे?"

"ते मी परत येऊन आपणांस सांगतो." असे सांगून तो तरुण युवक निघून गेला.

दोन दिवसांनी तो तरुण युवक रात्रीच्या वेळी राजाला येऊन भेटला व म्हणाला—"आपण दोघांनी आज रात्री वेष पालटून निघाले पाहिजे!"

[illegible] जंगलात येऊन पोचले. दोघे एका खडकाआड लपून बसले. तो तरुण युवक राजाला म्हणाला—"महाराज! समोरच्या डोंगरातल्या गुहेत चोर जमतात. खूप पिऊन गातात नाचतात. परंतु मी आपणांस दाखविणार आहे ते अगदी वेगळेच दृश्य आहे.

दुरून पैंजण वाजल्याचा आवाज येऊ लागला. युवक राजाला म्हणाला—"महाराज, ती एक तरुण युवती येते आहे. तिला लक्षपूर्वक पाहून ठेवा, म्हणजे पुढे ओळखणे कठीण होणार नाही.

काही वेळाने त्यांच्या समोरून सुमारे सोळा वर्षांची एक सुंदर युवती जाऊ लागली. तिच्या दोन्ही बाजूला समोरून मशाली दाखवीत दोघे जण जात होते. तसेच आणखी दोघे जण तिच्या पाठीमागून खांद्यांवर पिशव्या घेऊन चालत होते. राजा व तो तरुण युवक पहात असतां ते पांच जण पुढे निघून गेले.

परंतु राजाच्या तोंडातून एकही शब्द न निघालेला पाहून तो युवक विचारू लागला—"काय एवढे पाहतां आहां?"

राजाने त्या तरुणाला विचारले—"इकडे अशा काही गोष्टी घडत आहेत, हे तुला कसे काय कळले?"

तो तरुण म्हणाला—"महाराज! मी लहानपणापासून आईवडिलांच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून, कोणत्याही गोष्टीची





फिकीर केल्याशिवाय दऱ्या खोऱ्यातून व जंगलांतून मनमोकळेपणाने हिंडत फिरत असे. एके दिवशी रात्री मी म्हणालो त्या गुहेजवळ सहज येऊन पोचलो तेव्हां मला गुहेतून गलका ऐकू आला. मी आत वांकून पाहिले. आत चोर होते. एका बाजूला महाकालीची प्रतिमा बसविलेली होती. काही लोक तिच्या पुजेत मग्न होते. काही जण दुसरीकडे बसून दारू पिण्यात गर्क होते. एका उंच दगडावर चोरांचा नायक बसला होता. आपण आतां पाहिली ती युवती एका तरुणाशेजारी बसली होती. तिच्या शेजारी पैशाच्या पिशव्या ठेवलेल्या होत्या. इतके धन कोठून बरे आले असेल,

[illegible] आपण पिट-विलेली दवंडी ऐकून कदाचित् आपल्या खजिन्यातले नाहीसे झालेले तेच धन असावे असा एक संशय माझ्या मनात डोकावला. म्हणून मी आज आपणास इकडे घेऊन आलो."

राजाने तरुणाला विचारले—"आज आपण पाहिली ती मुलगी कोण माहीत आहे का? ती माझीच मुलगी आहे."

तो युवक घाबरल्यासारखा होऊन म्हणाला—"खरं का महाराज? ही गोष्ट मला माहीत असती तर आपणांला मी तसदी देऊन दु:खी केले नसते. आपण मला क्षमा करावी, महाराज!"

"वेड्या! तुला माफी मागण्याचे कारणच काय? माझी मुलगी असो की आणखी कोणाची, न्याय हा झालाच पाहिजे. मी उद्यां तिला कडक शिक्षा करतो. तू उद्यां राजवाड्यात अवश्य आले पाहिजेस!" असे सांगून राजाने त्या तरुणाला निरोप दिला आणि राजवाड्यात परतला.

तो सरळ राजकन्येच्या महालात गेला. तेथे दासी होत्या त्यांना बोलावून त्याने विचारले—"राजकन्या कोठे आहे?" काय उत्तर द्यावे त्यांना सुचेना.

उजाडेपर्यंत राजा आपल्या मुलीच्या महालाबाहेर पडला नाही. राजकन्या [illegible] विचारले—"काय ग, कोठे गेली होतीस?" ती मान खाली घालून गुपचुप उभी राहली.

दुसऱ्या दिवशी सकाळी राजाने राजसभेत जाहीर केले—"मी राजकन्या राजद्रोही असल्याचे जाहीर करीत आहे. तिला मी कडक शिक्षा करण्याचे ठरविले आहे!"

त्या वेळी राजसभेत तो तरुण युवक हजर होताच. तो हात जोडून म्हणाला—"महाराज! आपण राजकन्येला राजद्रोही म्हणून शिक्षा केल्यास मी चोराला पकडून दिल्याबद्दल आपण तिच्याशी लग्न करून देण्याचे वचन कसे काय पुरे होणार?"

राजाने तो तरुण म्हणाला ते मान्य करून त्याच्याशी आपल्या मुलीचे लग्न करून दिले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा! मला हे नाही कळले की विक्रमसेनाने आपल्या मुलीला शिक्षा कां केली नाही? त्या तरुणाला दिलेले वचन पालन करण्यासाठीच का? की ते मिश करून आपल्या मुलीला संकटातून मुक्त करून घेण्याच्या हेतूने? त्याच साठी तर त्याने त्या तरुणाला समजून उमजून राजसभेत यायला नव्हते सांगितले? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."



विक्रमादित्य त्याचे उत्तर देत म्हणाला– "हे कोडे वरवर वाटते, तितके ते सोपे नाही. त्या तरुणाची वागणूक सुरवातीपासून शेवटपर्यंत संदेहास्पदच होती. त्याने स्वतःच्या पूर्वजांविषयी राजाला सांगितले तेव्हां अट्टल चोरामध्ये असलेल्या गुणांचे वर्णनच त्याने केले होते. फक्त चोराला पकडून देण्याचाच हेतूच त्याच्या मनात असता तर शिपायांनाबरोबर नेऊन त्याने राजकन्येला किंवा गुहेतल्या चोरांना पकडवून ती देऊ शकला असता. परंतु त्याने राजाला दाखविले ते सर्व पूर्वी ठरवून तयार करविलेले नाटकच होतेसे दिसते. मशाली वगैरेची व्यवस्था राजकन्येला ओळखता यावे व राजाच्या मनांत दुसरा संशय राहू नये याचसाठी तर होती. राजाला हे दृश्य दाखविण्यासाठी त्याने दोन दिवसांचा अवधी मागून घेतला होता, असे नाही का वाटत? राजाला त्या तरुणाच्याविषयी संशय होता यात मला तरी शंका वाटत नाही. राजकन्येने कोणत्या तरी अट्टल चोराशी प्रे [illegible] राजाने हा तरुण तिच्याशी लग्न करण्यास साहस करून तयार होतो का नाही हे पाहण्यासाठीच राजाने त्याला दरबारात बोलाविले होते. तो दरबारात आला, एवढेच नव्हे तर तिच्याशी लग्न करायला त्याने पाय मागे घेतला नाही. याचा अर्थ तो तरुणच स्वतः अट्टल चोर होता व त्याचेच राजकन्येवर प्रेम होते या दोन्ही गोष्टी स्पष्ट झाल्या. त्या तरुणाचे राजकन्येवर गुप्त प्रेम होते. म्हणून तिलाच चोर म्हणून पकडवून देऊन, राजाने दिलेल्या वचनाप्रमाणे तिच्याशी लग्न करून घेण्याचा घाट त्याने युक्तीपुरस्सरच घातला होता. त्याच्या त्या हुशारीसमोर राजाला मान वाकवावी लागली. त्याने दोघांचे लग्न करून दिले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# शेरास सव्वा शेर

एका गावात एक श्रीमंत मनुष्य रहात असे. त्याला एकुलता एक मुलगा होता. त्याने आपल्या मुलाला फार लाडात वाढविले होते. म्हणून मुलाला अनेक वाईट संवयी लागल्या आणि तो पाण्यासारखा पैसा खर्च करू लागला.

एकदा मुलाने बापाजवळून बरेचसे पैसे मागून घेतले आणि शेजारच्या गावी जाऊन चैनीत सर्व पैसे उडवले. त्याला पैशाची गरज पडली तेव्हां एका सावकाराकडे त्याने पांचशे रुपये कर्जाऊ मागितले. म्हणाला–"मी घरी गेल्यानंतर पांचशे रुपये आणि त्याचे व्याज जे होईल ते पाठवून देईन."

तो सावकार त्या मुलाच्या बापाला चांगला ओळखत होता. म्हणून तो कर्ज द्यायला कबूल झाला. परंतु कर्ज देण्यापूर्वी म्हणाला–"बाबा रे! रुपये देतो. परंतु काही वस्तू गहाण ठेवून घेतल्याशिवाय कर्ज द्यायचे नाही असा माझा नियम आहे."

मुलाने थोडा विचार केला व म्हणाला– "माझ्याजवळ तूर्त एक खंजीर आहे. तो ठेवून घ्या आणि पैसे द्या."

सावकाराने तो खंजीर ठेवून घेतला आणि पांचशे रुपये त्याला दिले.

एक वर्ष लोटले. तो श्रीमंत मनुष्य एकाएकी मरण पावला. त्याच्या मुलाच्या हातात सर्व इस्टेट आली. परंतु त्याने शेजारच्या गावातल्या सावकाराकडून घेतलेले पांचशे रुपये परत केले नाहीत.

ती रक्कम सरळ मार्गाने वसूल होणे शक्य नाही, असे सावकाराला वाटू लागले.

तो सावकार रहात असे त्या गावातला धोबीच त्या श्रीमंताच्या घरचे कपडे धुवायला नेत असे. अर्थातच सावकाराकडचे कपडे सुद्धा तो धुई.

एकदा सावकार त्या परटाला कपडे देत असतां म्हणाला—"तुझा तो धनी कोणी म्हणालास त्याचा मुलगा माझ्याकडे आपला खंजीर गहाण ठेवून पांचशे रुपये घेऊन गेला होता. तो खंजीर हल्ली दिसतनाहिसा झाला आहे. उद्या तो कर्ज फेडण्यासाठी आला आणि मी खंजीर देऊ शकलो नाही, तर उगाच एका पेचात सापडेन. काय करावे कळत नाहीसे झाले आहे."

त्या परटाने दुसऱ्या दिवशी त्या श्रीमंत माणसाच्या मुलाला सावकार म्हणाला ते त्याने त्याला सांगितले.

श्रीमंताचा मुलगा खूष होऊन मनात म्हणाला—"पाहतो, बच्चू कोठे जातो!" तो पांचशे रुपये आणि व्याजाचे दोनशे रुपये घेऊन सावकाराच्या घरी आला.

सावकाराने त्याला बसायला खुर्ची दिली व नम्रपणे म्हणाला—"काय सेवा करू?"

"काही नाही, मला बसायला वेळ नाही. एका कामासाठी जावयाचे आहे. कर्ज

"सांखळी?" सावकार त्याला आठवत नसल्यासारखे नटून विचारू लागला.

"होय खंजीर! तो आमच्या आजोबां-पासून पिढ्यान्‌पिढ्या चालून आला आहे. तो आमच्या कुळाचे जणुकाही कुळदैवतच आहे. तो हरविला तर मी तुमच्याकडून दहा हजार वसूल केल्याशिवाय राहणार नाही." श्रीमंताचा मुलगा म्हणाला.

सावकार थोड्या पडत्या स्वरात म्हणाला—"थांबा पाहतो, आहे का. परवां-परवां शोधीत होतो, सापडला नाही. तो घालवून बसलो तर त्याची किंमत भरावीच लागणार! तुम्ही पैसे आणले आहेत, म्हणालात, नाहीं का?"

श्रीमंताच्या मुलाने सातशे रुपये मोजले. सावकाराने ते मोजून घेतले आणि तिजो-रीत ठेवले. नंतर त्याने घरात जाऊन खंजीर आणून श्रीमंताच्या मुलास दिला. तो एवढेसे तोंड करून निघून गेला.



# १५६. निसर्गाचा चमत्कार

आर्मेनिया देश अनेक अत्यद्‌भुत गोष्टींसाठी प्रसिद्ध आहे. या डोंगरात आपल्याला दिसणारे शिल्प मानवाने निर्मिलेले नसून ही निसर्गनिर्मिती आहे. यात अनेक गुंफा आहेत. जागोजागी स्फटिकासारख्या स्वच्छ पाण्याचे ओहोळ व प्रवाह आढळतात. आर्मेनियातील शहरांना पाण्याचा पुरवठा याच ओहोळांच्या पाण्याने होतो.





# सदुपदेश

फार पूर्वी कोशल देशावर प्रचंड नावाचा एक सुयोग्य व प्रजावत्सल राजा राज्य करीत असे. त्याच्या राज्यात प्रजा सुखी होती. हृदयविकाराने एकाएकी राजा मरण पावला. तेव्हां त्याचा एकुलता एक मुलगा सुकुमार याला विद्याभ्यास मध्येच सोडून राजधानीत परतावे लागले. यथा वेळी त्याचा राज्याभिषेक ही झाला.

सर्व विद्याभ्यास संपल्यानंतर राजकुमाराला राजनीती शिकवावी असा कोशल देशात प्रघात होता. परंतु राजगुरूजवळ विद्याभ्यास पुरा होण्यापूर्वीच सुकुमाराला राज्यकारभार संभाळावा लागला. त्याला सर्व विद्या सुमती नावाच्या गुरूने शिकविल्या होत्या. सुमती एक थोर विद्वानच नव्हे, तर एक थोर तत्ववेत्तादेखील होता. म्हणून सुकुमार राजा झाल्यावर सुमतीने त्याला काही उपदेश केले.

"माणसाचे मन हेच मुख्य असते. ते सर्वदा निर्मल असावे लागते. अनीतिकर कामांविषयी नित्य विचार करीत राहून वेळ घालविण्यापेक्षां एकदां काय ती चूक करून मन स्वच्छ करून घेणे श्रेयस्कर आहे.

"प्रत्येक माणसाला 'अहं' असतो. तो स्वत:ला फार मोठा समजतो. परंतु दुसऱ्यातला थोरपणा–मोठेपणा ओळखणाराच खरोखरी थोर होय. अशाच माणसांना राजाने जवळ करावे.

"मनुष्य दोन प्रकाराचे असतात,– चांगले व वाईट. देशातल्या वाईट लबाडलुच्चा लोकांचा कांटा काढून राज्यात नीतिकर व चांगल्या लोकांना निर्भय करणे हे राजाचे कर्तव्य होय.

"आपण मनात एखादी गोष्ट करण्याचे ठरविले आणि त्या गोष्टीस भगवंताचे सहाय्य नसल तर त्या कामात यश मिळत नाही. भगवंताचे अधिष्ठान असेल तर न योजलेले काम देखील यशस्वी होते."



हे उपदेश ऐकून सुकुमाराला आपल्याला सर्व राजनीती कळली असे वाटले. एका वर्षात तो राजकार्य करण्याऐवजी भोगविलासात गुरफटला. प्रचंडाच्या कारकीर्दीत सुखी झालेल्या प्रजेला सुकुमाराची कारकीर्द मुळीच पसंत पडली नाही.

दोन वर्षे लोटली. राज्यकारभारात सर्वत्र अस्तव्यस्तता पसरली. कोशलदेश आर्थिकदृष्ट्या, सैनिकदृष्ट्या कमकुवत झाल्याचे ऐकू येऊ लागले. शेजार पाजारच्या राजांना कोशलदेश जिंकण्याला ही संधी चांगली आहे, असे वाटू लागले.

ते कळल्यावर सुकुमार सुमतीकडे जाऊन म्हणाला–"गुरुवर्य! आपण दिलेल्या उपदेशाप्रमाणे मी सर्व काही करीत आहे. परंतु राज्य परिस्थिती बरोबर नाही. उद्यां काय होईल, हे त्या परमेश्वरालाच माहीत!"

"मी म्हटल्याप्रमाणे तू वागला नाहीस. तू भोगविलासात गुरफटलास!" सुमती त्याची कानउघाडणी करीत म्हणाला.

"अनीतिकर गोष्टी मनात न ठेवतां त्या करून टाकून आपले मन शुद्ध करून घ्यावे असे आपणच नाही का म्हणाला होतां. मद्यपान व कामवासना यांच्यातून माझे मन अद्याप मुक्त झाले नाही." सुकुमार म्हणाला.

ते ऐकून सुमती चकितच झाला. आपण केलेल्या सदुपदेशाचा असा विपरीत परिणाम होईल, याची त्याला कल्पनाच नव्हती. त्याने राजगुरूचा सल्ला घेण्यासाठी त्यांच्याकडे निरोप पाठविला.

इतका काळ लोटल्यावर प्रथमच राजा व राजगुरु यांची परस्पर भेट झाली. राजगुरूने सुमतीसमोर उभा राहिलेला प्रश्न शांतपणे ऐकून घेतला आणि स्मित करून म्हणाला–"हे पहा, आपण सुकुमाराला केलेले उपदेश फार मोठे आहेत.



परंतु ते उपदेश वेदांती व तत्ववेत्त्यांसाठी आहेत. प्रजेच्या सुखासाठी राज्य करणाऱ्या राजकर्त्यांच्या कामाचे नाहीत." असे सांगून सुकुमाराकडे वळून राजगुरू म्हणाला– "राजाने आपले मन शुद्ध ठेवावे हे तेवढे महत्वाचे नाही, त्याने डोके थंड ठेवावे हे महत्वाचे आहे. समज, तू रागाच्या भरात कोणाचा वध केलास. तू राजा आहेस म्हणून तुला कोणी विचारणार नाही. तू त्या माणसाला ठार करून मोकळा होशील. परंतु त्यानंतर त्या माणसाची काही चूक नाही हे कळल्यावर तू त्या माणसाला पुन्हां जिवंत करू शकणार नाहीस. म्हणून तू स्वत:वर संयम राखला पाहिजेस."

[illegible] सुकुमाराच्या चांगले लक्षात आले. भावी राजाला उपदेश करण्याचा अधिकार व लायकी आपणात नाही, हे सुमतीला देखील कळले. त्याने राजगुरूची क्षमा मागितली आणि तेथून निघून गेला.

त्यानंतर राजगुरू राजकुमाराला म्हणाला–"तू राजा आहेस. तुझ्या हातात सर्व अधिकार आहेत. कोणीही समजूतदार मनुष्य तुझ्यासमोर तुझ्याविरुद्ध काही बोलणार नाही. तुझ्याकडून शाबासकी व बक्षिसे मिळविण्यासाठी कित्येक जण तुझी खोटी स्तुती करतील. कोणी तुला इंद्रासारखा पराक्रमी म्हणेल, मदनाचा पुतळा म्हणेल. ते सर्व तुझा थोरपणा ओळखून तुझ्या मोठेपणाची थोरवी गातात असे समजू नकोस. ते राजभक्त नाहीत. तुला खरा राजभक्त कोण हे दाखवितो. त्याच्या घरी आज रात्री आपण वेष पालटून जाऊ या."

त्या प्रमाणे दोघे वेष पालटून एका गरीब दरिद्री ब्राह्मणाच्या घरी गेले. परगावचे पाहुणे आले आहेत हे कळल्यावर त्या ब्राह्मणाने त्यांना फक्त आश्रयच दिला नाही तर त्याने आपल्या शक्तीप्रमाणे त्यांचे आतिथ्यदेखील केले.

बोलताना राजगुरूने देशातल्या परिस्थितीसंबंधी त्याला विचारले. त्यावरो-

[illegible] तोंडाला आले ते बोलला,–"प्रचंडाच्या पोटी एक अयोग्य नालायक जन्मला. प्रजेच्या हितापेक्षा स्वत:च्या भोगविलासात मग्न असणारा राजा असून नसून सारखाच!" ते सर्व ऐकून सुकुमार भयंकर तापला. परंतु त्याने स्वत:ला आवरले.

नंतर दुसऱ्या दिवशी रात्री दोघे त्या ब्राह्मणाच्या घरून निघाले.

सुकुमार राजगुरूला म्हणाला–"मी ओळखतो या भटाला. हा दररोज दरबारात येतो. दुसरे लोक माझी स्तुती करून काही तरी पारितोषिक घेऊन जातात. हा मात्र काहीच बोलत नाही. म्हणून याला काही देऊ नये अशी मी आज्ञा केली होती. याच्या मनांत माझ्या विषयी एवढा राग असण्याचे काय बरे कारण असेल? तोंडाला आले ते बडबडला, पहा! तुम्ही जवळ होता म्हणून, नाही तर मी याला असा सोडला नसता!"

"उद्या पुन्हां वेष पालटून जाऊन पाहू या काय होते ते!" राजगुरू म्हणाला.

दुसऱ्या दिवशी ते दोघे पुन्हा आल्यावर त्या ब्राह्मणाने त्यांना आदरपूर्वक बोलावून विचारले–"मध्यरात्रीच तुम्ही निघून गेलात कारण नाही कळले?"

तेव्हां राजगुरू त्या ब्राह्मणाला म्हणाला– "हे आपल्या देशाचे महाराज आहेत. त्यांना लागेल अशा शब्दात बोलणाऱ्याच्या घरी महाराजांना झोप आली नाही."





राजगरूने ते म्हटल्यावर राजा खऱ्या स्वरूपात प्रगट झाला.

ते पाहून तो ब्राह्मण घाबऱ्या घाबऱ्या उठून उभा राहिला आणि राजाला बसायला चांगलीशी उच्चासनाची जागा तयार करीत म्हणाला–"आपण आमचे प्रभू, धनी, हे माहीत नसल्यामुळे केवळ अज्ञानाने मी मागचापुढचा काही एक विचार न करता तोंडाला आले ते बडबडलो. क्षमा करावी, गरीब ब्राह्मण आहे. आपल्या मर्यादेप्रमाणे आपला आतिथ्य सत्कार करू शकलो नाही."

राजगुरु स्मित करून म्हणाला–"वेड्या ब्राह्मणा! हे सर्व कशाला बोलतो आहेस? केलेस म्हणून राजाचे मन पालटेल असे वाटले होय तुला? तुला शिक्षा भोगावी लागणारच!"

ब्राह्मण थोडादेखील न घाबरता म्हणाला–"मी शिक्षा होईल या भीतीने आपले आतिथ्य करू शकलो नाही असे म्हणण्याचा माझा हेतू नाही. आपल्या देशाचा जो राजा आहे, त्याच्याविषयी माझी व्यक्तिगत अशी काय वाटेल ती मते असली तरी मी त्या पदाची मर्यादा राखतो व त्याचा गौरव माझ्या मनात सतत असतो. राजाने किती चुका केल्या तरी तो आपल्या आसनावर आहे तोंपर्यंत मी त्याला मान देणार. आपल्या देशाच्या राजाचा अपमान करण्याचा अर्थ स्वतःचा अपमान करण्या-सारखाच नव्हे काय? त्याचे मन बदलावे अशी इच्छा बाळगून त्याला मौन आशीर्वाद देण्यासाठी मी दररोज दरबारात जातो. परंतु त्याच्यात जे सद्गुण नाहीत त्यांचा उल्लेख करून त्याची स्तुती मी करणार नाही, मला ते येत नाही. म्हणून मला बक्षिस पारितोषिक मिळत नाही, हे मला माहीत आहे. परंतु पिढ्यात्पिढ्या चालत आलेल्या रूढी व परंपरा मी सोडणार नाही."

ते ऐकून सुकुमाराचे डोळे उघडले.

राजभक्ताला तू पाहिलेस ना? अशा माण-साने स्तुती प्रशंसा केली नाही तरी ती तुला मान्य असली पाहिजे."

त्यानंतर राजगुरु सुकुमाराला म्हणाला–"मनुष्य चांगला असो की वाईट असो, प्रत्येकात शिकण्यासारखा कोणता तरी गुण असतोच. राजाने प्रत्येकाकडून, शिकण्या-सारखे असेल ते शिकून घ्यावे."

सुकुमारला ते पटले नाही. म्हणाला–"आपल्या तुरुंगात कित्येक गुन्हेगार आहेत. त्यांच्याजवळ ही मी शिकण्या-सारखे आहे का?" दुसऱ्या दिवशी राजगुरु सुकुमाराला कारागृहाच्या बाजूला घेऊन गेला. गुन्हेगारात घोड्यांची चोरी करणारा एक गुन्हेगार होता. किती खोडकर व मस्तवाल घोडा असला तरी तो त्याला पाहतां पाहतां वश करून नाहीसा होत असे.

"मी याच्याजवळ घोडे कसे चोरून न्यायचे, हे शिकावे म्हणता का?" सुकु-मारने विचारले.

"नाही. परंतु किती नवा घोडा असला तरी त्याला कसे वश करून घ्यायचे हे शिकायचे! काही क्षणात घोड्याला अदृश्य करण्याचे,–स्वारी करण्याचे नैपुण्य शिका-यचे!" राजगुरु म्हणाला.

"तशीच राजवाड्यातल्या खजिन्यात शिरून चोरी करणाऱ्याकडून कडक पाहरा



असलेल्या घरात शिरण्याची विद्या शिकता येईल." राजगुरू म्हणाला. अशा तऱ्हेने प्रत्येक गुन्हेगाराकडून शिकण्यासारखे काय आहे, हे राजगुरू सांगत गेले.

शेवटी एका गुन्हेगाराला दाखवीत तुरुंगाचा अधिकारी म्हणाला–"ह्याचा द्वेष किंवा ह्याच्याविषयी घृणा वाटणार नाही, असा कोणी मनुष्य मिळणार नाही. उपकार कर्त्याविरुद्ध काय वाटेल ते करायला हा तयार होईल. याच्या शब्दकोशात कृतज्ञता हा शब्दच नाही. ज्या क्षणाला जे सुचेल ते हा करायला तयार असतो. याने कित्येक स्त्रियांचा मानभंग केला. कित्येक जणांचा याने खून केला!"

"अशा माणसाकडून आपण काय शिकणार?" सुकुमाराने विचारले.

"माणसाने काय करू नये, हे याच्याजवळ शिकतां येईल." राजगुरू म्हणाला.

सुकुमार हात जोडून राजगुरूला नमस्कार करीत म्हणाला–"आपण म्हणालात ते सर्व अक्षर अक्षर सत्य आहे!"

विचारले.

"हे गुन्हेगार मोकळे राहिले तर प्रजेचे नुकसान होईल!" सुकुमार म्हणाला.

"आपण काही करावयाचे म्हटले तरी त्याला भगवंताचा आशीर्वाद व सहाय्य लागते. चांगल्या कामासाठी भगवंताची मदत ही मिळतेच. तरी गुन्हेगारांवर नजर ठेवण्याचा भार देवावर न सोडता तो माणसांवर कां सोडला आहे?" राजगुरूने विचारले.

सुकुमार काही एक बोलला नाही.

"याचा अर्थ असा आहे की आपला प्रयत्न नसेल तर देवदेखील मदत, सहाय्य करीत नाही. आलं का लक्षात?" राजगुरूने विचारले.

त्यानंतर सुकुमाराने राजगुरूकडून कित्येक सदुपदेश घेतले व राजनीती शिकून घेऊन बापापेक्षां ही उत्तम तऱ्हेने राज्यकारभार चालवून प्रजेला सुखी केले.





# दोघे मंत्री

चंदनपूरचा राजा सुमंत याच्याकडे अरविंद भट नावाचा एक मंत्री होता. चंदनपूरच्या जवळपासच्या जंगलात हत्ती पुष्कळ होते. म्हणून त्या देशात घोड्यांपेक्षां हत्तीच फार होते. त्याचप्रमाणे शमंतनी नावाच्या राज्यात हत्तींपेक्षा घोडे जास्त होते.

म्हणून सुमंतने आपल्या मंत्र्याला बोलावून शमंतिनीच्या राजाला हत्ती देऊन त्यांच्या बद्दल घोडे मागून आणायला सांगितले.

त्याप्रमाणे अरविंदभट आपल्या राजाच्या इच्छेनुसार एका नोकराला बरोबर घेऊन शमंतिनी राज्यात गेला. त्याने राजाला भेटून हत्ती घेऊन घोडे द्यावेत, अशी विनंती केली. राजाने त्या गोष्टीस होकार दिला. शमंतिनी देशाच्या राजाकडे आदिभट नांवाचा मंत्री होता. त्याने अरविंद भट्टाला आपल्या घरी जेवायला रहायला बोलाविले. जेवणखाण आटोपून दोघे मंत्री गप्पा गोष्टीत बराच वेळ रमले. बोलतां बोलतां आदिभट अरविंद भटाला म्हणाला–"आमचे महाराज माझ्या हातातले एक बाहुले आहे. मी 'नंदी' म्हटले तर ते 'नंदी' म्हणतात 'गाढव' म्हटले तर 'गाढव' म्हणतात."

अरविंद भटाला ते खरे वाटले नाही.

आदिभट म्हणाला–"एवढे कशाला? पाहिजे तर तुम्ही प्रत्यक्ष खात्री करून घ्यां. आज संध्याकाळी मी महाराजांबरोबर फिरायला एका दिशेने जाईन. तेव्हां तुम्ही एखाद्या झाडाआड किंवा खडकाआड लपून आमचे बोलणे ऐका. पहा, काय होते ते!"

अरविंद भट आपल्या नोकराला बरोबर घेऊन गावाबाहेर आदिभटाने प्रथमपासून सांगून ठेवलेल्या जागी एका मोठ्या झाडाआड लपून बसला.

त्यानंतर काही वेळाने घोड्यांवर बसून पुढे मंत्री व पाठीमागून राजा आले. वाटेत



आदिभटाने घोड्याला थांबविले व राजाला एक ज्वारीचे शेत दाखवीत म्हणाला–"हा उसाचा मळा तर पहा, ऊस कसा जाडजूड झाला आहे?"

राजाने थोडेसे इकडे तिकडे पाहिले व म्हणाला–"खरंच! ऊस कसा जाडजूड झाला आहे नाही का?"

इतक्यात मंत्री जवळून सरसर करीत एक हिरवा साप निघून गेलेला पाहून म्हणाला–"पाहिलेत महाराज! तो अजगर किती जाड आणि किती लांब आहे तो!"

"होय की इतका मोठा अजगर मी उभ्या आयुष्यात पूर्वी कधी पाहिला नाही." राजा म्हणाला आणि दोघे पुढे निघून गेले.

नोकर दोघे ऐकून चकित झाले. अरविंदभट व आदिभट घरी पोचल्यावर परस्परांना भेटले. अरविंदभटाने, तो स्वतःकाकणभर जास्तच वस्ताद आहे हे आदिभटाला दाखवायचे मनात ठरविले.

आदिभटाने विचारले–"पाहिलेत मी सांगितले ते खरे झाले की नाही? असा मी राजाला मुठीत ठेवला आहे."

अरविंदभटाने त्याच्या फुशारक्यांकडे दुर्लक्ष करीत म्हटले–"ते काही असो, तू माझा पराक्रम पाहिला नाहीस तर! तुला माझ्यासमोर नक्कीच मान वांकवावी लागेल. मला राग आला म्हणजे महाराजांना मी तोंडाला येईल ते म्हणायला मागेपुढे पहात नाही. तू माझ्याबरोबर चल, मी प्रत्यक्षच दाखवितो तुला?"

दोघे चंदनपूरला आले. अरविंद भट आदिभटाला म्हणाला–"मी महाराजांजवळ आतां बोलणार आहे. त्याने आदिभटाला एका पडद्याआड बसविले. पडद्यापलीकडे तो महाराजांजवळ स्वतः जाऊन बसला.

"काय तर मंत्री? मी म्हटलं ते काम कितपत पुरे झाले?" राजाने विचारले.

अरविंदभट म्हणाला–"काम आपल्याला हवं होते तसंच झालं. परंतु या प्रवासात मला एवढा तेवढा का, फार त्रास झाला.

माझाच तो मूर्खपणा होता. परंतु तुम्ही एवढे म्हातारे झालांत, पण तुमची बुद्धी कोठे चरायला गेली होती?"

ते ऐकून राजाने फक्त डोके हलविले आणि थोडा हसला. पडद्याआडून आदिभटाने तो सर्व प्रकार पाहिला. मनात म्हणाला, आहे खरा वस्ताद!

अरविंदभट पडद्याआड बसलेल्या आदिभटाकडे जाऊन म्हणाला–"पाहिलंस, मी तुझ्याहून कांकणभर मोठाच ठरलो की नाही?"

"यात काय संशय आहे!" आदिभट म्हणाला.

इतक्यात अरविंदभटाचा नोकर आपल्या मालकाला एका बाजूला घेऊन जाऊन म्हणाला–"धनी! शमंतिनीच्या महाराजांना मुळीच दिसत नाही, असे त्याच्या मंत्र्याचा नोकर म्हणत होता माझ्याजवळ! म्हणून कदाचित ज्वारीचे शेत दाखवून उसाचा मळा आणि हिरव्या सापाला अजगर म्हणाला तरी त्याने त्याला होकार दिला.

तिला आदिभटाचा नोकर अरविंद भटाच्या नोकराला भेटला होता. तो आपल्या धन्याला एका बाजूला घेऊन जाऊन म्हणाला–"मालक! या देशाचा राजा बहरा आहे, म्हणे! थोडेदेखील ऐकू येत नाही. त्यांच्या मंत्र्याच्या नोकराकडून मला कळले.

दोघां मंत्र्यांना दुसऱ्याने फसविल्याबद्दल राग आला. अरविंद भटाने शमंतिनी देशाच्या राजाला एक पत्र लिहून त्यात त्याने आदिभट म्हणाले होता ते सर्व त्यात कळविले. त्याच प्रमाणे आदिभटाने अरविंद भट म्हणाला होता ते सर्व एका पत्रात लिहून सुमंताला कळविले.

त्याचा परिणाम असा झाला की अरविंद भटाला व आदिभटाला त्यांच्या त्यांच्या राजाने मंत्री पदावरून काढून टाकून हद्दपारीची शिक्षा केली.



# वहिवाट!

एका गावात लखू नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. तो फार काबाड कष्ट करून पोटापुरते मिळवी. एकदा त्याने आपल्या झोपडीच्या जवळ कलिंगडाचे दोन वेल लावले. काही दिवसांनी ते वेल चांगले वाढले आणि आठ नऊ कलिंगडे लागली. ती विकून एखादी घोंगडी विकत घ्यायचे लखूने मनात योजले. त्याने आपल्या चादरीत ती छान बांधून घेतली आणि शेजारच्या बाजारपेठेत गेला.

बाजारपेठेच्या पाहरेकऱ्याने त्याची वहिवाट म्हणून एक कलिंगड लखूकडून घेतले. त्याचप्रमाणे तिथला सरकारी कारकून, मॅनेजर एकेक कलिंगड हक्क म्हणून घेऊन गेले.

बिचारा शेतकरी एका शब्दाने काही बोलला नाही, पहात राहिला. त्याने वरच्या अधिकाऱ्याकडे गाऱ्हाणे नेऊन काही न्याय मिळेल या आशेने प्रयत्न केला. तो उलट लखूवरच बसकन ओरडला आणि म्हणाला–"लुच्चा! इतक्या लबाडांना वहिवाटीची कलिंगडे देऊन माझ्याकडे रिकाम्या हाताने आलास होय! बऱ्या बोलाने तेवढीचादर येथे ठेवून चालता हो!"

निरुपाय होऊन उरलेली ती जुनी फाटकी चादर तेथेच टाकून लखू घरी निघाला.





# केशिनीचा केशशृंगार

सोनारपूरची केशवती एक रूपवती कन्या म्हणून प्रसिद्ध होती. ती बाराच वर्षांची मुलगी होती, परंतु त्या वयातही तिची वेणी इतकी सुंदर असे की लोक थक्क होऊन तिच्याकडे पहात रहात. तिचे केस चकचकीत, काळेभोर आणि लांब सडक होते. म्हणून राज्यभर तिच्या वेणीफणीची फार मोठी चर्चा होत असे.

एकुलती एक मुलगी असल्या कारणाने राजा व राणी तिचे सर्व लाड पुरवीत. राणी स्वतः वेळ काढून तिचे केस विंचरी आणि स्वतःच्या हाताने निरनिराळ्या तऱ्हेच्या वेण्या घालून तिला नटवी. ते काम तिने कधी दासींना नाही सांगितले. सर्व ती स्वतः करी. ती केशवतीच्या केसांना फक्त स्वच्छ खोबरेल तेल लावी.

एकदा केशवती तेल करतात ते पहायला तेलाच्या घाणीकडे गेली. ती बैल कसे गोलगोल फिरतात व घाणी कशी फिरते ती गंमत पहात खोबरे कसे पिळून निघते व त्यातून तेल कसे बाहेर येते ते पाहू लागली. तेल घाणीतून भांड्यात पडत होते व ती पहात होती. तेथली जागा पाहून तिला, कां कोणास ठाऊक, तेलाची किळस आली. इतक्यात एक पाल कोठून तरी त्या घाणीत पडली. केशवती एकदम मोठ्याने ओरडली आणि घेरी येऊन पडली.

त्या दिवसापासून तेल पाहिले की तिच्या अंगावर कांटा उभा राही. त्यानंतर तिने तेल लावायचेच नाही असा मनात निश्चय केला. आईने अनेक प्रकारे तिला समजावून पाहिले. बापानेसुद्धां समजावून पाहिले. परंतु सर्व प्रयत्न फुकट गेले. खोबरेल नाही तर दुसरे कोणते तरी तेल लावून घे, म्हटले तर ती त्याला देखील कबूल झाली नाही.

तिला तेलाचीच किळस वाटू लागली होती. तेलाच्या अभावी तिच्या केसांची कळाच गेली. त्यांचा तकतकीपणा नाहीसा झाला.

"तू कोणाचं काहीच ऐकत नाहीस बाई! थोडी समजूत नको का माणसाला?" आई म्हणाली.

"मला सर्व कळते. पण मी डोक्याला तेल लावून घेणार नाही." केशवती म्हणाली.

"अग, पण तेल लावून घेतले नाहीस तर केस कसे वाढतील?" आईने विचारले.

केशवती एका झाडाला पाण्याऐवजी तेल घालत गेली. ते झाड वाढण्या ऐवजी वाळू लागले.

"पाहिलेस का आतां तरी आई? हे झाड तेलाने वाढण्याऐवजी वाळू लागले [illegible] त्यावर काय बोलणार?

दरबारी राजवैद्य आले. त्यांनी आयुर्वेद शास्त्रातले श्लोक वाचून केस वाढायला तेल किती आवश्यक असते, सांगितले. परंतु केशवतीचे मन पालटवणे त्यांना शक्य झाले नाही.

ही बातमी लवकरच रजतपूरला जाऊन पोंचली. रजतपूर सोनापूर शेजारचेच एक राज्य होते. दोन्ही देशांच्या राजघराण्यात जुना ऋणानुबंध होता. रजतपूरचा युवराज कांचन याच्याशी केशवतीच्या विवाहाच्या गोष्टी ठरून बराच काळ लोटला होता.

कांचन आतां अठरा वर्षांचा तरुण होता. कित्येक विद्येत त्याने प्राविण्य संपादन केले होते. त्याने त्याच्या भावी पत्नीविषयी [illegible] मन पालटता आले तर प्रयत्न करून पहायचे ठरविले आणि सोनापूरच्या महाराजांना तसे कळविले. सोनापूरच्या राजाने त्याला आग्रहपूर्वक यायला विनंती केली.

कांचन येणार हे कळल्यावर केशवतीला फार आनंद झाला. लहानपणापासूनच तो सोनापूरला येत असे. दोघं मिळून खूप खेळत होती व त्यामुळे परस्पर प्रेम वाढत गेले होते. दोघांचे वय वाढत गेले तसतसा मोकळेपणा कमी होत गेला, परंतु मनातले प्रेम मात्र वाढतच गेले.

कांचन ठरल्याप्रमाणे आला. त्याने केशवतीशी केसाला तेल लावायच्या गोष्टी वर निराळ्याच तऱ्हेने बोलायचे ठरविले.

"मेंदू तेजस्वी व्हायला डोक्याला तेल लावणे किती आवश्यक आहे, तुला माहीत नाही का? ते मेंदूचे खाद्यच समज!" तो म्हणाला.

"मला नाही तसे वाटत. पंडित हरि शास्त्री प्रकांड पंडित आहेत. परंतु ते तेल मुळीच लावीत नाहीत." ती म्हणाली.

"आतां लावीत नसले म्हणून काय झाले? लहानपणी त्यांनी नक्कीच लावले असले पाहिजे." कांचन म्हणाला.

"म्हणूनच तर ते कोरे पंडितच राहले आहेत!" थोडीदेखील माघार न घेतां केशवती म्हणाली.

"अत्यंत लहान प्राणी असून मुंगी किती हुशार असते? तिला तेलाच्या थेंबाचा







नुसता वास आला की पुरे, तिच्या चारी बाजूला मुंग्यांच्या रांगा लागतात तेल चाटायला." कांचन म्हणाला.

"मी पाहिले आहे पुष्कळदां साखरे-साठी सुद्धां मुंग्या कशा रांगा लावतात त्यादेखील मी खूप पाहिल्या आहेत. म्हणून तू, मी माझ्या डोक्याला साखरेचा पाक लावून घ्यावा म्हणशील का? आणि मग आपल्या बुद्धीला तजेला येईल म्हणतोस का?" केशवतीने जणुकाही त्याचे तोंडच बंद करण्यासाठी तो प्रश्न टाकला.

आतां जास्त वाद घालून काही उपयोग नाही, इंद्रजाल विद्येचा प्रयोग करूनच तिचे मन पालटता आले तर पालटेल असे

[illegible] किती गमती व्हायच्या नाही का? आठवते का तुला केशवती?" त्याने तिला विचारले.

"ते दिवस फार गमतीचे आनंदाचे होते बुवा! खेळ, गंमत म्हणजे गंमत! असे होते नाही?" केशवती म्हणाली.

"जाऊ दे, त्या तेलाच्या गोष्टी. एक खेळ खेळू या का?" कांचनने विचारले.

"या वयात? तुला वेडबीड तर नाही लागलं?" केशवतीने विचारलं.

"तू नको खेळूस. मी खेळतो ते पाहशील तरी?" त्याने विचारले.

"हो, पाहीन की! तू मागे करीत होतास ना तशी काही जादू कर की एखादी!" केशवती म्हणाली.

"ठीक! तरमग आज मी तुला अगदी नवीन जादू दाखवितो. परंतु एका अटीवर. ती जादू तुला आवडली तर मी सांगेन ते तू केले पाहिजेस! आहे कबूल?" कांचनने तिला विचारले.

"हो! करीन की!" केशवती म्हणाली.

दुसऱ्या दिवशी कांचन राजा, राणी व सर्व मंत्री सर्वांना बरोबर घेऊन जादूचा प्रयोग करून दाखविण्यासाठी केशवतीच्या महालात आला. त्याने टेबलावर एक भला मोठा पाण्याचा हौद ठेवला. नंतर त्याने एक जाडजूड पुठ्ठ्याचा तुकडा घेऊन तो

[illegible]
[illegible] दीड इंचाची ठेवली. त्या माशाच्या मधो-मध एक भोक व त्याच्या शेजारी एक तुकडा कातरून ठेवला. तो माशाच्या आकृतीचा पुठ्ठा त्याने राजाला, राणीला व केशवतीला पहायला देऊन तो हौदातल्या पाण्यावर तरंगेल अशा तऱ्हेने टाकला व म्हणाला—"केशवती! हे माशाचे खेळणे हाताने स्पर्श केल्याशिवाय त्याच्यावर फुंकर घातल्याशिवाय तू पाण्यावर तरंगत सरकत असलेले दाखवू शकशील काय?"

केशवती जवळ येऊन बराच वेळ त्या माशाकडे पहात राहली व तिला ते जमायचे नाही, म्हणाली.

"मी आतां करणार आहे ते तुला आवडले तर मी सांगेन तसे करायचे तू कबूल केले आहेस, आहे ना लक्षात?" कांचनने विचारले.

"हो, आहे लक्षात. तू आपली काय जादूकर!" केशवती म्हणाली.

कांचनने एक मोठी बाटली वर उचलून तिच्यातल्या द्रवपदार्थाचा एक थेंब माशाच्या भोकात सोडला. मासा आपोआप त्या हौदात इकडेतिकडे तरंगत फिरू लागला. सर्व चकित होऊन ती गंमत पाहू लागले.

केशवतीने आनंदाने स्मित करीत कांचनला विचारले—"बरं तर सांग, मी काय करावे म्हणतोस?"

"या बाटलीतल्या द्रवपदार्थाच्या महि-मेनेच मासा तरंगू लागला. तेव्हां मी तुला एवढेच सांगणार आहे की हा अद्‌भुत द्रव पदार्थ तू आपल्या डोक्याला लावीत जा. ही बाटली रिकामी झाली की मी दुसरी बाटली पाठवून देतो. आहे ना मान्य?" कांचनने विचारले.

"मी तू म्हणालास तसा द्रवपदार्थ लावीत जाईन." लावीत म्हणाली.

राजा, राणी परस्परांकडे पाहून हसू लागली. त्या बाटलीत सुवासिक खोबरेल होते हे त्यांना माहीत होते. त्याच्या एका थेंबाने पुठ्ठ्याचा मासा हलू लागला.












# यथा राजा तथा प्रजा

फार प्राचीन काळी विक्रमपुरी येथे विक्रमसिंह नावाचा राजा राज्य करीत असे. त्याचे मंत्री हुशार व कर्तबगार होते. त्याच्या राज्यात अखंड शांतता नांदत असे.

एकदा राजा आपल्या राज्यात पर्यटन करीत असतां राज्यातल्या एका कोपऱ्यात-ल्या गावी गेला. त्या गावात त्याला एक अत्यंत प्राचीन काळातले सोमनाथाचे देवालय दिसले. कित्येक शतकांपूर्वी बांधलेले ते देऊळ पाहून त्या काळात आपल्या राज्याचे सांपत्तिक वैभव फार मोठे असले पाहिजे हे राजाने ओळखले. परंतु आज ते पडके देऊळ झाले आहे हे पाहून राजाला फार वाईट वाटले. त्याने त्या देवलयाचा पुनरुद्धार करण्याचे ठरविले.

त्याने त्या विषयी आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेतला. एवढा पैसा आपल्या खजिन्यातला खर्च केला तर राज्यकारभाराची इतर कामे होणार नाहीत. देवलयाचा पुनरुद्धार करून भागणार नाही. नित्य नियमित पुजेची, उत्सवादींची व्यवस्था सुद्धां करणे आवश्यक आहे. दर्शनास येणाऱ्या भक्त यात्रेकरूंच्या राहण्या जेवणाची व्यवस्था करायला हवी आणि देवालयाला चांगली ख्याती येऊन प्राप्ती वाढेपर्यंत राज्याच्या खजिन्यातूनच खर्च करावा लागणार, वगैरे गोष्टी सांगि-तल्या व म्हणाले–"एवढा खर्च करण्याची आपली शक्ती नाही."

"मनांत आल्यानंतर हे काम केले नाही तर पुनरुद्धाराचे काम पुढे केव्हांही व्हायचे नाही. तेव्हां पाहिजे तर त्यासाठी नवीन कर लावा. सामान्य प्रजेवर भार टाकणे बरोबर नाही." राजाने सुचविले.

मंत्र्यांनी राजाच्या सल्ल्याप्रमाणे नवीन कर लावण्याचे ठरवून दवंडी पिटविली.

विषयी दवंडी पिटवून जाहीर केल्यावर राजा स्वतः वेष पालटून राज्यभर फिरे आणि प्रजेच्या सुखदुःखाच्या गोष्टी समजून घेऊन काही फेरबदल करावयाचा झाला तर करी. त्याप्रमाणे राजा नवीन कर लावण्यासंबंधी दवंडी पिटवल्यावर काही दिवसांनी वेष पालटून राज्यभर हिंडायला निघाला. दुपारच्या सुमारास एका दुकाना-समोरून तो जात असतां त्याला एका दुकानदाराचे एका तरुण गिऱ्हाइकाशी कोणत्यातरी गोष्टीवर चर्चा चालू असल्याचे दिसले. त्या तरुणाच्या बोलण्यावरून राजाला काही गोष्टी कळल्या. तो तरुण एका श्रीमंताकडे नोकरी करीत होता. नवीन कर लागल्यापासून त्या श्रीमंताने त्या तरुणाचा पगार कमी केला होता. मुळातच पगार कमी होता आणि त्यात नवीन कर लागल्यामुळे व्यापाऱ्यांनी किमती वाढविल्यावर घरच्या हिशोबाची तोंड मिळवणी कशी होणार? म्हणून त्या तरुणाला पाहिजे असलेला माल अर्धाच विकत घ्यावा लागला.

राजाने विचार केला होता त्याचा भलताच परिणाम झाला. धनिकांवर व व्यापाऱ्यांवर नवीन कर लावायला तो गेला. परंतु त्याचा परिणाम सामान्य गरीब प्रजेवर पडू लागला होता.

राजाने घरी परत गेल्यावर मंत्र्यांना बोलवून त्यांचा सल्ला घेतला. म्हणाला–



"नवीन कर बंद करा. दवंडी पिटवा त्यासाठी. किमती वाढविल्या तर व्यापाऱ्यांना शिक्षा होईल असे जाहीर करा." त्याने वेष पालटून फिरत असतां त्याला जो अनुभव आला तो सांगितला.

"तरमग देवालयाच्या पुनरुद्धाराचे काम तूर्त बंद करावयाचे का?" मंत्र्यांनी विचारले.

"नाही. काम बंद होता कामा नये. त्यासाठी होणारा सर्व खर्च मी खाजगीतून देणार आहे. राजवाड्यात कित्येक गोष्टींवर व्यर्थ खर्च आपण करतो. तो बंद करा. तो बंद करा. शिकार, करमणुकी वगैरेवर लक्षावधी रुपये खर्च होतात. तो खर्च बंद करा. राजा सामान्य प्रजेसारखा राहू लागला तर देवलयाच्या पुनरुद्धाराला लागणारा खर्च सहजी निघू शकेल. निदान देवळाचे काम पुरे होईपर्यंत तरी हा बदल करणे आवश्यक आहे."

मंत्री ते ऐकून चकितच झाले. म्हणाले—"महाराज! आम्ही देखील मेज-

... तेवढे पैसे देवालयाच्या पुनरुद्धारासाठी देतो. आपण त्याचा स्वीकार करावा."

ते ऐकून राजाला आनंद झाला. मंत्र्यांनी स्वतःच आपला खर्च कमी करून वांचलेले पैसे देवलयाच्या कामासाठी दिले. इतर अधिकाऱ्यांनीदेखील आपला खर्च कमी करून वांचलेले पैसे दिले. ही बातमी राज्यभर पसरली. लोकांनी सोमनाथ पुनरुद्धार फंड गोळा केला. दानपेट्यात खूप पैसे जमा झाले.

ते पाहून व्यापाऱ्यांना व श्रीमंतांना लाज वाटू लागली. देवालयासाठी दान देण्यास ते हमरी तुमरीने पुढे आले आणि त्यांनी मोठमोठी दाने दिली.

अशातऱ्हेने पुष्कळ पैसा जमा झाला. आतां देवालय पहिल्यापेक्षा चांगले झाले. योजलेल्या सर्व कल्पना साकार झाल्या आणि ते एक उत्तम तीर्थक्षेत्र म्हणून प्रसिद्ध झाले.





# पुराण श्रवण

एका गावात एक अट्टलचोर रहात असे. त्याला चार मुलगे होते. मरते वेळी तो मुलांना जवळ बोलावून म्हणाला— "तुम्ही कधी कोणत्याही देवळात पाऊल टाकू नका आणि पुराण तर ऐकूच नका."

एकदां चौघे भाऊ राजवाड्यात चोरी करायला निघाले. वाटेत कोठे पुराण असले कानावर पडू नये यासाठी चौघांनी आपल्या कानात कापसाचे गोळे घालून ठेवले. ते राजावाड्याकडे जात असतां एकाच्या कानातला बोळा खाली पडला. नेमके त्याच वेळी शेजारच्या देवळात पुराण चालू होते. पुराण सांगणारा पुराणातल्या कथेच्या संदर्भात सांगत होता—"देवीदेवता किंवा भुतेखेते या मर्त्यलोकात येतात तेव्हां त्यांची पावले जमिनीला चिकटत नाहीत. अधांत्री राहतात. याशिवाय त्यांची सावली सुद्धा पडत नाही."

ही गोष्ट ज्या मुलाने ऐकली तो दचकला आणि चटकन त्याने कापसाचा बोळा उचलून कानात कोंबला.

नंतर चौघे राजवाड्यात शिरले आणि खजिन्यातले हिरे, माणिक्ये व सोने चांदी जे हाती आले ते घेऊन पसार झाले. त्यांनी आपल्या झोपडीत पोंचल्यावर सर्व धन जमिनीत पुरून ठेवले.

दुसऱ्या दिवशी खजिन्यात चोरी झाल्याची गोष्ट कळली. चोराचा शोध काढण्याचे काम प्रधानाने स्वतःकडे घेतले. त्याने गावाबाहेरच्या एका नारळाच्या बागेतल्या झोपडीत कोणी चौघे जण संशयास्पद तऱ्हेने राहतात असे समजले. त्यांनी चोरी करून चोरीचा माल झोपडीत न ठेवता, अन्यत्र कोठे तरी ठेवला असावा. त्यांना धरून आणले तर त्यांनी चोरी केल्याचा आरोप साबित करण शक्य होणार नाही

व चोरीचा मालदेखील हाती लागणार नाही, यासाठी आरोप सिद्ध व्हावा व मालदेखील हाती यावा, अशी काही तरी युक्ती करण्याचे मंत्र्याने ठरविले.

त्याने कालीमातेचा भयंकर वेष धारण केला. हातात तलवार घेऊन रात्री काळोखात त्या नारळाच्या बागेत जाऊन हृदयाचा थरकाप उडेल इतक्या मोठ्याने ओरडला.

तो आवाज ऐकून चारही भाऊ दिवा घेऊन आपल्या झोपडीतून बाहेर आले. तिघां भावांनी कापऱ्या आवाजात विचारले–"माते! तू कोण व कशासाठी आली आहेस?"

कालीमातेच्या वेषात असलेला मंत्री म्हणाला–"मी कालीमाता आहे! खजिन्यातून चोरून आणलेला सर्व माल मुकाट्याने समोर आणून ठेवा! नाही तर तुमची मुंडकी कापून तुमचे रक्त पिईन."

चोरांपैकी तिघे जण ते ऐकून थरथर कापू लागले. परंतु चवथा झोपडीतून एक दांडके आणून म्हणाला–"कोण रे तू,

त्याच्या आवाजात कडकपणा होता.

ते ऐकून प्रधान घाबरला आणि त्याने तेथून पाय काढला. त्यानंतर तिघां भावांनी चवथ्याला विचारले–"तुला रे कसे कळले की तो तोतया होता?"

"आपण चोरी करायला निघालो तेव्हां नकळत माझ्या कानावर पुराण पडले. त्यात देवादिकांचे चरण जमिनीला स्पर्श करीत नाहीत व त्यांची सावली जमिनीवर पडत नाही असे मी ऐकले. त्यावरून हा देव नसून मनुष्यच आहे, हे मी ओळखले. त्याचे पाय जमिनीवरच होते आणि दिव्याच्या उजेडात त्याची सावली जमिनीवर पडली होती." चवथा म्हणाला.

"अरे, चुकून पुराणश्रवण झाले, त्याचा एवढा फायदा झाला तर मनापासून पुराणश्रवण झाल्यास आपणां सर्वांना किती फायदा होईल, नाही?" तिघे म्हणाले. त्यानंतर ते पुराणप्रवचने ऐकू लागले व हळूहळू त्यांचे मन पालटून त्यांनी चोरीचाधंदा सोडून दिला.





# बहिरेपणा फळास आला

एका गावात बहुरू नावाचा एक बहिरा मुलगा रहात असे. त्याची आई तो लहान असतानाच मरण पावली. बापाने दुसरे लग्न केले. बहुरूला त्याची सावत्र आई प्रेमाने वागवीत नसे. शेतातली सर्व कामे तर त्याला करावीच लागत, त्या बरोबर घरची कामेसुद्धा नोकरासारखी करावी लागत.

मुलाला जे कष्ट करावे लागत ते स्वतःच्या डोळ्यांनी पाहून ही त्यांचा बाप आपल्या दुसऱ्या बायकोला एका शब्दानेही विचारीत नसे. म्हणून बहुरूला तोंड उघडल्याशिवाय सर्व सहन करावे लागे.

एकदा रात्री बहुरू गोठ्यात नुकताच लवंडला होता, तेवढ्यात त्याची सावत्र आई एक दांडके घेऊन गोठ्यात पाऊल टाकताना दिसली. अवेळी अशा स्वरूपात सावत्र आईला येताना पाहून ती आपला कपाळमोक्ष करणार या भीतीने बहुरू आपली चाहूल दिल्याशिवाय निसटला आणि जवळच्या एका शहरात येऊन पोचला.

त्या गावचा राजा फार भोळा भाबडा होता. त्याच्या मोठ्या राणीच्या मुलाचा वध करण्याच्या प्रयत्नात त्याची धाकटी राणी असल्याचे त्याला एकदा स्वप्न पडले. तो दचकून जागा होऊन पलंगावर बसला.

दुसऱ्याच दिवशी त्याने दरबारी लोकांस त्याला जे स्वप्न पडले होते ते सांगितले. म्हणाला–"काल रात्री मला एक स्वप्न पडले. त्याचा अर्थ सांगणाऱ्याला मी एक हजार मोहरा बक्षिस देईन."

पण कोणी काही उत्तरला नाही. सर्वांना राजाचा भाबडेपणा माहीत होता.

कोणी उत्तर देत नाही हे पाहून राजाने प्रधानाला विचारले–"मला पडलेल्या स्वप्नाचा अर्थ सांगू शकणारा कोणी

दरबारात नाही वाटते? तुम्ही दवंडी पिटवून कोणी आहे का विचारून तर पहा!"

ती दवंडी पिटली गेली तेव्हांच नेमका बहुरू त्या गावाला गेला होता. त्याने दवंडी पिटली गेल्याचे पाहिले, परंतु ऐकू येत नसल्याने राजाच्या दवंडीचा अर्थ कळला नाही. प्रजेने राजाकडे जाऊन आपली गाऱ्हाणी सांगावी असा त्यादवंडीचा अर्थ असणार असे त्याला वाटले.

तो सरळ राजवाड्याची वाट विचारीत सरळ राजवाड्यात गेला. दारावरच्या पाहरेकऱ्यांनी त्याला अडविले आणि विचारले—"महाराजांना पडलेल्या स्वप्नाचा अर्थ सांगायला आला आहेस का?"

परंतु त्यांनी विचारले ते बहुरूला ऐकू आले नाही. तो फक्त अंदाजाने काही तरी समजून फक्त "होय" म्हणाला.

पाहरेकऱ्यांनी त्याला आंत बोलावून नेऊन राजासमोर उभं केले.

राजाने विचारले—"मला पडलेल्या स्वप्नाचा अर्थ सांगतोस का?"

[illegible]

[illegible]

बहुरू म्हणाला—"महाराज! सावत्र आईचा दुष्टपणा, तिच्या हाती सावत्र मुलांना सहन करावे लागणारे कष्ट, हे नव्याने का सांगायला हवेत? आपणाला माहीत नाही, असे काय आहे? तरी परंतु......" असे तो पुढे काही बोलणार, तितक्यात राजा आनंदाने म्हणाला—"शाबास!" राजाने त्याला एक हजार वराह बक्षिस दिले.

राजाने आपले गाऱ्हाणे ऐकून आपले कष्ट दूर व्हावे म्हणून एक हजार वराह दिल्याबद्दल खूष होऊन बहुरू घरी परतला आणि त्याने घडलेले सर्व वृत्त बापाला येऊन, त्याला कळले तसे सांगितले.

ते कळल्याबर त्याच्या सावत्र आईला वाटले की याला राजाचा आशीर्वाद मिळाला आहे. राजाला राग आला तर तो आपल्याला तुरुंगात टाकील किंवा दंड या भीतीने ती बहुरूला चांगल्या रीतीने वागवू लागली, व बहुरूचे कष्ट त्या दिवसापासून संपले.





# महाबली हनुमान

सुग्रीवाला वाटले होते तसा वाली मायावी राक्षसाच्या हाती मेला नव्हता. उलट त्यानेच मायावी राक्षसाला युद्धात ठार केले होते. वालीला परत आलेला पाहून सुग्रीवाने वालीला आदरपूर्वक नमस्कार केला. वालीने सुग्रीवाला आशीर्वाद दिला नाही व त्याच्याकडे क्रुद्ध मुद्रेने पहात उभा राहिला आणि रागाने तोंडाला आले ते सुग्रीवाला बोलला. परंतु सुग्रीवाने त्याचे प्रत्युत्तर दिले नाही व नम्रपणे त्याने आपला राजमुकुट वालीच्या चरणांसमोर ठेवून त्याने त्याच्या पायावर डोके ठेवले व नमस्कार करून म्हणाला.

"दादा! तू शत्रूचा नाश करून परतलास, किती आनंदाची गोष्ट आहे ही. हे मी माझे महद्भाग्य समजतो. मी त्या गुहेच्या तोंडाशी बराच वेळ वाट पाहिली. परंतु गुहेतुन बाहेर जेव्हां रक्तप्रवाह वहात बाहेर आला तेव्हां माझ्या हृदयाला धक्काच बसला. मला भीती वाटली की तो राक्षस बाहेर येऊन मला ठार करील. म्हणून मी त्या गुहेच्या तोंडावर एक शिळा सरकवून ठेवली आणि परतलो. मला राज्यांकांक्षा मुळींच नव्हती व राज्याभिषेकाची पण मला इच्छा नव्हती. नागरिकांनी व मंत्र्यांनी राजाची गादी रिकामी असतां कामा नये असा हट्ट धरला व माझा राज्याभिषेक केला. आतां यापुढे तूच राजा आहेस. मी युवराज राहीन. माझ्याविषयी दुसरी



काही व्यर्थ गैर समजूत करून घेऊ नकोस."

परंतु वालीनें सुग्रीवाने सांगितले ते खरे मानले नाही. त्याने सर्वांना बोलावून त्यांच्या समक्ष सुग्रीवाची निंदा केली. म्हणाला–"हा व मी मायावीचा पाठलाग करीत गेलो. तो एका भयंकर गुहेत शिरला. त्याला ठार केल्याशिवाय किष्किंधेला परतणार नाही, अशी मी प्रतिज्ञा केली होती. मी होऊन या सुग्रीवाला गुहेत न यायला सांगितले होते. मी एकटाच त्या राक्षसाला ठार करायला आत गेलो होतो. परंतु तो मला सहजी सांपडला नाही. तरी मी त्याला हुडकून काढला व ठार करून बाहेर यायला निघालो तर गुहेचे दार बंद होते. याने एक मोठी शिळा गुहेच्या तोंडावर लावून ठेवली होती. मी 'सुग्रीवा' म्हणून बराच वेळ हाका मारीत राहलो. परंतु या दुष्टाने राज्यभोगाच्या मोहाला बळी पडून गुहेचे तोंड बंद करून ठेवले होते. मी बाहेर येऊच नये असा त्याचा हेतू होता. परंतु मी त्या दगडाचा चक्काचूर करून बाहेर आलो."

असे सांगून वालीने सुग्रीवाला अपमानीत करून अंगावरच्या कपड्यानिशी घराबाहेर काढले. त्याने सुग्रीवाची बायको तारा हिच्याशी बळजवरीने विवाह करून घेतला. बायकोला घालवून व अपमानित होऊन, सुग्रीव वालीच्या भीतीने ऋष्यमूक पर्वतावर येऊन राहू लागला. त्या वनवासात सुग्रीवा-बरोबर हनुमान, जाम्बुवंत, मैंद, द्विविद असे चार वानर वीर मंत्री म्हणून राहू लागले.

ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीवाबरोबर रहात असतानाच हनुमंत व रामचंद्र यांचा परस्पर परिचय झाला, तो असा–

सुग्रीवाने ऋष्यमूक पर्वतावर रहात असतां पंपा सरोवराच्या परिसरात दोघां तरुणांना पाहिले. ते मानव होते व त्यांच्या हातात धनुर्बाण होते. दिसायला ते अत्यंत सुंदर होते. परंतु त्यांना पाहून सुग्रीवाला भीती वाटली. वालीनेच त्यांना आपले पारिपत्य करण्यासाठी पाठविले असावे, असा संशय देखील त्याच्या मनांत आला. वालीला एक शाप होता. त्यामुळे त्याला ऋष्यमूक पर्वतावर जाणे शक्य नव्हते. म्हणून त्याने कोणाला तरी आपल्याला ठार करण्यासाठी पाठविले असणार, असा वालीच्या मनांत संशय होता. कोठेतरी पळून जाण्याच्या विचारात तो होता, पण कोठे जावे त्याला कळत नव्हते.

तेव्हां हनुमान सुग्रीवाला म्हणाला– "वाली इकडे येणेच शक्य नाही. तो जवळपास कोठे असेल असे वाटतही नाही. मग भीती कां?"

"वाली आला आहे असे मी नव्हते म्हटले. त्या दोघां मानव शरीरधारी तरुणांकडे पहा. त्यांच्याजवळ धनुर्बाण व तलवारी आहेत. त्यांना फक्त पाहिले तरी कोणी भयभीत होईल. वालीने त्यांना माझ्या विरुद्ध पाठविले असावे, अशी शंका वाटते आहे, मला. कोणी राजा असला की त्याला मदत करणारे चार चोघे असतातच नाही का? ते दोघे हेर नसतील कशावरून? आपण बेफिकीर राहून चालणार नाही; नाहीतर मरण निश्चतच नशिबी येणार! शत्रुनाश करण्यासाठी राजाला अनेक उपाय व युक्त्या कराव्या लागतात. त्यात वाली फार हुशार आहे. तेव्हां हनुमंता! तू जाऊन



त्यांच्याशी बोलताना त्याच्या हृदयात प्रवेश करून ते कोण व कशासाठी आले आहेत, काढून घे. त्यांना अरण्यात शस्त्रास्त्रे घेऊन येण्याचे कारण काय बरे असेल? त्यांच्या मनांत माझ्या विषयीं द्वेष असेल तर तो नाहीसा करून सद्भाव उत्पन्न होईल असे कर." सुग्रीव हनुमानाला म्हणाला.

"बरं, मी तसेच करतो!" असे सांगून हनुमान रामलक्ष्मण फिरत होते त्या जागी आला. जाण्यापूर्वी त्याने आपले वानररूप सोडून एका ब्रह्मचाऱ्याचे रूप धारण केले होते. तो रामलक्ष्मणांजवळ जाऊन अगदी नम्रपणे म्हणाला–"प्रणाम! आपणां दोघांना पाहिले तर आपण कोणी राजर्षी, देवर्षी



किंवा तपस्वी आहांत असे वाटते. या पंपा तीरी आपलं आगमन कसं काय झालं? आपण कोण? आपणांस पाहून वनपशू घाबरल्यासारखे झाले आहेत. आपले वृषभस्कंध आणि हत्तीच्या सोंडेसारखे लांब हात पाहून आपण कोणत्यातरी राजघराण्यातले असाल असा भास होतो."

रामलक्ष्मण काहीच बोलले नाहीत.

पुन्हा हनुमान पुढे बोलू लागला– "सुग्रीव नावाचा एक अति बलिष्ठ वानर राजा थोर व धर्मात्मा आहे. तो त्याच्या मोठ्या भावाने त्याला राज्याबाहेर हाकलून दिल्यामुळे दुःखी मनाने जवळ राहतो आहे. त्याचा मी मंत्री. हनुमंत माझे नाव आहे.

पर्वतावरून मला पाठविले, म्हणून मी ब्रह्मचारीरूप घेऊन आपणांकडे आलो आहे. मी जल स्थल कोठे ही जाऊ शकतो. सुग्रीवाने आपणाबरोबर मैत्री करून घेण्याची इच्छा दर्शविली आहे.

ते ऐकून रामाला आनंद झाला. सीतेला रावण घेऊन गेला आहे, तिचा शोध काढून तिला परत आणायला सुग्रीवाची मदत मिळेल हे कबंधाने रामाला सांगितले होते, हे त्याला आठवले.

तेव्हां राम लक्ष्मणाला म्हणाला–"आपण शोधीत निघालो होतो त्या सुग्रीवानेच आपल्या शोधार्थ आपल्या मंत्र्याला पाठविले आहे. याच्या तोंडावर कोठे छल कपट दिसत नाही. तू याच्याशी बोलतोस का?"

लक्ष्मण हनुमंताला म्हणाला–"सुग्रीवाच्या सद्गुणांविषयी आम्ही यापूर्वीच ऐकले आहे. त्याच्याच शोधार्थ आम्ही निघालो होते. तू सुचविल्याप्रमाणे त्याच्याशी मैत्री करण्याच्या हेतूनेच आम्ही येथवर आलो."

रामाला कोणत्यातरी कामासाठी सुग्रीवाच्या मदतीची गरज दिसते आहे. तेव्हां सुग्रीवाला त्याचे राज्य परत मिळवून देण्यास राम नक्कीच मदत करील असा

"परंतु आपण या भयंकर दंडकारण्यात कशासाठी आलांत, हे नाही कळले?"

रामाने लक्ष्मणाला आपला सर्व वृत्तांत सांगायला सांगितले. तेव्हां लक्ष्मण म्हणाला–"हे माझे थोरले बंधु दशरथ महाराजांचे सर्वांत मोठे चिरंजीव रामचंद्र आहेत. यांचा राज्याभिषेक होणार होता. परंतु पितृआज्ञा भंग करणे यांना शक्य नव्हते. म्हणून सिंहासनाचा मोह सोडून यांनी वनवास घेण्याचे मान्य केले. आमच्या बरोबर यांची पतिव्रता पत्नी सीतादेखील वनवास करण्यास निघाली. मी यांचा धाकटा भाऊ लक्ष्मण. रामचंद्राच्या थोर गुणांकडे पाहून मी यांची सेवा करणेच आपल्या आयुष्याचे ध्येय ठरविले आहे. म्हणून मी दोघांच्या बरोबर आलो आम्ही दोघे इतरत्र गेलों असतां यांच्या पतिव्रता स्त्रीला कोणीतरी राक्षस उचलून घेऊन गेला. त्या राक्षसाचा शोध सुग्रीवाच्या मदतीने लागू शकेल, असे आम्हांला आणखी एका राक्षसाकडून कळले. तू विचारलेसच म्हणून कोणताही आड पडदा न ठेवतां सर्व सांगितले. त्याला शरण देण्याची शक्ति असणारा हा महापुरुष राम आज सुग्रीवाला शरण मागीत आहे. तो देऊ शकेल असे आम्हांला वाटते."



ते ऐकून हनुमान म्हणाला–"आमचे महाराज सुग्रीवच आपल्याकडे शरण मागायला यावत येण्यासारखी आज त्यांची परिस्थिती आहे. त्यांचे राज्य व पत्नी त्यांचा मोठा भाऊ वाली याने अपहरण केले आहे. तरी या स्थितीतही तो सीतेच्या शोधासाठी नक्कीच आपणांला मदत करू शकेल." नंतर हनुमान दोघांना सुग्रीवाजवळ बोलावून घेऊन गेला.

लक्ष्मण रामाला म्हणाला–"याच्या मदतीने नक्कीच आपणांस आपल्या कार्यात यशप्राप्ती होईल."

हनुमानाने आपले ब्रह्मचारी रूप सोडून वानररूप धारण केले आणि रामलक्ष्मणांना



आपल्या खांद्यांवर बसवून ऋष्यमूक पर्वतावर आणले. परंतु सुग्रीव तेथे नव्हता. शेजारच्या मलय पर्वतात जाऊन लपून बसला होता.

हनुमान मलय पर्वतावर जाऊन सुग्रीवाला म्हणाला—"ज्यांच्या शोधार्थ तू मला पाठविले होतेस ते रामलक्ष्मण इक्ष्वाकु वंशीय दशरथ महाराजांचे पुत्र आहेत. रामाने पितृआज्ञेच्या पालनार्थ वनवास ग्रहण केला आहे. त्याच्या पत्नीला कोणी तरी राक्षस धरून घेऊन गेला आहे. म्हणून तो राम तुझ्याकडे शरण मागायला आला आहे. रामलक्ष्मण दोघे बंधू तुझ्याशी मैत्री करण्याच्या हेतूने आले आहेत.

करून घे."

सुग्रीवाला फार आनंद झाला. त्याने एका सुंदर मानव तरुणाचे रूप धारण केले आणि रामलक्ष्मणाला भेटून म्हणाला—"आपणां दोघांविषयीं हनुमंताने मला सर्व काही सांगितले आहे. रामचंद्रा! तू मानवांचा राजा असूनही माझ्यासारख्या एका सामान्य वानरासमोर मैत्रीचा हात पुढे केला आहेस. यात मी आपला गौरव मानतो."

त्यानंतर सुग्रीवाने हात पुढे केल्याबरोबर रामाने त्याचा हात हातांत घेऊन मैत्री दृढ झाल्याचे दर्शविले. दोघे परस्परांना प्रेमाने भेटले.

हनुमानाने अरणी वृक्षाच्या सहाय्याने अग्नि पेटवून त्याची पूजा केली. राम व सुग्रीव दोघांनी त्या अग्नीला प्रदक्षिणा घालून व त्याला साक्षी ठेवून परस्पर मैत्रीची प्रतिज्ञा केली.

राम सुग्रीवाला म्हणाला—"सुग्रीवा, यापुढे तुझे दुःख ते माझे व माझे ते तुझे. आपण दोघे परस्परांच्या सुखदुःखाचे वांटेकरी झालो."

त्यानंतर दोघे एका झाडाच्या जाडजूड फांदीवर बसले. लक्ष्मणाने एका चंदन वृक्षाची फांदी तोडली.

नंतर सुग्रीवाने त्याचे वालीशी भांडण कसे झाले थोडक्यात वर्णन करून सांगितले व म्हणाला–"त्याच्या भीतीने मला येथे येऊन रहावे लागत आहे. माझी ही भीती कायमची जाईल असे काही तर कर."

राम स्मित करून म्हणाला–"मैत्रीचे प्रत्यक्ष फळ तुला लवकरच दिसेल. तुझ्या पत्नीचे अपहरण करणाऱ्या वालीचा वध मी करतो."

सुग्रीव म्हणाला–"रामा! तुझ्या कृपेने मला माझे राज्य व पत्नी परत मिळाली पाहिजे, वालीचा वध तू कर. मी सीतेचा शोध करून तिला आणून पोचवतो. ती स्वर्गात असो की पाताळात, तिला आणून देण्याची जबाबदारी माझी. मला आतां एक गोष्ट आठवते आहे–मी पाहिली ती सीताच असावी. तिने मला व माझ्या-बरोबर चौघे वानर बसले होते त्यांना पाहून आमच्या समोर तिच्या आभूषणांचे एक गाठोडे टाकले. ते मी संभाळन ठेवले ओळखता येतात का?"

राम स्वत:ला आवरु शकला नाही व म्हणाला–"मित्रा! लवकर दाखव ते दागिने!" सुग्रीवाने गुहेतून सीतेने आपल्या पदराचा एक तुकडा फाडून त्यात बांधलेले तिचे दागिने आणून दाखविले.

ते पाहतांच राम "हा सीते!" असे म्हणत दु:खावेगाने स्वत:ला आवरू न शकल्याने लक्ष्मणाला म्हणाला–"लक्ष्मणा! तिला राक्षस उचलून घेऊन जात असतां सीतेने फार काळजीपूर्वक ओळख पटावी यासाठी हे टाकले असावेत."

लक्ष्मण म्हणाला–"तिच्या अंगाखांद्या-वरचे दागिने मी ओळखू शकणार नाही. परंतु वहिनींच्या चरणी नमस्कार करतांना पाहिलेली जोडवी मी नक्कीच ओळखू शकेन."

रामाने सुग्रीवाला विचारले–"त्या वेळी तो राक्षस सीतेला कोणत्या दिशेने घेऊन गेला?"





# अमरवाणी

व्यसने वार्थकृच्छे, वा,
भये वा जीवितांतके,
विमृशन्वै स्वया बुद्धया
धृतिमा न्ना वसीदति ।। ।। १ ।।

[दु:खात, धनहानी झाल्यास किंवा जिवावरचे संकट ओढवल्यास धैर्यशाली लोक शांतपणे साधकबाधक गोष्टीचा विचार करतात. घाबरुन जात नाहीत.]

बालिशस्तु नरो नित्यं
वैक्लव्यं योनुवर्तते,
स मज्जत्यवश शोके
भाराक्रान्तेव नौ जले ।। ।। २ ।।

[कमी समजूत असलेला व दीन स्वभावाचा माणूस वजन जास्त झाल्याने जशी नाव पाण्यात बुडते तसा (या संसार सागरात) बुडतो.

ये शोक मनुवर्तन्ते
न तेषां विद्यते सुखम्,
तेजश्च क्षियते तेषाम्,
न त्वं शोचितु मर्हसि ।। ।। ३ ।।

[सदा न कदा दु:ख करीत बसणाऱ्याला सुख कधीच मिळत नाही. त्याचे तेज क्षीण होते म्हणून तू दु:खी होता कामा नये.]

–वाल्मीकि



# मित्रभेद

[ १९ ]

"दुसऱ्या दिवशी कोळ्यांनी डबक्यात जाळे टाकून त्यात होते नव्हते ते सर्व मासे धरून नेले. प्रत्युत्पन्नमती मेल्यासारखा पडून राहिला. कोळ्यांनी विचार केला तो मेला असावा, किनाऱ्यावर काढून ठेवून उरलेले मेल्यानंतर त्यांच्याबरोबर त्यालादेखील उचलून नेऊ. त्याप्रमाणे किनाऱ्यावर ठेवताच प्रत्युत्पन्नमती चटदिशी उडी मारून पाण्यात शिरला. यद्भविष्यती जाळ्यातच तडफडत पडून राहीला. कोळी त्याला इतर माशांबरोबर घेऊन गेले."

बायकोने सांगितलेली ती गोष्ट ऐकून नर म्हणाला–"मी यद्भविष्यतीसारखा आहे असे वाटले होय तुला? मी प्रथमच सर्व विचार करून युक्त्या करतो आणि आपल्या कामात यशस्वी होतो."

तेव्हां मादीने समुद्र किनाऱ्यावर अंडी घातली.

मादीने समुद्रकाठी अंडी घातली त्या आधी नवराबायकोचे जे बोलणे झाले होते सर्व समुद्राने ऐकले होते. "या नर टिटवीला गर्व उतरवलाच पाहिजे!" असा समुद्राने विचार केला.

दुसऱ्या दिवशी टिटवीचे जोडपे चाऱ्याच्या शोधार्थ निघून गेल्यावर समुद्राच्या लाटेने सर्व अंडी ओढून घेतली. पक्षी परतले तेव्हां तेथे एकही अंडे नव्हते.

मादी नराला म्हणाली–"पहा, आपल्या अंड्यांचे काय झाले ते. तू यद्भविष्यती सारखाच वागून हे संकट ओढवून घेतलेस. पोटच्या पोरांना गमावून जगण्यापेक्षां आगीत उडी टाकून जीव देते!"

वेष्टनच्या मलपृष्ठावरील चित्र



"तू अशी घाई करून जिवाचे बरेवाईट करून घेऊ नकोस. मी हा समुद्र वाळवून टाकून याला आपला तडाखा दाखवितो. पहा तर!" नर म्हणाला.

"ज्वाला विझविण्याच्या प्रयत्नात पंख जाळून घेणाऱ्या भ्रमरासारख्याच या गप्पा आहेत." मादी म्हणाली.

"मी आपल्या चोचीने समुद्रातले सर्व पाणी पिऊन याला कोरडी वाळू करून दाखवितो. पहात रहा." नर म्हणाला.

"तुझ्या चोचीत भरणार तो एक पाण्याचा थेंबच ना? गंगा, सिंधू नदीसारख्या सहा सहस्र नद्या आणि पंचाहत्तर हजार उपनद्या ज्या समुद्रात सतत पडत असतात अशा समुद्राला तू कसा काय आटवणार?" मादी म्हणाली.

"हे सर्व हताश झाल्यासारखे कशाला बोलते आहेस? मनाचा दृढनिश्चय करून खंबीरपणे काम केले तर अशक्य असे काही या जगात आहे का?" नराने विचारले.

"निदान इतर सर्व पक्ष्यांशी मदत तरी माग. एकाच्या हातून न होणारी कामे चार चौघांच्या हातून पुरी होतात. एका बारीकशा धाग्याने हत्तीला बांधता येत नाही. परंतु शेकडो धाग्यांच्या दोरखंडाने मदोन्मत्त हत्तीला बांधतां येते. सुतार पक्षी, चिमणी, बेडूक आणि भ्रमरीने ऐक्य करून हत्तीची खोड मोडली होती, माहिती आहे का?" मादी म्हणाली.

"ऐकू दे तरी ती गोष्ट!" नर म्हणाला.

तेव्हां मादी गोष्ट सांगू लागली.

**चिमणी व हत्ती**

एका अरण्यात एका झाडाच्या फांदीवर घरटे बांधून एक चिमणीचे जोडपे रहात असे. मादीने नुकतीच अंडी घातली होती. दुसऱ्या दिवशी एका हत्तीने दुपारचे कडक ऊन सहन न झाल्यामुळे त्या झाडाच्या सावलीत उभा राहून स्वभावानुसार सोंडेने डोक्यावरची फांदी धरून ओढली. त्याच फांदीवर चिमणीचे घरटे होते. सर्व अंडी जमिनीवर आदळून फुटली.

अंडी फुटून गेल्यामुळे माझी मोठ-मोठ्याने ओरडून रडू लागली. तिचे ते ओरडणे ऐकून तिच्या शेजारच्या झाडावरची सुतारपक्षीण चवकशीला आली आणि तिला रडण्याचे कारण विचारून म्हणाली—"अग वेडे! रडून काय मिळणार आहे? जे प्रज्ञावान असतात ते गेलेल्याचा शोक करीत बसत नाहीत. गेलेल्यासाठी शोक करीत बसल्याने दुप्पट त्रास होतो. स्वत: वांचण्याचा प्रयत्न करावाच लागतो."

ते ऐकून चिमणी म्हणाली—"तू म्हणतेस ते खरे आहे ग. परंतु हा दुष्ट हत्ती फारच बाई! याला मद चढला आहे. म्हणून याने माझ्या मुलांना ठार केले. तू माझी खरी सखी मैत्रीण असशील तर या मदोन्मत्त हत्तीला कसे ठार करावयाचे याचा विचार करून सांग."

"आपल्याला आपत्काळी मदत करतो तोच खरा मित्र. आपली स्थिती चांगली असते तेव्हां पुष्कळ मित्र गोळा होतात. परंतु चांगली स्थिती नसते तेव्हां मदतीला [illegible] आणि मित्र व बंधू! खायला घालतो तोच बाप आणि विश्वास करतो तोच मित्र. सुखी करते तीच बायको. माझी मैत्री कशी आहे हे मी तुला लवकरच दाखविते. वीणारव नावाची माझी एक भ्रमर मैत्रीण आहे तिला बोलावून आणते. हत्तीला ठार करण्याचा उपाय ती सांगेल." सुतार पक्षीण म्हणाली.

चिमणीलाबरोबर घेऊन सुतार पक्षीण आपल्या भ्रमर मैत्रिणीकडे गेली आणि चिमणीवर झालेल्या अत्याचाराची गोष्ट सांगून म्हणाली—"या हत्तीला ठार करण्याचा उपाय तूच सांगितला पाहिजेस."

"अरे रे, बिचारी! हिला इतका त्रास झाला का? मेघदूत नावाचा बेडूक माझा एक चांगला मित्र आहे. त्याचा सुद्धां सल्ला घेऊ या. हितैषी सज्जन, राजनीति कुशल अशा विद्वानांचा सल्ला घेऊन केलेल्या कामात यश मिळते असे सांगतात.' भ्रमरी म्हणाली.





# तिळ्या बहिणी

## [ ७ ]

[ रात्रीच्या वेळी अरण्यात एका झाडावर उदयन व संध्याकुमार झोपले असतां वावभर लांब दाढी असलेल्या व टीचभर उंचीच्या माणसाने त्यांना बंदी करून घेऊन आपल्या घरी नेले. निशीथ आपल्या भावांना शोधीत त्या घरात पोचला आणि त्याला दाढीवाल्याच्या गळयातल्या हाराचे आणि भस्माचे गुपित थोडे थोडे कळले. पुढे—]

संध्याकुमाराला व निशीथला दिवसां मुळीच दिसत नव्हतेच. त्यांत त्या दाढीवाल्याने त्यांच्यावर कसले तरी भस्म टाकले आणि ते पडतांच दोघे अदृश्य झाले. त्याच बरोबर सर्व जगही त्यांच्या दृष्टीआड झाले. त्यामुळे त्यांना उदयन वीतभर उंचीचा झाल्याचे आणि खाटेवर घोरत पडलेला तो दाढीवाला सामान्य मनुष्य झाल्याचे कळायला काही मार्ग नव्हता. दाढीवाला केव्हां झोपून उठतो आणि कायकाय आणखी करतो या विचाराने ते थोडे घाबरल्यासारखे झाले होते. त्याशिवाय त्यांच्या मोठ्या भावावर काही दुसरे संकट तर आले नसेल ना ही काळजी वाटत होती.

दाढीवाल्याचे गुपित कळले याबद्दल आणि त्याने आपल्याला फसविण्याऐवजी आपणच त्याला फसवून त्याच्या सारखे झालो याबद्दल उदयनला आनंद वाटत



होता. त्या आनंदाच्या भरात तो आपल्या भावांची गोष्ट पार विसरून गेला. आतां त्याला त्याच्या खिशातल्या भस्मांशिवाय काही दिसत नव्हते. या भस्मांचा व अंजनांचा उपयोग कशासाठी बरे होऊं शकेल, या गोष्टीचा विचार करीत असतां त्याला त्याच्या भावांची आठवण झाली. त्याने इकडे तिकडे नजर फिरवून पाहिली, परंतु ते कोठे दिसणार त्याला?

आतां मात्र त्याला काही सुचेनासे झाले. काय करावे या विचारात असतां एकाएकी तो दाढीवाला उठून बसला आणि त्याला समोर अगदी त्याच्यासारखाच गिड्डा दाढीवाला दिसला. तत्क्षण त्याच्या सर्व लक्षात

गुपित बाहेर पडले, हे कळण्या इतका तो नक्कीच हुशार होता. आपले गुपित बाहेर पडलेले पाहून मनात तो बेचैन झाला होता व त्याला रागही आला होता. तरी त्याने ते बाहेर न दर्शवितां अगदी सहजपणे तो हळूहळू उदयनच्याजवळ येत म्हणाला–"तुम्ही कोण मला माहीत नाही, पण आहांत आमचेही गुरु! माझे गुपित इतक्या सहजी पदरात पाडून घेणारा तुमच्या व्यतिरिक्त दुसरा कोणी मी उभ्या आयुष्यात पाहिला नाही. मी खरोखरच तुमच्या सारख्यांची भेट झाल्याबद्दल स्वत:च्या भाग्याची वाखाणणीच करतो आहे. परंतु तुम्हांला यापासून काही विशेष फायदा होईल असे मात्र नाही मला वाटत. तुम्ही इकडे कशासाठी आलात हे सांगू शकल्यास मी ते काम एका क्षणार्धात करून देऊ शकेन. मी असतां तुम्हांला कोणातीही कष्ट करण्याचे कारण नाही." असे म्हणत अनेक प्रलोभने देत व भुलावण्या दाखवीत उदयनच्या गळ्यातला हार परत मिळविण्यासाठी त्याने अनेक युक्त्या करून पाहिल्या.

परंतु उदयन इतक्या सहजी त्याच्या बोलण्यात फसण्या इतक्या भोळा नव्हता. म्हणाला–"प्रथम तू माझ्या भावांना कोठे

इतर गोष्टी बोलू!"

"मी नाही कोठे लपवून ठेवले, येथेच तर आहेत ते." तो म्हणाला. उदयनला वाटले की तो आणखी काही लबाडी करीत असावा. म्हणून तो त्याला दटावीत म्हणाला–"मला तू फसवितोस? माझ्याजवळ तुझ्या या गमजा चालणार नाहीत!" तेव्हां तो स्मित करून म्हणाला–"तुझ्या डाव्या खिशातल्या डबीतले काळं भस्म तेथे थोडे टाक!" असे म्हणत दाढीवाल्याने उदयनच्या भावांना अदृश्य करून ठेवले होते ती जागा दाखविली. त्या जागी उदयनने ते काळे भस्म टाकल्याबरोबर निशीथ आणि संध्याकुमार त्याला दिसले.

नंतर उदयन म्हणाला–"हे झालं. आतां माझा हात पुन्हां कसा येईल ते सांग!"

"त्यालासुद्धां एक औषध आहे व ते तुझ्याचजवळ आहे. पहा, तुझ्या उजव्या खिशात हिरव्या मलमाची एक डबी आहे. ते मलम आपल्या थोटचा हाताला लाव." दाढीवाला म्हणाला.

उदयनने त्याप्रमाणे केल्यावर त्याचा हात पहिल्यासारखा झाला.

आतां उदयनला तो दाढीवाला आपले सर्व गुपित सांगू शकेल असे वाटू लागले. प्रथम त्याच्या खिशातले पांढरे भस्म आणि



तांबडे मलम कोणत्या कामाचे आहे, हे कळले तर बरे होईल असे वाटले. म्हणून त्याने ते भस्म व मलम दाढीवाल्याला दाखवून विचारले–"मग, यांचा काय उपयोग?"

दाढीवाला हंसत मुखाने म्हणाला–"एवढेदेखील कळलं नाही का तुला? तुझ्या दोघां भावांना मी अदृश्य केले ते या पांढऱ्या भस्मानेच आणि तुझा हात थोटा झाला तो या तांबड्या मलमानेच." असे सांगून त्याने आपले सारे गुपित उघडे केले.

"मग हा पंचा कशाला?" उदयनने त्याला विचारले.



"त्याचे दोन उपयोग आहेत. तू मनात कोणताही खाद्य पदार्थ मिळावा असा विचार करून पंचा अंथरल्या बरोबर तो पदार्थ पंचावर मिळेल. त्याचप्रमाणे कोणाला कोणत्याही प्रकारचा आजार असो, ह्या पंचाने तो बरा होतो." तो दाढीवाला म्हणाला.

"तरमग आमच्या डोळ्यातला दोष दूर करू शकेल का हा पंचा?" उदयनने पंचाचा उपयोग कळतांच विचारले.

"डोळ्यातला दोष म्हणजे काय, मला नाही कळले?" दाढीवाल्याने आश्चर्यचकित होऊन विचारले. तेव्हां उदयनने तिघांना अनुक्रमे फक्त दिवसा, पहाटेच्या

वेळी दिसते हे सविस्तर सांगितले.

सर्व ऐकून घेतल्यावर तो दाढीवाला म्हणाला–"अस्सं होय? मी तिघांना कशी सामान्य दृष्टी येईल हे सांगतो. परंतु त्या पूर्वी तू तेवढा हार माझा मला परत कर!"

परंतु उदयन तेवढा भोळा नव्हता. कारण तो दाढीवाला तो मंत्रवलेला हार नसताना जेवढा नम्र व आर्जवी झाला होता, तोच हार हातात आल्यावर शेर होऊन तिघांना जिवंत सोडणार नाही, हे ओळखून उदयन त्याला म्हणाला–"आजोबा! आम्हांला दृष्टी यायला कोणता तो उपाय सांगा, ही आमची शेवटची मागणी आहे. येथून पश्चिमेकडे सुमारे दहा मैलावर एक गुहा आहे. त्या गुहेत आम्ही तुमचा हार ठेवून जातो. तुम्ही तो घेऊन जा."

तो हार म्हणजे त्याला प्राणदानासारखे होते. म्हणून तो दाढीवाला त्या गोष्टीस कबूल झाला.

इतक्यात निशीथ व संध्याकुमार उठून उदयनच्याजवळ येऊन म्हणाले–"दादा! आपण याच्या हातात सापडल्यापासून काही खाल्ले प्याले नाही. पोटात कावळे कोकलू लागले आहेत. त्या पंचाचे ते गुपित खरं की खोटं एकदां पाहू या तरी!"

सुचायला हवी होती. परंतु धाकट्या भावंडांनी सुचविल्याबरोबर उदयनने निरनिराळ्या फळांची इच्छा करून तो पंचा पसरला मात्र ताजी उत्तमोत्तम फळे पंचावर दिसू लागली. उदयनने काही फळे स्वतः आणि त्याच्या भावंडांनी खाल्ली. परंतु आश्चर्य म्हणजे पुन्हां पंचा फळांनी भरलेला दिसला. म्हणून तो दाढीवाला किती का दुष्ट असेना उदयनने औदार्य दाखवून त्यालादेखील फळे खायला दिली.

पोट भरल्यावर उदयनने तो पंचा घडी करून खिशात ठेवून दिला आणि त्या दाढीवाल्याला विचारले आतां सांगतां का पुन्हां दृष्टी यायला याचा कसा उपयोग करायचा तो? दृष्टी आल्याबरोबर आम्ही आपल्या वाटेने निघून जाऊ."

तो दाढीवाला म्हणाला–"आपल्या जवळच्या तांबड्या मलमाची एक गोळी करून ती या रेशात गुंडाळून जाळ. त्यातून धुराचे लोट येऊ लागतील. तेव्हां तुम्ही तिघांनी हा पंचा तोंडावर पांघरून त्या मलमाची धुरी डोळ्यांना लागेल अशी घ्या. तुम्हांला रात्रं दिवस छान दिसू लागेल."

उदयनने लाल मलमाची एक गोळी करून ती त्या रेशात गुंडाळली. परंतु ती पेटवायची कशी, हा प्रश्न होताच.



उदयन या विचारात असता त्या दाढीवाल्याने दोन गारगोट्यांनी रेशात गुंडाळलेल्या त्या गोळीवर ठिणग्या पाडल्याबरोबर धुराचे लोट बाहेर येऊ लागले. उदयने आपल्या दोघां भावांना जवळ बसवून तिघांच्या डोक्यांवर तो पंचा टाकला.

पांच मिनिटांनी तिघांनी पंचा काढला. तिघांच्या डोळ्यांतून पाण्याच्या धारा येत होत्या. थोड्या वेळाने डोळे कोरडे झाले.

परंतु आश्चर्य असे की चांगली दृष्टी यावी यासाठी केलेला तो खटाटोप करून व त्या दाढीवाल्याच्या सांगण्याप्रमाणे करून झाल्यावर दृष्टी यायची तर दूरच डोळ्याची बुबुळेच नाहीशी झाली.



आतां मात्र उदयनला भयंकर राग आला. म्हणाला–"काय रे लबाडा! हीच ना तू आम्हांला दृष्टी आणून दिली म्हणतोस?"

तो दाढीवाला म्हणाला–"अशी घाई करू नकोस! तुम्हांला फंसवायचेच होते मला तर मी तुम्हांला आतांपर्यंत सांगितले ते सर्व गुपित सांगितले असते का? सर्व काम पूरे झाले आहे, व्यर्थ ओरडण्याचे कारणच नाही. तू बुभुळं नाही म्हणतोस, तर तुझ्याजवळ ते हिरवे मलम आहे ते थोडे पापण्यांना लावून पहा!"

त्याप्रमाणे उदयनने ते हिरवे मलम पापण्यांना लावल्याबरोबर त्याला परत

त्याने त्यानंतर आपल्या दोघां भावांच्या डोळ्यांना ते मलम लावले. त्यांनासुद्धां छान दिसू लागले. आपण दाढीवाल्यावर उगाच रागावल्याचा त्याला पश्चात्ताप झाला. निशीथला फक्त रात्री दिसत होते व संध्याकुमाराला फक्त अंधुक उजेडात दिसत होते. परंतु त्यांना सुद्धां छान दिसू लागल्याचे पाहून तिघांना आनंद झाला व त्यांची मने त्या दाढीवाल्याबद्दल आपली कृतज्ञता दर्शविण्यासाठी भरून आली.

नंतर ते तिघे आपल्या घोड्यांच्या शोधार्थ निघाले. प्रथम त्यांनी घोडे बांधून ठेवले होते त्या झाडाजवळ आले. उदयनने काळे भस्म शिंपडल्याबरोबर घोडे खेंकाळू लागले. त्या घोड्यांना घेऊन गुहेत लपवून ठेवलेल्या काळ्या घोड्याजवळ आले. नंतर तिघे आपापल्या घोड्यांवर बसून त्या दाढीवाल्याच्या घरी आले.

त्यानंतर दाढीवाल्याने विचारले– "तुम्हांला पाहिजे होते ते सर्व मिळाले का, की आणखी काही आहे? नसेल तर तुम्ही आपल्या वाटेने जा आणि मला वाट मोकळी करा. वचन दिल्याप्रमाणे माझा हार तेवढा गुहेत ठेवून जा. परंतु तुम्ही वचन मोडलेत तर मात्र....." आणखी असेच काही तो बोलत असतांच निशीथ मध्येच त्याला

सांगितलेस की तू कोण आणि गरीब वाटसरूंना असा बंदी करण्याचा धंदा कां करतोस?"

तो दाढीवाला म्हणाला–"मी ते सर्व सांगू नये, असे गूढ आहे. ते जाहीर केले तर माझे डोके फुटेल व तत्काळ मला मरण येईल."

तिघां भावांनी एकदांच त्याच्याकडे सहानुभूतीपूर्वक पाहिले आणि त्याचे ते गूढ त्याच्याकडून काढून घेण्याचा आग्रह न धरतां आपापल्या घोड्यांवर बसून निघाले. जात असतां उदयन दाढीवाल्याला म्हणाला–"आणखी एकच इच्छा राहली आहे. तुझा हार मी तुला देतो. परंतु ही मलमे, भस्मे आणि पंचा देतोस का आम्हांला?"

त्या गोष्टीला त्या दाढीवाल्याने होकार दिला. त्यानंतर पांढऱ्या घोड्यावर उदयन, काळ्या घोड्यावर निशीथ आणि तांबड्या घोड्यावर संध्याकुमार बसले आणि निघाले.

थोडे अंतर चालून गेल्यावर ते दाढी-वाल्याला त्यांनी सांगितलेल्या गुहेजवळ पोचले. वचन दिल्याप्रमाणे उदयनने आपल्या गळ्यातून हार काढून गुहेत ठेवून दिला. गळ्यातून हार काढल्याबरोबर उदयनला स्वस्वरूप लाभले. नंतर तिघे पुढे निघाले.

थोडे दूर गेल्यातर ते एका दाट अरण्यात येऊन पोचले. काळोख पडू लागला होता.



पुन्हां रात्री कोठे अंग टाकायचे हा प्रश्न उभा राहिलाच. त्याविषयी विचार करीत असतां त्यांच्यावर तीन सिंह गर्जना करीत धावून आले. संध्याकुमाराला व निशीथला काय करावे, सुचेना. परंतु उदयन त्याच्या जवळच्या भस्माची आठवण झाली. त्याने पांढरे भस्म काढून निशीथ, संध्याकुमार दोघांवर आणि त्यांच्या घोड्यांवर टाकले. ते लगेच अदृश्य झाले. नंतर त्याने आपल्या घोड्यावर व स्वत:वरदेखील ते भस्म टाकून घेतले. तो आपल्या घोड्यासह अदृश्य झाला.

ते सर्व अदृश्य झाले आणि सिंह गर्जना करीत तेथवर येऊन पोचले दोन्ही गोष्टी एकदमच घडल्या. तोंडाचा घास एकाएकी अदृश्य झाल्याबद्दल त्या सिंहांना निराशाचे झाली. काही वेळ तेथेच हुंगून पहात आणि शेवटी हताश होऊन ते सिंह निघून गेले.

सिंह निघून गेले तरी त्या अरण्यात रात्री मोकळेपणे हिंडणे धोक्याचे आहे हे [illegible] अदृश्य रूपातच आले. उजाडल्यावर उदयनने त्याच्या जवळचे काळे भस्म स्वत:वर, आपल्या घोड्यावर आणि आपल्या दोघां भावांवर व त्यांच्या घोड्यांवर टाकले. त्यानंतर सर्व स्वस्वरूपात आले.

नंतर तिघे पुन्हा आपल्या घोड्यांवर बसून वायुवेगाने निघाले. दाढीवाल्याच्या कृपेने त्यांना दृष्टी चांगली लाभली होती म्हणून कोणी पुढे व कोणी मागे चालावयाचे हा प्रश्न उरला नव्हता. काही अंतर चालून गेल्यावर त्यांना एका निर्जन स्थानी एक वाडा दिसला.

"पाहू या, त्या वाड्यापर्यंत कोण प्रथम पोचतो!" असे म्हणत तिघांनी आपापल्या घोड्यांना टांचा मारल्या. उदयनचा घोडा वायुवेगाने निघाला. त्याच्या घोडा पाठीमागे संध्याकुमार व निशीथ दोघे समान वेगाने जात होते. परंतु आश्चर्य असे की उदयन पापण्या लवतांलवतां एकदम अदृश्य झाला.

(क्रमश:)



# विधिलिखित

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ पुन्हां गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू किती प्रयत्न केलेस तरी शेवटी विधिलिखित असते तेच घडते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला दीर्घोद्योगीची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

समुद्र किनाऱ्यावर ब्रह्मस्थली नावाचे एक गाव होते. त्या गावात वेदशर्मा नावाचा एक ब्राह्मण रहात असे. तो चारही वेदांचा पारंगत विद्वान म्हणून प्रसिद्ध होता. त्याच्याजवळ एक शिष्य वेदाध्ययन करीत असे. त्याने खूप लक्ष्य लावून वेदांचा अभ्यास केला आणि 'दीर्घोद्योगी' म्हणून गुरुकडून उपाधि संपादन केली. दीर्घो-

वेताळच्या गोष्टी










द्योगीला विद्याभ्यास करीत असतां खाण्या-पिण्यासाठी व पुस्तकांकपड्यांसाठी खर्चाला तमोभेदक नावाचा एक गृहस्थ पैसे देत असे. दीर्घोद्योगी विद्याभ्यास करीत असतां भग्न-तामस नावाच्या ब्राह्मणाच्या घरी रहात असे. खूप परिश्रम करून दीर्घोद्योगी चारही वेदांत पारंगत झाला.

एकदां भग्नतामस दीर्घोद्योगीशी बोलत बसला असतां म्हणाला—"बाबा रे, तुला मी कधी सांगितले नाही, या मोठ्या राहत्या वाड्या व्यतिरिक्त माझ्या मालकी-च्या शेकडो गाई व म्हशी आणि मोठी शेतीवाडी आहे. याशिवाय दासदासी व नोकरांचाकरांचा मोठा परिवार आहे. मी इतकी विद्वत्ता संपादन केली असूनही जन्मापासून एक शेतकरी असल्या कार-णाने त्या विद्वत्तेचा यत्किंचितही उपयोग करू शकलो नाही. आतां वार्धक्य आले म्हणून, ऋषीमुनींनी सांगितल्याप्रमाणे उर-लेले आयुष्य तीर्थयात्रेत घालविण्याचा विचार आहे. मोक्ष हवा असेल तर काशी-विश्वनाथाची सेवा केली पाहिजे. माझ्या-कडे जे काही आहे ते सर्व तुला देतो. तूच याचा मालक आहेस."

दीर्घोद्योगीने आनंदाने त्या गोष्टीस होकार दिला. दुसऱ्या दिवशी तो आपल्या गुरूचा आशीर्वाद घेऊन तमोभेदकाचा निरोप घेण्यासाठी त्याच्या घरी आला.

तिकडे भग्नतामसाने दीर्घोद्योगीची बराच वेळ वाट पाहिली, पण तो आला नाही. दुपारची वेळ झाली तेव्हां भग्नतामस दीर्घोद्योगीच्या शोधार्थ निघाला तेव्हां तो तमोभदकाच्या घरी गोंधळलेल्या स्थितीत घुटमळत असलेला आढळला.

"मी अद्याप तमोभेदकाचा निरोप घेतला नाही. घरात सर्व लोक जरा गडबडीत असल्यासारखे दिसत आहेत. कारण कळले नाही." दीर्घोद्योगी भग्नतामसाला म्हणाला.

भग्नतामस स्मित करून म्हणाला—"तमोभेदकाची बायको थोड्याच वेळाने प्रसूत होईल. तिला मुलगी होणार, तुझे तिच्याशी लग्न होणार आणि तिच्या कुळाचा नाश होणार!" असे सांगून भग्न-तामस निघून गेला.

थोड्या वेळाने तमोभेदक "फुटकंनशीब" असे मनात म्हणत बाहेर आला. कारण त्याला मुलगी झाली होती. ते ऐकून दीर्घोद्योगी जास्तच गोंधळला. कारण भग्न-तामसाने सांगितलेले पहिले भविष्य खरे झाले होते. तेव्हां त्याने सांगितलेली इतर दोन्ही भविष्येसुद्धां नक्कीच खरी होतील असे दीर्घोद्योगीला वाटले. ती दोन भविष्यें कशी खोटी होतील व त्या पापी मुलीशी लग्न लावून पायात बेडी अडकवून घेतल्या-शिवाय कसे सुटायचे असा विचार करीत दीर्घोद्योगी दुसऱ्या दिवशी उजाडतांच निघाला. समुद्र किनाऱ्यापासून दूर, फार दूर जाण्याच्या हेतूने तो दहा वर्षे सतत चालत राहल्यावर शेवटी गंगातीरी येऊन पोचला.

एके दिवशी तो एका ब्राह्मणांच्या गावी येऊन पोचला. समोर एक म्हातारी दिसली. तिला तो म्हणाला—"आजी! थोडे पाणी प्यायला द्यायला सांगता का?"

ती म्हातारी हाक मारीत म्हणाली—"बाळ तमालिके! एक पाट आणि तांब्या-भरून पाणी घेऊन ये कशी, माझे आई!"

घरातून एक मुलगी आली. तिच्या अंगावरचे सर्व कपडे काळे होते. ती आपल्या



चंचल डोळ्यांनी एका क्षणार्धात चारी-बाजूला पाहून लाजत पुढे आली. तिच्या एका हातात पाट होता आणि दुसऱ्या हातात पाण्याचा तांब्या होता.

"बसा!" असे म्हणत ती पाट मांडू लागली आणि तांब्या खाली ठेवला.

"काय ग हे!" जा पुन्हां जाऊन पाणी घेऊन ये पाहू. म्हातारी म्हणाली.

दीर्घोद्योगी बसल्यावर थोड्या वेळाने तिने त्याला विचारले—"कोठून आलास बाबा! आणि कोठे जातो आहेस?"

"सर्व जग फिरून आलो, म्हणायला हरकत नाही. कोठे तरी ब्राह्मणांच्या गावात स्थायिक होऊन रहावे. मलांना



शिकवावे आणि आयुष्य घालवावे, विचार करतो आहे!" दीर्घोद्योगी म्हणाला.

"अस्सं! तरमग तू इतर कोणाकडे जाण्याची गरजच काय? माझेच दोघे नातू आहेत! त्यांना तुझी गरज आहे आणि तुला त्यांची गरज आहे." म्हातारी म्हणाली.

दीर्घोद्योगीला ते काम आवडले व तो दोन वर्षे त्या म्हातारीच्या नातवांना शिकवीत तिच्याच घरात राहला. मध्यंतरी म्हातारीच्या मनात एक विचार आला. तमालिकेचे वय लग्नाचे झाले होते. तिचे दीर्घोद्योगीशी लग्न करून मोकळे व्हावे! तिने तसे त्याला विचारले ही.

दीर्घोद्योगीने थोडा विचार केला आणि लग्नास कबूल झाला. कोठे तरी पश्चिमेकडच्या समुद्रकाठी राहणाऱ्या तमोभेदकाच्या पापी मुलीशी लग्न होण्यापेक्षां, त्या संकटातून मुक्ती मिळण्यासाठीच एक मार्ग निघतो आहे असा विचार करून त्याने तमालिकेशी लग्न करून घेतले.

एक वर्ष लोटले. एके दिवशी तमालिकेला पहाटेच उठलेली पाहून दीर्घोद्योगीने विचारले—"काय ग, या म्हाताऱ्या बाई तुझ्या कोण? माझ्याजवळ शिकणारी मुले कोण?"

तमालिकेने दीर्घश्वास सोडला व म्हणाली—"या म्हातारीचा नवरा फार मोठा विद्वान, दानी व श्रीमंत होता. त्यांना एकच एक मुलगी होती. त्या विद्वानाने मुलीचे लग्न आपल्याच एका शिष्याशी करून दिले. लग्नापूर्वी तो शिष्य आपल्या गुरूशी भक्तीपूर्वक वागे. परंतु लग्न झाल्यावर तो सासूसासऱ्याविरुद्ध उलटला. नंतर तो त्यांच्याशी भांडून सिंध देशात निघून गेला. तेथे तो ब्रह्मस्थली नावाच्या गावी राहून भिक्षुकी करू लागला.

"काही काळ लोटल्यावर त्याला एक जन्माची पापी अशी मुलगी झाली आणि जुळी मुले झाली. ती दोघं मुलंच तुमच्याजवळ आतां शिकत आहेत आणि ती

आईवडील चांगलेसे आठवत नाहीत. सिंधू नदीला एकदां मोठा पूर आला आणि फार मोठा प्रदेश पाण्याखाली बुडाला. तेव्हां आम्हांला अनाथ अवस्थेत पाहून आमच्या आईची आई इकडे घेऊन आली."

दीर्घोद्योगीला ते ऐकून कोणी काळजात सुरा खुपसल्यासारखे झाले. भग्नतामसाची दुसरी भविष्यवाणी खरी झाली होती. निदान तिसरी तरी खोटी ठरविण्याचे मनाशी ठरवून दीर्घोद्योगी काशीला निघाला. तीर्थयात्रा करून उरलेले आयुष्य पुण्य संपादन करण्यासाठी खर्ची घालावे असा त्याने निश्चय केला.

बारा वर्षांनंतर दीर्घोद्योगी काशीला येत असतां एक कापालिक मुंडमाळा गळ्यात घालून खूप झिंगून येत असलेला त्याला दिसला. त्याच्या पाठीमागून एक कापालिनी त्याच्यासारखीच झिंगून येत होती.

कापालिक तिला हाक मारून म्हणाला—"अग ए! जरा लवकर ये. काळ फुकट जाता कामा नये. 'ह्रीम्'' ह्राम' म्हणून खूप प्याले पाहिजे!" इतक्यात तिची नजर दीर्घोद्योगीवर पडली. पतीला ओळखून मोठ्याने किंकाळी फोडीत तिने त्याचे पाय धरले.

लोक ते दृश्य पाहून चारीबाजूला जमले. तमालिका आपल्या नवऱ्याला म्हणाली—



"तुमचा वेदाभ्यास काय झाला? नित्यहोमाग्नी कोठे गेला? तर्पणादीचे काय झाले? मला सोडून माझ्या आयुष्याचे मातेरे करायला तुम्हीच कारण झालात!"

जमलेल्या लोकात काही ब्राह्मण होते. त्यांनी दीर्घोद्योगीला प्रश्न करून व तमालिका म्हणाली त्यात सत्यार्थ असल्याचे ओळखून तमालिकेला विचारले—"बरं, आतां तू कापालिकेबरोबर जाणार की आपल्या नवऱ्याबरोबर जाणार?" ती नवऱ्याबरोबर जाते म्हणाली.

तेव्हां सर्व ब्राह्मण दीर्घोद्योगीला म्हणाले—"ह्या बाईचे पाऊल वांकडे पडायला कारण झाल्याबद्दल तू प्राय:श्चित्त करायला तयार

झाले पाहिजेस. तू हिला आपली बायको म्हणून तू स्वीकारलेच पाहिजेस!"

दीर्घोद्योगीने ते मान्य करून तसे केले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— "राजा! दीर्घोद्योगीला जे भोगावे लागले त्याला मूळ कारण कोण? विधिलिखितच की तो स्वत: त्याने भग्नतामसाच्या भविष्यावर विश्वास केला म्हणायचा की नाही? या शंकांचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"दीर्घोद्योगीने भग्नतामसाच्या भविष्य कथनावर विश्वास केला म्हणूनच त्याने स्वत:ला वाचविण्याचे प्रयत्न केले. विश्वास केला नसता तर त्या भविष्याकडे त्याने दुर्लक्ष केले असते. भग्नतामसाचे भविष्य वास्तविक विधिलिखितच होते. दीर्घोद्योगीने ते भविष्य बदलण्याचा जो प्रयत्न केला तो देखील विधिलिखित

रहायचे होते तर त्याने पळून जाण्याऐवजी शक्य तितक्या जवळच रहायला हवे होते. तिच्याशी लग्न झाल्यानंतर त्याने तिचा पूर्वइतिहास विचारण्यात ही चूक केली. ते त्याने पूर्वीच विचारून घ्यायला हवे होते. कळल्यानंतर तो पळून गेला तेव्हां चार जणांसमोर तमालिका त्याला दोषी ठरवू शकली. नवऱ्याने टाकलेल्या बाईचे पाऊल वांकडे पडले नाही तरच आश्चर्य शेवटी तिने त्याच्याबरोबरच संसार करायचे ठरविले म्हणजे तिचे पतन व्हायला कारण तिची दुर्बुद्धी नाही, हे कळते. म्हणून हा सर्व दीर्घोद्योगीचा स्वत:च्या पायावर कुऱ्हाडमारून घेण्याचाच प्रयत्न म्हटला पाहिजे."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झा[ड]ा जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# चोराचे औदार्य

काश्मीर राज्यात एक कुलीन ब्राह्मण पंडित रहात असे. मुळात ते एक थोर जमीनदार कुटुंब होते. त्यांचा वाडा बराच मोठा होता. परंतु पंडिताच्या वाडवडिलांनी कधी हात राखून खर्च केला नाही. म्हणून त्यांच्याजवळ होते नव्हते ते सर्व खर्च होऊन गेले होते. त्यामुळे त्यांची स्थिती खालावत गेली होती. परंतु पंडिताने ही गोष्ट बाहेर कोणाला कळू नये याची काळजी बाळगली आणि संसाराचा गाडा रेटीत आणला.

त्या पंडिताला एक अत्यंत रूपवती कन्या होती. तिच्याशी लग्न करण्यासाठी तरुण मंडळी मागण्या घालीत होती. परंतु बिचारा पंडित मुलीचे लग्न पैशाशिवाय कसे करायचे या पेचात होता. ही गोष्ट कोणाला माहीत नव्हती व त्यानेदेखील सांगितली नाही. परंतु त्याच्या वाड्याच्या तळघरात व माळ्यावर अलोट संपत्ति लपवून ठेवली आहे असे लोक म्हणत.

या कारणामुळे त्या पंडिताचे आणि त्याच्या एका जवळच्या स्नेह्याचे वांकडे आले. त्या मित्राचे नाव सुंदर असे होते. त्याने एकदां पंडिताकडे एक मोठी रक्कम कर्जाऊ मागितली. पंडिताने व्यवहार म्हणून खरी स्थिती मित्राला सांगितली. परंतु सुंदरला ते खरे वाटले नाही व त्याचा अपमान झाल्यासारखे त्याला वाटले. त्याने पंडिताची खोड मोडण्याचे मनाशी ठरविले.

सुंदरने त्यासाठी एका अट्टल चोराची मदत घ्यायचे ठरविले. त्याने चोराला पंडिताच्या वाड्यात शिरून त्याच्या तळघरात व माळ्यावरचे सर्व धन लुटायला प्रोत्साहन दिले. चोराने आनंदाने होकार दिला. पंडिताला ती गोष्ट मुळीच माहीत नव्हती.

     



एके दिवशी रात्री पंडिताची बायको झोपण्यापूर्वी नवऱ्याला म्हणाली–"काय हो, मुलीला मागण्या घालायला लोक येत आहेत. योग्य वर पाहून वेळेवरच मुलीचे लग्न नको का करून द्यायला? उशीर कां करतां आहां, मला नाही कळत!"

पंडित म्हणाला–"तू म्हणतेस ते खरे आहे. परंतु खरी वस्तुस्थिती मी तुला कधीच सांगितली नाही. आपल्याजवळ पैसा नाही. कशीतरी लाज राखून दिवस काढीत आहो. या पुढे संसाराचे गाडे कसे चालणार हा माझ्यासमोर प्रश्न आहे. मुलीच्या लग्नाला पैसे कोठून आणायचे?"

"म्हणजे इतकी का स्थिती बिघडली आहे? इतके दिवस आनंदाने जगलो आणि शेवटी दारिद्र्यच का नशीबी?" पंडिताची बायको निराश होऊन म्हणाली आणि फार दुःखी झाली. पंडितदेखील आपले दुःख आवरू शकला नाही.

नवराबायकोंचे बोलणे चोराने ऐकले. तो त्या दिवशी वाड्यात चोरी करायला [illegible] त्याला सुंदरचा फार राग आला. दोघां नवराबायकोला झोप येईपर्यंत चोराने आपली चाहूल दिली नाही. नंतर हळूच निसटला.

दुसऱ्या दिवशी सुंदरने त्या चोराची फार वेळ वाट पाहिली. तो आला तर नाहीच उलट रात्री आपलयाच घरात चोरी होऊन होती नव्हती ती सर्व चीजवस्तु चोर घेऊन गेल्याचे ऐकून सुंदर चकित झाला.

दुसऱ्या दिवशी पंडित व त्याची बायको सकाळी उठून पाहतात तर त्यांच्या उशाशेजारी एक गाठोडे ठेवलेले त्यांना दिसले. सोडून पाहिले तर सोन्याचे दागिने आणि चांदीची नाणी होती. त्या गाठोड्याला एक चिठ्ठीसुद्धा अडकवलेली होती. "तुमच्या मुलीच्या लग्नासाठी एका अट्टल चोरातर्फे अल्प भेट!" असे चिठ्ठीत लिहिले होते.



# व्यवहार ज्ञान

अकबराच्या दरबारात एक अत्यंत हुषार असा बिरबल नावाचा एक दरबारी होता.

एकदां अकबराला त्याचे सर्व दात पडल्याचे स्वप्न पडले. त्याने आपल्या दरबारी ज्योतिष्याला बोलावणे पाठविले आणि पडलेल्या स्वप्नाचे वर्णन करून त्याचे भविष्य सांगायला सांगितले. ज्योतिष्याने सर्व ग्रंथ चाळले आणि म्हणाला–"प्रभू! आपल्या डोळ्यासमोर आपले सर्व नातेवाईक व परिवार या जगाचा निरोप घेणार!" ते ऐकून बादशहाने त्याला तुरुंगात टाकायला सांगितले.

इतक्यात काही कामा निमित्त बाहेर गेलेला बिरबल दरबारात आला. घडलेली गोष्ट कळल्यावर त्याने त्या गरीब भोळ्या ज्योतिष्याला वाचवायचे ठरविले.

तो बादशहाला म्हणाला–"जहांपनाह! मी आपल्या स्वप्नाचा अर्थ सांगतो." असे सांगून बोटे उचलून एकदां आकाशाकडे पाहून व नंतर जमिनीकडे पहात म्हणाला–"जहांपनाह! आपले नातेवाईक व परिवार यांच्याहून आपण दीर्घायु आहां! असा आपल्या स्वप्नाचा अर्थ आहे."

"हा चांगला व शुभ अर्थ तू सांगितलास त्यासाठी माग, काय वाटेल ते मागून घे!" बादशाह म्हणाला.

"आपण आपल्या दरबारी ज्योतिष्याला सोडावे, एवढीच कृपा करावी!" बिरबल म्हणाला.

सुटका मिळाल्यावर ज्योतिषी घरी जाऊ लागला त्याला भेटून बिरबल म्हणाला–"फल ज्योतिष सांगायचे झाले तर फक्त पुस्तकी ज्ञान पुरत नाही. थोडे व्यवहार ज्ञान सुद्धा लागते! लक्षात ठेवा!" असे सांगून बिरबलाने ज्योतिष्याला निरोप दिला.





# स्वश्रमाचे मूल्य

एका गावात रामू आणि सोनू नावाचे दोघे मित्र रहात असत. दोघे गरीब होते. एके दिवशी दोघांनी बसून विचार केला आणि धनार्जन करण्यासाठी आपल्या गावाहून निघाले. बरेच अंतर पायी प्रवास केल्यावर दमून भागून ते एका मुनीच्या आश्रमाजवळ येऊन पोचले. मुनीने चवकशी करून त्यांना जे म्हणावयाचे होते ते सर्व ऐकून घेतले व म्हणाला—

"बाबांनो! मी पुष्कळ श्रम करून अनेक विद्या शिकून घेतल्या. तुमच्यापैकी एक जण ब्राह्मण आहे. ब्राह्मणाला धनाचा किंवा पैशाचा मोह असतां कामा नये. त्याने ज्ञानार्जन करून ते चार चौघांना दान केले पाहिजे. त्यात त्याची कीर्ती वाढेल आणि ब्राह्मण कुलात जन्म घेतल्याचे सार्थक होईल. दुसरा आहे वैश्य कुळात जन्मलेला. त्याने व्यापारातले सर्व गुपित माझ्याजवळ शिकून धनार्जन करावे. फक्त धनार्जन करूनही चालणार नाही, जनसेवासुद्धा करील तोच खरा वैश्य!"

त्या मुनीच्या उपदेशाप्रमाणे दोघां मित्रांनी तीन वर्षे मेहनत करून त्या मुनीजवळ विद्याभ्यास केला. रामू अनेक शास्त्रांचा अभ्यास करून रामशास्त्री झाला. सोनू व्यापाराची सर्व गुपिते शिकून सोनूशेट झाला. रामशास्त्री आपल्या पांडित्याच्या बळावर राजाच्या दरबारात दरबारी पंडित म्हणून प्रसिद्ध झाला. सोनूशेटने व्यापारात नावलौकिक संपादन केला. चार पांच वर्षात दोघांची सांपत्तिक स्थिती चांगली झाली.

बराच काळ लोटला. रामशास्त्रीला मुलगा झाला. त्याचे नांव कृष्ण होते. परंतु रामशास्त्री मुलाविषयी फार काळजीत पडला. कारण मुलगा हट्टी व खोडकर

दिवस रात्र खेळात आणि आरडाओरडा करण्यात खर्च होऊन जाई. मुलगा आपल्यासारखा विद्याभ्यासात हुशार व्हावा यासाठी रामशास्त्रीने केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ झाले.

तेवढ्यात एक विचित्र गोष्ट घडली.

रामशास्त्री आपल्या विद्यार्थ्यांना श्लोकांचा अर्थ सांगत होता. ते श्लोक फार कठीण होते. म्हणून विद्यार्थ्यांना कळत नव्हते. तीच तीच गोष्ट कित्येकदां सांगून ही त्यांना न कळल्यामुळे दमून जाऊन रामशास्त्री थोडी विश्रांती घेण्यासाठी आत गेला.

बाप मुलांना शिकविण्यासाठी जे कष्ट करीत होता ते कृष्णा पहात होताच. बाप आत गेल्याबरोबर तो बापाच्या जागी येऊन बसला आणि शिकवू लागला. परंतु आश्चर्याची गोष्ट अशी की रामशास्त्रीच्या तोंडून ज्या श्लोकांचा अर्थ मुलांना कळला नव्हता त्याच श्लोकांचा अर्थ कृष्णाच्या तोंडून ऐकल्यावर सहजी कळला.

रामशास्त्रीने बाहेर येऊन ते दृश्य पाहिले व आश्चर्यचकित झाला. आपला मुलगा मूर्ख नाही. त्याची स्मरणशक्ती उत्तम आहे. अभ्यास केला तर सहजी थोर विद्वान होऊ शकेल, असे त्याला वाटले.

रामशास्त्री ते म्हणाला तेव्हां मुलगा म्हणाला—"विद्याभ्यास कशाला करायचा?"



"मान मिळावा, धन मिळावे असे वाटत असेल तर विद्याभ्यास केला पाहिजे!" रामशास्त्रीने समजावून सांगितले.

"मी एका थोर विद्वान पंडिताचा मुलगा आहे, म्हणून लोक माझा गौरव करीत आहेत. मी ब्राह्मण आहे म्हणून मला मान देत आहेत. मी एका श्रीमंताचा मुलगा आहे. याहून जास्त मिळविण्यासारखे काय आहे?" कृष्णाने विचारले.

मुलगा हुशार आहे हे रामशास्त्रीने ओळखले. त्याची बुद्धी सरळ मार्गावर आली तर तो नाव काढील हे त्याला कळले. पण ती मार्गावर कशी येईल, याविषयी विचार करीत असतां त्याच्या



घरी त्याचा बालमित्र सोनूशेट आला. दोघे बसून बोलू लागले तेव्हां सोनूशेटदेखील आपला मुलगा धनशेट याच्याविषयी त्याच काळजीत असल्याचे कळले. मुलगा खेळकर व उडाणटप्पू निघतो की काय या भीतीने सोनूशेट त्याला मार्गावर आणायचा प्रयत्न करी तेव्हां तो म्हणे, "मी एका श्रीमंताचा मुलगा आहे. मी काळजीपूर्वक राहण्याची गरजच काय?"

बराच वेळ परस्पर सुखदु:खाच्या गोष्टी बोलत राहल्यावर दोघां मित्रांनी विचार करून दोघांच्या मुलांना सरळ मार्गावर आणण्यासाठी एक उपाय करून पहायचा ठरविले. त्याप्रमाणे सोनूशेट आपल्या [illegible] ठेवून बायको-बरोबर परदेशात व्यापारासाठी निघून गेला. जातांना त्याने मुलाच्या सेवेसाठी दोघां नोकरांना ठेवले.

कृष्णशास्त्री व धनशेट दोघांची चांगली गट्टी जमली. दोघांच्या आवडी निवडी आणि स्वभाव एकच. धनशेटचे नोकर कृष्णशास्त्रीच्या सेवला सुद्धा हजर रहात.

दोन महिने लोटले. रामशास्त्रीने एके दिवशी धनशेटला बोलाविले व म्हणाला— "तुझ्या बाबांनी पैशाची गरज असल्याचे कळविले आहे. आपले घर विकून पैसे पाठव, दुसरा मार्ग नाही."

धनशेटला कसे ते कळेना.

आणखी एक महिना लोटला. एके दिवशी एकजण रामशास्त्रीकडे येऊन म्हणाला—"सोनूशेटचे जहाज बुडले व त्याबरोबर सोनूशेट बरोबरची मंडळी आणि त्यांच्या जवळचा सर्व माल बुडाला. मी स्वत:च्या जिवाची पर्वा न करून त्यांना जमिनीवर आणले व आपल्या घरी घेऊन गेलो. परंतु ते वांचले नाहीत."

ते ऐकून धनशेट रडू लागला. रामशास्त्रींनी त्याची समजूत घालण्याचा प्रयत्न केला आणि त्याला एक गोष्ट स्पष्टपणे सांगत म्हणाला—"बाबा रे! मी तुझ्या बापासारखा व्यापारी नाही. तुला फार [illegible] नाही. तेव्हां तुला स्वत:विषयी काय तो विचार करायला हवा."

धनशेटचे पौरुष जागे झाले. तावडतोब रामशास्त्रीच्या घरातून तो बाहेर पडला. परंतु त्याला पाय ठेवायला कोठेच जागा मिळाली नाही. कोणी जेवायला वाढायला-सुद्धा तयार नव्हता. म्हणून धनशेट स्वत:चा राग गिळून रामशास्त्रीकडेच आला आणि निदान जेवण तरी घाला अशी त्याने विनंती केली.

रामशास्त्रीने त्या दिवशी त्याला जेवायला वाढले, परंतु त्याच बरोबर फार दिवस त्याला ते जमणार नाही असे सांगून टाकले.

ते ऐकून कृष्णशास्त्रीला राग आला. त्याने बापाला विचारले—"मित्राच्या मुलाचा एवढादेखील मान नको का ठेवायला?"

बाप म्हणाला—"हे बघ, सोनूशेट माझा मित्र आहे. तो संकटात असेल तेव्हां मी त्याच्या मदतीला नक्कीच धावेन. परंतु धनशेटशी माझा तसा काहीच संबंध नाही."

"त्याच्याशी तुमचा काही संबंध नसेल, तो माझा मित्र आहे. माझ्या मित्राला घरात एवढा आदर नको का मिळायला?" कृष्णशास्त्रीने बापाला विचारले.



"तू तरी काय मोठे दिवे लावले आहेस, ऐकू दे तरी?" रामशास्त्रीने तितक्याच तुटकपणे विचारले.

"देवाची पूजा करून देवासारखा पूज्य झालेल्या पुजाऱ्याचा मी मुलगा आहे. विद्वान पंडित रामशास्त्री यांचा मुलगा आहे मी. हे माझे थोर पण नाही का?" मुलाने विचारले.

रामशास्त्रीने एक मिनिटभरच विचार केला. नंतर म्हणाला—"तुझ्या प्रश्नाचे उत्तर मी देतो. त्या आधी तू एक काम कर. तुझी व धनशेटची आजपर्यंत सेवा करणारे ते दोघे नोकर आहेत ना त्यांना बोलावून धनशेटाची दोन दिवस नोकरी करायला सांग."

कृष्णशास्त्री, एवढेच ना, असे मनाशी म्हणत उत्साहाने निघाला. दोघां नोकरांनी पूर्वी कधी एक पैसादेखील मागितला नव्हता आणि सर्व कामे आनंदाने करीत होते. परंतु आतां धनशेटचे नाव सांगितले तरी तिकडे दुर्लक्ष करीत म्हणाले—"असल्या दरिद्री माणसाकडे कामाला कोण येईल हो?"

त्यांचे उत्तर ऐकून कृष्णशास्त्री तर थक्कच झाला. त्याने परत येऊन बापाला घडले ते सांगितले.

रामशास्त्री हंसून म्हणाला—"त्यांचे म्हणणे बरोबरच आहे. धनशेटचे आपले असे व्यक्तिमत्व कोठे आहे? तो बापाच्या छत्रछायेत असेपर्यंत बापाचे धन त्याच्या पाठीशी होते. ते गेल्याबरोबर तो एक सामान्य माणूस झाला. उद्यां तुझी गत तीच होणार. माझ्या पांडित्यामुळे तुझा गौरव होतो आहे. माझे वैभव व संपत्ती काय ती माझी विद्वत्ता आहे. ती तुला लाभली नाही तर तुझी तीच गत होणार नाही का? स्वकष्टार्जित जे असते तेच ति[illegible] वैश्य होऊ शकत नाही, तसाच विद्यासंपन्न नसेल तो ब्राह्मण होऊ शकत नाही."

"बरोबर! स्वकष्टार्जित अत्यावश्यक आहे, हे मला कळले. तुम्ही आपल्या मित्राला जी मदत करू शकता ती मी आपल्या मित्राला करण्याच्या स्थितीत नाही. आतां मी काय करू म्हणता?" कृष्णशास्त्रीने विचारले.

"तू आणि तुझा मित्र मी सांगतो त्या जागी जाऊन काम करा व थोडे शिका." असे सांगून रामशास्त्रीने त्याने स्वतः व सोनूशेटने ज्या गुरूच्या आश्रमात विद्याभ्यास केला होता त्याविषयी सांगितले.

कृष्णशास्त्री व धनशेट दोघांनी त्या मुनींच्या आश्रमात दोन महिने विद्याभ्यास केला व परत आले. धनशेटचा बाप जिवंतच होता. त्याने आपली मिळकत दुप्पट वाढविली होती. आपली सुधारणा व्हावी यासाठीच दोघांच्या वडिलांनी तो उपाय केला असल्याचे दोघांना कळले.






# राजा झाडूवाला

फार पूर्वी उत्कल देशाच्या गादीवर पुरुषोत्तम देव नावाचा एक धर्मभीरु राजा राज्य करीत असे. तो जगन्नाथाचा थोर भक्त होता. सर्व राज्य जगन्नाथाचेच व स्वतः मी देवाचा सेवक या नात्याने राज्यकारभार करीत आहे, असे मानून पुरुषोत्तम देव राज्य करी.

जगन्नाथपुरी येथे आषाढ महिन्यात रथ-यात्रा होत असे. रथयात्रेला लक्षावधी लोक येत असत. रथयात्रेच्या वेळी तिन्ही रथांची वाट राजा स्वतः केरसुणी घेऊन झाडून काढी. त्यानंतरच लोक रथ ओढीत.

पुरुषोत्तम देवाने, द्विग्विजय करीत कांचीला गेला असतां कांचीची राजकन्या पद्मावती हिला पाहिले. ती अत्यंत रूपवती होती. तिला पाहून राजाने लग्न करायचे तर तिच्याशीच असे मनाशी ठरविले. ती गोष्ट दूतांकडून पद्मावतीच्या वडिलांना, म्हणजे कांचीच्या राजाला कळली व त्याने विवाहास आपली संमती दिली. विवाहोत्सवापूर्वी उत्कलच्या राजाच्या आमंत्रणा-वरून कांचीच्या राजाने उत्कलच्या राज-धानीस जाण्याचे व रथोत्सवाच्या वेळी हजर राहण्याचे ठरविले.

रथोत्सवाच्या दिवशी देवळापासून उद्यान-भवनापर्यंतचा राजमार्ग रथोत्सव पाहणाऱ्या प्रजेने दुतर्फा भरलेला होता. शंखध्वनी व प्रजेचा जयजयकार यांनी आकाश दुमदुमत होते. देवालयातून जगन्नाथ, बलभद्र व सुभद्रेच्या मूर्ती रथात बसविण्यात आल्या.

त्यावेळेपर्यंत कांचीच्या राजाशी बोलत बसलेला राजा उठून रथाखालची जागा केरसुणीने झाडू लागला. प्रजेने हर्षध्वनी करून टाळ्या वाजविल्या आणि रथ हलला.

पुरुषोत्तम देवाला केरसुणी घेऊन केर काढतांना पाहून कांचीच्या राजाने कांचीला

उत्कल देशाची लोककथा

परतल्यानंतर उत्कल देशाच्या राजाला कळविले की, मी राजकन्येचा हात एका झाडूवाल्याच्या हातात द्यायला तयार नाही.

ते ऐकून पुरुषोत्तम देवाला भयंकर राग आला. त्याने कांचीच्या राज्यावर स्वारी करण्याचे जाहीर करून स्वारी केली. त्यानंतर झालेल्या युद्धात पुरुषोत्तम देवाचा जय झाला. पद्मावती कैद होऊन त्याच्या शिबिरात आली.

आतां तिच्याशी लग्न करण्याची तिळमात्र इच्छा त्याच्या मनात उरली नव्हती. त्याचा राग अद्याप शांत झाला नव्हता. त्याने आपल्या मंत्र्याला बोलावून आज्ञा केली—"हिच्या बापाने मला झाडूवाला म्हटले. आतां हिचे लग्न एखाद्या झाडूवाल्याशीच करून द्यावे."

"जी महाराज! तसेच करतो." मंत्री म्हणाला.

परंतु हुशार व चतुर मंत्र्याने तसे केले नाही. त्याने पद्मावतीला आपल्या घरी [illegible] आणि त्याच्या बायकोने पद्मावतीला आपली पुत्री मानून अगदी गुप्तपणे तिचा सांभाळ केला.

पुढे काही दिवसांनी पुन्हां रथोत्सव आला. राजा रूढीप्रमाणे पुन्हां केरसुणी घेऊन रथासमोरची जागा झाडू लागला.

त्यावेळी मंत्री पद्मावतीला घेऊन जाऊन म्हणाला—"महाराज! आपल्या आज्ञेचे पालन न केल्याबद्दल क्षमा करावी अशी प्रथम विनंती करतो. या मुलीला झाडूवाला नवरा आपल्याहून चांगला मिळणे शक्य नाही. मेहेरबानी करून आपण हिच्याशी लग्न करावे."

तेव्हां कोठे राजाचा राग शमला. त्याच्या मंत्र्याने युक्ती लढवून केलेल्या कामाबद्दल राजाने खूष होऊन खूप थाटामाटाने पद्मावतीशी विवाह करून घेतला.

त्याच्या कुळात जन्मलेले सर्व राजकुमार आज पावेतो रथोत्सवाच्या दिवशी हातात केरसुणी घेऊन देवळाचा केर काढण्यात भूषण मानतात.





# लबाड राजकन्या

एका व्यापाऱ्याच्या मुलाचे नाव रामपाल असे होते. तो एकदां जंगलात वाट चुकला आणि जंगला बाहेर येऊ शकला नाही. त्याला जगण्याची आशा उरली नाही. परंतु त्याच वेळी त्याला एक अजगर एका हरणाच्या पिल्लाचा पाय तोंडात धरून गिळत असलेले दिसले. ते हरण स्वतःचा जीव वांचविण्यासाठी धडपडत होते.

त्या गरीब हरणाच्या पिल्लाला त्या केविलवाण्या दशेत पाहून रामपालला दया आली व त्याने त्याला वाचविण्यासाठी एक युक्ति केली. सांपाच्या अंगावर एक झाड लवलेले होते. रामपालने आपल्या तलवारीने ते झाड कापल्याबरोबर ते त्या अजगराच्या अंगावर पडले. अजगराने कळ सहन न होऊन तोंड उघडताच हरणाची सुटका झाली.

जातांना ते हरण रामपालाकडे कृतज्ञतापूर्वक पाहूं लागले. फार थोडेच अंतर ते चालून गेले असेल आणि कां कोणास ठाऊक, ते परत आले. त्याला पुन्हांपुन्हां तसेच करताना पाहून रामपालला वाटले की कदाचित ते एकट्याने जाण्यास भीत असावे. म्हणून रामपाल त्याच्याबरोबर निघाला.

हरणाचे पिल्लू त्याला एका सुंदरशा जागी बोलावून घेऊन गेले. तेथे एक डोंगरी ओढा वहात होता. ओढ्याच्या काठी फळझाडे होती. रामपालाने पोटभर फळे खाऊन पाणी पिऊन घेतले आणि विश्रांती घेण्यासाठी झाडाखाली झोपला.

बऱ्याच वेळाने त्याची झोप मोडली तरी ते हरणाचे पिल्लू जवळ तसेच उभे होते. त्याला उठतांना पाहून तेदेखील चालू लागले. रामपाल त्याच्या पाठोपाठ चालू











लागला. लवकरच दोघे जंगलाबाहेर आले. समोर त्यांना एक नगर दिसले. तेथे जवळच एक किल्ल्याचा तट दिसला. हरणाचे पिल्लू तेथून नंतर निघून गेले.

अंधार पडू लागला होता. रात्र कोठे घालवावी हा विचार करीत रामपालने एकदां चहूंकडे नजर फिरवून पाहिली. तो उभा होता त्या जागी एक स्मशान असल्याचे त्याने ओळखले. रात्र झाडावर बसून काढण्याचे ठरवून तो झाडावर चढला. इतक्यात त्याला अंगावर काटा उभा करणारे दृश्य दिसले. कारण नुकत्याच पुरलेल्या एका खड्डयातून एक मानवी शरीर बाहेर निघत असलेले त्याला दिसले. मोठ्याने

थरथर कांपू लागला.

खड्डयातून वर येणारा तो माणूस बोलू लागला—"घाबरू नकोस! घाबरू नकोस. मी भूत नाही. तुझ्यासारखाच हाडामांसारक्ताचा मनुष्य आहे. माझ्या फुटक्या नशिबाची गोष्ट मी तुला सांगतो."

रामपाल स्वतःला सावरून धैर्याने झाडावरून खाली उतरला आणि विचारू लागला—"हा भयंकर प्रकार आहे तरी काय?"

"तू माझी करुण कथा ऐकलीस तर तुला सर्व काही कळेल." असे सांगून तो मनुष्य आपली गोष्ट सांगू लागला—

"मी एक राजकुमार आहे. वयात आल्यावर मी आपला देश सोडून आपल्या घोड्यावर देशाटन करायला निघालों. मी अनेक नगरे, राजधान्या व राज्ये पाहिली. एक विचित्र देश असल्याचे आणि त्या देशाच्या राजाची मुलगी अपूर्व सुंदरी असल्याचे मी एके दिवशी ऐकले. तिला एका पैजेत हारवील त्याच्याशी मी लग्न करीन व आपले राज्यसुद्धा त्याला देईन असे तिने जाहीर केले होते. मी तिला चित्रात पाहिले. खरोखरच ती अपूर्व लावण्यवती आहे असे समजून मी तिच्या शोधार्थ निघालो व तिला भेटलो.

तिचे रूप पाहून मी देहभान विसरलो.

"माझ्याशी पैज लावायची असेल तर एक अट कबूल करावी लागेल. तुम्ही पैजेत हारलात तर तुम्हांला माझे दास्यत्व मान्य करून आयुष्यभर माझ्या सेवेस हजर रहावे लागेल. त्याला तुम्ही कबूल आहां का?" तिने मला विचारले.

"तिचे सौंदर्य पाहून मी मुग्धच झालो होतो. म्हणून मी होकार दिला. तिने मला एक रिकामें पात्र दाखविले. नंतर तिने एका पिशवीतून डब्या काढल्या. त्या तिच्या तळहातात राहतील इतक्या लहान होत्या. त्या तिने त्या रिकाम्या पात्राजवळ ठेवल्या. नंतर उजव्या हाताने एक डबी उचलून हालविली. ती हालविली तेव्हां त्या डबीतून काही आवाज आला नाही. त्यावरून त्या डबीत काही नाही असे कळले. ती डबी त्या पात्रात ठेवून तिने डाव्या हाताने दुसरी डबी उचलून हलविली तेव्हां त्या डबीत काही तरी असल्याचा आवाज झाला. ती डबी सुद्धा पात्रात ठेवून माझ्याकडे वळून ती म्हणाली—'हे तरुण माणसा, या पात्रात दोन डब्या आहेत. यांच्यापैकी एकीत एक नाणे आहे. नाणे असलेली डबी तू उचलून दाखविलीस तर मी व माझे राज्य दोन्ही तुझी होतील!'

"मी त्या पैजेत हारलो. ज्या डबीतून आवाज आला होता ती डबी उचलून हालवून दाखविली. परंतु ती वाजली नाही.





तिने आपल्या डाव्या हाताने पात्रातली दुसरी डबी उचलून हालवून दाखविली तेव्हां ती वाजली. मी तिचे दास्यत्व कबूल केले. माझ्यासारखेच पैज हारून तिचे दास झालेले अनेक तरुण आहेत!

"दिवसांमागून दिवस लोटत होते. निसटायला मार्ग मिळत नव्हता. मी मनोभावे तिची सेवा करून तिची थोडी फार कृपादृष्टी संपादन केली. एके दिवशी मी आजारी असल्याचे सोंग करून राजकन्येला भेटण्याची इच्छा असल्याचा निरोप पाठविला. ती कृपा करून मला भेटायला आली व विचारू लागली–'अरे तरुण माणसा! काय रे झाले तुला?'

[illegible] कृपादृष्टी ठेवून आलीस मी कृतकृत्य झालो. फक्त एकच मागणं मागतो. मी राजघराण्यात जन्मलो आहे. आमच्या कुलाचाराप्रमाणे माझे प्रेत पुरण्याची कृपा कर, चितेत जाळून टाकू नकोस. माझा जीव गेल्यावर मला दास्यमुक्ती देऊन नगराबाहेर कोठे तरी पुरून टाक" अशी मी इच्छा प्रकट केली.

"बरे! मी तू म्हणालास तसेच करीन. तुझ्या मनाचे एवढयाने समाधान होईल ना?" तिने विचारले.

मी तिचे आभार मानले.

रामपाल ती कथा ध्यानपूर्वक ऐकून मध्येच म्हणाला–"तू आपले नाव नाही सांगितलेस. माझे नाव रामपाल आहे. तुझे नाव काय?"

"माझे नाव सागरकुमार!" असे सांगून तो आपली ती कथा पुढे सांगू लागला.

"आमच्या दरबारात एक विषबाधा दूर करणारा एक दरबारी होता. आमच्या देशात साप चावल्याने कित्येक लोक मरण पावले. म्हणून माझ्या वडिलांनी त्याला आपल्या दरबारात स्थान देऊन त्याच्याकडून अनेकांचे जीव वांचविले. त्याने एकदां मला एक मुळी दाखविली व ती जेवतांना चघळली तर माणूस दोन दिवस [illegible] सांगितले. माझ्या सुदैवाने राजकन्येच्या उद्यानात मला ती मुळी मिळाली. मी तिचा एक तुकडा रविवारी जेवताना चघळला आणि आज कोणता वार?"

"आज सोमवार आहे नाही का?" रामपाल म्हणाला.

"बरोबर! म्हणून मी पुन्हां जिवंत झालो. बरं, पण मित्रा तू इकडे कसा काय आलास, कळू दे तरी?" त्याने रामपालला विचारले.

रामपालने त्याला आपला वृत्तांत सांगितला.

सागरकुमार म्हणाला त्यावरून राजकन्या तिच्याशी लग्न करण्याच्या इच्छेने येणाऱ्यांना जादू करून हात चलाखीने फसविते हे रामपालला कळायला वेळ लागला नाही. रामपालचा एक आप्त मित्र इंद्रजाल विद्येत निष्णात होता. त्याच्याकडून रामपालने अनेक जादूचे सोपे प्रयोग शिकून घेतले होते. म्हणून राजकन्येने केलेला जादूचा प्रयोग काय होता हे त्याला सहजी लक्षात आले. तोच प्रयोग करून तिला पैजेत हारवायचे, असे रामपालने मनाशी ठरविले.

रामपालने तो काय करणार आहे हे सांगितल्यावर सागरकुमार म्हणाला–"तू हा जादूचा प्रयोग करून पैज जिंकलास तर राजकन्या वचन दिल्याप्रमाणे आपली हार मानील, हे तरी कशावरून? समज





ती हारली तरी तुला तुरुंगात टाकणार नाही का?"

"तेव्हां तू आपल्या वडिलांचे सर्व सैन्य घेऊन येऊन हिच्या राज्यावर स्वारी कर आणि मला सोडव. मित्रासाठी तू इतके नाही करू शकणार का?" रामपालने विचारले.

"मी प्रतिज्ञापूर्वक सोडवीन. मी वेष पालटून राजधानीतच मला होईल ती मदत करण्यास सिद्ध राहतो. माझ्या बाबांचे राज्य जवळच, या राज्याला लागून आहे." सागरकुमार म्हणाला.

दुसऱ्या दिवशी राजधानीची महाद्वारे उघडल्याबरोबर रामपाल व सागरकुमार [illegible] प्रवेश केला. सागर-कुमाराने आपले लांब केस कापून वेष पालटला आणि रामपालबरोबर गेला असल्यामुळे त्याला कोणी ओळखले नाही.

एका खेळण्यांच्या दुकानात रामपालने सागरकुमाराने सांगितल्याप्रमाणे एक लहान डबी घेऊन तीत एक नाणे ठेवले. नंतर त्याने ती डबी डाव्या हाताच्या आस्तनीच्या आत बाहेर दिसणार नाही, अशा तऱ्हेने थोडी वर मनगटाला बांधून घेतली. आतां डावा हात हलविला तर डबी वाजते हे पाहून खात्री करून घेतली.

अशा तऱ्हेने तयार होऊन रामपाल राजकन्येकडे गेला आणि म्हणाला—"मी मागणी घालायला आलो आहे."

"माझ्याशी लग्न करायचे असेल तर मी लावीन ती पैज जिंकली पाहिजेस." राजकुमारी म्हणाली.

रामपाल म्हणाला—"तू सांगशील ती अट मला मान्य आहे." तेव्हां तिने पैज हारल्यास त्याला आयुष्यभर तिचे दास्यत्व मान्य करावे लागेल, हे त्याच्याकडून पहिल्याने कबूल करवून घेतले.

तो म्हणाला—"मला ते कबूल आहे. परंतु त्यापूर्वी तुमचे जे कुलदैवत आहे त्या देवाच्या देवळात मला घेऊन चल. आपण दोघांनी देवाला साक्षी ठेवून प्रतिज्ञा केली [illegible] आयुष्यभर करण्याची प्रतिज्ञा करतो. तू हारलीस तर तू माझ्याशी लग्न करून आपले राज्य देशील अशी प्रतिज्ञा कर."

पैज हारणे हे तिला आजवर माहीतच नसल्यामुळे राजकन्या तशी प्रतिज्ञा करायला तत्क्षण कबूल झाली आणि त्याला देवळात घेऊन गेली. पुजाऱ्यासमक्ष दोघांनी प्रतिज्ञा केली. परीक्षादेखील देवळातच झाली.

राजपालने पात्रात डावा हात घालून एक डबी उचलून हलविली आणि आवाज झालेला ऐकून राजकन्येने आश्चर्यचकित होऊन एकदां रामपालकडे पाहिले व गप्प बसली.

"मी जिंकलो राजकन्या! मग करणार ना माझ्याशी लग्न?" रामपालने विचारले.

राजकन्येने मान खाली करून आपली हार कबूल केली.

रामपालने आपल्या उजव्या हाताने दोन्ही डब्या उचलून दाखविल्या व एकीचा ही आवाज होत नसल्याचे दाखविले. कारण दोन्ही रिकाम्याच होत्या. त्याने राजकन्येच्या डाव्या हाताची आस्तनी वर घडी करून तिच्या मनगटाला एक डबी बांधली असल्याचे व तीत नाणे असल्याचे दाखविले.

"आजपर्यंत तू कित्येकांना असेच फसवून आपले दास्य करायला लावलेस!" रामपाल म्हणाला.

"मी नाही फसविले. मी आपल्या वडिलांच्या आज्ञेचे पालन केले! मला जिंकणाऱ्याशीच मी लग्न करावे अशी त्यांची आज्ञा होती. जो जिंकेल तो हुशार असल्याची ती एक परीक्षा म्हणून त्यांनी ठेवली होती. देवानेच तुला पाठविले, नाहीतर माझे लग्नच झाले नसते व मीच शेवटी फसल्यासारखे झाले असते. आता माझ्या वडिलांच्या आत्म्याला सुद्धां आनंदच होईल. आजपर्यंत मी ज्यांना ज्यांना आपले दास्य करायला लावले त्या सर्वांना मुक्त करते. ते सर्व आपल्या विवाहोत्सवाला हजर राहतील आणि आदरपूर्वक आपापल्या देशात परत जातील." राजकन्या म्हणाली.











# १५७. कष्टसाध्य नौकानयन

स्वीडन देशाच्या नैऋत्य तीरावर हा नौकामार्ग डोंगराळ प्रदेशात लहान लहान द्वीप समूहातून जातो. या द्वीपात अनादिकालापासून मानववस्ती आहे. या द्वीपात पांच हजार वर्षापूर्वीच्या समाध्या आहेत. इ. स. पू. एक हजार (आजपासून तीन हजार) वर्षापूर्वी लिहिलेले शिलालेख व चित्रे शिलांवर आहेत. या चित्रांत मनुष्य, त्यांची आयुधे, नौका, प्राणी वगैरे दिसतात. आजही इकडच्या डोंगराळ प्रदेशात वेडगळ लोकांच्या वस्त्या आहेत.






# अकबराचा पेला जहांगिरचा हंडा

एका गावात सलीम नावाचा एक गरीब तरुण युवक रहात असे. लहानपणीच त्याचे वडील वारल्यामुळे आईनेच त्याला वाढवून लहानाचे मोठे केले. वयात आल्यावर सलीम एका व्यापाऱ्याकडे नोकरी करू लागला. त्याच्या आईने जहीदा नावाची एक सुंदर मुलगी पाहून तिच्याशी आपल्या मुलाचे लग्न करून दिले.

सलीमला त्याच्या मालकाकडून जो पगार मिळे तो त्याच्या अन्नवस्त्रापुरता होता. परंतु सलीमच्या बायकोला जरीची पोलकी व पातळे आणि मोत्याचे दागिने हवे होते. नवऱ्याची मिळकत कमी आहे, हे कळत असूनसुद्धां तिच्या आवडीच्या वस्तू नवऱ्याने आणून द्याव्या, यासाठी तिने हट्ट धरला.

एकदां सलीम नमाज झाल्यावर माडीवर व्हरांड्यात बसून एका मोठ्या पेल्यात दूध पीत असतां बायकोच्या मागण्या कशा पुऱ्या करावयाच्या या विचारात गढून गेला होता. इतक्यात अचानकपणे हातातला पेला निसटून खाली पडला.

सलीम रहात असे त्या घराच्या खालच्या मजल्यावर एक दुकान होते. त्या वेळी कोणी गोरा साहेब त्या दुकानात उभा राहून दुकानदाराजवळ कसली तरी चवकशी करीत होता. सलीमच्या हातांतून निसटलेला पेला बरोबर त्या गोऱ्या साहेबाच्या डोक्यावर पडला. सुदैवाने त्या वेळी त्याच्या डोक्यावर टोप होता. म्हणून त्याला फारसे लागले नाही. परंतु त्याला रागमात्र खूप आला. त्याच्या तर्फे दुकानदाराने सलीमवर खूप तोंडसुख घेतले.

दुकानाजवळ लहानशी गर्दी जमली. त्या गर्दीत एक वृद्ध मुसलमान हातात पेला घेऊन खालीवर पहात आश्चर्य दर्शवीत

म्हणाला–"अरे! हा तर अकबर बादशाहाच्या काळातला पेला दिसतो आहे! याची किंमत काही नाही तरी पांचशे रुपये सहज मिळेल, मी विकत घेतो हा!"

तो गोरासाहेब त्याच्या डोक्यावर पेला पडल्याची गोष्ट पार विसरून गेला आणि तो पेला सहाशे रुपयाला घ्यायला तयार झाला. त्या मुसलमान वडीलधाऱ्या माणसाने जणुकाही पेल्याचा लिलांव चालू असल्यासारखे आणखी पंचवीस रुपये किंमत देण्याचे कबूल केले. शेवटी त्या गोऱ्या साहेबाने सातशे रुपये देऊन तो पेला सलीमकडून विकत घेतला.

सलीमच्या आजाचा मित्र असा एक वृद्ध मुसलमान तेथे उभा राहून सर्व गंमत पहात होता. तो म्हणाला–"सलीम आतां सामान्य स्थितीत दिसत असला तरी फार थोर वंशात जन्मला आहे. त्याचे पूर्वज मोगल बादशाह होते. उदाहरणार्थ यांच्या घरातला मोठा हंडा जहांगीर बादशाहाने स्वतःसाठी तयार करविलेला होता."

[illegible] मिळेल का विचारू लागला. त्याला जुन्या काळातल्या ऐतिहासिक काळातल्या वस्तू विकत घेण्याचा छंद होता.

सलीम हंडा विकायला तयार झाला. दोन हजार रुपये घेऊन त्याने तो हंडा त्या साहेबाला दिला. सलीम आतां बायकोच्या सर्व हौशी पुऱ्या करतां येतील याबद्दल खूष झाला.

ते पैसे कपड्यावर व दागिन्यावर खर्च करण्यापेक्षा सलीमने त्या भांडवलावर स्वतःचे दुकान काढायचे ठरविले. त्याने तसे बायकोला समजावून सांगितले. जहीदा त्या गोष्टीस आनंदाने तयार झाली. सलीमने आपली नोकरी सोडली व स्वतः व्यापार करू लागला. थोड्याच दिवसात त्याची त्या गावातल्या मोठ्या व्यापाऱ्यात गणना होऊ लागली. जहीदाला जरीची पोलकी पातळे आणि मोत्यांचे दागिने तिच्या हौशीप्रमाणे मिळू लागले.





# खंडू खंडेराव झाला

एका गावात खंडू नावाचा मुलगा रहात असे. तो थोडासा धाडशीच होता. तो कोणाची कधी फिकीर करीत नसे. त्याच्या अंगात बळही तसे बरेच होते. परंतु त्याच्यामुळे त्याच्या आईला, बापाला व जवळच्या नातेवाइकांना लोक नावे ठेवीत. म्हणून खंडूला त्याच्या बापाने घरातून बाहेर हाकलून दिले.

काही दिवस खंडू निराश्रितासारखा भटकत राहिला. त्याला कोठे कामधंदा मिळाला नाही. शेवटी दोघां चोरांच्या टोळीत सामील झाला. त्यांच्याशी त्यांची चांगली मैत्री जमली. चोर एकदां त्याला आपल्याबरोबर चोरी करायला घेऊन निघाले. तिथे एका घरात शिरले. दोघे चोर त्यांच्या हाती जे आले ते घेऊन खंडूला काही सांगितल्याशिवाय पसार झाले.

खंडूने ते ओळखले आणि एक डब्बा खाली पाडून त्याने जोराने वाजविला. तो आवाज ऐकून घरातली माणसे जागी झाली. त्यांनी समोर दिसला म्हणून खंडूला धरले. त्यानेच चोरी केली असली पाहिजे असे समजून त्याच्या मुसक्या बांधून त्यांनी त्याला राजासमोर हजर करण्याचे ठरविले आणि निघाले.

ते जात असतां वाटेत त्यांना एक शेतकरी बैलांना शिव्या देत असलेला दिसला. तो म्हणत होता–"बेट्यांनो तुम्हांला एक गुद्दा मारून ठार करणारा कोणी भेटला तर किती बरं होईल?"

ते ऐकून मागचा पुढचा काही विचार न करतां खंडूने त्या बैलांना एकेक गुद्दा मारला आणि आश्चर्य म्हणजे बैल तिर मिरी येऊन जे पडले ते पुन्हां उठले नाहीत. ते पाहून शेतकरी संतापला. त्याने

श्री ना. ना. [illegible]

खंडूला दोरखंडाने बांधले व त्याला घरून तो शेतकरी देखील फिर्याद करायला निघाला.

थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांना एक म्हातारी भेटली. ती केळी विकायला हिंडत होती आणि सुरात म्हणत होती– "पैसा देऊन केळी घ्या अन्, एक हाणून वाटेने जा."

खंडूने त्या म्हातारीला पैसा देऊन केळे घेतले आणि तिच्या डोक्यात एक चापटी दिली. त्या चापटीने म्हातारीचे डोळे बाहेर आल्यासारखे झाले. खंडूविरुद्ध आपले गाऱ्हाणे घेऊन तीसुद्धा निघाली.

तिघे फिर्यादी मिळून खंडूला राजाकडे घेऊन गेले. खंडूमात्र बेफिकीर होता. [illegible] ऐकून घेतली. नंतर पहिल्या फिर्यादीच्या घरी चोरी केली होतीस का रे, म्हणून राजाने खंडूला विचारले.

तो म्हणाला–"महाराज! चोरी करणारा कधी डब्बा वाजवील का? मला थोडे पोहे लागले म्हणून मी त्यांच्या घरात शिरलो."

"शंभर वराह किमतीची गोष्ट बोललास रे!" मंत्री म्हणाला.

बैलांना ठार केल्याची फिर्याद शेतकऱ्याने केली. त्या फिर्यादीविषयी खंडू म्हणाला– "मी काय चूक केली? हा शेतकरी आपल्या बैलांना एका गुद्दयांत ठार करणारा कोणी मिळत नव्हता यासाठी फार दु:खाने बोलत [illegible] मदत केली."

"एक हजार वराह किमतीची गोष्ट बोललास!" मंत्री म्हणाला.

नंतर म्हातारीने आपली तक्रार सांगितली. तेव्हां खंडू आपली सफाई देत म्हणाला–"महाराज! ही म्हातारी म्हणाली, तेच तर मी केले. ठोकणेसुद्धां केळयाच्या किमतीबरोबर आवश्यक आहे, असे वाटले मला ते तसे नाही हे मला कसे कळणार?"

"लाख वराह मोलाची गोष्ट बोललास रे!" मंत्री म्हणाला.

राजाने खंडूवरच्या सर्व फिर्यादी कुचकामाच्या असल्याचा निवाडा देऊन खंडूला सोडायला सांगितले. परंतु तो तेथून जायला तयार असल्याचे दिसेना. तो मंत्र्याकडे वळून म्हणाला–"लाखाची गोष्ट म्हणजे गोष्टच गोष्ट का? मला तेवढी किंमत देववा, म्हटले!"

"बरोबर आहे, तुझे म्हणजे! मंत्र्याकडे शंभर, हजार व एक लाख वराह खंडूला देणे निघाले नाही का?" असे म्हणत राजाने खंडूला तेवढी रक्कम मंत्र्याकडून देवविली.

तो पैसा घेऊन आपल्या वाटेने खंडूला जाता आले असते. परंतु तो तसा जाणारा नव्हता. तो सरळ मंत्र्याच्या घरी गेला त्याच्या दारात उभा राहून म्हणाला– "खुशीखुशीने जेवण वाढले तर मी वाढणाराला हे सर्व धन देईन." ही गोष्ट त्याने दोन तीनदां म्हटली.





मंत्र्याला एक सुंदर मुलगी होती. तिला एकुच एक सखी होती. खंडूजवळ जे धन होते ते सर्व तिच्या मालकिणीला मिळावे या हेतूने त्या सखीने खंडूला बोलावून त्याला बसायला सांगितले आणि त्याला जेवायला वाढायला मंत्र्याच्या मुलीला सांगितले.

मंत्र्याच्या मुलीने आपल्या सखीच्या सूचनेप्रमाणे खुशीखुशीने पंचपक्वांन्ने तयार करून खंडूला बसायला पाट मांडला. तिने स्वतः चांदीच्या ताटात त्याला जेवायला वाढले आणि जेवण झाल्यावर त्याला विडा लावून दिला.

खंडूने आपले सर्व धन मंत्र्याच्या मुलीला देऊन टाकले व सरळ राजाच्या दरबारात जाऊन म्हणाला–"महाराज! एक लहानशी शंका विचारू का?"

राजा मंदहास्य करीत म्हणाला– विचार ना, काय ते?"

"कोणाला पाट मांडून बसवते ती कोण? पाट मांडून चांदीच्या ताटात, स्वतः जे[illegible] पैसा काळजीपूर्वक ठेवते ती कोण?" खंडूने असे सविस्तर राजाला विचारले.

"आणखी कोण, त्याची बायको! असे कां रे तू विचारलेस? तुझा हेतू नाही कळला." राजाने विचारले.

खंडू हसत म्हणाला–"कां विचारले ते मंत्र्यांच्या मुलीला विचारून पहा जरा!"

राजाला सर्व कळले. मंत्र्याला भयंकर राग आला. त्याची मुलगी पैशाच्या मोहाला बळी पडली आणि या दुष्ट गुंडाच्या जाळ्यात सांपडली. राजा मंत्र्याला थोडी सहानुभूती दर्शवीत म्हणाला–"तसे बिघडले नाही, मुलगा, हुशार दिसतो आहे. तुमच्या मुलीला योग्य वर होईल. दोघांचे लग्न करून द्या."

खंडूचे आणि मंत्र्याच्या मुलीचे फक्त लग्नच झाले नाही तर त्याला राजाच्या दरबारात उपमंत्रीपद लाभले आणि त्याचे पुढील आयुष्य सुखात गेले.





# चंडभट्ट

पूर्वी एका राजाच्या दरबारात चंडभट्ट नावाचा एक मांत्रिक रहात असे. तो लहानथोर जादू करून भोळ्या भावड्या प्रजेला आश्चर्यचकित करून सोडी आणि स्वतःला एक थोर मांत्रिक म्हणवून लोकांना फसवी. चंडभट्टच्या लबाडीला आतून मदत करणारा एक दरबारी अधिकारी देखील होता. त्याला प्राप्तीचा वांटा मिळत असे.

एकदां राणी ग्रहणाचे स्नान करायला नदीवर गेली. तिने नदीत उतरण्यापूर्वी आपले सर्व दागिने काढून काठावर ठेवले. तेव्हां तिच्या दासींशिवाय त्या बाजूला इतर कोणी फिरकणे शक्य नव्हते. राणी स्नान करून परत आली तेव्हां तिच्या दागिन्यांपैकी एक मूल्यवान हार दिसेना. राणीच्या सर्व दासी विश्वास-पात्र होत्या. त्या माहेरून तिच्या अहेर हुंड्याबरोबर आलेल्या होत्या. म्हणून त्यांना एका शब्दाने विचारणेदेखील राणीला अवघड वाटत होते.

परंतु ती राजवाड्यात परत गेली आणि तिने लगेच चंडभट्टला बोलाविले आणि हार कोणी चोरून नेला, चवकशी करून सांगायला सांगितले.

चंडभट्ट स्मित करून म्हणाला–"हे काय मोठे काम झाले, महाराणी? उद्याच्या आत चोराला मुद्देमालासह धरून महाराणींसमोर हजर करून दाखवितो." असे सांगून चंड भट्ट निघून गेला.

चंडभट्ट घरी पोचल्यानंतर थोड्याच वेळाने त्याच्या घरी मालिनी नावाची दासी धावत येऊन चंडभट्टाचे पाय धरून म्हणाली–"माझी बुद्धी भ्रष्ट झाली होती. राणी सरकारांचा हार नदीकाठावरून मी चोरला. ही गोष्ट आपणांपर्यंत येईल याची मला कल्पना नव्हती. उद्या तुम्ही मला चोर

श्री रघुनाथ शास्त्री

म्हणून उभे केलेत तर माझी दुर्गतीच होईल! कृपा करून माझा जीव वांचवा! तो हार आपणच ठेवून घेऊन राणीसरकारांकडे कसा तो पोचता करा. माझं नाव कोणत्याही परिस्थितीत बाहेर येता कामा नये. तुमचे हे उपकार मी आयुष्यभरात विसरणार नाही." असे म्हणत तिने तो हार चंडभट्टच्या हातात दिला.

चंडभट्ट मालिनीला म्हणाला–"भिऊ नकोस! मी तुला वांचवितो. परंतु तू माझ्याकडे आल्याचे कोणाजवळ बोलू नकोस. ते तुलाच धोक्याचे आहे." असे सांगून त्याने तिला पाठवून दिले.

तो हार स्वत: लांबवावा अशी दुर्बुद्धी चंडभट्टाला झाली. त्या करितां त्याने एक लहानशी जादू केली. एका कागदावर कांदारसाने 'हार नदीत वाहून गेला.' असे लिहून राजसभेत सर्वांसमक्ष त्याला धूप दाखविला. अक्षरे दिसू लागली. राणीचा हार कोणी चोरला नसून तो नदीत पडून वाहून गेला या गोष्टीची सर्वांची खात्री झाली.

दरबारी अधिकारी मित्राबरोबर तो हार घेऊन एका सोनाराच्या घरी गेला आणि त्याला हार दाखवून तो विकायला सांगितला. बरोबर त्याच वेळी मालिनी शिपायांना बरोबर घेऊन तेथे आली. राजाच्या शिपायांनी चंडभट्टला आणि त्याच्या बरोबर आलेल्या त्या अधिकाऱ्याला कैद केले आणि दरबारात घेऊन गेले.

मालिनी भर दरबारात राजाला म्हणाली–"महाराज! हा चंडभट्ट पहिल्या नंबरचा लबाड व लुच्चा आहे. हे कळल्यानंतर याला कसे पकडवून द्यायचे या विचारात मी होते. शेवटी राणी सरकारांचा हार चोरून याची खरी लबाडी बाहेर काढण्याचे काम मी करू शकले."

मालिनीच्या चातुर्याची राजाने व दरबाऱ्यांनी खूप वाखाणणी केली. राजाने तिला मोठे पारितोषिक दिले आणि चंडभट्टला व त्याला मदत करणाऱ्या दरबारी अधिकाऱ्याला हद्दपारीची शिक्षा केली.





# महाबली हनुमान

रामाने सुग्रीवाला रावण कोठे राहतो हे विचारल्यावर सुग्रीव म्हणाला– "रामा! तो दुष्ट रावण कोठे राहतो, हे मला माहीत नाही. परंतु मी एवढी प्रतिज्ञा करतो की तुला सीता परत मिळवून देण्याकरितां मी प्राणपणाने प्रयत्न करीन. तू धीर धर. मी देखील तुझ्यासारखाच बायकोचे अपहरण झाल्यामुळे दु:खी आहे. परंतु मी अद्याप धीर सोडला नाही."

दोघांचे डोळे परस्पर सहानुभूतीने डबडबले होते. दोघांनी आपापले डोळे पुसले. राम सुग्रीवाला म्हणाला–"तू खऱ्या आप्तमित्रासारखा बोललास. मी ज्या दु:खाचा अनुभव करीत आहे अगदी तशाच दु:खात तू आहेस. अशा मित्रांची अशी अचानक भेट व्हावी हा योगायोगच म्हटला पाहिजे. तू रावण कोठे आहे, त्याने सीतेला कोठे ठेवले आहे, हे शोधण्याच्या कामी मला मदत केली पाहिजेस. आतां तुला माझ्या मदतीची अपेक्षा कोणत्या स्वरूपाची आहे, निस्संकोच सांग. मी वालीचा वध करण्याची प्रतिज्ञा केलीच आहे. मी आजपर्यंत कधी खोटे बोललो नाही व पुढे ही कधी बोलणार नाही."

ते ऐकून सुग्रीव व त्याचे मंत्री सर्वांना परमानंद झाला. सुग्रीव रामाला म्हणाला– "रामा! मला माझ्या भावाने फसवून माझ्या बायकोचे अपहरण केले. मला काय करावे, सुचत नाही. कसा तरी आजवर जिवंत आहे. बलवान वालीने माझे राज्यच



बळकावले नाही तर बळजबरीने माझ्या बायकोला उचलून घेऊन गेला आहे तो. त्याने मला ठार करण्यासाठी अनेक प्रयत्नसुद्धां केले आहेत. त्याने पाठविलेल्या अनेक वानरवीरांना मी ठार केले. मी आपल्या भावाच्या भीतीनेच तुला भेटायला भीत होतो. कदाचित त्यानेच तुला माझ्या विरुद्ध पाठविले असावे, असा मला संशय होता. आत्तां माझ्या मदतीला हनुमान वगैरे काही निवडक मित्र आहेत तेवढेच. त्यांचे माझ्यावर अपार प्रेम आहे, म्हणून ते माझ्या रक्षणासाठी सतत जागरूक असतात. मी जातो तेथे माझ्याबरोबर येतात. परंतु असे जिणे किती काळ आवडणार कोणाला,

निश्चित होता येईल."

राम ते सर्व ऐकून स्मित करून म्हणाला—"मी एका बाणाने वालीचा वध करीन. तुझी व माझी स्थिती सारखीच आहे. तुझे दुःख लवकरच दूर होईल."

सुग्रीवाने वालीच्या प्रतापाचे वर्णन केले व म्हणाला—"वालीच्या बळाची तुला कल्पना नसेल कदाचित, म्हणून सांगतो. वाली पहाटे उठून सूर्योदयापूर्वी चारही समुद्रांत स्नान करतो आणि संध्यावंदन करतो. तो पर्वत शिखरांवर जाऊन मोठमोठ्या शिळांशी चेंडूसारखा खेळतो. मोठमोठी झाडे उपटून आपले बळ अजमावून पाहतो. त्याने सहस्र हत्तींचे बळ असलेल्या दुंदुभी नावाच्या राक्षसाचा वध केला होता.

दुंदुभी हा रेड्याचे तोंड असलेला एक महाभयंकर राक्षस होता. त्याला आपल्या शक्तीचा मद चढला होता. तो प्रथम समुद्राकडे गेला आणि त्याने त्याला द्वंद्वयुद्धास आह्वान केले.

पण समुद्र म्हणाला—"बाबा रे! तुझ्याशी युद्ध करण्याची शक्ती माझ्या अंगात नाही. कदाचित हिमवंत तुझ्याशी युद्ध करू शकेल. तू त्याच्याशी द्वंद्वयुद्ध केलेस तर तुझ्या बाहुबलाची खुमखुमी जिरेल."

दुंदुभीला वाटले आणि तो त्या गर्वात हिमालयावर वायुवेगाने गेला. त्याने हत्तीच्या आकाराएवढे खडक आपल्या शिंगाने उचलून फेकायला सुरवात केली आणि जोरजोराने रेंकू लागला.

ते कळल्यावर हिमवंत आपल्या एका शिखरावर उभा राहून म्हणाला—"दुंदुभी! मला युद्धाला कशाला रे बोलावतोस? मी कसा शांत थंड पडून आहे येथे. मला नाही येत युद्धबिद्ध. कित्येक मुनी माझ्या प्रदेशात तपश्चर्या करीत आहेत. ही जागा युद्धाला उपयुक्त होणार नाही."

दुंदुभीला खूप राग आला. म्हणाला—"तुला युद्ध करता येत नसेल तर ज्याला माझ्याशी युद्ध करता येण्यासारखे असेल त्याचे नाव तरी सांग!"

"तुला युद्धच करावयाचे असेल तर किष्किंधानगरीत वाली नावाचा वानर राजा आहे, त्याच्याकडे जा. त्याला जिंकणे तुला अशक्यच, समज!" हिमवंताने दुंदुभीला सुचविले.

दुंदुभी त्याप्रमाणे किष्किंधानगरीच्या द्वारावर आला आणि मोठमोठ्याने गर्जना करू लागला. आपल्या अंगाने झाडे मोडून पाडीत, खुरांनी जमीन उकरीत शेवटी शिंगांनी दारावर धक्के मारू लागला



आणि पुष्कळ आरडाओरडा केला. वालीने ते सर्व ऐकले. त्यावेळी तो अंतःपुरात होता. बरोबर आपल्या स्त्रियांना घेऊन येऊन दुंदुभीला दरडावून त्याने विचारले—"अरे, दुंदुभी! मी तुला ओळखतो रे! कशाला उगाच एवढा आकांडतांडव चालविला आहेस? जिवाची आशा सोडलीस वाटते?"

ते ऐकून दुंदुभी संतापला. म्हणाला—"बायकांसमोर तुझ्या या वल्गना शोभतील, परंतु माझ्याशी युद्ध करूनच तुला आपला काय तो पराक्रम दाखविला पाहिजे. तुला उद्यांपर्यंत सवड देतो. तुला उपभोगायची असतील ती सुखे रात्रभर उपभोगून घे.



आपल्या सर्व बंधुबांधवांना जे काही तुला द्यावेसे वाटत असेल, देऊन मोकळा हो; मित्रमंडळींशी जे काही बोलून घ्यावयाचे असेल ते सर्व बोलून घे; एकदा शेवटचे आपल्या या राजधानीचे दर्शन घे; आपल्या जागी वारस म्हणून तुला ज्या कोणाला राजा नेमावयाचा असेल त्याचा राज्याभिषेक उरकून घे. त्यानंतर मी तुझा सर्व दर्प उतरवायला येतो."

वालीने सर्व स्त्रियांना अंतःपुरात परत पाठविले, देवेंद्राने त्याला दिलेली कांचनमाला स्वतःच्या गळयात घातली आणि दुंदुभीशी द्वंद्वयुद्धाला गेला. वालीने त्याची दोन्ही शिंगे धरून त्याला गरगर फिरविले [illegible] आपटून मोठ्याने सिंहनाद केला. दुंदुभीच्या कानातून रक्तप्रवाह सुरू झाला.

तरी दोघांनी बराच वेळ मुष्टियुद्ध करून किंवा ढोपरांनी ढुशा देत किंवा परस्परांना मोठमोठ्या खडकांनी किंवा झाडांनी मारीत द्वंद्वयुद्ध चालू ठेवले. हळूहळू दुंदुभीची शक्ती क्षीण होत गेली आणि वालीची वाढत गेली. ते कळल्यावर वालीने दुंदुभीला वर उचलून जमिनीवर इतक्या जोराने आदळले की दुंदुभी जागच्या जागी ठार झाला. नंतर त्याने दुंदुभीचा मृत देह उचलून आठ दहा मैल दूर जाऊन पडेल अशा तऱ्हेने फेकला. तोंडावाटे रक्तप्रवाह चालू असतांना तो देह मतंग मुनींच्या आश्रमात जाऊन पडला. त्याच्या आघाताने आश्रमातील अनेक वृक्ष मोडून पडले.

आश्रमात रक्ताचे डाग चहूकडे पाहून मतंग मुनींना राग आला. याला कारण वाली आहे हे कळल्यावर वालीने आश्रमाच्या परिसरातल्या आठ दहा मैलांच्या टापूत पाऊल टाकले तर तत्काळ मरेल असा शाप देऊन मतंगमुनींनी वालीच्या सर्व नोकरांचाकरांना हाकलून लावले. जे लोक एका दिवसाच्या आत बाहेर निघून जाणार नाहीत ते दगड होतील असा ही शाप दिला.

[illegible] रांना वालीने विचारले—"तुम्ही परत कां रे आलात? वानरांच्या जिवाला काही धोका नाही ना?" त्यांनी घडले ते सर्व जसेच्या तसे सांगितले. वालीने, मतंग मुनींनी शाप परत घ्यावा, अशी विनंती करून पाहिली. परंतु त्यांनी तिकडे दुर्लक्ष केले. त्या दिवसापासून वालीने ऋष्यमूक पर्वताच्या बाजूला वळूनदेखील पाहिले नाही. तो शाप यावेळी सुग्रीवाच्या फायद्याचा ठरला. तो आपल्या मित्रमंडळीसह ऋष्यमूक पर्वतावर निर्भयपणे रहात होता.

सुग्रीवाने वालीचा हा सर्व वृत्तांत सांगून रामाला दुंदुभीचा देह दाखविला आणि विचारले—"तुला येथे हे जाडजूड सात तालवृक्ष दिसत आहेत ना? यांच्यापैकी कोणत्याही एकातून आरपार बाण मारू शकेल अशा वीराइतके बळ वालीच्या अंगात आहे. अशा बलशाली वालीला तू युद्धात कसा काय जिंकणार?"

ते ऐकून लक्ष्मण थोडा हसून म्हणाला—"हे सांग की रामाने काय केले तर तुला राम वालीला मारू शकेल याचा विश्वास उत्पन्न होईल?"

"रामाने तालवृक्षातून आरपार जाईल असा बाण मारून दाखवावा. नंतर दुंदुभीचा देह दोनशे वाव दूर फेकून दाखवावा,



म्हणजे याच्या हातून वालीचा वध होऊ शकेल असे मी मानू शकेन." सुग्रीव म्हणाला.

तो रामाकडे वळून म्हणाला—"रामा! वाली हा महा पराक्रमी आहे. त्याला पराभव हा माहीतच नाही त्याच्या बळाची माहिती मला आहे, परंतु तुझ्या बळाची मला कल्पना नाही. तेव्हां मी तुला घाबरवून सोडण्यासाठी हे सर्व सांगत नाही. वालीचे मला जे भय वाटते ते मी तुला सांगतो आहे."

राम स्मित करीत म्हणाला—"माझ्या पराक्रमावर तुझा विश्वास बसावा असे मी करून दाखवितो." असे सांगून रामाने



दुंदुभीचा देह पायाच्या एका बोटाने उचलून दहा योजन दूर जाऊन पडेल इतक्या जोराने फेंकला.

ते पाहून सुग्रीव म्हणाला–"रामा! दुंदुभीचा हा देह वाळून कोरडा झाला आहे. त्यामुळे अगदी हलका झाला आहे. दुंदुभीशी युद्ध करून दमून गेलेल्या वालीने तो इतका दूर फेंकला होता. म्हणून तुझ्या व वालीच्या बलाबलासंबंधी माझा संदेह काही मिटला नाही. एका तालवृक्षाच्या आरपार बाण मारून दाखव म्हणजे माझा संदेह दूर होईल."

सुग्रीवाच्या मनातला संदेह दूर करण्यासाठी रामाने हातात धनुष्य घेऊन त्यावर

अशातऱ्हेने मारला की त्या एका झाडाच्या आरपारच नव्हे तर सात ही तालवृक्षांच्या आरपार निघून गेला. नंतर तो डोंगरावरच्या एका खडकाला भेदून जमिनीत इतका खोल गेला की अदृश्य झाला. ते पाहून मात्र सुग्रीव थक्कच झाला. तो हात जोडून रामासमोर उभा राहला. नंतर त्याला साष्टांग नमस्कार करून म्हणाला– "रामा! तू वालीलाच काय? इंद्राला व देवांनादेखील युद्धात जिंकशील व वालीचा वध करू शकशील या गोष्टीची माझ्या मनात आता मुळीच शंका उरली नाही. तुझ्याशी मैत्री जमली याबद्दल मला फार फार आनंद होत आहे."

रामाने सुग्रीवाला आलिंगन करून लक्ष्मणाचा सल्ला घेतला व म्हणाला– "सुग्रीवा तरमग चल, किष्किंधेला जाऊ या. तू थोडा पुढे जा आणि वालीला आह्वान कर!"

रामलक्ष्मण व सुग्रीवाचे मंत्री किष्किंधेला निघाले. ते किष्किंधा नगरीच्या बाहेर झाडाआड बसून राहले.

सुग्रीव वालीची झोप मोडावी व त्याने बाहेर यावे, यासाठी खूप मोठ्याने ओरडून हाका मारू लागला. आपल्या धाकट्या भावाचा तो उर्मटपणा पाहून वालीला राग

आला. बाहेर येऊन त्याने त्याच्याशी द्वंद्व सुरू केले. दोघांचे ते युद्ध भयंकरच होते. दोघे परस्परांवर बुक्क्यांचा, लाथांचा डोक्याच्या ढुशीचा मारा करीत होते.

दोघांच्या रूपात इतके साम्य होते की वाली कोण व सुग्रीव कोण हे कळणेच शक्य नव्हते. म्हणून वालीला बाण मारणे रामाला अशक्य झाले. मध्यंतरी सुग्रीव हारला आणि पळून गेला. वालीने त्याचा पाठलाग केला व त्याला मतंग मुनींच्या आश्रमापर्यंत पिटाळून लावले आणि "वाचलास जा!" असे म्हणत किष्किंधेला परतला.

राम हनुमंताला व लक्ष्मणाला बरोबर घेऊन सुग्रीवाला जाऊन भेटला. सुग्रीव रामाला पाहून मान खाली करून म्हणाला— "तुझा काय तो पराक्रम कळला. तू मला वालीशी युद्धाला पाठवून मृत्यूच्या तोंडात ढकलले होतेस. हे सर्व तू कशासाठी केलेस? वालीचा वध तुझ्या हातून होणार नाही, हे तू मला पुर्वीच सांगितले असतेस तर मी त्याच्या वाटेला कां गेलो असतो?"

नाही त्याचे कारण एक! तुमची दोघांची वस्त्राभूषणे, रूपे, आवाज, चाल, डोळे, रंग वगैरे सर्व अगदी सारखी आहेत. म्हणून मला दोघांत काहीच फरक कळला नाही. बाण मारून नंतर पश्चात्ताप करावा लागेल म्हणून मी बाण सोडलाच नाही. तुला अभयदान देऊन नंतर मी तुझाच प्राण घेतला तर त्याच्यासारखे महापाप दुसरे कोणते होईल? मी आणि लक्ष्मण तुझ्या अधीन आहों. माझ्या बळाच्या व कर्तृत्वाच्या विषयी तू मनात शंका करू नकोस. तू पुन्हा वालीशी युद्ध करायला जा. या खेपेस मला तुझी ओळख पटेल अशी एखादी वस्तू गळयात घालून जा. मी एकाच बाणाने वालीचा वध करतो. लक्ष्मणा! हे फुललेले गजपुष्प तोडून सुग्रीवाच्या गळयात बांध."

सुग्रीवाला राम म्हणाला ते खरे वाटले. त्याने आपल्या गळयात गजपुष्प बांधून घेतले आणि पुन्हां किष्किंधेला निघाला.





# अमरवाणी

रिपूणां धर्षणं शूरा
मर्षयंति न संयुगे,
जानन्तस्तु स्वकं वीर्यं
स्त्रीसमक्षं विशेषतः ॥ ॥ १ ॥

[ शूर पराक्रमी वीर युद्धसमयी शत्रूंचा तिरस्कार सहन करीत नाहीत. त्यांत शत्रूपेक्षा आपले बळ जास्त असल्याचे ज्यांना माहीत आहे ते बायकांच्यासमोर तर तो मुळीच सहन करीत नाहीत.]

अधर्षिताणां शूराणां,
समरे ष्वनिवर्तिनां,
धर्षणामर्षणं (भीरु!)
मरणादतिरिच्यते ॥ ॥ २ ॥

[ युद्धात माघार न घेणाऱ्या शूर वीरांना कोणी आव्हान केले तर ते सहन करून गप्प राहणे हे मरणापेक्षा जास्त कष्टदायक होते.]

शूराणां हि मनुष्याणां
त्वद्विधानं महात्मना
विनश्ये वा, प्रणश्ये वा
शोक स्सर्वार्थ नाशनम् ॥ ॥ ३ ॥

[ शूर, महापुरुष जे असतात त्यांनी जे दिसत नाही, त्याविषयी किंवा जे नष्ट झाले आहे त्याविषयी दुःखी होणे सर्वप्रकारे दुर्दैवच !"

—वाल्मीकी

# चांदोबा


संस्थापक : नागिरेड्डी

संचालक : 'चक्रपाणी'


गुढी पाडव्याला 'चांदोबा' १९५२ साली सुरू झाला. गुढी पाडवा हा सण आन्ध्र व कर्नाटकातही 'उगादि' म्हणजे 'युगादि' या नावाने साजरा होतो. या तीनही प्रांतात वर्षप्रतिपदा एकाच दिवशी पडते. कारण तिघांचे पंचांग एकच,—चंद्राच्या गतीवरून चालणारे आहे. तीनही प्रांतात बहुतेक सण एकाच दिवशी व सारखे आहेत. रीती, रूढी पण सारख्याच आहेत. परस्परांच्या भाषा निराळ्या असल्या तरी स्वभाव-धर्म एकच आहे.


वर्ष : २४  एप्रिल १९७५  अंक : १०






# मित्रभेद

[ २० ]

चिमणी, सुतारपक्षी व भुंगा बेडकाला भेटायला गेले. बेडूक सर्व ऐकून म्हणाला–"आपल्या सारख्यांनी एकदां मनात आणले तर या हत्तीसारख्या मूर्खांची घमेंड जिरविणे काय मोठेंसे काम आहे का? हे भुंग्या! तू गुंजारव करीत हत्तीच्या डोळ्याजवळ जा आणि त्याला चावण्याचा प्रयत्न कर. हत्ती भिऊन डोळा मिटून घेईल. तेव्हां सुतारपक्ष्याने जाऊन आपल्या अणकुचीदार चोचीने त्याचा तो डोळा फोडावा. हत्ती घाबरून जाऊन दुसरा डोळासुद्धा बंद करून घेईल व पळू लागेल. तेव्हां सुतारपक्ष्याने त्याच्या पाठोपाठ जाऊन दुसरा डोळा फोडावा. हत्ती तळ्यात जाण्यासाठी वाट फुटेल तिकडे पळू लागेल. तेव्हां मी एका खोल खड्याच्या टोकाला बसून 'डरांव' 'डरांव' करून ओरडू लागेन. त्या दिशेला तळे असावे असे समजून हत्ती त्या बाजूला धावत येईल आणि त्या खड्ड्यात पडून मरेल."

बेडकाने सांगितले, बरोबर तसे भुंग्याने आणि सुतारपक्ष्याने मिळून केले आणि हत्तीला खड्ड्यात पाडून ठार केले.

बायकोने सांगितलेली चिमणी व हत्तीची गोष्ट ऐकून टिटवा म्हणाला–"मी आपल्या सर्व मित्र पक्ष्यांना बोलावून आणतो आणि नंतर सर्व मिळून समुद्र आटवितो."

त्याने त्याप्रमाणे सर्व पक्ष्यांना बोला[illegible] आणि समुद्राने त्याच्याविरुद्ध केलेल्या जुलमाचे वर्णन केले. नंतर सर्वांनी चोचीने पाणी न्यायचे ठरवून पाणी चोचीने ओढून घेतले. त्यांनी समुद्राचे पाणी आटविण्याची शिकस्त करून पाहिली. परंतु त्यापासून परिणाम तर काहीच निघाला नाही. म्हणून त्यांना समुद्राचा राग आला व त्यांनी आपल्या पंखांनी समुद्राला मारायला सुरवात केली. त्या प्रयत्नातही यश आले नाही, तेव्हां त्यांनी मातीची लहान मोठी ढिकळे आणून समुद्राचा खड्डा भरून काढण्याचा प्रयत्न केला.

इतके करूनही काही उपयोग होत नाही हे पाहून एक विवेकवान पक्षी म्हणाला–"हे पहा, मित्र हो! आपण स्वतःच्या बुद्धीबळावर अवलंबून समुद्राची मान वांकवू शकणार नाही. वडाच्या झाडाखाली एक म्हातारी बदकीण आहे. ती आपल्याला बरोबर सल्ला देईल. एकदां तिने दिलेल्या सल्ल्याप्रमाणे एक बदकांचा कळप वांचला होता. म्हणून आपण तिचा सल्ला घेऊ या."

"काय रे ती गोष्ट?" पक्ष्यांनी विचारले. विवेक नावाच्या पक्ष्याने गोष्ट सांगितली ती अशी.

## म्हाताऱ्या बदकिणीची गोष्ट

एका जंगलात एक फार मोठे झाड होते. त्या झाडाला असंख्य फांद्या व शाखा होत्या. त्या झाडाच्या बुंधात एक वेल उगवला आणि जोमाने वाढू लागला.

एक म्हातारी बदकीण बदकिणींना म्हणाली–"हा वेल वाढून झाडावर चढला तर त्याच्या मदतीने शत्रू वर चढून जाऊ शकेल. म्हणून आपण आतां मुळापासून हा वेल तोडून उपटून टाकू या."



बदकिणी हसून म्हणाल्या—"काय पण बोलतां, हा वेल आपलं काय नुकसान करू शकेल ?"

म्हणून वेल वाढू लागला आणि झाडावर चढत गेला. एकदां एक शिकारी त्या वेलाच्या मदतीने झाडावर चढून गेला आणि बदके आहाराच्या शोधार्थ गेली असतां त्याने जाळे टाकले. बदके परत आली आणि त्या जाळ्यात सांपडली. त्यांनी स्वत:ला सोडविण्याचा खूप प्रयत्न करून पाहिला, परंतु तो फुकट गेला.

"माझं तुम्ही ऐकले नाही आणि शेवटी या संकटांत सापडलो आपण." म्हातारी बदकीण म्हणाली.

"तुम्ही म्हणतां ते खरं आहे, आतां या संकटातून सुटका कशी मिळेल ते सांगा!" बदके म्हणाली.

"आपण आतां जागचे मुळीच हलता कामा नये, अगदी मेल्याचे सोंग केले पाहिजे. नंतर शिकारी येईल आणि आपण सर्व मेलो आहो असा विचार करून आपणां सर्वांना एकेक करून जाळ्यातून बाहेर काढून खाली जमिनीवर टाकील. अगदी शेवटचा पक्षी जमिनीवर खाली पडेपर्यंत आपण हालचाल न करतां अगदी शेवटी सर्वांनी एकदम उडून जाऊ या."

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर शिकारी आला. सर्व पक्षी मेले आहेत असे त्याला वाटले. त्याने जाळे सोडले आणि एकेकाला सोडवून जमिनीवर ठेवू लागला. सर्वांना जमिनीवर टाकून तो जाळे सोडवू लागला; तेवढ्यात सर्व बदके एकदम उठली आणि उडून गेली. ते पाहून त्या शिकाऱ्याला फार आश्चर्य वाटले."

ती गोष्ट ऐकल्यानंतर सर्व पक्षी त्या म्हाताऱ्या बदकिणीला जाऊन भेटले आणि समुद्राने टिटवीची अंडी ओढून नेऊन जो जुलूम केला होता, सर्व सांगितले.

"आपण सर्व मिळून विष्णूचे वाहन असा, आपला राजा जो गरुड त्याला जाऊन भेटू या. तो उदार व प्रेमळ मनाचा आहे." म्हाताऱ्या बदकिणीने सुचविले.





# तिळ्या बहिणी

[ ८ ]

[ तिळ्या बहिणींच्या शोधार्थ निघालेले तिळे भाऊ जंगलात एका दाढीवाल्याच्या कचाट्यात सापडले आणि शेवटी त्याला चकवून व आपली सुटका करून घेऊन त्याच्या-कडून अनेक अपूर्व, भस्मे, मलम पंचा वगैरे मंत्रवलेल्या वस्तू मिळविल्या. तिथे अरण्यात काही अंतर गेल्यावर सर्वांत पुढे जात असलेला उदयन एकाएकी अदृश्य झाला. पुढे—]

उदयन दिसेनासा झाल्यावरोबर संध्याकुमार व निशीथ दोघांनी लगाम ओढून आपल्या घोड्यांचा वेग थोडा कमी केला आणि सावकाश पुढे सावधगिरी बाळगून जाऊ लागले. काही अंतर चालून गेल्यानंतर त्यांना त्या वाड्यासमोर एक मोठा खंदक दिसला. त्यांचा भाऊ आपल्या घोड्यावरोबर त्यात पडला असावा असे संध्याकुमार व निशीथला वाटले. परंतु त्या खोल खंदकात त्यांना तो किंवा त्याचा घोडा कोठेच दिसला नाही.

संध्याकुमार व निशीथला पुढे काय करावे हेच सुचेना. त्या वाड्यात जावे असा विचार त्यांच्या मनात आला, परंतु तो खंदक बराच रुंद होता. त्या खंदका-वरून पलीकडे जायला कोठून तरी वाट असेल असा विचार करून ते खंदकाच्या बाजूबाजूने चालू लागले. परंतु पुष्कळ



फिरले तरी त्या खंदकाला सुरवात कोठे व त्याचा शेवट कोठे हे कळतच नव्हते. त्यांनी किल्यंकदां मागे पुढे जाऊन कोठे मार्ग मिळतो का हिंडून पाहिले, परंतु त्यांना कोठे पूल किंवा इतर मार्ग दिसलाच नाही. तेव्हां खंदकापलीकडे वाड्यापर्यंत कोणी येऊच नये यासाठी हा सर्व बंदोबस्त केला गेला असावा असे अर्थातच शेवटी त्यांना वाटले. एकूण वाड्यात जावेसे वाटत असूनही त्यांना खंदकापलीकडे जाणे अशक्य वाटू लागले.

थोडा वेळ दोघांनी विचार केल्यावर संध्याकुमार निशीथला म्हणाला–"निशीथ दादा! मला वाटते की काय वाटेल ते करून आपण खंदकापलीकडे गेलेच पाहिजे. आपण घोड्यावर बसून दुरून घोड्यांना भरधांव सोडून पलीकडे उडी मारता आली तर प्रयत्न करू या का? जाऊ शकलो तर नशीब बलवत्तर आहे, असेच मानावे लागेल. समज, आपण खंदकातच पडलो तर उदयन दादाला शोधत जाता येईल!"

त्याला निशीथने उत्साहाने होकार दिला. दोघे आपापल्या घोड्यावर बसले. घोड्यांना थोडे मागे घेऊन गेले आणि वायुवेगाने घोडे सोडून उडी मारून खंदकापलीकडे येऊन पोचले.

ते नशीबवान खरेच. कारण कोणत्याही प्रकारचा अपघात झाल्याशिवाय ते खंदकापलीकडे येऊन पोचले. "हे सर्व शुभसूचकच म्हटले पाहिजे. आता काही भिण्याचे कारण नाही, आतां आपण किल्ल्यात प्रवेश केल्यासारखाच आहे." दोघांनी परस्पर बोलून मनाचे समाधान व्यक्त केले.

दोघांनी त्या आनंदात त्या वाड्यात प्रवेश केला खरा, परंतु आत त्यांना कोणी मनुष्य दिसला नाही. असंख्य दरवाजे त्या वाड्यात होते, परंतु एकाला देखील दार नव्हते. एकामागून एक दरवाजे ओलांडून जात होते आणि आश्चर्य म्हणजे त्या दरवाज्यांच्या दोन्ही बाजूला त्यांना दगडाच्या मानव मूर्ती दिसत होत्या.

शेवटी एक फार मोठा दरवाजा लागला. वास्तविक तो दरवाजा नव्हताच. तो एक महाभयंकर आकाशा एवढा उंच राक्षस उभा राहूनच झोपत होता. त्याची झोप मोडली व त्याने दोन्ही हातांनी संध्याकुमार व निशीथला हातानें उचलून घेतले व म्हणाला–"छान! आणखी दोन मूर्ती!" त्याला फार आनंद झाल्यासारखा दिसला. त्याच्या तोंडून ते वाक्य निघाल्याबरोबर दोघांना वाड्यात दिसलेल्या मूर्तींचे कोडे उलगडले. ही राक्षसाची काहीतरी मायाच असली पाहिजे.

अशातऱ्हेनें नकळत राक्षसाच्या तावडीत सापडल्याबद्दल संध्याकुमार व निशीथ दोघे काळजीत पडले. काय करावे त्यांना सुचेना. त्यांच्या समोरच थोड्या वेळापूर्वी उदयन पाहतां पाहतां अदृश्य झाला होता. तीदेखील याच राक्षसाची माया असणार. त्याची व आपली भेट कदाचित होणारही नाही आणि होईलही कदाचित्! आपण आतां पावेतो संकटांतून सुटत आलों तसे याही संकटांतून नक्कीच सुटूं, निराश हताश होण्याचे कारण नाहीं. असे दोघेही परास्परांशी काही बोलल्याशिवाय विचार करीत होते.

मानवाला संकटांना नेहमीच तोंड द्यावे लागते. अशाच संकटात सांपडल्यावर त्या संकटातून स्वत:ची सुटका कशी करून घ्यायची यातच माणसाच्या बौद्धिक बळाची परीक्षा होते. असा विचार करून दोघे



              



घाबरले होते तरी स्वतःला सावरून निशीथ मनात म्हणाला–"मरण तर समोरच आहे, परंतु हातपाय गाळून बसण्यापेक्षा डोके लढवून सुटका मिळते का पाहू या."

तसा विचार करून निशीथ राक्षसाला म्हणाला–"काय रे, तू आम्हांला ओळखले नाहीस वाटते? आम्ही कोण आहो असे वाटलं तुला? आम्ही लपून छपून आत नाही शिरलो. तो लांब दाढीवाला आहे ना, त्याने एक निरोप पाठविला आहे. म्हणून..." असे बोलत असतां राक्षसाने अधीर होऊन विचारले–"म्हणजे तो जिवंत आहे ना? किती दिवस झाले, तो परत आला नाही तेव्हां कोणत्या तरी संकटात सांपडून मेला असावा असे मला वाटले होते. बरं तर सांग तरी त्याने कोणता निरोप पाठवला आहे, लवकर सांगा!"

तेव्हां निशीथ राक्षसाला म्हणाला–"तो अजून जिवंत आहे आणि तसे जिवावरचे संकट नाही. परंतु त्याची सर्व गुपिते कोणाला तरी कळली आहेत. गुपिते कळली एवढेच नव्हे तर त्याच्याजवळची भस्मे, मलमे आणि पंचासुद्धा ते लोक घेऊन गेले आहेत. त्यांच्या अभावी त्याला एक पाऊल देखील पुढे टाकणे अशक्य झाले आहे. म्हणून ही गोष्ट तुला कळवून पुन्हां काही भस्मे, मलमांच्या डब्या पाठवून द्यायला त्याने सांगितले आहे."

सर्व ऐकून राक्षस म्हणाला–"अस्सं! बिचारा! म्हणूनच तो परत येऊ शकला नाही तर! बरं तर बरं! त्या दुष्टांनी त्याचा हार नाही काढून घेतला म्हणावयाचा. ते झाले असते तर कोणीदेखील त्याला वांचवू शकला नसता. बरं तर मी जाऊन येतो. तुम्ही कीड मुंगीसुद्धा आत येणार नाही याची काळजी बाळगा. सावधपणे पाहारा द्या!" असे सांगून तो निघाला.

राक्षस निघून गेल्यावर संध्याकुमार व निशीथ आनंदाने उड्या मारू लागले. [illegible] फसवू शकलो आणि आपली सुटका करून घेऊ शकलो याबद्दल दोघे स्वतःच्या बुद्धीचे कौतुक करू लागले. तेव्हां निशीथ म्हणाला–"परंतु आतां आपण वेळ घालविता कामा नये. तो परत यायच्या आत या वाड्यातली सर्व गुपिते काय ती हुडकून ओळखून घेतली पाहिजेत."

दोघे भाऊ पुढे निघाले. आणखी काही दरवाजे ओलांडल्यावर शेवटचा दरवाजा आला. त्याच्या पलीकडे पाऊल टाकतांच त्यांना एक मोठे सरोवर दिसले. त्यात सुंदर हंस पोहोत होते.



सकाळपासून भटकत फिरत असल्यामुळे त्या दोघां भावांना फार तहान लागली होती. पाणी प्यायला म्हणून संध्या पाण्यात उतरला ओंजळीने पाणी पिऊ लागला. परंतु ते पाणी तो प्याला असेल नसेल बिचारा जागच्या जागी दगडाची मूर्त होऊन गेला.

डोळयादेखत आपल्या भावाला दगडाची मूर्त झालेला पाहून निशीथ थक्क होऊन जागच्या जागी मूर्तीसारखा उभा राहला. मनात म्हणाला–"बरं झालं, मी घाई करून पाणी प्यालो असतो तर माझी हीच गत झाली असती. उदयनची काय गत झाली हे कळायला काही मार्ग नाही, अशा स्थितीत संध्याकुमारची ही गत व्हावी ना! माझ्यावर अशीच एखादी आपत्ती ओढवली तर आम्ही तिघे कोठे जिवंत आहो की मेलो हे कोणाला कळायचे देखील नाही." तो फार काळजीत पडला.

निशीथ आणखी थोडे अंतर चालून पुढे गेला तेव्हां त्याला एक फळांची बाग दिसली. त्या बागेत अनेक फळझाडे होती. त्यात एक आंब्याचे झाड मोठे विचित्र होते. त्या झाडाला इतकी फळे होती की फळांच्या आड पाने झांकून गेली होती.

निशीथला तर भूक खूपच लागली होती. त्याने घाईघाईने पुष्कळ फळे तोडली आणि समोर ठेवून एक फळ खाऊ लागला.



परंतु आंब्याला दात लागतांच निशीथ एक माकड झाला. माकड झाल्यावर तो विचार करू लागला–"हे काय झाले! आणखी काय काय होणार आहे, ते त्या परमेश्वरालाच माहीत! राक्षसाची माया कोणाला आणि कशी कळणार?" असा विचार करून त्याने तो आंबा खाल्लाच नाही आणि तसाच टाकून दिला. निशीथ त्या माकड रूपात सरोवराजवळ दगडाची मूर्त झालेला संध्याकुमार होता तेथे आला आणि त्या मुर्तीच्या चारी बाजूला घिरट्या घालू लागला.

इतक्यात सरोवरात् बुडबुड असा आवाज ऐकू आला आणि आणखी थोड्या वेळाने पाण्यातून एक हंस [illegible] असलेला दिसला. वानर रूपात निशीथ ते सर्व प्रत्यक्ष पहातच होता.

आणखी काही वेळाने तो हंस पूर्णपणे पाण्याबाहेर आला आणि त्याचा एक मनुष्य झाला. निशीथने चकित होऊन उडी मारली. कारण तो दुसरातिसरा कोणी नसून खंदकात पडलेला तो उदयनच होता.

उदयनला काठावर येताच संध्याकुमाराची दगडाची मूर्त दिसली. तो आश्चर्य चकित होऊन त्या मूर्तीकडे पाहू लागला.

इतक्यात वानर रूपात असलेला निशीथ उदयनच्या पायाला विळखा घालून बसला. ते एक माकड असावे असे वाटून उदयन पहिल्याने त्याला दूर ढकलून मारायला धावला. परंतु ते माकड पुन्हां येऊन चिकटले व सोडत नाही हे पाहून आपला भाऊ निशीथच तर नसेल या रूपात अशी एक शंका त्याच्या मनात आली.

परंतु काय करावे उदयनला सुचेना. संध्याकुमार असा दगड होऊन बसला आहे आणि वानर रूपात असलेला आपला भाऊ निशीथच आहे की नाही हे कसे कळणार?

काही वेळ असाच विचार करीत उदयन उभा राहला आणि एकदम काही तरी



















उत्तम युक्ती सुचल्यासारखा उठून त्याने खिशातली भस्मे व मलमे काढली. त्याने संध्याकुमाराच्या मूर्तीवर ते काळे भस्म टाकले. काही बदल झाला नाही. हिरवं मलम लावून पाहिले, काही बदल झाला नाही. तांबडे मलम लावून पाहिले, तरी काही बदल झाला नाही. ती दगडाची मूर्त होती तशीच होती. इतके प्रयत्न करून ही निरुपयोगी ठरल्यावर उदयनने ती भस्मे, मलमे वगैरेंचा वानर रूपात असलेल्या निशीथवर प्रयोग करून पाहिला. परंतु काही फरक झाला नाही. माकड माकडच राहले.

उदयनला काय करावे, सुचेना म्हणून तो पुन्हां तलावाच्या काठी येऊन बसला आणि विचार करू लागला. तेव्हां सरोवरातल्या हंसांपैकी एक उदयनच्या पायाजवळून पुढे जाऊ लागले. उदयनने चटदिशी त्याला धरले आणि बाहेर काढले. तो हंस बाहेर निघताच एक सुंदर कन्या रूपात बदलला.

ती मुलगी ... काही बोलल्याशिवाय उभी राहली. तिला उदयन म्हणाला–"कोण ग तू? या हंस रूपात या सरोवरात कशी काय राहतेस?" असे तिला बरेच काही तरी विचारू लागला.

तेवढ्यात त्याला आरोळी ऐकू आली– "कोठे आहां रे तुम्ही?"

ती आरोळी ऐकू आल्याबरोबर ती मुलगी त्या वाड्यात पाहारा देणारा राक्षस आल्याचे ओळखून उदयनला म्हणाली– "हे सर्व मी मागाहून सांगेन. पहिल्याने आपला जीव वांचविला पाहिजे." म्हणत तिने संध्याकुमाराची दगडाची मूर्त आणि तिच्याजवळ जे माकड होते त्याला पाण्यात ढकलले.

त्या पाठोपाठ अगदी सहजी व निःसंकोचपणे उदयनचा हात धरून स्वतः तिने पाण्यात उडी मारली आणि उडी मारल्याबरोबर त्या दोघांनादेखील हंस रूप लाभले. (क्रमशः)



# जिवांला भुलो

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "फार अशक्त माणसातही दुरभिमान उत्पन्न होतो. त्याचे उदाहरण म्हणून मी प्रवीणाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक. असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी सुवर्णगिरीच्या गादीवर राजसिंह नावाचा राजा राज्य करीत असे. तो एक अयोग्य व असमर्थ असा राजा होता. त्याने राज्यकारभाराची सर्व कामे सरकारी नोकरांवर व अधिकाऱ्यांच्या भरंवशावर सोडली होती. म्हणून राज्यकारभारात लांचलुचपत व इतर गैर प्रकार फार वाढले. मंत्र्यांपासून तर सामान्य द्वारपाल-

वेताळाच्या गोष्टी



कांपर्यंत सर्व प्रजेला पिळून काढीत. सर्वत्र अधर्म पसरला होता. परंतु राजाला त्याची वानवा नव्हती. राज्याच्या अधिकाऱ्यांवर त्याचा अपार विश्वास होता.

सुवर्णगिरीच्या राजधानीतच एका गरीब ब्राह्मणाला प्रवीण नावाचा मुलगा होता. आपल्या मुलाची कुशाग्र बुद्धी पाहून बापाने मुलाला सर्व शास्त्रे व विद्या शिकविण्याचे ठरविले आणि त्याच्या शिक्षणाची व्यवस्था केली. प्रवीण निरनिराळ्या विश्वविद्यालयांत शिक्षण घेऊन एक थोर पंडित व विद्वान होऊन सुवर्णगिरीला परत आला.

मुलगा एक विद्वान पंडित होऊन आला आहे, कुटुंबाची जबाबदारी संभाळू शकेल असे अर्थातच बापाला वाटले. परंतु तसे झाले नाही. प्रवीणला सर्व परिस्थिती पाहिल्यावर काय करावे हे कळेनासे झाले.

बाप म्हणाला—"बाळा! आपण किती झालों तरी गरीब आहों. तुझे हे पांडित्यच आम्हांला दोन घास घालू शकले तर पाहिले पाहिजे."

"मी मिळविलेले पांडित्य, माझा सर्व विद्याभ्यास सर्व फुकट आहे असे मला वाटत आहे. चारी बाजूचे जीवन पाहून मला जीवनाचा तिटकारा वाटू लागला आहे. कोणाकडून सत्कार करून घेण्याची माझ्या मनात मुळीच इच्छा नाही. सन्मान सत्कार करणारे लोक कसे असतात मला सर्व माहीत आहे." प्रवीण म्हणाला.

बापाला शंका वाटू लागली की मुलाला स्वतःच्या पांडित्याविषयी संशय तर येत नाही? कदाचित याच्याजवळ पुरेसे पांडित्य नसेल ही. नाही तर याला एवढी विरक्ती दर्शविण्याचे कारणच काय? म्हणून बापाने त्याला माहीत असलेल्या चार चौघां पंडितांना बोलावून त्यांच्या करवी मुलाशी शास्त्रार्थ करविला. प्रवीणशी काही वेळ बोलून ते प्रवीणच्या बापाला म्हणाले—"बाबा रे! नशीबवान आहेस तू. तुझ्या पोटी खरोखरच रत्न म्हणजे एक रत्नच जन्मले आहे."

त्या पंडितांच्या तोंडी प्रवीणची थोरवी राजाच्या दरबारात पोचली. राजाने प्रवीणला आदरपूर्वक दरबारात येण्यास निरोप पाठविला. प्रवीणच्या वडिलांना ते कळल्यावर फार आनंद झाला. प्रवीणने स्वतः राजदरबारात जाण्याचा उत्साह दर्शविला नाही. बापाने अनेक प्रकारे त्याची समजूत घालून शेवटी आपल्याबरोबर त्याला दरबारात नेले.

प्रवीणने दरबारात प्रवेश केल्याबरोबर राजाला विचारले—"मला दरबारात कशासाठी बोलाविण्यात आले आहे?"

प्रवीणचा तो उद्धटपणा पाहून सर्व दरबारी आश्चर्यचकित झाले. प्रवीणच्या बापाचे पाय तर थरथर कापूच लागले.

राजाने शांतपणे म्हटले—"तू एक थोर पंडित असल्याचे मी ऐकले व तुझा सत्कार करावा म्हणून बोलाविले."

प्रवीण ते ऐकून मोठ्याने हसला.

राजाला ते आवडले नाही व त्याने विचारले—"कां रे असा हसतो आहेस?"

"आपल्या राज्यात प्रजा पोटभर अन्न मिळत नाही म्हणून तडफडून मरत आहे. आपले अधिकारी त्यांचे रक्त शोषण करीत आहेत. आपला खजिना प्रजेला लुटून आणलेल्या धनाने भरला आहे. एका अयोग्य असमर्थ राजाकडून लबाडून मिळ-



विलेल्या धनाने आपला सत्कार करून घ्यावा लागणार की काय, हा विचार करून मी हंसतो आहे?" प्रवीण म्हणाला.

"मूर्खा! तू शुद्धीवर आहेस का? तू कोणासमोर बोलतो आहेस, याची तुला कल्पना आहे का? त्याची कल्पना नसणारा पंडित कसा झाला व कसा म्हणवितो? तू म्हणतो आहेस तसा माझा राज्यकारभार बरोबर नसेल तर तू सरळ करून दाखविशील काय? तू लावलेले आरोप सिद्ध करून दाखव, नाही तर तुला क्रूर शिक्षा भोगावी लागेल." राजा म्हणाला.

प्रवीणने त्याचे काहीच उत्तर दिले नाही.



तेव्हां राजाने आज्ञा केली–"या मूर्खाला पन्नास फटके मारून राजधानीच्या बाहेर हाकलून द्या."

प्रवीणला ती शिक्षा भोगावी लागली व तो राजधानी बाहेर हाकलून दिल्यावर त्या असहाय स्थितीत पाय नेतील तिकडे चालू लागला. आतां त्याला आपल्या आयुष्याचा वीट आला. त्याने जे पांडित्य संपादन केले ते सर्व फुकट गेल्यासारखे त्याला वाटू लागले. म्हणून त्याने आत्म-हत्या करून घ्यायचे ठरविले.

जातांजातां तो एका स्मशानात येऊन पोचला. त्याला एक प्रेत जळत असलेले दिसले. या चितेत उडी घेऊन आपण आपले जीवित समाप्त करावे असे त्याला वाटले. तो त्या चितेजवळ चालत गेला. परंतु त्याच वेळी त्याला एक विचित्र दृश्य दिसले. चितेजवळच काही भुते काही तरी मंत्रतंत्र करीत असलेली दिसली. प्रवीण दूर उभा राहून ते सर्व पाहू लागला.

भुतांच्या घोळक्यात मध्यभागी माण-सांच्या दोन कवटी जमिनीवर जवळजवळ ठेवलेल्या होत्या. त्यांचे लग्न लावण्यात येत होते. त्या कवटींसमोर लग्नसमारंभाला लागणाऱ्या सर्व वस्तू ठेवलेल्या होत्या. काही भुते हाडांची सनई वाजवीत होती. काही भुते मातीची मडकी उपडी ठेवून त्यावर ताल देत होती आणि बाकी भुते त्या तालावर नाचत होती.

त्या भुतांना पाहून प्रवीणला फार आनंद झाला. माणसांपेक्षां या भुतांचे जीवित लाखपट चांगले आहे! तो चिते-जवळ आल्याबरोबर सर्व भुते जागच्या जागी एकदम थांबली. प्रवीण चितेत उडी मारण्याच्या बेतात होता.

दोन भुतांनी त्याला घट्ट धरून ठेवले व विचारले–"जीव द्यायचा प्रयत्न कशाला रे करतो आहेस?"

"मेल्यावर तुमच्यासारखे भूत व्हायला!" प्रवीण म्हणाला.

"वेड्या! मेलेली सर्वच माणसे भुते होतात असे वाटले होय तुला? मानव जन्म हा सर्वांत मोठा आहे. तू कां जीव द्यायला निघाला आहेस ते आधी सांग! तू सांगितलेली कारणे आम्हांला पटली तर आम्ही तुला अडविणार नाही." एक भूत म्हणाले.

"नको रे बाबा, हा मानव जन्म. त्याच्या इतका हीनकोटीचा जन्म दुसरा शक्यच नाही. कोणताही प्राणी आपल्या जातीच्या प्राण्याला खातो का? ते काम एकटा मनुष्य करतो. त्याला नीतीनियमांचे काही एक बंधन नाही. भिकारी पोटासाठी दुसऱ्याचा जीव घ्यायला मागेपुढे पहात नाही. व्यापारी लबाडी करण्यात चढाओढ लावतात. अधिकारी लाच घेऊन ती पचवितात. काही थोर लोक रक्ताचा व्यापार करतात; धर्मांचे डोळे फोडण्यात आले आहेत. न्यायाचे तोंड शिवून टाकण्यात आले आहे. विद्वान व पंडित आपले पांडित्य व विद्वत्ता विकून पैसे मिळवीत आहेत. गृहिणी आपले शील विकू लागल्या आहेत. म्हणून मी जिवाचा शेवट करून तुमच्यात सामील होण्याचे ठरविले आहे." प्रवीण म्हणाला.

भूत हसून म्हणाले–"अरे वेड्या! तू म्हणालास तसलेच लोक मेल्यावर भूत-



पिशाच्च योनीत प्रवेश करतात. तुझ्या-सारख्या नीतीधर्मांचे पालन करणाऱ्याला आमच्या जातीत प्रवेश मिळणेच शक्य नाही. आम्ही सर्वांनी जिवंत असतांना पापकर्मे केली म्हणून भूत योनीत प्रवेश केला. हा पहा, मिसळ खाद्यपदार्थ विकणारा व्यापारी होता हा, खोटे बोलून प्रजेला लुबाडणारा सरकारी अधिकारी होता. हा आहे वैद्य, चिकित्सा करवून घेणाऱ्यांकडून वाजवी पेक्षा जास्त पैसे घेऊन श्रीमंत झाला होता. याने खोटी औषधे दिली व त्यामुळे कित्येक रोगी मृत्युमुखी पडले. आम्ही सर्व पिशाच्च योनीत आल्यावर सारखे झालो. आमचा स्वार्थ सुटला. लबाडी लफ्फेगिरी संपली.



सर्व परस्परांची काळजी वाहतो आहों. ही पिशाच्च योनी सुखाची आहे. परंतु मेल्या-वरच आम्हांला हा बोध झाला."

"आपल्या फुटक्या नशिबामुळे मीसुद्धा कदाचित् पिशाच्च होईन. मलासुद्धा जीव देऊ द्या. माझ्या मनात तुमच्या-सारखं राहण्याची इच्छा आहे." प्रवीण म्हणाला.

भूत म्हणाले–"बाबा रे, तुला पिशाच्च कदापि होता येणार नाही. ह्या दोन्ही कवटी पहा. ही दोघं जिवंत असतांना कुलधर्मभेद पाळल्याशिवाय परस्परांवर प्रेम करू लागली. त्यांच्या लग्नाला त्यांच्या आईवडिलांनी अनुमती दिली नाही. म्हणून दोघं एका वैद्याकडून विष विकत घेऊन एकाच भांड्यात ओतून पिऊन मरण पावली. दोघांना एकाच खड्ड्यात पुरले. त्याना भुते होतां आलं नाही. पैशाच्या लोभाने यांना विष विकणारा वैद्य आजच मरण पावला. या चितेत त्याचेच प्रेत जळते आहे. मरण पावलेल्या प्रेमी जोडप्या-च्या कवटया बाहेर काढून त्यांचे लग्न लावून देतो आहो."

तुम्हां पिशाच्चांबरोबर राहणे साध्य झाले नाही तरी माझे मरण मात्र मी चुकवू देणार नाही. कारण मी या जिवंत पिशाच्चांबरोबर जगायला तयार नाही." असे म्हणत प्रवीणने चितेत धावत प्रवेश केला. तत्क्षण त्या चितेतून बाहेर आलेल्या भुताने प्रवीणला बाहेर ढकलला. ते पिशाच्च म्हणजे तो मेलेला वैद्य होता.

प्रवीणला भयंकर संताप आला. त्याने वैद्याला विचारले–"तू दोघांचा जीव घेणारा पापीच का? मला मरून देणारा आणि मध्येच थांबवणारा तू कोण रे?"

"बाबा रे! आतां माझ्या मनात तशी पापकल्पना येणेंच शक्य नाही. तू थोर विद्वान पंडित आहेस. आत्महत्या भित्रे लोक करतात. तू तरुण आहेस. योग्य व समर्थ आहेस. आपले जीवित चांगले व्हावे यासाठी प्रयत्न कर." वैद्य म्हणाला.

प्रवीणने बराच विचार करून विचारले–"मी आत्महत्या करण्याचा विचार सोडा-यला तयार आहे. तुम्ही सर्व पिशाच्चांनी मिळून मला एक मदत केली पाहिजे. करतां का?"

"सांग, तसे करायला आम्ही तयार आहों!" भुते म्हणाली.

"राजधानीत जी जिवंत भुते व पिशाच्चे आहेत त्या सर्वांना इकडे घेऊन या." प्रवीण म्हणाला.

लवकरच राजधानीतली थोर घराण्यात जन्मलेली अशी शेकडो माणसे स्मशानात हजर झाली. ते आपल्या चारी बाजूला जमलेल्या भुतांना पाहून थरथर कापत होती.

"तुम्ही सर्व प्रजेला त्रास देणारे समाज द्रोही आहां. होय की नाही?" प्रवीणने त्यांना विचारले.

त्यांनी तोंडे उघडली खरी, परंतु त्यांच्या तोंडावाटे एकही शब्द उमटला नाही. त्यांची बोबडी वळली होती.

"तुम्ही सर्व चला महाराजांसमोर! राजासमोर खोटे बोललात तर ही भुते तुम्हांला ओरबाडून खातील. तुम्ही केलेली सर्व पापकर्मं स्वतःच्या तोंडाने राजासमोर बोलून कबूल करा." या शब्दात सर्वांना धमकी देऊन प्रवीण पिशाच्चांना म्हणाला–"या सर्वांना दरबारात हजर करा."



दरबारात प्रवेश करताच राजाने समोर थोर घराण्यातली माणसे अपराध्यासारखी उभी राहून थरथर कापत असलेली पाहिली. त्याला तर आश्चर्यच वाटले.

त्यांना घेऊन येणारी भुते राजाला किंवा दरबारी मंडळींना दिसली नाहीत.

"तुम्ही महाराजांना फसवून प्रजेला कसे लुबाडीत आलात तो तुमचा स्वार्थी-पणा व लबाडी काय ते सर्व महाराजांसमोर सविस्तर सांगा." प्रवीण त्या जिवंत पिशाच्चांना म्हणाला.

प्रत्येकाच्या पाठीमागे भुते उभी होती. त्यांच्या भीतीने सर्वांनी आपापल्या पाप-कर्मांची खतावणी राजासमोर वाचून











दाखविली. त्या अयोग्य व असमर्थ राजाचे डोळे उघडले. त्याने त्या सर्वांना हद्दपारीची शिक्षा देऊन आपल्या राज्याबाहेर हाकलून लावले. त्यांच्या बरोबर प्रवीण देखील जाऊ लागला तेव्हां त्याला बोलवून राजा म्हणाला–"तू माझा अंतरंग मित्र म्हणून रहा आणि राज्यकारभार नीतीधर्मानुसार कसा चालविता येईल तो पहा." प्रवीण त्या गोष्टीस कबूल झाला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! पिशाच्च म्हणून राहणे शक्य नाही असे कळल्यावर ही आत्महत्या करण्यास तयार झालेला प्रवीण पिशाच्चांची मदत मिळतांच जीवित सुधारण्याच्या प्रयत्नास कसा काय तयार झाला? त्याचे पांडित्य व त्याचे काम यांचा परस्पर संबंध काय? त्याने उच्च अधिकारपद मिळविण्यासाठी पांडित्य कां सोडून दिले? या प्रश्नांची, उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस, तर तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"प्रवीणचे पांडित्य व वागणूक दोन्हींचा परस्पर घनिष्ट संबंध आहे. तो खरा पंडित होता. आपले पांडित्य विकणारा लबाड स्वार्थी नव्हता. पांडित्य समाजाच्या हितासाठी खर्च व्हावे ही इच्छा त्याच्या मनात होती. राज्यात घोटाळे असेपर्यंत पांडित्याचा उपयोग नव्हता. म्हणून तो आत्महत्या करावयास निघाला होता. ते घोटाळे कायमचे नाहीसे करायला आपले पांडित्य त्याला लुळे वाटले. त्यासाठी भुता पिशाच्चांची मदत उपयोगी होईल असे वाटल्यावर त्याने त्यांच्या मदतीने ते घोटाळे करणारे जे होते त्यांना शिक्षा करण्याचा प्रयत्न केला. तो राजाचा अंतरंग सल्लागार झाला तो आपले पांडित्य कसे उपयोगी पडते हे दाखवूनच. प्रवीणने कधी क्षणभरही आपले पांडित्य सोडले नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# बुद्धीची शक्ती

एका राजाच्या दोन राण्या होत्या. दोघींना मुले होती. मोठा हुशार होता. धाकटा थोडा मंदबुद्धी होता. रीतीप्रमाणे मोठा युवराज व्हायला पाहिजे. परंतु धाकट्या राणीने हट्ट केला की तिच्या मुलालाच युवराज केले पाहिजे.

राजाने दोघांची परीक्षा घ्यायचे ठरविले. त्यात जो पहिला येईल त्याला युवराज करण्याचे वचन दिले. त्याने दरबारात दोघांना विचारले–"देशातले हत्ती बैल झाले, बैल सामान्य जनावरे झाली. जनावरे कुत्री झाली, कुत्री मांजरे झाली आणि मांजरे उंदीर झाले तर ती स्थिती बदलून पुन्हा पूर्ववत् स्थिती व्हायला काय केले पाहिजे?"

धाकटा चट्दिशी म्हणाला–"मांत्रिकाला बोलावून मंत्र टाकविला पाहिजे!"

मोठा थोडा वेळ विचार करून म्हणाला–"किणग्या कोठारे भरून राहतील याची काळजी घ्यायला व्हावी; नद्यांचे पाणी व्यर्थ जाऊ नये याची काळजी बाळगली पाहिजे; तळ्यांतला चिखल काढून टाकला पाहिजे; पाण्याचा सांठा करण्याचा व त्याचा मितव्यय व्हावा यासाठी सर्व प्रयत्न केले पाहिजेत."

"या प्रश्नाचे हेच उत्तर आहे. दुष्काळाची परिस्थिती निर्माण झाली तरच मी म्हटले तसे होते. म्हणून थोरलाच युवराज होणार!" राजा म्हणाला.





# निरुत्तर पंडित

**पा**ंडय देशात हरिशंकर नांवाचा एक विद्वान पंडित रहात असे. तो दिग्विजयाला निघाला आणि अनेक देशात फिरुन त्याने तेथील विद्वान पंडितांचा शास्त्रार्थात पराभव केला व विजय पत्रे मिळविली. परंतु काशीच्या पंडितांचा पराभव केल्याशिवाय त्याची महत्वाकांक्षा पुरी होणे शक्य नाही, असे वाटून तो काशीला आला.

काशीच्या राजाने हरिशंकराच्या इच्छेप्रमाणे दरबारी पंडितांशी शास्त्रार्थ करण्यास परवानगी दिली.

काशीच्या दरबारात एकूणपन्नास विद्वान पंडित होते. त्यात गजकेसरी उपाध्याय नावाचा एक विद्वान पंडित होता. तो हरिशंकरला म्हणाला—"पांडित्यात शास्त्रार्थ करून एकाचा जय व दुसऱ्याचा पराजय करण्याची पद्धत आमच्याकडे नाही. पुराण व इतिहास लिहिणाऱ्या विद्वान पंडितांनी कधी कोणाशी शास्त्रार्थ केला नाही की कोणाला जिंकले नाही. एका विद्वानाने दुसऱ्याचा पराभव करणे म्हणजे त्याला दु:खी करण्यासारखे किंवा त्याचा अपमान करण्यासारखे आहे. कोणी किती विद्वान असला तरी त्याच्याहून थोर विद्वान असतोच. विद्वत्तेला सीमा किंवा मर्यादा असूच शकत नाही. त्यात कमी जास्त कोण आहे, हे संदर्भाने किंवा प्रसंगवशात कळून येते. परंतु त्यासाठी शास्त्रार्थ करून निर्णय द्यायची गरज आम्हांला कधी वाटली नाही."

आपले व्यक्तिमत्व पाहून व आपल्या प्रतिभेविषयी वर्णन ऐकून स्वारी टाळाटाळ करण्यासाठी बोलते आहे असे वाटून हरिशंकर म्हणाला—"सामर्थ्य नसले की काही पंडित असेच उत्तर देऊन मोकळे होतात! शास्त्रार्थ करणे तुम्हांला इष्ट नसेल तर मी जिंकल्याचे कबूल करून विजयपत्र लिहून द्या."

ते ऐकून एक तरुण पंडित म्हणाला—"त्यांच्या मनाचे समाधान करून देण्यासाठी मी त्यांच्याशी शास्त्रार्थ करायला तयार आहे. मी अद्याप विद्यार्थी दशेतच असल्या कारणाने मी हारलो तर त्यात मला अपमान वाटण्यासारखे काहीच नाही. त्यांचा जय झाला तर तो मी मान्य करीन. त्यांना विजयपत्र घेऊन जाऊ द्या. त्यांनी मला प्रथम तीन प्रश्न विचारावे. नंतर मी त्यांना तीन प्रश्न विचारीन."

राजाने ते मान्य केले.

तेव्हां हरिशंकरने पहिला प्रश्न विचारला—"या जगाहून मोठे काय?

"हे पहा, आकाश!" तो तरुण पंडित म्हणाला.

त्याच्या प्रश्नाचे बरोबर उत्तर वेदांत अर्थाप्रमाणे ब्रह्म होते; भौतिक अर्थे आशा होते, असे हरिशंकरचे मत होते. परंतु तरुण पंडिताने दिलेले उत्तर त्या प्रश्नाचे उत्तर नाही, असे म्हणतां येईना. म्हणून हरिशंकरने दुसरा प्रश्न विचारला—"माणसाने मोठे होण्यासाठी काय केले पाहिजे?"

"मनात विचार करून शब्दात व्यक्त केले पाहिजे." तरुण पंडित म्हणाला.

ते उत्तर बरोबर नाही, असे म्हणतां आले नाही, म्हणून हरिशंकरने तिसरा प्रश्न विचारला—"सर्व कळावे असे वाटत असल्यास काय केले पाहिजे?"










"आपली दृष्टी असेल आणि सूर्यप्रकाश स्वच्छ असेल तर सर्व कळेल." तरुण पंडित म्हणाला.

हरिशंकर ते उत्तर ऐकून ते उत्तरदेखील बरोबर नाही, असे म्हणू शकला नाही. तरी तो म्हणाला–"तू तर अगदी सरळ असे उत्तर दिलेस की! त्यात तुझे पांडित्य प्रगट झाले नाही."

"होय! मी लहान आहे. मी आपल्या बुद्धीप्रमाणे उत्तर दिले. चूक असेल तर त्याचे खंडन करा की!" तरुण पंडित म्हणाला.

"ते सोड. तू मला विचारायचे ते प्रश्न विचार." हरिशंकर म्हणाला.

तरुण पंडिताने विचारले–"तुम्ही कोठून आलात?"

काय उत्तर द्यावे, हे हरिशंकरला कळेना. तात्विक दृष्टचा त्या प्रश्नाचे उत्तर "माहीत नाही!" हे होते. तो कोणत्या गावाहून आला ते त्या तरुण पंडिताला माहीत होते. तेव्हां ते उत्तर देण्यात काही अर्थ नव्हता. म्हणून हरिशंकर म्हणाला–"तूच सांग!"

"सर्व लोक या मृत्युलोकांत जिकडून येतात, तुम्ही तिकडूनच आलात." असे उत्तर सांगून त्याने दुसरा प्रश्न विचारला–"तुम्ही कोठे जाणार?"

त्याचे देखील तात्विक दृष्टचा उत्तर "माहीत नाही!" हेच होते.

परंतु हरिशंकर म्हणाला–"तूच सांग!"

"तुम्ही दिग्विजय करण्याचा विचार सोडून आपल्याच देशात परत जाणार!" हे उत्तर सांगून त्याने तिसरा प्रश्न विचारला–"तुम्ही इकडे काय घेऊन आलात आणि काय घेऊन चालला?"

हरिशंकर म्हणाला–"मी या प्रश्नाचे उत्तर देऊ शकेन. मी आपला 'अहंकार' घेऊन आलो होतो. त्याचा भार येथे फेकून देऊन विवेक घेऊन जातो आहे!"

असे म्हणत हरिशंकरने तरुण पंडिताला शाबासकी देऊन त्याला आशीर्वाद दिला.





# १५८. प्राचीन काळातील मद्यपात्रे

भूमध्य समुद्रात सुमारे २१०० वर्षां पूर्वी एक जहाज बुडाले. संशोधकांनी त्याचा शोध काढून पाहिला तर त्यात बाहुल्यांच्या आकृतीत सहस्रावधी मद्यपात्रे सांपडली. त्यांच्या बरोबर अनेक आश्चर्यचकित करून सोडणाऱ्या प्राचीन काळातील वस्तू सापडल्या. ही ग्रीक व रोमन सभ्यतेची आहेत.












# देव अवतरला

एके काळी विदर्भ देशात महेंद्र नावाचा एक जादुगार रहात असे. तो राजा महाराजांच्या दरबारात आपले प्रयोग करून पुष्कळ पैसे मिळवी. त्याने अनेक थोर पदव्यादेखील संपादन केल्या होत्या. परंतु तो कर्णासारखा दानी असल्या करणाने त्याने संपादन केलेले सर्व धन व संपत्ती संपुष्टात आली.

महेंद्राचा मुलगा जितेंद्र इंद्रजाल विद्येत 'बापसे बेटा सवाई' निघाला. परंतु काल पालटला होता आणि लोकांचा इंद्रजाल विद्येवरचा विश्वास कमी होत गेला होता. त्यामुळे प्राप्ती कमी होत होती आणि जितेन्द्र बापासारखाच उदार असल्या कारणाने गरीबी आली.

जितेंद्राला दोघे मुलगे होते. त्याने आपल्या दोघां मुलांना इंद्रजाल विद्या शिकविली. एक तर ती विद्या त्याच्या घरात पिढ्यान् पिढ्या चालून आली होती. याशिवाय पुढेमागे पुन्हां इंद्रजाल विद्येचा पुनरुद्धार होण्याची त्याला आशा होती म्हणून त्याने आपल्या मुलांना दुसरा काम-धंदा काहीच शिकविला नाही, फक्त इंद्रजाल विद्याच शिकविली.

जितेंद्राचा मोठा मुलगा रामू हा स्वभावाने थोडा खर्चीक होता. लहानपणी त्याला त्याचा बाप मागेल तेव्हां पैसे देत असे. परंतु परिस्थिती बदलल्याची गोष्ट त्याच्या डोक्यात कधी शिरलीच नाही. म्हणून मागितल्याबरोबर बापाने पैसे द्यायचे बंद केले तेव्हां त्याने घरातच चोरी करायला सुरवात केली. ते कळल्यावर जितेंद्राने रामूला खूप झोडपून काढले इतके की शेवटी बापावर रागावून घरातून निघून गेला आणि घरी परतलाच नाही. बापाने मुलाला रागात मारले होते खरे, परंतु रामू म्हणजे आईला जीव की प्राण वाटे. म्हणून तिने व तिच्या बरोबर रामूच्या बापाने दोघांनी ती गोष्ट मनाला फार लावून घेतली. त्यांनी अंथरूण धरले व दोघे मुलाच्या नावाचा जप करीत जगाचा निरोप घेऊन निघून गेले. म्हणून जितेंद्राचा धाकटा मुलगा चंद्रू पोरका झाला.

परंतु चंद्रू खंबीर मनाचा होता, घाबरला तो गावोगाव फिरून जादूचे प्रयोग रस्त्यावर करी आणि जी थोडी मिळकत होई त्यावर आपला उदर निर्वाह चालवी. तेवढ्यावर समाधान मानून तो दिवस काढीत होता.

एकदा तो एका गावातल्या रस्त्यावर जादूचे प्रयोग करीत होता. ते पाहण्यासाठी बरीच मुले जमा झाली. त्यांच्याकडून पैसे मिळणार नाहीत हे माहीत असूनही त्याने जादूचे प्रयोग केले व मुलांना खूष केले.

इतक्यात शेजारच्या घरात एका लहान मुलाचे रडणे ऐकू आले. चंद्रूने आपले जादूचे प्रयोग थांबवून त्या घरी जाऊन चवकशी केली तेव्हां त्याला कळले की एक बाई आपल्या चार वर्षे वयाच्या मुलाला मारीत होती.

मुलाच्या बापाला कसला तरी मोठा आजार होता. तिने नवऱ्यासाठी नवस केला होता की नवऱ्याला बरे वाटेपर्यंत



दुपार पावेतो उपास करून देवाचे दर्शन करावयाचे व त्यानंतर जेवायचे आणि देवाच्या कृपेने तिच्या नवऱ्याचा आजार बरा होत आला होता. कसे तरी सहा दिवस लोटले होते. सातव्या दिवशी मुलाला दुपारपर्यंत उपाशी राहणे अशक्य वाटू लागले. त्याचा जीव भुकेने कसावीस झाला होता, म्हणून तो रडत होता. तिला देव-दर्शनाला जायचे होते. तिने पुष्कळ सांगून समजावून पाहिले, परंतु मुलगा ऐकेच ना, म्हणून ती त्याला मारीत होती.

मुलाला इतका वेळ उपाशी ठेवणे बरो-बर नाही आणि त्यावर त्याबद्दल त्याला मारणे फारच वाईट, असे चंद्रूला वाटले.



तो तिला नम्रपणे म्हणाला–"आई! लहान मुलात देवाचा वास असतो. त्यांचे मन निर्मूल निष्कलंक असते. या लहान मुलात जो देव आहे त्याला तुम्ही ओळखले नाहीत आणि आणखी कोणत्या देवाच्या दर्शनाला जाता आहां, हे नाही मला कळले कृपा करून सांगाल का?"

ती चिडल्यासारखी होऊन म्हणाली–"तुझे माथे फिरले आहे. तू माथे फिरू आहेस म्हणूनच तुझी ही दशा झाली आहे. तुला याच्यात देव दिसतो आहे तर तू या देवाला काही वेळ पहात रहा. मी देव दर्शन करून येते आणि याच्या बरोबर

चंदूने ते मान्य केले आणि मुलाला गोड गोड बोलून व लहानलहान जादूचे प्रयोग करून रंजवले. तो भूक तहान विसरला. त्या बाईने परत आल्यावर मुलाला व चंदूला जेवायला वाढले.

जेवण झाल्यावर चंदूने त्या बाईला विचारले–"आई! तुम्ही म्हणालात तो देव कोठे आहे हो? मीसुद्धां त्याचे दर्शन घ्यावे म्हणतो!"

ती थोडी हसून म्हणाली–"देव म्हणजे सामान्य देव वाटला का तुला? अरे प्रत्यक्ष देवाचा अवतार आहे तो. तो आपल्याशी बोलतो. आपल्या प्रश्नांची उत्तरे देतो. तुझ्यावर त्याची कृपादृष्टी झाली तर तुझे सर्व दुःख दूर होईल."

चंदूचे कुतूहल जास्तच वाढले. तो तिने सांगतलेल्या जागी गेला. तेथे लोकांची फार मोठी गर्दी होती. एका उच्च आसनावर दाढी मिशा असलेला एक साधू बसलेला होता. तो लोकांना सदाचारी व्हायला सांगत होता. जो कोणी संकटात असेल त्याने त्याच्याजवळ खुशाल यावे. गोर गरिबांचे कष्टी लोकांचे दुःख व कष्ट दूर करण्यासाठी त्याने अवतार घेतला असल्याचे तो सांगत होता. मधूनमधून तो हवेतून भस्म काढून लोकांवर टाकीत होता.

काहीक्षण रहात होता. या काही विचित्र अविश्वसनीय वाटणाऱ्या गोष्टी तो दाखवीत असतां लोक "हे परमात्मा!" म्हणून घोष करीत होते.

चंदूला हे सर्व विचित्र वाटू लागले. तो साधू करीत होता ते सर्व त्याला करतां येत होते. परंतु तो एक सामान्य गारुडी किंवा फार तर जादुगारच राहिला, परंतु हा साधू देव झाला. हे काय गुपित आहे हे कळावे म्हणून चंदू दिवसभर वाट पहात राहिला. मध्यरात्रीच्या सुमारास भक्त लोक निघून गेल्यावर चंदू साधूला भेटला.

"कोण रे तू?" साधूने त्याला विचारले आणि कुतूहलपूर्वक त्याच्याकडे पाहू लागला.

"मी एक जादुगार आहे. तुम्ही आपली जादूची शक्ती दाखविली ती मी पाहिली. परंतु ती तुमची दैवी शक्ती होती असे लोक म्हणत होते. परंतु हेच जादूचे प्रयोग मी करतो, परंतु मला पोटापुरते खायला प्यायलासुद्धा मिळत नाही. लोक तुम्हांला देवाचा अवतार मानतात. हे कसं काय हे विचारायला मी तुमच्याकडे आलो आहे." चंदू म्हणाला. त्याने त्या साधूला त्या अविश्वसनीय गोष्टी करून दाखविल्या.



"यांत गुपित असे काही नाही. मी देवाचा अवतार आहे. मला ही विद्या सहज अवगत आहे. तू ती विद्या कष्ट करून शिकला आहेस. तुला साधन सामुग्रीची गरज आहे. मला त्या सर्वांची गरज नाही." साधू म्हणाला.

"अस्सं! तरमग मी आपले बोट कापतो. तुम्ही ते पुन्हां जोडून दाखवितां का?" चंदूने विचारले.

साधूने होकार दिला. लगेच चंदूने आपल्या लहानशा सुरीने बोट कापून घेतले आणि लालभडक रक्त वाहू लागले. साधूने कापलेले बोट यथास्थानी ठेवून काही तरी मंत्र म्हटला. रक्त नाहीसे झाले व बोट जसे होते तसे झाले.








"अशक्य! ही विद्या आमच्या कुटुंबियां-शिवाय आणखी कोणाला माहीत नाही!" चंदू गुणगुणला.

साधू दचकून म्हणाला—"काय रे, तू चंदूच का?"

"होय, तुम्हांला ते कसे कळले?" चंदूने विचारले.

"मी तुझा भाऊ रामू आहे." साधू चंदूकडे अत्यंत प्रेमाने पहात म्हणाला.

चंदू चकित होऊन साधूकडे पाहू लागला. आनंदातिरेकाने त्याच्या तोंडावाटे एक शब्दही निघाला नाही.

चंदू साधूला पुढे म्हणाला—"मघां तू विचारलेल्या प्रश्नाचे बरोबर उत्तर सांगतो. हे जग म्हणजे एक माया आहे. तू एका मुलाला जादू दाखवून त्याची भूकतहान विसरायला लावलेस. तो लहान मुलगा तुझ्यात देव आहे का पहात असणार. मोठ्यांची गोष्ट तशी नाही. मी स्वतः देव आहे असे सांगून इंद्रजाल करून देव झालो. तू गारुडी किंवा जादुगार होऊन जादूचे प्रयोग करून गारुडी किंवा जादुगार म्हणून राहलास. लोक माझी जादू व तुझे जादूचे प्रयोग पाहतात. परंतु त्यांना शंका संशय काही वाटत नाही. जगात आनंदात सौख्यात रहावयाचे असेल तर विद्या येऊन पुरत नाही. गप्पा मारून लोकांना भुरळ पाडता आली तरच तुझ्या विद्येचे पूर्ण माप तुझ्या पदरात पडेल. मी तेच केले. 'देव आहे' म्हणून मी खोटे बोललो त्याचा हा फायदा झाला. लोक भोळे भाबडे आहेत तोंपर्यंत मला कोणत्याही गोष्टीची उणीव भासणार नाही. तुझी शंका मिटलीना आता? तर मग ये!"

चंदू निघून गेला. नंतर तो कोठे गेला, त्याचे काय झाले, कोणास काही माहीत नाही. परंतु विदर्भ देशात पूर्वेकडील भागात एका कोपऱ्यातल्या गावी देवाचा अवतार झाला असल्याचे व तो अनेक दिव्य चमत्कार करीत असल्याचे ऐकून लोकांची गर्दी त्याच्या दर्शनासाठी होत असल्याचे ऐकू येऊ लागले.



# चोर दरवाजा

एका राजाला दोन मुलगे होते. मोठा शूर व पराक्रमी होता. धाकटा भितरा व हट्टी होता. एकदां धाकटा बापाला विचारू लागला—"मोठमोठ्या राजवाड्यात व किल्ल्यात चोर दरवाजे असतात म्हणे. आपल्या राजवाड्यात सुद्धां आहेत का?" बापाने पुष्कळ असल्याचे सांगितले. मुलगा ते पहावयाचे असल्याचे सांगू लागला.

"ते माझ्याशिवाय आणखी प्रधानांशिवाय आणखी कोणाला कळतां कामा नयेत. पण तुला आतां त्यांची गरज कां वाटली?" बापाने विचारले.

"समजा, शत्रूने स्वारी केली आणि कोणाचे सहाय्य मला मिळत नाहीसे वाटले तर माहीत असलेले बरे, म्हणून विचारले." मुलगा म्हणाला.

राजा लगेच उठला आणि त्याने मुलाला एका दरवाज्याजवळ नेऊन दार उघडून पलीकडे असलेला जिना दाखविला. मुलगा जिना उतरून वाट पाहून यायला निघाला. राजाने लगेच दरवाजा आतून बंद करून घेतला.

काही वेळाने राजाच्या मुलाने परत येऊन दार खडखडवून पाहिले.

राजा दार न उघडता आतून म्हणाला—"तुझ्यासारख्या भित्र्याने किल्ल्यात असतां कामा नये. या मार्गाने गेलास तर दुसऱ्या राजाच्या राज्यात जाऊन पोचशील. आतां यापुढे तेथेच जाऊन रहा. आपले तोंड मला पुन्हां दाखवू नकोस."





# राजाची तीर्थयात्रा

अंग राजा एक थोर राजपुरुष होऊन गेला. पराक्रम व शौर्य यांजबरोबर न्याय युक्त कारभार व दया, औदार्य आदिक राजोचित प्रसिद्ध गुणांमुळे तो लोकप्रिय राजा होता. एकदां त्याच्या राज्यात कॉलऱ्याची साथ आली आणि राणी व एकुलता एक मुलगा कॉलऱ्याच्या आजाराला बळी पडले. तो दारुण शोक असह्य झाल्याने राजाचे मन या जगापासून विटले. तेव्हां त्याच्या मंत्र्यांनी व राजगुरुने त्याला तीर्थयात्रा केल्याने दु:ख ओसरेल असा सल्ला दिला.

अंग राजा त्या गोष्टीस कबूल झाला. परंतु मंत्री त्याच्या तीर्थयात्रेसाठी मेणे, दासदासी इत्यादी तयार करू लागले ते त्याला मान्य नव्हते.

"मी एकटा प्रवासाला जाणार आहे. हा राजसी थाट मला नको आहे. त्याची गरज नाही." तो म्हणाला.

"आपण राजाला शोभेल अशा तयारीनं गेला नाहीत तर कसे चालेल? या शिवाय आपण येईपर्यंत आमचे रक्षण कोण करणार? गादी रिकामी असतां कामा नये. राजा नाही तर कारभार कसा काय चालणार?" मंत्र्यांनी त्याला विचारले.

"मी परत येईपर्यंत माझा धाकटा भाऊ संग तुमचा राजा म्हणून राहील. मी माझ्या गैरहजेरीत राजा म्हणून त्याची नेमणूक करीत आहे." अंग राजा म्हणाला.

ते ऐकून सर्वांची तोंडे उतरली. राजाने ते ओळखले परंतु राजाने त्या गोष्टीकडे दुर्लक्ष केले. त्याने तीर्थयात्रेसाठी त्याला योग्य वाटला तो पोशाख केला आणि एक मोठी काठी हातात घेऊन सामान्य यात्रेकऱ्यासारखा पायींच निघाला.

संग स्वभावाने कुटिल व दुष्ट होता आणि क्रूरपण होता. त्याला कोणते व्यसन नाही असे नव्हतेच. या व्यतिरिक्त त्याला अधिकाराचा मद होता. राज्याच्या सर्व अधिकाऱ्यांनी राजाच्या तोंडावर ती गोष्ट सांगितली नाही.

संग राजाने सिंहासनावर बसताच सर्व जुन्या मंत्र्यांना काढून टाकले. अंग राजाचे जे विश्वासपात्र होते त्यांना कोणत्याही अधिकार पदावर राहू दिले नाही. त्यांच्या जागी त्याने आपल्या विश्वासपात्र लोकांना नेमून त्यांच्या करवी पीडनाला सुरवात केली. अत्याचाराचे नग्न नृत्य चहूकडे चालू असतां प्रजेत हाहा:कार उडाला. त्याचे अधिकारी वाटेल त्या घरात शिरून कोठे पुष्कळ धन आहे, कोठे सुंदर सुंदर स्त्रिया आहेत हे जाऊन संगला सांगत आणि संग न्यायनीती डोक्याला गुंडाळून ते धन व त्याला वाटेल त्या स्त्रीला उचलून घेऊन जाई. देशातल्या मूल्यवानवस्तू परदेशात पाठवून तो परदेशातली दारू मागवी. कारभार वाढल्याने प्रजा घाबरून देश सोडून जाऊ लागली. देशावर ज्यांची भक्ती होती ते मात्र देश सोडून गेले नाहीत. परंतु त्यांना मन:शांती किंवा सुरक्षितता संगच्या राज्यात मिळण्याची आशा राहिली नाही. सुपीक जमिनी पडीत



राहू लागल्या. सोने देशातून परदेशात जाऊ लागले आणि धान्य मागवावे लागू लागले. विलासाच्या वस्तू बाहेरून मागविण्यासाठी जीवनावश्यक वस्तूंची निर्यात होऊ लागली.

संगच्या सल्लागारात परदेशीच जास्त होते. लवकरच त्यांनी अलोट संपत्ती मिळविली. त्यांनी निष्ठूरपणे प्रजेशी वागण्यास आणि जास्तजास्त भोगविलासात संग बुडून जाण्यास आवश्यक ती सर्व कामे केली.

ते त्याला सांगत, "तू चक्रवर्ती आहेस. सर्व भोग भोगण्यास तुला अधिकार आहे. कोणाला भिण्याचे कारणच काय?"



तो म्हणे–“मी तर राजाचा प्रतिनिधी आहे. खरा राजा माझा मोठा भाऊ अंग आहे, नाही का ?”

“महाराज, आपण इतका भावडेपणा दाखवून कसे चालेल ? आपण राज्याभिषेक करून घ्यावा, म्हणजे आपल्या हातात सर्व अधिकार येईल. नंतर आपल्याला वाटेल ते करतां येईल. कायदा करण्याचा व त्याचे पालन करण्याचा अधिकार आपल्याला मिळेल. वाटल्यास आपल्या वडील बंधूंना मृत्यूदंडसुद्धां देतां येईल.” त्यांनी त्याचे कान भरले.

ते ऐकून संगने कानात बोटे घातली आणि थरथर कापू लागला. म्हणाला– “नाही, नाही! ते काम माझ्या हातून होणार नाही.”

“हा भितरेपणा आहे ! असले मानसिक दौर्बल्य राजपुरुषाला शोभत नाही. जरा विचार करा, अंग परत आल्याबरोबर तुमचे हे सर्व वैभव हातातले निघून जाईल. तुमच्याकडे ढूंकून पाहणारा सुद्धां भेटणार नाही. अधिकार राहणार नाही. तुम्हांला आपली इच्छा म्हणून राहणार नाही. हे सुख सोडून आणि नंतर सर्व कष्ट सोसायला लागतील. तो विचार न करतां तुम्ही भावाचे प्रेम जास्त मानतां का ?”

संग डोके खाजवीत म्हणाला–“तुम्ही काय बरे वाटेल ते करा.” असे सांगून सिंहासनावरून खाली उतरला.

अंग राजाचा वध करावा असा हुकूम जाहीर झाला.

जुने पंतप्रधान रघुपती हजार डोळयांनी घडलेल्या सर्व गोष्टी पहात होते. त्यांना हे सर्व कारस्थान कळल्याशिवाय राहले नाही. त्यांनी आपल्या शिकविलेल्या कबूतरांकरवी या सर्व गोष्टी महाराजांना कळविल्या. ते कळल्यावर अंग महाराज फक्त हसले.

तीर्थयात्रेमुळे महाराजांच्या मनाला चांगलाच विरंगळा झाला आणि मन बरेच हलके झाले. पुन्हां जगण्याची इच्छा मनात उपजली. आतां स्वदेशाविषयी त्यांच्या मनात प्रेम वाढत गेल्याचे भासू लागले. प्रजेविषयी प्रेम होतेच, इतक्या दिवसांच्या अंतराने ते अधिक वाढले. स्वदेशी परतावे असे त्यांना वाटू लागले. ती गोष्ट मनात आली नेमकी तेव्हांच कबूतरांकरवी राज्यात होत असलेल्या कारस्थानाची बातमी त्यांना कळली. कबूतरांकरवीच त्यांनी आपल्या प्रधानाशी पत्रव्यवहार केला. संगच्या सर्व कारवाया त्यांना चांगल्या कळल्या.

ऊन, वारा, थंडी, पाऊस सहन करावा लागल्याने राजाच्या देहात व चेहऱ्यात पुष्कळ बदल झाला. रंग थोडा काळवंडला. दाढी मिशा वाढल्या. डोक्यावरचे लांब लांब केस जटा पडल्यामुळे आणि धुळीत माखल्याने विचित्रच दिसत होते. डाव्या बाजूच्या काखेत एक मोठा तांबडा तीळ होता त्यावरूनच त्याची खूण पटणे शक्य होते.

मध्यंतरी संगच्या अनुयायांपैकी कोणालाच अंग राजाचा थांगपत्ता लागला नाही. एका उत्साही तरुण अनुयायाने एक पुरलेले मढे उकरून त्याचे मुंडके कापून आणून संगला दरबारात आणून दाखविले आणि ते अंग राजाचे असल्याचे सांगितले. मुंडके पाहून ते कोणाचे आहे हे ओळखणे शक्य नव्हते. म्हणून संगला त्याचे म्हणणे खरे वाटले व त्याने त्याला मोठे बक्षीसही दिले. आतां त्याचा राज्याभिषेक होण्यास कोणी आडवा येणे शक्य नाही, असे त्याच्या





नव्या मंत्र्याने त्याला सांगितले. संग ते ऐकून खूष झाला.

संगच्या राज्याभिषेकासाठी तयारी सुरू झाली.

त्या देशाच्या रीतीप्रमाणे राज्याभिषेक समयी एक संस्कार एकांतात होत असे. त्यावेळी दरबारी इंद्रजाल करणारा मांत्रिक प्रमुख हजर रहात असे. या इंद्रजालिकाचे कुटुंब अंग राजाच्या घराण्याचे राज्य सुरू झाले तेव्हांपासून दरबारात होते. हा संस्कार राजवाड्यातच एका आंतल्या एकांत-जागी होत असे. तेथे सिंहासन असे व तेथे तो संस्कार होई. त्या वेळी सिंहासनावर बसतांना एक विशिष्ट झेंडा हातात घेऊन राजाला सिंहासनावर बसावे लागे. इंद्रजाल विद्येचे प्रयोग संपल्यावर राजा सहा प्रमुख नागरिकांसमक्ष अत्यंत प्राचीन काळातला तो रेशमाचा झेंडा हातात घेऊन सिंहासनावर बसत असे. हाच तो गुप्त संस्कार असे.

परंतु तो जुना प्राचीन काळचा झेंडा कोठे दिसेना. म्हणून अगदी तसाच नवा झेंडा तयार करविण्यात आला. इंद्रजाल विद्येत निष्णात असा संपत हा त्या कुळातला मोठा होता. तेव्हा त्याचे वय सत्तर वर्षांचे होते. इंद्रजालिकाचे घराणे पिढ्यान् पिढ्या राजभक्त म्हणून प्रसिद्ध होते. म्हणून अंग राजाविषयी त्यांच्या मनात कितीही भक्ती असली तरी संग राजाच्या मनात विश्वास उत्पन्न होण्यासाठी तो त्याच्याशी आपली वरकरणी भक्ती दर्शवीत असे.

उद्यां राज्याभिषेक आहे. अंग राजाने एक तीर्थयात्रेकरू म्हणून राजधानीत प्रवेश केला. राजधानीतल्या देवळात अनेक तीर्थयात्री येत. त्यांच्याबरोबर प्रवेश करून कबूतराकरवी ठरलेल्या योजनेप्रमाणे तो आला आणि रात्री संपतच्या घरी राहला.

गुप्तपणे होणाऱ्या त्या संस्कार प्रसंगी संपतने जाताना बरोबर अंग महाराजाला आणि रघुपतीजवळ गुप्तपणे ठेवलेला झेंडा घेऊन जायचे ठरविले. अंग महाराजांना गुप्तपणे संपत व रघुपती भेटले तेव्हां ओळखू शकले नाहीत. महाराजांनी काही अत्यंत गुप्त अशा गोष्टींची आठवण करून देऊन आपल्या काखेतला खुणेचा तीळ दाखविल्यावरच दोघांनाही त्यांची ओळख पटली.

संपत म्हणाला—"महाराजांना कोणी ओळखू शकणार नाही याची मला खात्री झाली आहे. तेव्हां मला माझ्या युक्तीत नक्कीच यश मिळणार. रघुपती! आपल्या बाजूनं प्रजा आहेच. संकेत मिळताच प्रजेनं हल्ला केला पाहिजे याची व्यवस्था तू करून ठेव."

"अरे ठिणगी पडल्याबरोबर स्फोट होतो तशी प्रजा चालून आली नाहीतर मी आपले नाव बदलून टाकीन. पण तू हा झेंडा कसा काय आत नेणार? राजवाड्यात कडक पाहरा आहे आणि प्रत्येकाची झडती कडकपणाने घेतली जात आहे." रघुपतीने सावध राहण्यासाठी म्हटले.

"मी आपल्याबरोबर एक मदतनीस नेण्यासाठी परवानगी घेऊन ठेवली आहे. मी महाराजांनाच मदतनीस म्हणून नेणार आहे. मलादेखील अशाच लांब मिशा व दाढी आहे. म्हणून आमची दोघांची जोडी जमून येईल. आम्ही बरोबर जे सामान घेऊन जाऊ त्याची झडती होईल हे मला माहीत आहे. तरी देवाची कृपा असेल तर



त्यांची नजर चुकवून झेंडा आत पोचेल. या झेंड्याहून थोडे मोठे दोन कागद घेऊन त्यांच्या मधोमध तो झेंडा चांगली इस्तरी करून ठेवायचा, म्हणजे चुण्या पडणार नाहीत. दोन्ही कागदांच्या कडा चांगल्या चिकटवून घ्यायच्या. इतर सामानाबरोबर झेंडा कोणाला कळायचा नाही." संपत म्हणाला.

देवाच्या कृपेने सर्व ठीकच झाले. कागदांमध्ये ठेवलेला झेंडा कोणाच्या नजरेस आला नाही. त्या गुप्त समारंभाला दोघे इंद्रजालिक, माजीप्रधान रघुपती आणि यांच्याशिवाय माजी रक्षण मंत्री रणधीर आणि संगचे चौघे मंत्री हजर होते. रुढी

     

प्रमाणे सर्वांनी निःशस्त्रपणेच आत प्रवेश केला होता. सिंहासनाच्या मागे भिंतीला दोन तलवारी फुलीसारख्या ठेवून वर ढाल टांगून ठेवली होती. राज्याभिषेक संस्कार प्रसंगी ती एक आवश्यक रूढी म्हणून मानली जात असे.

राजपुरोहित संगला आत घेऊन आला आणि दार बंद करून त्याने कडी लावून घेतली. त्याने काही मंत्र म्हणून इंद्रजालिक संपतला प्रयोग सुरू करण्यास आज्ञा केली.

संपतने झेंडा लपविलेला कागद उचलला आणि तो दोन्ही बाजूंनी फिरवून सर्वांना दाखविला व एका सुरळीसारखा गुंडाळला. त्याचा मदतनीस म्हणून आलेल्या अंग राजाने भिंतीला अडकवलेली एक तलवार घेऊन तिचे टोक त्या सुरळीत खुपसले आणि जरासे इकडून तिकडे फिरविले. नंतर तलवारीने झेंडा वर उचलून उभा राहिला. तो जुना झेंडा पाहून सर्व आश्चर्य चकित झाले.

नंतर इंद्रजालिकाचा मदतनीस सिंहासनाजवळ जाऊन तो स्वतः सिंहासन बसला. त्याने तलवारीचे टोक संगकडे वळवून विचारले–"संगा! माझा आवाज तुला नक्कीच ओळखेल. तुला स्वतःचे क्षेम कुशल हवे असेल तर शरण माग. नाहीतर तुझा या क्षणी शेवट निश्चित समज."

संगने आपल्या थोरल्या भावाचे पाय धरले. संपतने भिंतीवरची दुसरी तलवार काढून घेऊन पुरोहिताच्या तबकातला शंख घेऊन जोराने फुंकला. बाहेर वाट पहात असलेल्या प्रजेला तीच खूण होती. अंग महाराजांचे विश्वासपात्र शिपाई व राजवाड्यातले रक्षक प्रजेला घेऊन आत शिरले. प्रजेचा हल्ला होताच रघुपतीने कडी काढून दार उघडले.

"अंग महाराजांचा जयजयकार असो!" असा जयघोष करीत प्रजेने महाराजांना आपल्या खांद्यावर बसवून दरबारात नेले आणि सिंहासनावर बसविले. संग व त्याच्या अनुयायांच्या हातात बेड्या पडल्या. ते मागे सरकले आणि सशस्त्र शिपायांनी त्यांना आपल्या ताब्यात घेतले.



# न्याययुक्त वांटणी

एका शेतकऱ्याला दोघे मुलगे होते. थोरला हुशार होता व धाकटा थोडा भोळा होता. शेतकरी मरणापूर्वी गांव प्रमुखांसमक्ष मुलांना बोलावून म्हणाला–"थोरल्याने माझी जी जमीन आहे तिचा, चारी बाजूंनी माप घेऊन तीन हजार वार होईल एवढा भाग घ्यावा आणि बाकी धाकट्याला द्यावा. परंतु वांटणी न्यायाधिशासमोर व्हावी."

बाप मरण पावल्यावर मोठ्याने शेत चारी बाजूने मापले. ते बरोबर तीन हजार वार निघाले. तो धाकट्याला म्हणाला–"बाबांनी मला जेवढी जमीन सांगितली होती तेवढी मी घेतली. बाकी उरलीच नाही. त्याला मी काय करू?"

धाकटा ते ऐकून काय बोलणार? परंतु त्यात त्याला अन्याय वाटला. तो न्यायाधिशाकडे गेला आणि न्याय करायला विनंती केली.

न्यायाधीश दोघां भावांना घेऊन शेतावर गेला आणि शेत चारी बाजूंनी मापले आणि ते बरोबर तीन हजार वार असल्याची खात्री करून घेतली. नंतर त्याने त्या जमिनीच्या मधोमध एक रेघ उभी काढली आणि एक आडवी काढून चार भाग पाडले आणि विरुद्ध कोपऱ्यातले दोन भाग मोठ्याला निवडून घ्यायला सांगून बाकी दोन धाकट्याला दिले. दोघांच्या शेताचे माप चारी बाजूंनी घेतले तेव्हां तीन हजार वारच आले.





















# रामाचा विवाहोत्सव

एका गावी. एक जुने रामाचे देऊळ होते. रामशास्त्री त्या देवळात पुजारी होते. त्या गावात कोणी मेला तर तीन दिवस त्या देवळात पुजा होत नसे आणि देऊळ बंद रहात असे.

गावापासून थोड्याच अंतरावर एक मोठे बाजाराचे गाव होते. त्या गावात आठवड्याचा बाजार भरे तेव्हां जवळपासचे लोक मीठ, डाळ वगैरे गरजेच्या वस्तु खरेदी करण्यासाठी येत. एके दिवशी आठवड्याच्या बाजाराला रामशास्त्री गेले होते. गरजेच्या वस्तु विकत घेऊन ते गाडीत बसून परतु लागले तेव्हां समोरच्या टेकडीवर राहणाऱ्या वाण्याने त्यांना हाक मारली. रामशास्त्र्यांनी त्यांना भेटून विशेष काही आहे का विचारले. वाण्याने काय ते सांगितले.

म्हणे, गेल्या महिन्यात त्या वाण्याची बायको फार आजारी पडली असतां कोणाच्यातरी सांगण्यावरून त्या वाण्याने बायकोचा आजार बरा झाला तर सीतारामांच्या मंगल विवाहोत्सवासाठी एक हजार एकशे अकरा खर्च करीन असे मागणे घालून नवस केला होता. नवसाला देव पावला आणि वाण्याच्या बायकोची तब्येत बरी झाली.

वाणी म्हणाला–"शास्त्रीबुवा! केव्हांपासून मी तुम्हांला भेटावे म्हणत होतो. पण जमलेच नाही हो! एक का दोन हजार कामे निघतात. बरं तर असे पहा, माझ्या नवसाला देव पावला व माझी बायको जिवाच्या दुखण्यातून वांचली. उद्यां मी बायकोला घेऊन तुमच्या गावी येतो. सर्व तयारी करून ठेवा. परवां सीतारामांचा विवाहोत्सव अगदी थाटाने झाला पाहिजे. दरिद्रनारायणाला जेवण द्यायचं बरं का?"

[illegible] झाला. जणुंकाही देव पावल्यासारखे त्याला वाटले. कारण तो पुजारी झाल्यापासून सीतारामांचा विवाह नवस म्हणून कोणी मागून केला नव्हता आणि आतां इतक्या मोठ्या प्रमाणावर तो होणार. म्हणून आनंदाने शास्त्रीबुवा म्हणाले–"गणूशेट आनंदाने या हो! सर्व तयारी करून ठेवतो."

तो आनंदाने गाडीत बसून घरी परतला. बायकोला सांगण्याची घाई झाली होती त्याला. परंतु पाहतो तो ओटयावर कोणी झोपलेला दिसला. त्यांनी थोडे जोरानेच विचारले–"कोण ते?"

पण उत्तर आले नाही.

शास्त्रीबुवांचा आवाज ऐकून शास्त्रीबुवांची बायको असे म्हणत बाहेर आली–"मेला हा, गेला नाही का अजून! आंत या, सांगते!"

शास्त्रीबुवांनी आत पाऊल टाकतांच विचारले–"कोण तो?"

"कोणास ठाऊक लुच्चा कुठला! संध्याकाळी आला आणि जेवायला वाढा म्हणून ठाणे देऊन बसला. नाही वाढले तर इथेच जीव देईन, म्हणाला. चोरासारखा दिसतो आहे. त्याला हाकलले पाहिजे बाहेर." बायको म्हणाली.



"जेवून घेतो आणि त्याच्या समाचाराला जातो. आज आपल्याला देव पावला, आहे का माहीत!" असे म्हणत शास्त्रीबुवांनी बाजारपेठेच्या गावी घडलेले सर्व वृत्त सांगितले आणि म्हणाले–"कमी म्हटले तरी अर्धे पैसे तरी वाचतील. आपल्या दोघांच्या पुरेसे जरीकाठी कपडे होतील."

जेवण झाल्यावर शास्त्रीबुवा त्याच विचारांत गुंग अंथरुणावर लवंडले असतां बायको आली आणि म्हणाली–"अहो, तो मेला तसाच ताणून पडून आहे की! त्याला पहिल्याने बाहेर काढा. नाही तर मागच्या दाराने शिरेल की आंत!"



नाइलाजाने शास्त्रीबुवांनी कोपऱ्यातली काठी घेतली आणि ती जोरजोराने वाजवीत मोठ्याने ओरडून विचारले–"कोण रे, ए! ऊठ, म्हटले तर जागचा हालतसुद्धां नाहीस!"

परंतु ओटीवरच्या माणसाने हालचाल केली नाही.

शास्त्रीबुवांना शंका आली. त्यांनी जवळ जाऊन त्याला जोरजोराने हालवून पाहिले. तरी तो हलला नाही.

"संपलं की सगळंच! मेला वाटतं लेकाचा!" शास्त्रीबुवा चिडून म्हणाले.

"मेला तर बरं झालं. सुटलो. या आत!" बायको म्हणाली.

शास्त्रीबुवा आत येऊन म्हणाले–"डोंबल! सुटलो नाही अडकलो! तो मेला म्हणून देऊळ तीन दिवस बंद ठेवावे लागेल. गणूशेटने परवां येतो म्हटलं आहे आणि सीतारामाच्या विवाहोत्सवाची तयारी काय डोंबल करणार? त्याला पुन्हां केव्हां जमते कोणास ठाऊक?"

"मग काय करायचे म्हणतां?" बायकोने शंका केली.

"चार पैसे त्याच्या तोंडात कोंबले की झालं." असे म्हणत शास्त्रीबुवांनी पेटीत तळाला राखून लपवून ठेवलेल्या पैशातले शंभर रुपये काढून कनवटीला ठेवले. आतून धाकधूक होत असून मोठा धीर करून ते काळोखात स्मशानात गेले. स्मशानातला पाहरेकरी तेथेच एका झोपडीत रहात असे. त्याला बाहेर बोलावून शास्त्रीबुवांनी सर्व गोष्टी समजावून सांगितल्या व म्हणाले–"चार कानी झालेली गोष्ट लपत नाही बरं का?"

त्याने ते काम करायला शंभर रुपये मागितले. शेवटी पंचाहत्तर रुपयावर सौदा पटवून शास्त्रीबुवा त्याला म्हणाले–"हे बघ, मी जाऊन प्रेत घेऊन येतो, तोंपर्यंत तू खड्डा खणून तयार ठेव." असे सांगून शास्त्रीबुवा परत घरी आले.

शास्त्रीबुवांच्या बायकोने एक मोठी चटई दिली. शास्त्रीबुवांनी तीत त्याला गुंडाळून घेतले आणि डोक्यावर उचलून घेऊन निघाले. अर्धी वाट चालून गेल्यावर थोडा दम लागला म्हणून गल्लीत आजूबाजूला कोणी नाही, याची खात्री करून घेऊन एका ओट्यावर डोक्यावरचे ओझे उतरून ठेवले आणि जरासा दम घेतला.

इतक्यात त्यांच्या खांद्यावर कोणीतरी हलकेच हात ठेवला. घाबरून ते मोठ्याने ओरडणार होते. परंतु स्वतःला सावरून थांबले.

"ओहो! शास्त्रीबुवा का? या मध्य रात्रीच्या वेळी निघालात कोठे?" एक जण म्हणाला. शास्त्रीबुवांच्या छातीत धडधड चालू होती. त्यांनी आवाजावरून गावातल्या विठू दारूड्याला ओळखले.

"झोप लागेना, म्हणून निघालो होतो जरा." शास्त्रीबुवांनी थाप दिली.

"एवढ्या थापा टाकता आहां! आणि हे काय? चटईत गुंडाळल्यासारखं दिसतं आहे? आत काहीतरी आहे वाटतं?" विठू बोलू लागला.

"होय! पण काय रे, तू आज ताडीच्या दुकानात गेला नाहीस वाटते?" घाबरून जाऊन शास्त्रीबुवा कपाळाचा घाम पुशीत म्हणाले.

"काही नाही हो, त्या बेट्याचे पंचवीस रुपये द्यायचे आहेत ना! उधार फेडल्या-



शिवाय उभा नाही राहू देत तो!" विठू म्हणाला.

शास्त्रीबुवांनी गुपचूप पंचवीस रुपये कनवटीचे काढून दिले व म्हणाले–"हे घे, पंचवीस आहेत. देऊन मोकळा हो!"

विठूचे काम भागले, शास्त्रीबुवांचे विघ्न टळले.

शास्त्रीबुवांनी समाधानाचा सुस्कारा सोडला आणि चटईतले ओझं डोक्यावर उचलून घेऊन झपाझप पावले टाकीत स्मशानात आले. पाहरेकऱ्याने खड्डा खणून ठेवला होता. शास्त्रीबुवा ओझे खड्ड्यात ठेवू लागले तर चटई निसटून खड्ड्यात ते ओझे पडले.










"मेलो, मेलो!" ओरडत एक माणूस चटईतून बाहेर आला. शास्त्रीबुवांच्या छातीत "धस्स!" झाले.

"वेड्या शास्त्र्या! जिवंत माणसाला पुरणार होतास काय?" म्हणत स्मशानाचा पाहरेकरी हसू लागला.

तो मनुष्य म्हणू लागला—"मी कोठे आहे? माझी झोप म्हणजे कुंभकर्णाची आहे!"

"कोठे म्हणून विचारतोस? स्मशानात आहेस! चल नीघ!" शास्त्रीबुवा चिडून म्हणाले.

तो मनुष्य घाबरूनच गेला आणि त्याने नेथून पाय काढला.

शास्त्रीबुवांनी पाहरेकऱ्याकडून पैसे परत मिळतात का पाहिले. तो म्हणाला, मढं किंग बाहेर काढतो समजलास काय शास्त्र्या!" शास्त्रीबुवांनी काही उत्तर दिले नाही आणि गुपचूप घरी परतले. त्या अवधीत त्याच्या बायकोची एक झोप झाली होती व ती स्वप्नात जरी काठी लुगडे नेसून कसे दिसते पहात होती. "परवा तुझे स्वप्न खरे होणार बघ!" शास्त्रीबुवा खुशीत म्हणाले.

परंतु दुसऱ्या दिवशी संध्याकाळी गणूशेट बायकोबरोबर आला नाही. त्यानंतरच्या दिवशीसुद्धां त्यांचा पत्ता नव्हता.

चार दिवस गणूशेटसाठी वाट पाहून शास्त्रीबुवा त्याच्या घरी गेले. त्याच वेळी तो कोठून तरी आला होता.

"या या शास्त्रीबुवा! मी निरोप पाठवावा म्हणत होतो. तुम्हांला भेटलो त्या नंतर त्याच दिवशी रात्री आम्हांला आजीची तब्येत जास्त बिघडली आहे असा निरोप आला. गाव दूर होते, पण जावे लागले. आतां बर आहे तिला. गेलोच होतो, तेव्हां आपल्याच गावच्या देवळात सीतारामांचा विवाहोत्सव उरकून घेतला." गणूशेट म्हणाला.

शास्त्रीबुवांच्या डोक्यावर घागरभर पाणी पडले. सीतारामांचा नाही त्यांचाच विवाहोत्सव झाला!






गजपुष्पलता सुग्रीवाने आपल्या गळ्या भोवती बांधून घेतल्यावर राम त्याला बरोबर घेऊन किष्किंधेला गेला. तो धनुष्य बाण बरोबर घेऊन गेला होता. रामाच्या पुढे लक्ष्मण आणि सुग्रीव चालत होते. त्यांच्या पाठीमागून महाबली हनुमान, नल, नील, तार वगैरे वानरवीर चालत होते.

वाटेत रामाला एक दाट अरण्य दिसले. त्यात झाडी होती. रामाने सुग्रीवाला त्या अरण्याविषयी विचारले.

सुग्रीव चालतचालत त्या अरण्याविषयी सांगू लागला—"एके काळी येथे एक आश्रम होता. या अरण्यात दाट व गार सावली असे. गोड व चवदार फळे होती. यात सप्तजन नावाचे ऋषी तपश्चर्या करून सदेह स्वर्गाला गेले. आतां यात कोणालाही प्रवेश करतां येत नाही. यदाकदाचित प्रवेश करतां आलाच तर बाहेर येता यायचे नाही. यात अप्सरा गातात व नाचतात. त्यांचा आवाज ऐकू येतो. झाडांच्या वर टोकाला प्रकाशासारखं दिसतं ते त्रेताग्नी आहेत व सर्वदा जळत असतात."

ते ऐकून रामलक्ष्मणांनी सप्तजन ऋषींचे स्मरण करून त्या अरण्याला नमस्कार केला.

तेथून पुष्कळ दूर चालून गेल्यावर ते किष्किंधेच्याजवळ पोचल्यावर झाडाआडून चालू लागले.

सुग्रीवाने एकदा चारीबाजूला नजर फिरविली. उंच आवाजाने वालीला युद्धासाठी

आव्हान केले. नंतर तो रामाला म्हणाला—"रामा! निदान आत्तां तरी आपल्या वचनाचे पालन कर."

"तुझ्या गळ्यात माळ आहे, आतां मी तुला सहजी ओळखू शकेन. मी एकाच बाणाने वालीचा वध करीन. तू मुळीच भिण्याचे कारण नाही. मी मोठ्या संकटात देखील खोटे कधी बोललो नाही. यापुढे ही कधी बोलणार नाही. तू वालीला मोठ्याने ओरडून आव्हान कर." राम म्हणाला.

सुग्रीवाने आकाश व भूमी हादरून जाईल इतक्या मोठ्याने ओरडून वालीला हाक मारली. तो आवाज ऐकून जंगलातली जनावरे घाबरून गेली. हरणे तर दचकून उभी राहली.

वाली त्या वे[illegible]त पुरात होता. त्याने तो सिंहनाद ऐकला. आपल्याला पाहून घाबरून पळून जाणारा सुग्रीव पुन्हा आव्हान करायला आला आहे तर, असा विचार करून वालीला भयंकर राग आला. म्हणून तो चटदिशी उठून निघाला.

तो निघालेला पाहून तारा उठली व त्याला म्हणाली—"सुग्रीवाला ठार करण्यासाठी या रात्रीच्या वेळीच जायची काय गरज आहे? उजाडल्यावर नाही का जाता येणार? यात तुमच्या पराक्रमाला कोणी कमी म्हणणार नाही. सुग्रीव शौर्यात तुमची बरोबरी करणे शक्यच नाही. मी कां नको म्हणते आहे, तेदेखील सांगते. एकदां तुमच्या हातून मार खाऊन जीव घेऊन पळून गेलेला सुग्रीव [illegible] आव्हान करीत आहे, याचे नक्कीच कारण आहे. त्याला कोणाचे तरी पाठबळ मिळाले असले पाहिजे. नाहीतर तो तुमच्या वाटेला येणेच शक्य नव्हते. त्याला कोणाचे पाठबळ असले तरी काय झाले असा खोटा अभिमान तुम्ही बाळगू नका. सुग्रीव आहे वस्ताद. त्याला मदत करणारा पराक्रमी आहे की नाही, या गोष्टीची खात्री करून घेतल्याशिवाय तो येणारच नाही. तो तुमच्याहून जास्त पराक्रमी वीराची मदत घेऊन येत असला पाहिजे. अंगद अरण्यात गेला होता. तो जे काही प्रत्यक्ष पाहून व ऐकून आला आहे ते त्याने मला सांगितले आहे. ईक्ष्वाकु वंशातील दशरथाचे दोन महापराक्रमी पुत्र राम व लक्ष्मण ऋष्यमूक पर्वतावर आले होते. शूर बंधूंनी सुग्रीवाला मदत द्यायचे कबूल केले आहे. त्या रामाने विराधाचा, खरदूषणांचा आणि कबंधाचा वध केला आहे, म्हणे."

एवढे सांगून ताराने वालीला असा सल्लासुद्धा दिला.

"रामाशी वैर करण्याऐवजी सुग्रीवाशी मैत्री करावी. त्याला बोलावून पुन्हां युवराज करून घ्यावे. तो तुमचा सख्खा भाऊ आहे. जे रक्त तुमच्या अंगात खेळते आहे, तेच त्याच्या अंगातही खेळते आहे. तो परका नाही. मी तुमच्या व आपल्या हितासाठी हे सर्व सांगत आहे."

परंतु ती म्हणाली ते वालीला पटले नाही व आवडलेदेखील नाही. तो ताराला







म्हणाला–"सुग्रीव मला युद्धाला आव्हान करीत असता कापुरुषासारखा मी गप्प बसू म्हणतेस? तू आहेस भितरी, तुला हे सर्व कळणार नाही. शूराला युद्धभूमीवरून पाठ फिरवून येणे मरणापेक्षा कठीण वाटते. रामाविषयी तरी तू भिण्याचे कारण नाही. तो माझ्यासारख्या निरपराध्याचा वध करण्याचे पाप कधीच करणार नाही. तू म्हणालीस ते सर्व माझ्या हिताचे आहे, हे मी ओळखतो. तू माझ्याबरोबर येऊ नकोस. मी सुग्रीवाचा गर्व परिहार करून त्याला सोडून देईन, त्याला ठार करणार नाही. तो माझ्या हाताचा मार सहन झाला नाही, म्हणजे समोरून पळूनच जाईल."

तारा त्यापुढे आणखी काय बोलणार? वालीला त्या द्वंद्वयुद्धात यश येवो, असा मंत्र म्हणून आपल्या दासींसह परतली.

नंतर वाली पुढे गेला व त्याला त्याच्याशी यूद्धाला तयार होऊन आलेला सुग्रीव दिसला. तोसुद्धा युद्धाला तयार होऊन मुठी आवळून सुग्रीवावर वार करण्यास पुढे सरसावला. सुग्रीवदेखील मुठी आवळून पुढे आला.

दोघांनी परस्परांना आपल्या पकडीत आवळले. नंतर सुग्रीव एक सालवृक्ष उपटून वालीवर धावला. परंतु कां कोणास ठाऊक, क्षणभर थबकला. परंतु थोड्याच वेळात वालीसमोर सुग्रीव नमत चालल्याचे स्पष्ट झाले.

सुग्रीवाचे बळ कमी झालेले पाहून आणि तो मधून मधून कोणी मदत करतो आहे का या हेतूने आजूबाजूला पहात असल्याचे ओळखून रामाने वालीचा वध करण्यासाठी एक अत्युत्तम बाण ठेवला आणि कानापर्यंत ओढून वालीवर सोडला. तो अति वेगाने जाऊन वालीच्या छातीला लागला. त्या बाणाने तिरिमिरी येऊन वाली पडला.

इंद्राने दिलेली कांचनमाला त्याच्या गळयात असल्यामुळे तो तत्काळ मरण पावला नाही. त्याचा वध करणारा कोण












व कोठे उभा आहे हे तो पाहू लागला तेव्हां लक्ष्मणाबरोबर राम समोर येत असलेला त्याला दिसला. तेव्हां वाली म्हणाला–

"तू एका चक्रवर्ती राजाचा मुलगा आहेस. गुणवान आहेस अशी तुझी कीर्ती ऐकतो. तुला सर्व शास्त्रांचे ज्ञान आहे. उच्चकुलात जन्मला आहेस. शूर व पराक्रमी आहेस. मी दुसऱ्या कोणाशी युद्ध करीत असतां तू माझ्या छातीत बाण मारलास, हे काम करून तुला कोणता असा थोरपणा मिळाला? तू असा लपून माझा वध करशील असे मला माहीत नव्हते. राजपुत्रांमध्ये जे थोर गुण असायला हवे शक्ती, सत्य, धर्म, पराक्रम व दुष्टाचे पारिपत्य, हे सर्व तुझ्यात आहेत असे मानून तारानें मला अडविले असूनही मी युद्धाला आलो. तू दुर्बुद्धी, पापाचारी आणि जगाला फसविणारा असशील असे नाही मला वाटले. तुझा किंवा तुझ्या देशाचा अपकार असा मी काही केलेला नाही. तुझा अपमान ही केला नाही. तुझ्याशी युद्ध करायला देखील आलो नाही. अशा परिस्थितीत मी दुसऱ्या एकाशी युद्ध करीत असतां तू माझा वध कां केलास? माझी तू शिकार केलीस असे म्हणायलासुद्धा जागा नाही. कारण माझे कातडे, केस, हाडे किंवा मांस तुझ्या कामाचे नाही. तुझ्या सारख्या राजाच्या कारकीर्दीत भूमीचे व प्रजेचे पालन कसे चांगले होईल? तुझ्या सारखा दुष्ट कुलीन व पापी दशरथ महाराजांच्या पोटी कसा जन्मला? तू हे काम कसे काय केलेस? असा प्रश्न तुला कोणी केला तर तू त्याचे उत्तर काय देशील? तू आपला हा पराक्रम माझ्यावर न दाखविता तुझ्याशी वैर करणाऱ्या त्या रावणावर कां नाही दाखविलास? तू माझ्याशी समोरासमोर युद्ध केले असतेस तर मी तुला केव्हांच यमसदनी पाठविले असते. तू मला सांगितले असतेस तर मी एका दिवसाच्या आत सीतेचा शोध काढून मला ठार करून वानरांचा राजा होण्याची जी इच्छा आहे त्यात काही नवल नाही. परंतु तू माझा आड लपून वध करणे, हे धर्मविरुद्ध व अन्याय आहे."

असे सांगून हळूहळू बेशुद्ध होत चाललेल्या वालीला राम म्हणाला–"तुला धर्माचे मर्म कळत नसल्यामुळे तू माझी अशी निंदा करीत आहेस. हा सर्व भूलोक ईक्ष्वाकु वंशीयांचे राज्य आहे. या राज्याचा राजा भरत आहे. त्याने घातलेल्या धर्मनीतीप्रमाणे वागत आम्ही संचार करीत आहो. तू धर्माचे अतिक्रमण केले आहेस. धाकटा भाऊ हा मुलासारखा असतो. तू अशा भावाच्या बायकोला बळजबरीने आपल्या अंतःपुरात घेऊन गेलास. तुझ्या त्या पापकर्माबद्दल तुला ही शिक्षा मिळाली आहे. याशिवाय सुग्रीव हा मला लक्ष्मणासारखा धाकटा भाऊ आहे. त्याच्या प्रेमाखातर मी हे काम केले. मी तुझा वध केला त्यात अधर्म असा काहीच नाही. मी आड उभा राहून तुझा वध केला याबद्दल मला मुळीच वाईट वाटत नाही. रानटी पशूंना ठार करणारे आड लपून किंवा जाळे टाकून किंवा असेच अनेक उपाय करून हे काम करतात. ज्या पशूंचे रक्त मांस खातात त्यांचाशिवाय खाण्यालायक नसतात अशा पशूंचा सदा राजर्षी



वध करतात. तू असाच न खाण्यालायक वन्य पशू आहेस!"

प्राण सोडण्यापूर्वी वाली रामाला म्हणाला–"मला मरण येत आहे याबद्दल मला वाईट वाटत नाही. ताराची, बंधुबांधवांची मला काळजी नाही. मला काळजी वाटते ती एकट्या अंगदाची मी त्याला जीव की प्राण वाटतो. तो माझ्यासाठी फार शोक करणार. तू त्याचे रक्षण कर. सुग्रीवावर आहे तशीच त्याच्यावरही कृपा दृष्टी ठेव. माझ्यामुळे सुग्रीवाकडून ताराचा अपमान होणार नाही, याची काळजी घे."

रामाने तसे करण्याचे वचन दिल्यावर वालीने प्राण सोडला.

       



मध्यंतरी ताराला वालीचा वध झाल्याची गोष्ट कळली. ती अपार दुःख झाल्याने आपल्या मुलाला बरोबर घेऊन किष्किंधेहून आली. वाटेत तिला वानर भेटले व म्हणाले–"तारा! तू परत जा. आपल्या मुलाला सांभाळ. रामाचे रूप घेऊन प्रत्यक्ष यमच वालीचा वध करण्यास आला होता. म्हणून तू किष्किंधा नगरीची सर्व द्वारे बंद कर आणि अंगदाचा राज्याभिषेक कर. नाहीतर तुला किष्किंधेत उभी रहायला सुद्धां जागा मिळणार नाही. तुझे शत्रू वानर येऊन किष्किंधा नगरी बळकावून बसतील!"

ते ऐकून तारा म्हणाली–"माझे पतीच निघून गेल्यावर, माझा मुलगा, माझे राज्य आणि माझा देह यांचे काय वाटेल ते झाले तरी त्याची फिकीर करण्याचे मला कारणच काय? मी पतीबरोबरच जाते!" असे म्हणत कपाळ व छाती बडवीत ती धावत वाली पडला होता तिकडे निघाली. जवळ जाऊन तिने राम व लक्ष्मण दोघांना पाहिले. नंतर वालीजवळ जाऊन त्याचा देह मांडीवर घेऊन रडू लागली. ताराला व अंगदाला त्या स्थितीत पाहून सुग्रीव देखील स्वतःचे दुःख आवरू शकला नाही.

हनुमान ताराचे सांत्वन करीत म्हणाला–"जो गेला त्याच्या विषयी शोक करणे बरोबर नाही. कारण शेवटी सर्वांना जायचेच आहे. दुःखी व्हायचे आहे ते यासाठी. तुझा मुलगा आहे. त्याच्या क्षेमाविषयी विचार करणे आवश्यक आहे. त्याचे जीवन कसे सुखी होईल याचा विचार कर. वाली थोर वानर राजा होता. त्याला उत्तम लोक लाभला आहे. अंगद राजा झाला तर तू त्याला मदत कर. वालीची उत्तरक्रिया करावयाची आहे, अंगदाचा राज्याभिषेक करावयाचा आहे."

ते ऐकून तारा म्हणाली–"हनुमाना! तू म्हणतो आहेस ते काम माझे नाही. सुग्रीवाने ती कामे करावयाची आहेत. मी वालीबरोबर जाण्याचे एकच काम करणे आवश्यक आहे."





# अमरवाणी

दम, श्शमः, क्षमा, धर्मो,
धृति, स्सत्यं, पराक्रमः
पार्थिवानां गुणा (राजन्)
दण्डश्चा प्यपराधिषु ॥ ॥ १ ॥

[ इंद्रियनिग्रह, चित्तशुद्धी, सहनशक्ती, धर्म, धैर्य, सत्य, पराक्रम, अपराध्याला दंड करणे–हे राजाचे गुण आहेत.]

नयश्च विनयश्चोभौ,
निग्रहानुग्रहौ अपि,
राजवृत्ति रसंकीर्णा
न नृपाः कामवृत्तयः ॥ ॥ २ ॥

[ राजपुरुषांत नय, विनय, निग्रह, अनुग्रह असतात; ते मनाला वाटेल ते करीत नाहीत.]

शासना द्वा विमोक्षा द्वा,
स्तेनः स्तेया द्विमुच्यते,
राजात्वशासन्पापस्य
त दवाप्नोति किल्बिषम् ॥ ॥ ३ ॥

[ राजाने शिक्षा केली किंवा सुटका दिली की चोराचे पाप दूर होते. परंतु शिक्षा केल्याशिवाय सोडलेल्या चोराचे पाप राजाच्या माथीं येते.]

राजा



# मित्रभेद

[ २१ ]

सर्व पक्षी गरुत्मन्ताकडे म्हणजे गुरुडाकडे गेले आणि मोठ्याने रडत टिटवीची अंडी समुद्राने कसा अत्याचार करून लाटेबरोबर ओढून नेली हे सांगितले.

"टिटवी अशी अंडी सोडून कोठे निघून गेली होती?" गरुडाने त्यांना विचारले.

पक्षी म्हणाले–"महाप्रभो! पोटाची खळगी भरायला हवीच ना? म्हणून दाण्याच्या शोधार्थ कोठेकोठे जावेच लागते. टिटवीचे जोडपे चाऱ्याच्या शोधार्थ कोठे तरी निघून गेले होते त्या वेळी समुद्राने वेळ साधून हा दुष्टपणा केला. या जगातल्या सर्व कष्टांच्या व लबाडीच्या मुळाशी पोटच कारण असते ही गोष्ट सिंह व मेंढ्याच्या गोष्टीवरून आपल्याला कळतेच की नाही?

"सिंह व मेंढ्याची काय बरे ती गोष्ट?" गुरुडाने विचारले.

तेव्हां म्हाताऱ्या बतकिणीने ती कथा अशी सांगितली.

**सिंह व मेंढा यांची गोष्ट**

एका अरण्यात एक मेंढरू आपल्या कळपातून वाट चुकून कोठे तरी जातां जातां एकटे झाले आणि त्या दिवसापासून त्याला एकट्याने आयुष्य कंठावे लागू लागले. परंतु खुल्या वातावरणात मन मोकळेपणाने खातपीत हिंडत फिरत राहिल्याने त्याचा अंगपिंड खूप वाढला व शिंगे पण मोठी लांब झाली. त्याला पाहून व त्याची शिंगे पाहून अरण्यातील जनावरे भिऊ लागली.

एके दिवशी अचानकपणे सिंहाने त्याला पाहिले. त्याचा तो अवाढव्य देह, लांबलांब केस व शिंगे पाहून सिंह मनात भ्याला. 'बाप रे बाप! हे निःशंकपणे अरण्यात फिरते आहे, म्हणजे आपल्या जिवाला धोकाच आहे!'

परंतु एकदां सिंहाने त्या मेंढ्याला गवत चरत असतांना पाहिले व स्वतःच्या भित्रेपणाचे त्याला हंसू आले. "हत् तिच्या! हे गवत खाणारे जनावरच तर आहे! याच्या अंगात माझ्या इतके बळ कोठून असणार? उलट माझा आहार होऊ शकेल!" असा विचार करून सिंहाने त्याला ठार करून खाऊन टाकले.



म्हाताऱ्या बतकिणीने ती गोष्ट येथवर सांगतां सांगतांच विष्णूकडून गरुडाकडे निरोप आला की विष्णूला गरुडवाहनावर बसून कोठें तरी जावयाचे होते म्हणे.

गरुड विष्णूकडे जाऊन म्हणाला– "प्रभो! मी आतांच कसा येऊ म्हणता? माझ्या पक्षी कुळातल्या टिटवीची अंडी समुद्र ओढून घेऊन गेला आहे ती अंडी तिला परत आणून देण्याची जबाबदारी माझ्यावरच आहे! समुद्र माझ्या प्रजेवर असा अत्याचार करीत राहिला तर मी ज्यांचे वाहन म्हणून स्वतःला मिरवितो त्यांची शोभा तरी माझ्या प्रजेच्या समोर काय राहणार?"

लगेच विष्णूने आपला बाण धनुष्यावर चढवून समुद्रावर नेम धरला व म्हणाला– "हे बघ रे, टिटवीची अंडी तिला तावडतोब आणून दे, नाही तर हा बाण तुला अटवून वाळू करून टाकील."

ते ऐकून समुद्र भयभित होऊन 'थरथर' कापू लागला. त्याने टिटवीची अंडी आणून त्या जोडप्याला दिली.

दमनकाने संजीवकाला ही गोष्ट सांगितली व म्हणाला–"तुला तशी मदत करू शकतील असे मित्र आहेत का? म्हणून तू सिंहाशी दोन हात करण्याचा विचार मनातून काढून टाक!"

"मित्रा! सिंह मला ठार करणार आहे किंवा हे मला कसे काय रे कळणार?" संजीवकाने दमनकाला विचारले.

"ते सहजी कळेल. सिंह आपल्या सिंहासनावर म्हणजे दगडावर बसला असतां तू जवळ जाशील तेव्हां सिंह हसतमुखाने व शांतपणे बसून राहिला तर तुला काही धोका नाही. परंतु शेपूट वर करून पंजे घट्ट आवळून तुला दुरून पाहतांच नजर करडी करील तर तो तुला ठार करणार असे समज." दमनक म्हणाला.

नंतर दमनक करटकाला भेटला. करटकाने त्याला विचारले–"काय करून आलास ?

"दोघांच्या मनांत विष पेरून आलो आहे." दमनक म्हणाला.

"खरंच का?" करटकाने विचारले.

"माझं कारस्थान कसे फळास येते, हे तुला दिसेलच. सिंह आणि बैल दोघां-मधल्या स्नेहाचा धागा तोडून आलो आहे." दमनक म्हणाला.

"त्यांत काय आश्चर्य रे? तेच करण्यासाठी पाणी वहात असतां दगडसुद्धां विरघळून नाही का जात? तू कारस्थान करण्याचे योजलेस तर त्यांची मैत्री कशी राहील? पण एवढा खटाटोप करून तुला काय मिळणार?" करटकाने विचारले.

"हा काय प्रश्न झाला? मी प्रधान मंत्री होईन व मला त्याचा पुष्कळ फायदा नाही का मिळणार? जाडजूड ग्रंथ वाचून त्या वाचनामुळे पैसा व अधिकार न मिळविणाऱ्याची विद्या फुकट असे सांगतात!" दमनक म्हणाला.

"परंतु स्वार्थदेखील वाईटच नाही का? या तुच्छ देहासाठी वाटेल ते करणे बरोबर नाही. या शिवाय तुझी लबाडी बाहेर पडली तर मागे एका लबाडाची दुर्गत झाली तशी दुर्गत होऊन तुझ्या जिवावर बेतले नाही म्हणजे पुरे!" करटक म्हणाला.

"काय रे ती गोष्ट?" दमनकाने विचारले.

करटक लबाड माणसाची गोष्ट सांगू लागला.





# तिळ्या बहिणी

[ १ ]

[ संध्याकुमार व निशीथने सांगितले ते खरे समजून राक्षस दाढीवाल्याला भेटायला गेला. नंतर दोघे भाऊ राक्षसाच्या वाड्यानजीकच्या सरोवराकडे गेले. एक जण दगडाची मूर्त झाला व दुसरा माकड झाला. उदयनच्या बरोबर आलेल्या एका मुलीने राक्षसाचा आवाज ऐकून तिघां भावंडांना सरोवरात ढकलले. सर्व हंस झाले. पुढे–]

राक्षसाने आणखी एकदा जोराने "कोठे आहां रे?" अशी आरोळी दिली. त्याच्या आवाजावरून त्याला त्यावेळी खूप राग आल्यासारखे दिसत होते. संध्याकुमार व निशीथ दोघांनी त्याला थाप दिली होती. त्यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून तो दाढीवाल्याकडे गेला होता. तेथे गेल्यानंतर सर्व कळल्यावर दोघांनी त्याला बनविल्याबद्दल त्याला राग आला होता. दाढीवाल्याची भेट झाल्यावर आपण फसल्याचे त्याला कळले होते.

राक्षसाला आलेला पाहूनच दाढीवाल्याला आश्चर्य वाटले. नंतर राक्षसाने सर्व गोष्टी सांगितल्यावर कपाळावर हात मारीत दाढीवाला म्हणाला–"अस्सं! म्हणजे लबाड लुच्चांना तू आपल्या वाड्यातच सोडून आला आहेस म्हणायचाचास? अरे, त्या लबाडांनी माझ्या जवळची सर्व भस्मे



व अंजने लुबाडून नेली आणि आतां तुला टोपी घालायला गेले आहेत का? ते कोठे लपून काय करीत आहेत हे जाऊन तू वेळवरच पाहिले नाहीस तर तुझ्या जिवाला धोका आहे, समज! तेव्हां जा बघू लवकर! आपले दोघांचे गुपित जर का त्यांना कळले तर तू एकटाच नाहीस तर आपण दोघे मेलो समज! मुख्य करून आपल्या वाड्यातली गुपिते त्यांना जर का कळली तर आपल्या दोघांच्या आयुष्याची दोरी खुंटलीच, लक्षात ठेव! तेव्हां पळ आणि त्यांना प्रथम वाटेला लाव!" दाढीवाल्याने राक्षसाला उलटच्या-पावलीच पाठवून दिले.

दाढीवाल्याच्या सल्ल्याप्रमाणे आपल्या किल्लावजा वाड्यात परत आल्यावर राक्षसाने, त्याने नेमलेल्या जागी संध्याकुमार व निशीथ नाहीत हे पाहिले. म्हणून त्याने ओरडून विचारले होते–"कोठे आहां रे?" आणि तसाच ओरडत तो सरोवराच्या काठी आला. पण तेथेसुद्धां त्यांचा पत्ता नव्हता.

रागाने त्याचा सर्व देह खालपासून वरपर्यंत भडकला. त्याने ती जागा त्या दोघांना हुडकून काढण्यासाठी चाळून काढली. संध्याकाळपर्यंत त्या प्रयत्नात तो इतका दमून गेला की वाड्यात जाऊन स्वस्थ पडून राहण्याशिवाय दुसरा उपाय उरला नाही.

राक्षस त्यांना शोधत होता तितका वेळ उदयन व त्याचे दोघे भाऊ सरोवरात होते. उदयन हंस रूपात राहून सर्व गंमत पहात होता. परंतु राक्षस आपल्या वाड्यात निघून गेल्यावर उदयन स्वस्वरूपात पाण्यातून बाहेर आला. त्याच्या पाठोपाठ ती हंस रूपात असलेली मुलगीसुद्धां पाण्याबाहेर आली. तिने उदयनला विचारले–

"तुम्ही कोणीतरी दुर्दैवी वाट चुकून या वाड्यात आलेले दिसतां आहां. या वाड्याच्या चारीबाजूला सुमारे चार कोस अंतरातल्या प्रदेशात कोणी कीडमुंगी प्रवेश करू शकणार नाही इतकी कडेकोट व्यवस्था आहे. प्रवेश केलाच तर त्याला धरून बांधून कैद करणारा एक दाढीवाला नेमलेला आहे. त्याचा डोळा चुकवून येणे ब्रह्मदेवालाही शक्य नाही. इतके असूनही तुम्ही आत कसे काय आलात, हे मला तरी कळले नाही. मला वाटते, अजून ही तुम्ही ही जागा सोडून पळून जाणे तुमच्या हिताचे आहे. नाही तर तुमचा जीव धोक्यात पडेल. हा वाडा दुसऱ्या एका दुष्ट राक्षसाचा आहे. तो आत्तां येथे नाही. तो केव्हां येतो आणि केव्हां जातो कोणाला कळत नाही. तो येण्यापूर्वी मी तुम्हांला तुमच्या भावांना स्वस्वरूप प्राप्त होण्यास एक युक्ती सांगते. ती करून तुम्ही आपल्या वाटेने निघून जा?"

सर्व ऐकून घेतल्यावर उदयन म्हणाला–"आम्ही वाट चुकून या बाजूला आलो नाही. ह्या वाड्यात काय आहे, कोण राहतो व कशासाठी वगैरे गोष्टी कळाव्या म्हणूनच तर आलों आहों. तेव्हां तू आमच्याविषयी ती काळजी करण्याचे कारण नाही. तुला या राक्षसाविषयी जे काही माहीत आहे ते सांगितलेस की पुरे. आतांपर्यंत तू कोण हे नाही सांगितलेस. सांगायला काही हरकत नसेल तर ऐकण्याची इच्छा आहे."



तेव्हां ती सरोवरकन्या थोडा विचार करून म्हणाली–"सांगायला काहीच हरकत नाही. परंतु सांगितले तरी तू काही करू शकशील असे देखील मला वाटत नाही. तरी तू विचारलेसच म्हणून सांगते." असें सांगून ती पुन्हां सरोवरात गेली आणि काही वेळाने आणखी दोघां हंसां-बरोबर बाहेर आली. त्या सरोवरकन्ये-बरोबर दोन्ही हंस बाहेर येताच दोन सुंदर कन्या झाल्या.

रूपाने तिघी एका साच्यातून काढल्या-सारख्या दिसत होत्या. ते पाहून उदयनने त्यांना विचारले–"तुम्ही तिळ्या दिसतां आहां!"



"होय!" असे तिघी एकाच वेळी म्हणाल्या. ते कळल्यावर उदयनचा उत्साह वाढला. म्हणाला–"तरमग आम्ही आजपर्यंत ज्यांच्या शोधार्थ हिंडत आहोत त्या तुम्हीच आहां, म्हणावयाच्या! तुम्ही तिघी दानशील महाराजांच्या राजकन्याच नाही का?"

ते ऐकून तिघींना-फारच आश्चर्य वाटले. म्हणाल्या–"होय! परंतु आमच्या विषयीं तुम्हांला हे सर्व कसे काय कळले?" त्यांनी नि:संकोचपणे विचारले.

"कसे कळले हे काय विचारता? तुमच्या जन्मापासूनच नव्हे, त्या पूर्वीपासूनचे सर्व आम्हांला ध्या विचारून. तुम्हांला शोधून आणण्यासाठी आम्ही तिघे तुमच्या वडिलांचा आशीर्वाद घेऊन निघालो, बरं तर तुमची नावे...?" उदयनने विचारले.

"सुहासिनी......आपल्या जन्मापूर्वीच्या गोष्टी विचारून घ्या म्हणाला होता नाही का? तेव्हां इतर दोघींची नावे तुम्हांला माहीत असली पाहिजेत!" ती मुलगी म्हणाली.

"कां नाही माहीत? इतके सहज आणि इतक्या लवकर तुमची भेट होईल, असे स्वप्नात देखील वाटले नव्हते आम्हांला. ही आनंदाची गोष्ट माझ्या भावंडांनासुद्धां कळली तर किती बरे होईल?" असे म्हणत असतां त्याच्या भावंडांना मानव रूप नसल्याबद्दल उदयनला फार वाईट वाटले.

ते पाहून सुहासिनी–"वाईट वाटून घेण्याची गरज नाही!" असे म्हणत पाण्यात उतरली आणि थोड्या वेळाने माकडाच्या रूपात असलेल्या निशीथला आणि दगडाची मूर्त झालेल्या संध्याकुमाराला घेऊन बाहेर आली. नंतर ती उदयनला बरोबर घेऊन त्या उद्यानांतल्या एका आंब्याच्या झाडाजवळ घेऊन गेली.

त्या आंब्याच्या झाडाच्या बाजूला काही बेडकाच्या छत्र्या उगवलेल्या होत्या. त्या-  तिने उदयनला सांगितल्या. त्याने तशा काही उपटून घेतल्या. नंतर ती त्याला आणखी थोड्या अंतरावर घेऊन गेली. तेथे एका राक्षसाची मूर्त होती. त्या राक्षसाच्या तोंडातून पाण्याचा एक झरा वहात होता. त्याचे थोडे पाणी घ्यायला तिने सांगितले. तिने एका पानाचा द्रोण करून दिल्यावर उदयनने त्यात त्या झऱ्याचे पाणी घेतले. ते सर्व घेऊन दोघं सरोवराच्या काठी परतली.

सुहासिनीने त्या बेडकाच्या छत्र्या माकडाला खायला घालायला सांगितल्या. तसे करतांच माकडाचे रूप जाऊन निशीथ मानव रूपात आला. नंतर द्रोणांत आणलेले पाणी दगडाच्या मूर्तीला लावल्या बरोबर संध्याकुमार मानव रूपात आला.

नंतर उदयन त्या मुलींची ओळख करून देत आपल्या भावंडांना म्हणाला–"पाहिलीत का गंमत? आपण आजवर ज्यांच्या शोधार्थ हिंडत होतो त्याच या राजकन्या आहेत! तेव्हां आपलं काम पुरे झाल्यासारखं आहे. आतां आपण यांना घेऊन या वाड्या बाहेर जाण्याचा उपाय काढला पाहिजे."

तेव्हां सुहासिनी म्हणाली–"पण तुम्हांला वाटते आहे तेवढे सोपे काम नाही ते! आमच्या रक्षणाची गोष्ट सोडा, प्रथम स्वत:च्या रक्षणाचा विचार करा. या वाड्यातून कसे बाहेर..." असे ती बोलत असतां एकदम सोसाटयाचा वारा आला.



तो पाहून सुहासिनी म्हणाली–"तो पहा येतो आहे. हा सोसाटयाचा वारा त्याचे चिन्ह आहे. आम्ही पुन्हां जाऊ सरोवरांत. तुम्ही काय करणार? मागच्या खेपेसारखे तुम्ही हंस झालात तरी तो तुम्हांला पकडू शकेल. आतां स्वतःला कसं वांचवायचे ते तुमचं तुम्ही पहा." असे म्हणत ती आपल्या बहिणींसह पाण्यात शिरली.

उदयन विचार करीत फार वेळ थांबला नाही. त्याने आपल्या जवळचे पांढरे भस्म काढून ते स्वतःवर व आपल्या दोघां भावंडांवर शिंपडून घेतले. तत्क्षण तिघे अदृश्य झाले. थोडया वेळाने सोसाटयाचा वारा कमी होत गेला आणि एक राक्षसी देहाची घार सरोवराच्या काठी उतरली. पण आश्चर्य असे की सरोवराच्या काठावर उतरल्या बरोबर घारीचे रूप जाऊन एका भयंकर राक्षसाच्या रूपाने ती घार समोर उभी राहली.

तो राक्षस येऊन सरोवराच्या काठी उभा राहल्यावर सरोवरातले सर्व हंस पंख फडफडवीत पोहोत काठाच्या जवळ पाण्यात येऊन उभे राहले. राक्षसाने क्षणभर त्यांच्याकडे निरखून पाहिले आणि लगेच पाठ फिरवून घारीच्या रूपाने आकाशात उडू लागला.

हे सर्व होई होईतो चांगला काळोख पडू लागला होता. उदयनने भस्माच्या मदतीने स्वतःला व आपल्या दोघां भावंडांना मानव रूपात आणले. तोपर्यंत तीन दिवस होऊन गेले होते. सर्वांना भूक लागली होती. म्हणून त्यांच्याजवळ जो पंचा होता तो अंथरून त्यांनी त्यावरचे फळफळावळ व इतर खाद्य पदार्थ पोट भरून खाऊन घेतले. नंतर त्या तिळया बहिणी बाहेर येतील कदाचित म्हणून थोडा वेळ वाट पाहिली. परंतु बराच वेळ झाला तरी त्या बाहेर न आलेल्या पाहून आणि रात्र तेथेच काढावी लागणार असा विचार करून तिघांनी अंगावर भस्म टाकून घेतले आणि तेथेच अदृश्य रूपे झोपले.

उजाडल्यावर तिळया मुली बाहेर आल्या. त्याच वेळी तिघे भाऊ भस्म टाकून घेऊन प्रत्यक्ष समोर वाट पहात असलेले दिसले.

उदयन सुहासिनीला म्हणाला–"हा राक्षस परत कोठे गेला असावासे वाटते तुला? परत केव्हां येईल?"

"कोठे म्हणून काय विचारतोस? शिकारीला गेला आहे! ही शिकार पाण्याची नाही, जुळया किंवा तिळयांची!" सुहासिनी म्हणाली.

"जुळया तिळयांची शिकार? मला नाही कळले." उदयनने विचारले.

"ते एक गुपित आहे. हा राक्षस एका देवीचा भक्त आहे. त्या देवीच्या कृपेनेच तो हा मायामहल निर्माण करू शकला. यासाठी तो त्या देवीला पन्नास जुळी बळी देणार आहे. बळी देण्याचे काम पुरे झाले तर ती देवी त्याला सर्व शक्ती प्राप्त होण्याचा वर देईल. याशिवाय त्याला अमर होण्याचा वरदेखील देईल. त्याला आतापर्यंत सत्तेचाळीस जुळी तिळी मुले मिळाली आहेत. आणखी फक्त तीन जुळयांची गरज आहे. ती मुले मिळाली की सर्वांना तो बळी देणार. देवीचा वर मिळावा म्हणून तो एक क्षणही फुकट घालवीत नाही. तो या वृद्ध रूपातच रात्रंदिवस जगभर घिरटया घालीत असतो."



या शब्दांत सुहासिनीने राक्षसाचे सर्व गुपित सांगून टाकले.

ते सर्व वर्णन तिघां भावंडांनी लक्षपूर्वक ऐकले. म्हणाले–"म्हणजे आमचे केवढे मोठे भाग्य! आम्ही तिघे त्याच्या दृष्टीस पडलो असतो तर आज त्याची शिकार कायमची संपली असती. बळी देण्याचे काम देखील आजच संपले असते."

"ते कसे काय?" चकित होऊन तिघां बहिणींनी विचारले.

"होय, त्याला हवी असलेली आणि तुमच्या रक्षणार्थ निघालेली आम्ही तिळी भावंडे आहोत. म्हणून मी तसे म्हटले." उदयन म्हणाला.

"तसे असेल तर तुम्ही तिघांनी फारच जास्त सावधगिरी बाळगली पाहिजे." सुहासिनीने त्यांना सावध करीत म्हटले.

"होय, सर्व गुपित आतां चांगले कळले असल्यामुळे यापुढे आम्ही ती काळजी बाळगूनच राहू. परंतु इकडून आपण सर्वांनी पसार व्हायचा मार्ग काढलाच पाहिजे नाही का? हा सर्व प्रदेश म्हणजे एक मायानगरी आहे, हे आम्हांला आतां चांगले कळले आहे. म्हणून इकडून बाहेर पडतांना आड येणारे अडथळे आणि अडचणी कशा स्वरूपाच्या असू शकतील, हे कळले तर बरे होणार आहे. त्याप्रमाणे विचार करावा लागेल." उदयन म्हणाला.

सुहासिनी म्हणाली–"सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे, तुम्ही त्या राक्षसाच्या दृष्टीस पडल्याशिवाय त्यांच्या भुयारातल्या घरात प्रवेश करू शकलात तर, अर्धेअधिक काम होऊ शकेल."

ते ऐकून उदयन म्हणाला–"एवढेच ना? ते काय मोठे कठीण आहे का? आमच्या जवळ जो भस्म आहेत त्यांच्या मदतीने आम्ही अदृश्य होऊ शकतो व पुन्हां प्रगट होऊ शकतो, हे तुम्हीं पाहिलेच आहे!"

ते ऐकून सुहासिनी म्हणाली–"अरे हो, ते तू सांगितलेस म्हणून बरे झाले. तुझी ती भस्मे आणि अंजने त्या राक्षसाच्या भूगृहात कुचकामाची आहेत. त्याचा महिमा काय तो बाहेर येथे आहे. म्हणून त्यांच्यावर विसंबून राहू नकोस."

ही गोष्ट कळल्यावर तिघां भावंडांचे धैर्य थोडे खचल्यासारखे झाले. काय उत्तर द्यावे हे त्यांना सुचेना. तेव्हां सुहासिनी म्हणाली–"असे घाबरून कसे चालेल? आपल्या बुद्धीचा उपयोग करून काहीतरी मार्ग काढलाच पाहिजे."

"विचार करायला तरी थोडासा अवधी लागणारच!" उदयन म्हणाला.

सुहासिनी म्हणाली–"होय, शांतपणे विचार केला पाहिजे."

(क्रमशः)



# प्रजावात्सल्य

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू जे काम करतोस ते कितीही नीच असले तरी त्यामुळे प्रजेचे हित होणार असेल तर ते चांगलेच म्हटले जाईल. याचे उदाहरण म्हणून मी तुला विजयची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून तो गोष्ट सांगू लागला.

मालवराजा मार्तंडवर्मा याच्या एकुलत्या एका मुलाचे नाव विजय होते. उपनयन संस्कार संपल्यानंतर मार्तंडवर्माने आपल्या मुलाला गुरुगृही विद्याभ्यासासाठी पाठविले. विजयने गुरुकुलात शस्त्रास्त्रविद्येबरोबर राजनीती, धर्मशास्त्र वगैरे विषयांचादेखील अभ्यास केला आणि यथासमयी राज्याचा



भार स्वतःच्या शिरावर घेण्यालायक झाला.

एके दिवशी गुरुकुलाच्या कुलपतीने विजयला जवळ बोलावून राज्याचा भार घेण्यास तयार होण्यास सांगितले. म्हणाला– "मुला! तू सर्व विद्या शिकून राज्याभिषेकास योग्य झाला आहेस. आतां तू स्वदेशी परत जा. प्रजेला सुखी कर. जो राजा आपल्या प्रजेला स्वतःच्या मुलासारखा वागवितो तोच खरा राजा होय. मी तुला आशीर्वाद देतो."

विजय गुरुचा निरोप घेऊन स्वदेशी निघाला. तो आपल्या देशाच्या लहान मोठ्या खेड्यापाड्यातून जात असतां त्याच्या नजरेस अगदी अनपेक्षित अशा गोष्टी येऊ लागल्या. त्याच्या वडिलांचा राज्यकारभार अत्याचारी व अन्यायी असल्याचे त्याला आढळून आले. राज्याचे अधिकारी लाच घेत आणि प्रजेला पिळून काढीत. खेड्यापाड्यातून राहणारे अधिकारी प्रजेत बंडखोर वृत्ती वाढत चाललेली पाहूनही कायद्याचे पालन करविण्यास कचरत होते. दंगेधोपे, चोरी व लुटालूट चालू होती. विजयला तो स्वतः युवराज असल्याचे सांगणे देखील धोक्याचे वाटू लागले. म्हणून त्याने स्वतःची ओळख दिली नाही व आपले नाव विजय या ऐवजी विनय म्हणून सांगू लागला. आपण राजाच्या पदरी नोकरी मिळावी म्हणून जात असल्याचे सांगून तो स्वतःचा जीव व अब्रू वांचवीत होता.

एक वृद्ध विजय भेटल्यावर त्याला न ओळखून म्हणाला–"बाबा रे! मालव वंशाचा लय जवळ येऊन ठेपला आहे. तुझ्यासारखे तरुण चंपारण्यातील सुधीर नावाच्या एका तरुण पुढाऱ्याच्या झेंड्याखाली एकत्र जमत आहेत. आज नाही तर उद्या सुधीरच देशाचा राजा होणार. तो मार्तंडवर्मावर स्वारीची तयारी करीत आहे. त्याचे विश्वासपात्र हेर राजवाड्यात शिरले आहेत. त्यांनी खूण केल्याबरोबर सुधीर स्वारी करून किल्ल्यावर आपला झेंडा फडकवणार."

आपल्या देशाची ही दुरवस्था पाहून विजय आश्चर्य चकित झाला. तो चंपारण्याची वाट विचारीत तेथे येऊन पोचला. तेथे त्याला दोन डोंगरांच्या मधील एका विस्तीर्ण खोऱ्यात एक महानगर दिसले. वास्तवीक ते सुमारे एक लाख तरुणांचे शिक्षण शिबिर होते. ही तरुण मंडळी गोर गरीब शेतकरी वर्गातली, हरिजनातली किंवा मागासलेल्या जातीतली होती आणि सुधीरला आपला राजा मानीत. त्या प्रदेशात राजाच्या अधिकाऱ्यांना प्रवेश नव्हता. राजाचा कोणी हेर शिरलाच तर त्याला जिवंत परत जाणे अशक्य होते. राजाने पाठविलेले सरदार शिपाई ठार झाले किंवा सुधीरला फितूर झाले.

मार्तंडवर्माने सैन्याची एक तुकडी सुधीरचे पारिपत्य करण्यास पाठविली. परंतु ती खिंडीतून पलीकडे जात असतां वरून दगडाचा वर्षाव झाल्याने ठार झाली.

विजयने चंपारण्य प्रदेशात पाऊल टाकताच चार तरुणांनी त्याला नाव गाव व त्या प्रदेशात येण्याचे कारण विचारले.

विजयने आपले नाव विनय व शस्त्रास्त्र विद्येत प्रवीण असल्याचे सांगून सुधीरच्या



सैन्यात प्रवेश मिळविण्यासाठी आलो असल्याचे सांगितले.

तेव्हां त्या तरुणांनी त्याला एका मोठ्या गुहेत नेले. तेथे एका उंच खडकावर उभा राहून सुधीर बोलत होता व तरुण मंडळी समोर बसून ऐकत होती. विजयदेखील शेजारी बसून ऐकू लागला.

"राजाचा अर्थ प्रजेचे रंजन करणारा,– प्रजेला सुखी करणारा, शत्रूपासून प्रजेला वांचविणारा. पण राजा मार्तंडवर्मा राज्यात चालू असलेली लाचलुचपत, चोरी व लुटालूट यांना आळा घालण्या ऐवजी त्यांच्याकडे दुर्लक्ष करतो आहे. प्रजेची फिकीर न करणाऱ्या विवेकशून्य राजाला राजा म्हणणे



पाप आहे. याचे बाबा व आजोबा राजे होते म्हणून तो स्वत:ला राजा म्हणतो आहे. त्याचे आजोबा राजघराण्यात जन्मले नाहीत. ते एक सामान्य सरदार होते. परंतु त्यांनी नालायक राजाला कैद करून त्याची गादी बळकावली होती. त्यांच्या मुलाने म्हणजे मार्तंडवर्माच्या वडिलांनी राज्यकारभार हाती घेतल्यावर प्रजेच्या हिताची अनेक कामे केली. या उलट मार्तंडवर्माने गादीवर आल्यापासून प्रजा हिताचे एकही काम केले नाही. तो स्वत: भोगविलासात बुडून गेला आहे आणि त्याचे अधिकारी प्रजेला पिळून काढीत आहेत. तेव्हां अशा राजाचा वध करणे प्रजेचे कर्तव्य आहे. प्रजा स्वत:च आपला राजा निवडील."

सुधीरचे हे विचार राजद्रोहाचे होते. परंतु त्याचा प्रत्येकशब्द विजयच्या हृदयावर उमटत होता. सुधीरचे भाषण संपल्यावर रानटी तरुणांनी विजयला त्याच्यासमोर उभे केले. विजयने सुधीरला आपले नाव विनय असल्याचे सांगून शस्त्रास्त्रविद्येत प्रवीण असल्याचे सांगितले. मालव देशात प्रवेश केल्यावर सुधीरची कीर्ती ऐकून त्याच्या सैन्यात भर्ती होण्याच्या हेतूने त्या प्रदेशात प्रवेश करीत असल्याचेही सांगितले.

सुधीरने विजयच्या शस्त्रास्त्रविद्येची परीक्षा घेऊन त्याची पाठ थोपटली व म्हणाला–"मी तुला आपल्या सैन्यात भर्ती करून घेऊन जबाबदारीच्या पदावर नेमतो. परंतु जर का तू कोठे कुचराई केलीस तर तुझा शिरच्छेद होईल!"

विजयने सुधीरच्या प्रत्येक आज्ञेचे पालन करण्याची प्रतिज्ञा केली.

सुधीरला लवकरच किल्ल्यातून खुणेचा शब्द मिळाला. त्याने आपल्या सैन्याच्या तुकड्या करून त्यांचे नायक नेमले व कोणत्या तुकडीने कोणत्या बाजूने किल्ल्यात प्रवेश करावयाचा याविषयी आज्ञा दिली. विजयला सुद्धा एका मोठ्या व हुशार तुकडीचा नायक नेमण्यात आले.

बंडखोर सैन्याने किल्ल्याला वेढा दिला. राजाचे सैन्य किल्ल्याच्या तटावर येऊन उभे राहिले. दोन्ही सैन्ये युद्धाला सज्ज झाली. काळोख पडू लागला. अर्ध्या रात्री विजयने आपल्या तुकडीच्या सैनिकांना जागे करून किल्ल्याच्या एका लहानशा चोर दरवाज्यावर थाप दिली.

आतून कोणी तरी विचारले–"कोण आहे?"

विजयने उत्तर दिले–"मी युवराज विजयवर्मा!"

दार उघडले गेले. आत एक शिपाई तलवार उपसून वार करायला तयार उभा होता.

"तलवार म्यानेत ठेव. मी आताच गुरुकुलातून परतलो. शत्रुसैन्याची फळी फोडून येणे अशक्य होते म्हणून या दरवाज्याने प्रवेश करायला आलो. मला महाराजांना तावडतोब भेटायचे आहे. माझ्याबरोबर एका सैनिकाला पाठव." विजयने एका श्वासात सर्व सांगितले.

दरवाज्याजवळ एका सैनिकाला पाहाऱ्यासाठी नेमून तो सैनिक स्वत: विजयबरोबर निघाला. राजवाड्याच्या रक्षणार्थ नेमलेल्या अधिकाऱ्याने विजयला ओळखले आणि त्याला नमस्कार करून त्याने विचारले–"युवराजाचे येणे केव्हां झाले?"



ते ऐकून व विजय युवराज असल्याची खात्री झाल्यावर पाहऱ्यावरचा शिपाई परतला.

आपला मुलगा गुरुकुलातून परतल्याचे कळल्यावर मार्तंडवर्मा उठला व प्रेमाने आपल्या मुलाला विचारले–"उद्या सकाळी बोलू. आताच काय गर्दी आहे?"

"तुम्ही विलंब करू नका. तावडतोब राज्य सोडून निघून जा. प्रजेने आपल्याविरुद्ध बंड केले आहे." विजयवर्माने वडिलांना बंडखोरांच्या शक्तीची कल्पना देऊन स्वत:च्या जीव वांचविण्यासाठी राजाने राज्य सोडून निघून जाणे किती आवश्यक आहे, हे सांगितले. परंतु



मार्तंडवर्मानं आपल्या संशयी स्वभावाला अनुसरून मुलाला विचारले–" तुला राज्य-लोभ झालेला दिसतो आहे?"

" तुमचे म्हणणे खरे असू शकेल, कदा-चित! परंतु प्रजेच्या हितासाठी मला आपल्या कर्तव्याचे पालन करावेच लाग-णार!" असे म्हणत त्याने आपल्या पित्याचा शिरच्छेद केला.

थोड्याच वेळाने ती गोष्ट अंतःपुरात पोचली. नंतर किल्ल्यात सर्वत्र ती बातमी पसरली. मंत्री व सेनापतींनी विजयवर्माला भेटून पुढील पावले कशी टाकायची या-विषयी विचारविनिमय केला. कोणी एकाने देखील विजयवर्माच्या कृत्याबद्दल नापसंती दर्शविली नाही. उलट कित्येकांनी विजय-वर्माच्या कर्तबगारीची स्तुती केली.

उजाडेपर्यंत विजयने मंत्र्यांना व सेना-पतीला आज्ञा देऊन सूर्योदयाच्या सुमारास स्वतःच्या राज्याभिषेकाची तयारी करविली.

राज्याभिषेक होताच विजयवर्माने आज्ञा केली की किल्ल्याला वेढा देऊन बसलेल्या बंडखोरांच्या पुढाऱ्यांशी संधी करून त्यांना आदरपूर्वक किल्ल्यात घेऊन यावे.

सर्व गोष्टी विजयच्या सल्ल्याप्रमाणे घडल्या. सुधीरने किल्ल्यात प्रवेश करून विनयच खरा युवराज असल्याचे कळल्या-वर व त्याने प्रजावात्सल्य मनात बाळगून शुद्ध हृदयाने बापाचा वध केला असल्याचे ओळखून त्याची पाठ थोपटली. म्हणाला– "तुझ्यासारख्या प्रजावत्सल राजाच्या कार-कीर्दीत प्रजा सुखी होईल."

विजयने सुधीरचे आभार मानले व त्या-च्यासारखा हुशार सेनापती असल्यावर राज्यावर कोणतेही संकट येणार नाही व राज्यकारभार सुरळीत चालेल असे सांगून सेनापती पद स्वीकारण्यास सुधीरला विन-विले. सुधीरने त्या गोष्टीस होकार दिला.

विजयवर्म्याला गुरुकुलात मिळालेले शिक्षण व सुधीरच्या सान्निध्यात त्याचा मनात घडून आलेला बदल यामुळे तो एक योग्य व प्रजावत्सल राजा झाला.

वेताळाने येथवर गोष्ट सांगून विचारले– "राजा! विजयवर्माच्या या विचित्र वागणु-कीचे कारण काय? गुरूचा आशीर्वाद की सुधीरच्या उपदेशाचा परिणाम? त्याच्या मनात पित्याविरुद्ध द्वेष होता काय? या प्रश्नांची समाधानकारक उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

राजा विक्रमादित्य म्हणाला–" राजा हा प्रजेचा भाग्यविधाता असतो. उपदेश करून राजाचे किंवा प्रजेचे मन पालटणे शक्य नाही व हित होणे शक्य नाही. राज्यकार-भार हा प्रजेच्या हितासाठी करावयाचा असतो ही गोष्ट प्रत्येक राजाला माहीत असते. परंतु राजाने आपल्या कर्तव्याचे पालन केले नाही तर त्याला शिक्षा करण्यासाठी काही उपाय किंवा मार्ग नसतो. म्हणून राजा सर्व अधिकार स्वतः-च्या हातात घेऊन त्यांचा दुरुपयोग करतो. परंतु सुधीरला भेटल्यावर विजयवर्म्याला ही गोष्ट कळली की प्रजेचे चांगले नेतृत्व करणारा कोणी असेल तर अशा अत्याचारी शासकाला दंड होऊ शकतो. विजयवर्म्याला ही गोष्ट कळल्यामुळे अत्याचारी शासक होण्याची कल्पना त्याच्या मनात येणे शक्य नव्हते. आता त्याने बापाचा वध का केला, हा प्रश्न उरतो. युद्ध झाल्यास त्याच्या बापाचा वध होणार हे त्याला चांगले माहीत होते. म्हणून त्याने राज्य सोडून निघून जाण्यास बापाला सांगितले. परंतु बापाला ती गोष्ट अमान्य होती. युद्धात पित्याचा मृत्यू झाला तर सुधीर राजा होईल हे विजयवर्म्याला माहीत होते. म्हणून युद्ध होऊच नये यासाठी तो पित्याचा वध करून राजा झाला व सुधीरला सेनापती करून त्याने त्यालाही वाचविले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्याने वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

( कल्पित )



# १५९. अत्याधुनिक ज्वालामुखी

जगात सहस्रावधी ज्वालामुखी आहेत. परंतु इतिहासात नमूद झालेले सहाच ज्वालामुखी आहेत व त्यातला सर्वांत नवीन ज्वालामुखी 'परिकुटिन' हा होय. २० फेब्रुवारी १९४३ या रोजी मेक्सिकोतल्या एका मक्याच्या शेतात हा ज्वालामुखी प्रगट झाला. त्या शेतात एक फार जुना खड्डा होता. त्यातून भूगर्भातले काही विचित्र आवाज ऐकू येत. २० फेब्रुवारीला त्या खड्ड्यातून दूरवर जमीन दुभंगून खड्डा झाल्याचे आढळून आले. त्या खड्ड्यातून धूळ व शिट्टीसारखे आवाज वर येऊ लागले. शेताच्या मालकाबरोबर आणखी तिघांजणांनी ही गोष्ट पाहिली. लोक गंमत बघायला जमले आणि वैज्ञानिकसुद्धा तेथे आले.

लवकरच शेतात एक विवर झाले आणि त्यातून मुरबाळीला लालबुंद निखाऱ्यासारखे दगड व लाव्हा निघू लागला. भूकंप, गडगडणे व विजा चमकण्यासारखा प्रकार होऊ लागला. त्या दिवशी रात्री १० वाजेपर्यंत ३० फूट उंच देवळाच्या शिखरासारखे टोक वर आले. दुसऱ्या दिवशी ते ५० फूट उंच झाले आणि २६ तारखेपर्यंत ते २०० फुटाचे होऊन हळूहळू १५०० फूट उंचीचे होऊ लागले. त्यातून निघालेल्या लाव्ह्याने दोन खेडी, शेते आणि जंगले उध्वस्त झाली.





# कथाकथनाचा फायदा

एका गावात कृष्णशर्मा नावाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याने वेद, शास्त्र व पुराणे यांचा चांगला अभ्यास केला होता. तसा तो श्रीमंतही होता, म्हणून त्याला कधी द्रव्य संपादनाची फिकीर राहिली नाही. दररोज संध्याकाळी त्याच्या बैठकीत गावातली वडीलधारी मंडळी जमत. कृष्णशर्मा प्रसंगानुसार चांगल्या गोष्टी सांगून करमणुकीबरोबर अनेक अनुभवाच्या गोष्टी त्यांना सांगे.

कृष्णशर्माच्या मुलाचे नाव वेदशर्मा होते. तोदेखील विद्वान होता. परंतु वडिलांची ही बैठक त्याला आवडत नसे.

एकदा त्याने आपल्या वडिलांना विचारले—"तुमच्याजवळ ज्ञानाचा एवढा मोठा ठेवा आहे. परंतु गप्पा गोष्टीत तुम्ही आपले ज्ञान असे व्यर्थ का घालविता ?

कृष्णशर्मा म्हणाला—"हे पहा, एका लहानशा नीतिकथेच्या आधारे आपण अनेक गोष्टी सहजी शिकवू शकतो, आपल्याशी बोलणाऱ्या माणसाची चूक नकळत दाखवू शकतो, गुंतागुंतीचे प्रश्न सोडवू शकतो, करमणूक करू शकतो आणि बुद्धीला चालना देऊ शकतो." परंतु वेदशर्माच्या मनाचे समाधान झाले नाही.

एकदा वेदशर्माला राज्याच्या कामासाठी समुद्रपार मयूरदेशात जावे लागले. कृष्णशर्माला मुलाने इतक्या दूरचा प्रवास एकट्याने करणे आवडले नाही. म्हणून तो देखील त्याच्या बरोबर प्रवासाला निघाला.

मयूरदेशात वेदशर्माचे काम फक्त एक दोन दिवसात संपले. त्याच्या आदरार्थ त्या देशातल्या लोकांनी एक मेजवानी ठेवली. त्या देशाच्या राजाला कृष्णशर्मा व वेदशर्मा शाकाहारी आहेत व दारूला हात



लावीत नाहीत, हे चांगले माहीत होते. म्हणून त्याने शाकाहारी मेजवानीची व्यवस्थाच केली होती.

परंतु मयूरदेशाच्या दरबारी विदूषक दोघांची थट्टा उडविण्याचे ठरवून वेदशर्माला जाऊन भेटला आणि निरनिराळ्या मादक पदार्थांची नावे सांगून त्याला कोणती दारू आवडते, विचारले.

वेदशर्मा ते ऐकून चकितच झाला व म्हणाला–"मला यांपैकी एकाही वस्तूची माहितीसुद्धां नाही.

महाराज हसले नाहीत, परंतु इतर लोक वेदशर्माच्या अज्ञानाकडे पाहून हसले. ते पाहून कृष्णशर्मा विदूषकाला म्हणाला–"तुम्ही थट्टेत हे म्हटले ते ऐकून मला बगळ्यांनी मागे केलेली थट्टा आठवते."

"बगळ्यांनी केलेली थट्टा? ती कशी काय बुवा?" विदूषकाने विचारले.

कृष्णशर्मा बोलू लागला–"तशी फार मोठी थट्टा नव्हती ती. एकदां मानस सरोवरातला एक हंस वाट चुकून बगळ्यांच्या कळपाच्या जागी उतरला. बगळ्यांनी त्याला अनेक प्रश्न विचारले व हंसाने पुष्कळ सहनशक्ती दाखवून सर्व प्रश्नांची उत्तरे दिली. तेव्हां बगळ्यांनी विचारले–'तुम्ही खाता काय?' हंस म्हणाला–'मी कोमल कमलनाळ खातो.' बगळ्यांनी त्याला थट्टेत विचारले–'म्हणजे तुम्ही गोगलगाई व खेकडे नाही का खात?' हंस म्हणाला–'मला नाही बुवा माहीत ते काय आहे ते!' ते ऐकून सर्व बगळे हंसू लागले."

तेव्हां राजा व तेथे हजर असलेले सर्व दरबारी हसू लागले. विदूषकाचा चेहरा एकदम खाली पडला.

मेजवानी संपल्यावर विदूषकाने वेदशर्मा व कृष्णशर्मा दोघांना आपल्या घरी जेवायला बोलाविले. त्या दिवशी रात्री दोघे जेवायला गेले. विदूषकाने पाहुण्यांबरोबर जेवायला आपल्या इतर मित्रमंडळीसही बोलाविले होते. सर्वांबरोबर पितापुत्रांना गोमांस वाढले. कृष्णशर्माने त्या गोष्टीबद्दल आपली नाराजी दर्शविली.

विदूषकाने आपली चूक मान्य करीत म्हटले–"मी देखील या देशात येण्यापूर्वी दारू किंवा मांस यांना हात लावीत नसे. परंतु येथे कायमचे रहायचे ठरल्यावर देशकाल परिस्थितीप्रमाणे मी आपली संवय बदलली. तेव्हां तुम्ही दोघांनी देशकाल परिस्थिती पाहून तसे वागायला काय हरकत आहे?"

तेव्हां सर्वजण कृष्णशर्मा काय उत्तर देतो हे उत्सुकतेने पाहू लागले.

कृष्णशर्मा म्हणाला–"संवय बदलणे हे माणसामाणसाच्या स्वभावावर व मानसिक पातळीवर अवलंबून असते. पूर्वी एकदां एक सिंह गुरांच्या गोठ्यात अडकला. गोठ्यात गुरें नव्हती, पण गवत खूप होते. सिंहाला गोठ्याबाहेर यायला वाटच नव्हती. दोन आठवडे झाले तरी त्याने गवत खाल्ले नाही. मांस मिळेल याची वाट पाहात राहला."

ते ऐकून विदूषकाला मुस्कुटात बसल्यासारखे झाले. त्याने कृष्णशर्माची क्षमा मागितली.

तेव्हां वेदशर्माला त्याचे वडील गोष्टी गोष्टीतकशी कान उघाडणी करून आपला कार्यभाग साधून घेतात हे कळले. स्वदेशी परत येत असतां तो वडिलांना म्हणाला–"बाबा! तुम्ही ज्या गोष्टी सांगितल्या त्या मलादेखील माहीत होत्या. परंतु



समयानुकूल त्यांचा उपयोग कसा करून घ्यायचा, मला माहीत नव्हते. गोष्टी गोष्टीत आपल्याशी बोलणारा घमेंडखोर असेल तर त्याची शेखी उतरवून त्याला बोध करून देता येतो. तुम्ही दररोज हेच काम करता हे आतां मला समजले. परंतु माझ्यासमोर एक प्रश्न आहे. दरबारात माझ्या हाताखाली काम करणारे अनेक लोक आहेत. मी त्या सर्वांना प्रेमाने वागवितो. परंतु या गोष्टीस ते माझी कमी लायकी लेखतात. म्हणून मी त्यांच्याशी थोडी कठोर वागणूक ठेवायला सुरवात केली. आतां त्यांना माझ्या वाटेस जाण्याची हिंमत राहली नाही. परंतु माझा आदर कमी झाला. त्यांच्या मनात आपल्याविषयी आदर उत्पन्न व्हावा असे मला वाटते. माझी भीती त्यांच्या मनात राहू नये."

कृष्णशर्मा स्मित करून म्हणाला–"हीच गोष्ट एका सांपाच्या आयुष्यात एकदा घडली. त्याने एका ऋषीला विचारले–"मुनिवर्य! लोकांच्या मनात माझ्याविषयी घृणा किंवा भय राहणार नाही, यासाठी काही तरी उपाय सांगतां का?

मुनी म्हणाले–"तू कधी कोणाचे नुकसान करू नकोस." त्या दिवसापासून साप साधूसारखा वागू लागला. लोकांना सांपाचा तो स्वभाव कळला. आतां लहान मुलेसुद्धां त्या सापाला त्रास देऊ लागली. त्या सांपाची ती दुर्गत पाहून मुनीला दया आली व ते म्हणाले–"अरे, तू माझ्या उपदेशाचा अर्थ चुकीचा लावलास! मी तुला कोणाचे नुकसान करू नकोस, एवढेच सांगितले होते. तू 'फूत्कार' सोडू नकोस असे नव्हते सांगितले. कोणी तुला त्रास देऊ लागला तर तू फूत्कार सोडून त्यांना त्यांची मर्यादा पाळायला लाव."

तेव्हां वेदशर्माला कळले की त्याला त्याच्या हाताखाली काम करणाऱ्यांना कसे वागविले पाहिजे. त्या दिवसापासून तो लहानसहान गोष्टी सांगून किंवा दृष्टांत देऊन आपल्या हाताखालच्या लोकांची कानउघाडणी करू लागला. हळूहळू हाताखालचे सर्व लोक सरळ वागू लागले.





# जुळ्या राजकन्या

कर्मपूरचे महाराज बोपदेव यांना फक्त दोनच मुली होत्या. दोघी जुळ्या मुली होत्या. त्यांच्यापैकी श्वेता गोरी होती आणि दुसरी कृष्णा काळी होती. दोघींच्या रंगात फरक फार होता, परंतु नाकी डोळी दोघी अगदी सारख्या म्हणजे एका साच्यातून काढलेल्या जणुकाही मूर्तीच होत्या. दोघी लाडात वाढल्या होत्या. त्यांना नुकतेच दहावे वर्ष लागले होते.

एके दिवशी श्वेता बगिच्यात हिंडत होती तेव्हां एका झाडावरून पक्ष्यांचे घरटे खाली पडले. दोघी मुली घाबरून गेल्या आणि रडू लागल्या. त्यांचे रडणं ऐकून दासी धावत आल्या. त्यांना ते घरटे दिसले. त्यात दोन अंडी होती. दासींनी अंड्यासकट घरटे एका झुडपात टाकून दिले आणि राजकन्यांना घेऊन राजवाड्यात निघून गेल्या. परंतु दोघी मुलींनी धास्ती घेतली आणि त्यांना ताप आला. औषधपाणी करूनही ताप उतरला नाही.

एके दिवशी राजाला एक विचित्र स्वप्न पडले. राजाला स्वप्नात एक पंचरंगी पक्षी दिसला. तो माणसासारखा बोलू लागला. म्हणाला–"राजा, मी देवपक्षी आहे. मी तुझ्या बगिच्यातल्या झाडावर घरटे बांधून त्यात अंडी घातली होती. ती अंडी उबवून त्यातले पक्षी तुझ्या दोघां मुलींना भेट देणार होतो. परंतु तुझ्या मूर्ख दासींनी ती अंडी मोगरीच्या झुडपात टाकून दिली."

राजा स्वप्नातच म्हणाला–"मी ती अंडी मागवून देतो."

"ते आतां शक्य नाही. ती अंडी फुटली आणि दोन्ही पक्षी उडून गेले. दोन्ही पक्षी आतां तुझ्या राज्याच्या पश्चिमेकडील पर्वत शिखरावर आहेत. तू त्या शिखरावर जाऊन ते पक्षी घेऊन ये. त्यांना स्वादिष्ट



दाणा घाल. ते पक्षी तुझ्या सेवेवर खूष होऊन तुला दोन अंडी देतील. ती अंडी पांच वर्षांनी सुंदर रत्ने होतील. त्या पक्ष्यांना तू घेऊन आलास तर तुझ्या मुलींचा ताप उतरेल." तो पंचरंगी पक्षी स्वप्नात म्हणाला.

राजा म्हणाला–"परंतु त्या शिखरावर कसे काय चढायचे, अशक्यच आहे. खांबा-सारखे सरळ आहे ते. आजपर्यंत त्यावर कोणी चढला नसेल."

"मला हे माहीत नाही की तुला चढता येईल की नाही. परंतु तू त्या पक्ष्यांना तेथून धरून आणीपर्यंत तुझ्या मुलींचा ताप उतरणे शक्य नाही. एवढे मात्र नक्की मला माहीत आहे. आणखी एक गोष्ट सांगतो. अंड्यांची रत्ने होतील तेव्हां त्यांपैकी एक हिरा असेल व दुसरे गुलाबी रत्न. श्वेताला गुलाबी रत्न हातात घ्यावे लागेल आणि कृष्णाला हिरा घ्यावा लागेल. तसे त्यांनी केले नाहीतर दोघींच्या जिवाला धोका होण्याची शक्यता आहे." असे सांगून तो पक्षी अदृश्य झाला.

राजा बोपदेव जागा झाला. त्याने राणीला स्वप्नातल्या पक्ष्याची गोष्ट सांगितली व तिचा सल्ला विचारला.

दुसऱ्या दिवशी राजाने आपल्या मंत्र्यांना बोलावून त्यांना स्वप्नातल्या पक्ष्याने जे सांगितले होते ते सांगितले. परंतु एकाही मंत्र्याला त्या स्वप्नाचा उलगडा होईना. म्हणून राजाने देवळात जाऊन देवाला साकडे घातले.

इतक्यात देवाच्या मूर्तीखालून एक घोरपड आली आणि भिंतीवर चढू लागली. थोड्या वेळाने ती खाली उतरली आणि राजाजवळ येऊन बसली.

ते पाहून राजपुरोहित म्हणाला–"महा-राज! देवाने आपल्यावर कृपा करून आपल्या मदतीसाठी एक घोरपड पाठविली आहे."

"ही काय मला मदत करणार?" राजाने विचारले.

तिने स्वतःच नाही का भिंतीवर चढून काय मदत करू शकेल हे सुचविले? किल्ल्याच्या भिंतीवर चढून जायला घोर-पडीची मदत लागते. त्याशिवाय तटावर चढतांच येणार नाही. तिच्या कंबरेला दोर बांधून तिला वर टाकावी आणि आपण धरून वर चढून जावे. पर्वत शिखरावर चढायला दुसरा मार्गच नाही." राजपुरोहित म्हणाला.

राजा त्या गोष्टीस कबूल झाला. परंतु अधिक सावधगिरी बाळगण्याच्या हेतूने एक जाडजूड जाळे खाली अंथरून ठेवण्यात आले. घोरपडीला पोटभर खायला घालण्यात आले. राजा स्वतःच्या कंबरेला तलवार व पाठीला न्याहारी व पाणी बांधून घेऊन त्या डोंगराच्या दिशेने निघाला.

त्याने शिखरानजीक पोचल्यावर घोर-पडीच्या कंबरेला दोर बांधला व तिला शिखरावर फेकून वर चढून जाण्यास खूण केली. ती वर चढून गेली व एका सोयीच्या खडकाला घट्ट धरून बसली. दोघां सैनिकांनी दोरी घट्ट आहे की नाही या गोष्टीची थोडे अंतर चढून खात्री करून घेतली. दोरी बळकट असल्याची व घोरपडीने आपली पकड ढिली न केल्याची खात्री झाल्यावर राजा देवाचे नाव घेऊन दोर पकडून शिखरावर चढून गेला. खाली जाडजूड जाळे असूनही स्वतः राणी व राज-परिवारातील इतर मंडळी भयभीत होऊन पहात उभी होती.





राजा शिखरावर पोचला तोंपर्यंत काळोख पडू लागला होता. सुदैवाने ती चांदणी रात्र होती. राजाने घोरपडीच्या कंबरेला बांधलेला दोर सोडून तो एका खडकाला बांधला. चांदण्या रात्री राजाला एक लहान ठेंगणे झाड दिसले. राजाजवळ जाऊन पाहतो तर दोन पक्षी झाडावर बसलेले होते. त्या झाडाच्या बुंधाला विळखा घालून एक दोन फडांचा नाग बसला होता. राजाला पाहताच तो साप राजा येत होता त्या बाजूला येऊ लागला. राजाने तल-वारीच्या एका वाराने सापाला ठार केले.

बोपदेव पक्ष्यांना धरून घोरपडीबरोबर खाली उतरून आला तेव्हा दरबार ...

होते. घोरपडीला खाली जमिनीवर ठेवल्या-बरोबर विचित्रपणे तिला पंख फुटले व ती आकाशात उडून अदृश्य झाली. पक्ष्यां-बरोबर राजाने राजवाड्यात प्रवेश केल्या-बरोबर राजकन्यांचा ताप उतरला. दुसऱ्या दिवशी पक्ष्यांनी दोन अंडी घातली आणि ते उडून गेले.

राजाने ती अंडी एका चांदीच्या डबीत ठेवून ती एका लोखंडी पेटीत ठेवून दिली.

हळूहळू पांच वर्षे लोटली. श्वेता व कृष्णाला पंधरावे वर्ष लागले. राजाने ती लोखंडी पेटी उघडून चांदीची डबी उघडली आणि आश्चर्यचकित होऊन पहात राहिला. अंड्याच्या जागी दोन रत्ने होती. एक शुभ्र चकाकणारा हिरा होता व एक गुलाबी रत्न.

राजाने ज्या वेळी ती रत्ने बाहेर काढली त्या वेळी राजकन्या तेथे होत्या.

राजा आपल्या मुलींना म्हणाला—"बेटा! ही दोन्ही रत्ने तुमच्यासाठीच तर आहेत. ही घेतल्यावर तुमचे भाग्य पालटेल. कोणते रत्न कोणी घ्यायचे हा विचार तुम्ही मनातून काढून टाका. आज संध्याकाळी तुम्हांला दोघींना पांढऱ्या चाफ्याच्या फुल-दाणीत ठेवून मी देईन. तुम्ही दररोज ती पुढे पहात रहा व तुम्हांला आपोआप कोणी कोणते रत्न घ्यावयाचे आहे हे कळेल."

त्याच दिवशी राजाने आपला दरबारी जादुगार मायापाल याच्याकडे गुप्तपणे निरोप पाठवून त्याला बोलाविले आणि म्हणाला—"मायापाल! रत्ने आली आहेत आतां तू आपला जादूचा प्रयोग केला पाहिजेस.

"महाराज! ते कार्य आपल्याच हातून घडले पाहिजे. ते तसे कठीण नाही. श्वेताला द्यायच्या फुलदाणीत थोडी तांबडी-शाई पाण्यात घालून पांढऱ्या चाफ्याची देठे त्या पाण्यात बुडवून ठेवावीत. हळूहळू फुलाच्या पाकळ्यांवर आपोआप तांबडी झांक येईल. या प्रयोगाचे वर्णन मी पहिल्याने सांगून टाकल्याने तुम्हांला करा-यला अवघड वाटणार नाही." मायापालने थोडक्यात प्रयोग वर्णन करून समजावून सांगितला.

राजा म्हणाला—"तू सांगितलेस ते ठीक झाले, परंतु जे करायचे ते सर्व तुच कर." दोघे परस्परांकडे पाहून स्मित करू लागले.

त्या दिवशी रात्री श्वेताला व कृष्णाला पांढऱ्या चाफ्याची प्रत्येकी एकएक फुल-दाणी मिळाली. फुलदाण्यांवर त्यांची नावे लिहून ठेवण्यात आली. दोघींनी आपापली फुलदाणी नेऊन आपापल्या निजायच्या खोलीत ठेवली आणि फुलांवर लक्ष ठेवले. कृष्णाला दिलेल्या फुलदाणीतली फुले पांढ-रीच राहली, परंतु श्वेताला दिलेल्या फुल-दाणीतल्या फुलांचा रंग पालटून दुसऱ्या दिवशी तांबूस दिसू लागला.

ते कळल्यावर राजा बोपदेव आनंदाने आपल्या मुलींना येऊन भेटला व म्हणाला—"बेटा! तुम्हांला कळले ना की तुमच्या वांट्याचे रत्न कोणते आहे ते." असे सांगून राजाने तबकात ठेवलेली रत्ने दोघींना दाखविली. श्वेताने गुलाबी रंगाचे रत्न उचलले आणि कृष्णाने पांढरा हिरा घेतला.

मायापालला राजाकडून चांगले इनाम मिळाले.














# लोभ भोवला

विठ्ठल व रखमाबाई नावाचें एक मध्यम वर्गीय जोडपे एका गावी रहात असे. विठ्ठल खाण्यापिण्यात मन मोकळे-पणाने खर्च करी, परंतु कपड्याला कमी खर्च करण्यात त्याला भूषण वाटे. त्याची बायको अगदी विरुद्ध होती. ती म्हणे खाणेपिणे घरातल्या घरात असते. पोट-भरण्या पुरेसे खावे; पक्वान्ने आणि स्वादिष्ट भोजनात पैसे उडविणे चांगले नाही. आपण चारचौघात हिंडतो फिरतो, म्हणून चांगले कपडे घालवावे. परंतु नवऱ्याने तिला लुगड्यावर कधी जास्त खर्च करू दिला नाही. म्हणून ती माहेरी जाई तेव्हां, चांगल्या चांगल्या साड्या घेऊन येई. विठ्ठल मात्र साधे कपडे वापरी. फाटले तर ठिगळ लावून वापरी.

विठ्ठलचे एक धोतर इतके जुने झाले होते की त्याला ठिगळे लावूनच वापरावे लागे. नवीन धोतर घ्यायला बायकोने किती सांगितले, परंतु त्याने तिच्या बोल-ण्याकडे दुर्लक्ष केले. त्या धोतरावरून दर-रोज दोघांत भांडणे होत. ती म्हणे–"तुम्ही हे फाटके कपडे घालून जातां आणि माझ्या मैत्रिणी मला हसतात."

एक दिवशी विठ्ठल आंघोळ करून धोतर वाळत घालायला मागच्या दारी गेला तेव्हां रखमाबाई म्हणाली–"माझी अक्का आज उद्या येणार आहे, धोतराची ही चाळणी फेकून देऊन नवे काढा पेटीतून. नंतर माझी मण्याची माळ तुटली आहे ती बाजारात जाऊन गुंफवून घेऊन या."

विठ्ठलने बायकोच्या बोलण्याकडे सवयी-प्रमाणे दुर्लक्ष केले. म्हणाला–"तूच जा, हे नाही माझे काम!"

रखमाबाईला आला राग. तिने मागच्या पडवीत वाळत घातलेले धोतर उचलले आणि परसात फेकून दिले. विठ्ठलने बोल-ल्याशिवाय परसातून धोतर आणून धुवून वाळत घातले आणि दुकानात निघून गेला. रखमाबाई विचार करू लागली की अक्का येण्यापूर्वी हे धोतर काय वाटेल ते करून नाहीसे करायचे.

तिला रस्त्यावरून एक भिकारी जाताना दिसला. रखमाबाईने त्याला बोलावून धोतर दिले. भिकारी ते फाटके धोतर पाहून म्हणाला–"बाई! हे धोतर तुम्हीच ठेवून घ्या. नेसण्यासारखं असतं, तर घेतलं असतं."

रखमाबाईने त्याच्या हातावर एक रुपया ठेवला म्हणाली–"हा घे रुपया, हे धोतर पण घेऊन जा." भिकाऱ्याला रुपयाबरोबर धोतर न्यावे लागले.

त्या दिवशी विठ्ठल दुकानातून घरी परत येत असतां कर्मधर्मसंयोगाने समोर तो भिकारी त्याला दिसला. त्याच्या खांद्यावर विठ्ठलचे ते धोतर होते. विठ्ठलने दोन शिव्या त्याला हासडून विचारले–"कोठे रे घेऊन चाललास हे धोतर चोरून?"

"अहो, चोरून नाही आणलं मी, एका बाईने हे धोतर घेऊन जायला मला एक रुपया देखील बक्षिस दिला." असे म्हणत भिकारी निघून गेला.

विठ्ठल रागारागाने घरी निघाला. त्याला वाटेत देवाला निघालेली बायको भेटली.



त्याने मोठ्याने ओरडून विचारले–"काय ग ए! तू माझे धोतर दान करून टाकलेस का ग?"

"होय, पीडा गेली एकदाची. म्हणून देवासमोर नारळ फोडायला जाते आहे!" असे म्हणत रखमाबाई पुढे जाऊ लागली.

विठ्ठलने विचार केला, काय वाटेल ते झाले तरी ते धोतर परत मिळवायचे. तो घरी गेला. बायकोने गुंफवून माणिक्यांची माळ आणायला सांगितली होती ती घेतली आणि शेजारणीच्या घरी जाऊन म्हणाला–"वहिनी! रखमाबाई आल्यावर माणिक्यांची माळ गुंफवून आणायला घेऊन गेलो, म्हणून सांगता का?"

विठ्ठल भिकाऱ्याची चवकशी करीत करीत गावाच्या टोकाला गेला. तेथे वडाच्या पारावर तो रहातो, हे त्याला कोणीतरी सांगितले, परंतु तो पोचला त्या वेळेपर्यंत भिकारी आला नव्हता. तेथे बसलेल्या एका आंधळीच्या बाजूला फाटके कपडे कोंबून ठेवलेली एक पिशवी होती. तिच्या हातात चिंचेची एक काठी होती. विठ्ठल जवळ आल्याची चाहूल ऐकून तिने त्याच्या पायावर काठी मारून विचारले–''कोण रे तू, लबाड कोठला? मला आंधळीला पाहून चोरी करायला धावलास होय?''

विठ्ठल 'ओय ओय' करीत म्हणाला–''मी तुझ्या नवऱ्याला भेटायला आलो आहे!''

''[illegible] काळोख पडल्यावर ये!'' आंधळी म्हणाला.

विठ्ठलने निघून जाण्याचे सोंग केले आणि पाठीमागून येऊन झाडावर चढून बसला.

काळोख पडल्यावर भिकारी आला. ''हे अपशकुनी धोतर कोणत्या कुमुहूर्तावर हातात आले, कोण जाणे, आज खायला काही मिळाले नाही.'' असे म्हणत त्याने विठ्ठलचे धोतर फाटक्या कापडयांच्या पिशवीत खुपसून ठेवले. तो म्हणाला ते ऐकून विठ्ठलच्या मनात कसंसंच झाले.

त्यानंतर भिकाऱ्याने भात उकडला आणि दोघां नवराबायकोंनी खाऊन घेतले. मध्यरात्र उलटेपर्यंत बोलत, गात गुणगुणत दोघे झोपले. दोघे घोरू लागलेले पाहून विठ्ठल खाली उतरू लागला. नेमके त्याच वेळी दोघे चोर कोठून तरी आले आणि जवळपास कोणी नाही असे समजून परस्परांशी गुप्तपणे बोलू लागले.

''हे कोठे लपवायचे बुवा?'' एकजण म्हणाला.

''त्या भिकाऱ्याची ती फाटक्या कपडयांची पिशवी आहे ना, त्या पिशवीत ठेवू या. हिवाळा येईपर्यंत हे लोक ते कपडे बाहेर काढणार नाहीत.'' दुसरा म्हणाला. त्यानंतर दोघे चोर काळोखात झाडाखाली आले. भिकाऱ्याच्या पिशवीत त्यांनी काहीतरी ठेवले आणि निघून गेले.

चोरांना जाते वेळी ऐकून म्हातारी जागी झाली आणि ओरडली–''कोण रे तुम्ही चोरांनो!'' असे म्हणत तिने आपली पिशवी चाचपून पाहिली आणि उशाला घेऊन झोपली. भिकाऱ्यांच्या पिशवीत आपल्या धोतराबरोबर चोरांनी आणलेला मालदेखील असल्याचे ओळखून विठ्ठलने विचार केला, ती पिशवी उडवली पाहिजे.

उजाडताच तो झाडावरून उतरला आणि भिकाऱ्याला म्हणाला–''तुझ्याजवळ ती फाटक्या कपडयांची पिशवी आहे, देतोस का? मला फाटक्या कपडयांची गरज आहे. म्हणून आलो येथवर धावत.''

''नाही बुवा, मी कां देऊ?'' भिकारी म्हणाला.











“त्याच्या बदल मी तुला ही माणिक्यांची पिशवी देतो.” विठ्ठल म्हणाला.

म्हातारीने चाचपून ती पिशवी पाहिली. तिला ती आवडली. नवऱ्याला म्हणाली– “देऊन टाका, ती पिशवी आणि ही ठेवून घेऊ.”

विठ्ठल खुशीखुशीतती फाटक्या कपड्याची पिशवी घेऊन घरी गेला.

“रात्रभर कोठे गेला होता हो? माझी माणिक्यांची पिशवी कोठे ती दिसत नाही?” रखमाबाई विचारले.

“तुझी माणिक्यांची पिशवी देऊन ही घेऊन आलो.” असे म्हणत विठ्ठलने ती फाटक्या कपड्यांची पिशवी दाखविली.

“तुमचे डोके ठिकाणावर आहे का? अनर्थच केलात की! माझी माणिक्यांची माळ तुटली होती ती गुंफवून आणायला मी सांगितले होते आणि या पिशवीत सर्व माणिके भरून ठेवले होते. तुम्ही ती पिशवी देऊन ही दरिद्री पिशवी घेऊन आलात? नशिबी भोक लागले आहे तुमच्या?” असे म्हणत रखमाबाईने नवऱ्याच्या हातातली ती पिशवी हिसकावून घेऊन बाहेर गटारात टाकली.

पिशवी खाली पडल्याबरोबर फाटली आणि फाटक्या कपड्यांबरोबर त्यांत चोरांनी लपवून ठेवलेला चाकू बाहेर येऊन पडला. चाकू रक्ताने माखलेला होता. चोरांनी रात्री कोणावर तरी सुरा चालविला होता आणि त्या पिशवीत लपवून ठेवला होता.

गल्लीत गर्दी जमली. पोलीस शिपाई गर्दी कसली म्हणून पहायला आले आणि रक्ताने माखलेला चाकू पाहून तो चाकू, फाटके कपडे व ती पिशवी उचलून विठ्ठलला कैद करून घेऊन गेले.

त्यानंतर विठ्ठलला स्वतः निर्दोष असल्याची गोष्ट साबित करण्यासाठी पुष्कळ पैसे खर्च करावे लागले. त्याला जे कष्ट सहन करावे लागले, ते त्याचे त्यालाच ठाऊक!





# पाप की पुण्य

ताम्रलिप्ती नामक नगरीत धनगुप्त नावाचा एक जव्हेरी रहात असे. खोटे कृत्रिम हिरे, खरे सांगून विकत असे आणि त्याने खूप धनार्जन केले. खऱ्या हिऱ्यांसारखे दिसणारे काचेचे खडे तो परदेशातून विकत घेऊन येई. परंतु तो सावधपणे व्यापार करीत असल्यामुळे कधी त्याची लबाडी उघडकीला आली नाही.

तो व्यापारी चांचेगिरी करी. तो आपल्या नोकरांकरवी जहाजे व गलबते लुटून स्वतःचा माल चोरांनी लुटून नेल्याचे राजाच्या शिपायांना फसवी. इतर व्यापाऱ्यांना वाटे की चोरांनी त्यालादेखील लुटले आहे व ते सहानुभूती दाखवीत.

एके दिवशी तो व्यापारी जहाजातून उतरून चोरीचा माल घेऊन घरी परत येत होता, तेव्हां वाटेत त्याला एक साधू भेटला. त्या साधूने व्यापाऱ्याला खालपासून वरपर्यंत पाहिले व म्हणाला– “शेटजी! आशीर्वाद. काचेच्या भांड्यातले रंगीत पाणी जसे दिसते तसे तुमचे पाप बाहेर झळकते आहे. वेळेवर सावध झाला नाहीत तर ज्वालामुखीसारखा स्फोट होईल.”

ते ऐकून व्यापाऱ्याच्या हृदयाचा थरकांप उडाला. तो साधू कोणी सिद्धपुरुष असावा, असे त्या त्याला वाटले. त्याने त्या साधूला विचारले–“बुवा! काय केले म्हणजे पापातून सुटका मिळेल हो?”

“ते तू केलेल्या पापाच्या स्वरूपावरून ठरले. तरी तू गोदान, भूदान, अन्नदान वगैरे करून पहा. तो साधू म्हणाला.

“बुवा! तुम्ही म्हणतां ते मान्य आहे, परंतु मला व्यापारानिमित्त परदेशात रहावे लागते. दानपुण्य करायला वेळ केव्हां व कसा काढायचा आपण उपाय सुचवाल का?” व्यापाऱ्याने साधूला विचारले.



साधू म्हणाला–"ते काम तुझ्या बायकोनं केले तरी चालेल.

व्यापाऱ्याने घरी गेल्यावर बायकोला सर्व गोष्टी समजावून सांगितल्या व म्हणाला–"उद्यापासून तू माझ्या नावाने दानधर्म कर. कधी गोदान, कधी अन्नदान तर कधी भूदान. कितीही खर्च झाला तरी हरकत नाही. मला वेळ मिळत नाही, म्हणून तुझ्यावर ही जबाबदारी टाकीत आहे."

नवऱ्याच्या तोंडून ते शब्द ऐकून व्यापाऱ्याच्या बायकोला आश्चर्याबरोबर आनंदही झाला! इच्छा असूनही तिला मन मारून रहावे लागत असे. परंतु आता नवऱ्याने स्वत: होऊन सांगितल्यावर तिला साहजिकच आनंद झाला. तरी तिने विचारले–"पण एकदम हा विचार तुमच्या मनात कसा काय आला?"

"थोडक्यात असे झाले की एका साधूने मी व्यापारात लबाडी करतो हे सांगून पापातून मुक्त होण्याचा हा मार्ग सुचविला. नंतर त्याने असे बजावून सांगितले की मी वेळीच दानधर्म केला नाही तर पापाचे खापर एकदम केव्हा फुटेल हे सांगता येत नाही. परंतु मी, मला फुरसत मिळत नाही हे सांगितल्यावर त्याने तुझ्या हातून दानधर्म करण्यास सांगितले. तेव्हा तू मनात संकोच करण्याचे मुळीच कारण नाही." व्यापाऱ्याने बायकोला सर्व गोष्टी नीट समजावून सांगितल्या.

व्यापाऱ्याच्या बायकोने मनातल्या मनात देवाला नमस्कार करून त्या साधूचे आभार मानले. बायकोला आनंद झालेला पाहून वस्तुस्थिती जास्त चांगली समजावून देण्याच्या हेतूने व्यापारी म्हणाला–"परंतु एक गोष्ट लक्षात ठेव. घरात अन्नसत्र सुरू करू नकोस. धर्मशाळेत जाऊन हा दानधर्म कर. कारण दान घेणारात चोर असू शकतील. चोराला घरात एवढे ऐश्वर्य आहे, हे कळले तर, पुढे दानधर्म करायला काही उरणार नाही."

दुसऱ्या दिवसापासून धर्मशाळेत दानधर्माला सुरवात झाली. व्यापारी आपल्या धंद्यानिमित्त परदेशी निघून गेला. बायकोने मनमोकळेपणे गोदान व अन्नदान सुरू केले. व्रते व अनुष्ठाने पण चालू झाली. पाण्यासारखा पैसा खर्च होऊ लागला.

परंतु बायकोने केलेल्या या सर्व पुण्यकार्याचा फायदा व्यापाऱ्याला झाला नाही. त्याला नुकसानच सहन करावे लागू लागले. तो एका देशात नकली हिरे विकण्याच्या अपराधावरून तुरुंगात गेला. एक वर्षाची शिक्षा भोगूनही दंड इतका भरावा लागला की त्याला परदेशात जी मिळकत झाली होती ती सर्व दंड म्हणून भरावी लागली. नंतर त्याला पावलोपावली अपमान सहन करावा लागला व शेवटी निराश होऊन स्वदेशी परतावे लागले.

त्याने घरी येऊन पाहिले तर बायकोने घरातली सर्व मिळकत दानधर्म करून खर्च केली होती. बायको धर्मशाळेत दानधर्म करण्यात मग्न होती. त्याने तिच्याकडे निरोप पाठविला तेव्हा तिला येणे शक्य नसल्याचे कळले. म्हणून तो स्वत: तिला भेटायला धर्मशाळेत गेला. परंतु बायकोने त्या गर्दीत त्याला ओळखले नाही. त्याच्या बायकोने सर्व भिकाऱ्यांना प्रसाद म्हणून वाटला व व्यापाऱ्याला सुद्धा प्रसाद दिला. म्हणाली–"तुम्ही आल्याचे कळले मला, पण तुम्हीच पाहता आहां, केवढी गर्दी आहे. मला पाय बाहेर काढायला वेळच मिळाला नाही."





ते ऐकून व्यापाऱ्याच्या तळपायाची आग मस्तकापर्यंत गेली. त्याने प्रसाद तिच्या तोंडावर फेकला व म्हणाला–"तुला माझ्याहून हे लोक थोर वाटले होय? तू आपले घर रिकामे केलेस. मी तुला दानधर्म करायला सांगितला तो याचसाठी का?"

व्यापाऱ्याची बायको किंकर्तव्य विमूढ होऊन नवऱ्याकडे पहात राहली. ती एक शब्दसुद्धा बोलली नाही आणि घरी निघाली. घरी गेल्यावर तिने नवऱ्याला विचारले–"मी तुमच्याच सांगण्यावरून दानधर्म केला, त्याचे पुण्य मिळण्याऐवजी तुम्हांला हे कष्ट सहन करावे लागले का?"

"ते सर्व मी मागाहून सांगेन. तू हा दानधर्म बंद कर." व्यापारी म्हणाला.

त्यानंतर व्यापाऱ्याचे दिवस पुन्हा पालटले. त्याला व्यापारात खूप फायदा होऊ लागला आणि त्याने घालविलेले सर्व ऐश्वर्य जणुकाही माघारी आले. आपण एका भटक्याच्या उपदेशाप्रमाणे वागून विनाकारण कष्ट सहन केले, याबद्दल त्याला पश्चात्ताप वाटू लागला.

त्यानंतर पाचसहा महिन्यांनी व्यापारी नकली माल घेऊन स्वदेशी परत येत असता तो साधू त्याला भेटला. या खेपेस त्याच्याबरोबर त्याचे चारपांच शिष्यसुद्धा होते. तो व्यापाऱ्याला म्हणाला–"तू माझ्या बोलण्याकडे दुर्लक्ष केलेस. तुझ्यात बदल मुळीच झालेला नाही!"

व्यापारी रागाने त्या साधूला म्हणाला–"लबाडा! मी तुझ्या फंदात पडून आपले सर्वस्व घालविले. दिवाळे निघाले माझे. यापुढे मी कान धरला. तुझ्यासारख्या भामट्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्षच करावे लागणार! चालता हो!"

"तू जे पुण्य केलेस ते तुझ्या पापासारखे व्यर्थ जाणार नाही. झाले तरी काय?" साधूने विचारले.

"माझ्या बायकोने तुम्ही सांगितल्याप्रमाणे सर्व प्रकारची व्रते, अनुष्ठाने व दानधर्म केला. परंतु तिने मिळविलेले पुण्य कोठे गेले कोणास ठाऊक? मला व्यापारात नुकसानच होत गेले. एका देशात मला नकली हिरे विकण्याच्या अपराधावरून एक वर्ष तुरुंगवास भोगावा लागला. मी घरी आल्यावर बायकोकडून सर्व दानधर्म थांबविला. मी पुन्हा व्यापार करू लागलो. भाग्य अनुकूल होते म्हणून पुन्हा लक्षावधी रुपये मिळविले. नकली हिरे खऱ्या हिऱ्यांच्या मोलाने जात आहेत. हे पहा." असे म्हणत व्यापाऱ्याने आपली नकली हिऱ्यांची पेटी उघडून दाखविली. व्यापाऱ्याने दाखविलेले हिरे पाहून साधू काहीच बोलला नाही.

तेव्हा व्यापारी पुढे म्हणाला–"आता तुम्हीच सांगा, तुम्ही सांगितलेत ते पुण्य आहे की जे करतो आहे ते पुण्य आहे?" नंतर व्यापाऱ्याने एकदम आवाज पालटून म्हटले–"मी तुझ्यासारख्या नकली साधूंना हद्दपार करण्यास आमच्या देशाच्या राजाजवळ विनंती करणार आहे."

"बरोबर म्हणालास तू!" असे म्हणत साधूने आपली नकली दाढी काढली आणि खऱ्या रूपात प्रगट झाला.

व्यापारी आवाक् होऊन पाहू लागला. तो राजाच होता. जे चारपाच शिष्य म्हणून होते त्यांनीसुद्धा आपल्या दाढीमिशा काढून टाकल्या. व्यापाऱ्याची न्यायालयीन चवकशी झाली आणि त्याला काळ्या पाण्याची शिक्षा झाली.



व्यापाऱ्याने तुरुंगात जाताना राजाला विचारले—"महाराज, माझ्या मनात एक शंका आहे."

"विचार!" राजा म्हणाला.

"आपण मला पहिल्याने पाहिले तेव्हां कां कैद केले नाही? दानधर्म करायला सांगितला. माझ्या बायकोने त्याप्रमाणे दानधर्म करून जे पुण्य मिळविले ते माझ्या उपयोगी कां पडले नाही?" व्यापाऱ्याने विचारले.

"वेड्या! मी तुला पहिल्याने पाहिले तेव्हां तू लबाडीचा व्यापार करतोस, हे मला माहीत नव्हते. तुझ्या चेहऱ्यावरून मला शंका आली म्हणून मी ते म्हणालो. तुझा भितरेपणा पाहून माझ्या मनाची खात्री झाली कीं तू लबाडीचा व्यापार करीत असावास. मी तुला दानधर्म करायला सांगितला, तो तू करू लागल्यावर तुझा व्यापार लबाडीचा असल्याबद्दल माझ्या मनात शंका उरली नाही. परंतु आरोप लावायला पुरावा नव्हता. म्हणून मी आपले हेर तुझ्या पाठीमागून सोडले. तू कशी लबाडी करतोस याची पुरी माहिती मला मिळाली.

"आता तू विचारलेल्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर ऐक. तुझ्यासारखे लबाड जे पुण्य-कार्य करतात ते पापकार्यच होऊन जाते. ते पुण्यकार्य तुझ्याकरवी होणाऱ्या पाप-कार्यात विघ्नच असते. तुझ्या मनाची फसवणूक होते की मी पुण्यकार्य करून पापमुक्ती मिळवीत आहे. देवाला फस-विण्याचे नकली पुण्य संपादन करण्याचेच हे कार्य आहे. तुझ्या हातात तुझ्या बाय-कोने प्रसाद दिला व तो तू तिच्या तोंडावर फेकलास. त्यामुळे तोपर्यंत तुला जे पुण्य तुझ्या पत्नीच्या दानधर्मामुळे मिळाले होते ते संपुष्टांत आले. कारण तुझ्या मनात पापच होते. त्याने तुला अनेक प्रकारे नाचविले. शेवटी तुझा अधःपात त्यामुळेच झाला."

त्यानंतर शिपायी व्यापाऱ्याला तुरुंगात घेऊन गेले.





# खरा संतोष

एका श्रीमंत माणसाला तीन मुलगे होते. म्हातारपणी कोणता मुलगा आपल्या जवळ राहून आपली काळजी वाहील हे कळावे यासाठी तो आपल्या तिघां मुलांना बोलावून म्हणाला—"आतां मी फार दिव सांचा पाहुणा राहलो नाही. तुमच्यापैकी एकाजवळ म्हातारपणी रहायचे मी ठरविले आहे. मी मेल्यावर माझी इस्टेट त्यालाच मिळेल. शंभर रुपये देतो एका वर्षाने तुम्ही परत या. माझ्या मनाची खात्री झाली पाहिजे की कोणाजवळ राहल्याने माझ्या जिवाला सुख मिळेल."

तिघे मुलगे निघून गेले. सर्वात मोठा मुलगा एका शहरात राहून व्यापार करू लागला. त्याने पुष्कळ पैसे मिळविले. तरी खूप पैसे मिळविण्याच्या हेतूने त्याने हमा-लाचे कामदेखील करायला मागे पुढे पाहिले नाही. एका वर्षाने त्याच्याजवळ दहा हजार रुपये जमा झाले. ते नेऊन त्याने बापाला दिले. बाप म्हणाला—"बाळा, तू किती वाळलास? पैसे मिळविण्यासाठी आपली प्रकृती बिघडवून घेतलीस याबद्दल मला वाईट वाटले."

दुसरा मुलगा एका वैद्याकडे जाऊन राहला. त्याने त्या वैद्याचे शिष्यत्व करून कायकल्प करणाऱ्या एका औषधाचा शोध लावला. त्याने आपल्या गुरूला गुरुदक्षिणा म्हणून शंभर रुपये दिले आणि गुरूचा आशीर्वाद घेऊन घरी परतला.

दुसरा मुलगा घरी परतलेला पाहून बापाला आनंद झाला. "काय आणलेस रे तू? कोठे होतास वर्षभर?" बापाने मुलाला विचारले.

मुलगा म्हणाला—"बाबा, मी वर्षभर एका सुप्रसिद्ध वैद्याची सेवा केली. त्याच्या कृपेने मी एका दीर्घायुष्य येणाऱ्या औष-

धाचा शोध लावला. हे औषध घेतल्याने माणसाला पुन्हा तारुण्य येते. हे घ्या तुम्ही."

ते ऐकून बाप हसला. म्हणाला– "बाळा! या म्हातारपणी तारुण्य मिळवून मी काय करणार? तू माझ्या सुखासाठी शंभर रुपये खर्च केलेस व म्हाताऱ्याला तारुण्य मिळवून देण्यासाठी औषधाचा शोध लावलास हे सत्कार्य असले तरी मला समाधान वाटण्यासारखे नाही. तू व्यर्थ परिश्रम केलास असेच म्हणावे लागत आहे."

तिसरा मुलगा एका वृद्ध गुरूला भेटला आणि त्याला विचारले–"वृद्ध पित्याला सुखी करण्यासाठी काय करावे?"

तो गुरु म्हणाला–"तू संगीत शास्त्राचा अभ्यास कर. तुझा गळा चांगला आहे. तुला संगीत विद्या सहजी अवगत होईल. तुझे गाणे ऐकून बाप आपले दुःख विसरून जाईल आणि तुझ्या तोंडी भक्तिगीते ऐकून ईश्वर भजनात लीन होईल."

त्या प्रमाणे तिसरा मुलगा एका संगीत विद्वानाला जाऊन भेटला व वर्षभर त्याने त्याचे शिष्यत्व केले. त्याने गुरूला शंभर रुपये गुरुदक्षिणा दिली. तो देवळात भजने म्हणू लागला. त्याची कीर्ती राज्यभर पसरली. राजाने त्याला बोलावून आपला दरबारी गायक म्हणून नेमले.

तिसऱ्या मुलाने बापाला भेटून त्याने वर्षभर मेहनत करून संगीत शिकल्याचे सांगितले व म्हणाला–"बाबा! मी दररोज सकाळ संध्याकाळ तुम्ही पूजा करतां तेव्हां भजने म्हणत जाईन."

मुलगा चांगला संगीत विद्वान होऊन दरबारी गायक म्हणून नेमला गेल्याचे बापाने ऐकले होते. तो मुलाच्या पाठीवर हात फिरवीत म्हणाला–"बाळा! चार चौघांच्या तोंडी मी तुझी कीर्ती ऐकली आहे. तुमचा मुलगा चांगला निघाला, हे इतरांच्या तोंडून ऐकून बापाला जो आनंद होतो तो पैशाने मिळत नाही. आतां मी तुझ्याच जवळ समाधानाने पुढील आयुष्यभर राहीन."





# लोभाला बळी

एका तीर्थक्षेत्रात अनेक तीर्थयात्री येत. त्यांना उतरण्यासाठी त्या गावात अनेक धर्मशाळा होत्या. प्रत्येक धर्मशाळेत उतारूंच्या राहण्याची व्यवस्था पाहण्यास व पाहुण्यासाठी एक नोकर ठेवलेला असे. धर्मशाळा साफ ठेवणे व उतारूंच्या सुखसोयींकडे लक्ष देणे, इतर कामांबरोबर हे त्याचे मुख्य काम असे.

एका धर्मशाळेत रंगनाथ नावाचा एक प्रामाणिक नोकर होता. तो ज्या धर्मशाळेत काम करीत असे त्या धर्मशाळेत एक उतारू धर्मशाळा सोडून जाते वेळी चुकून आपली एक सोन्याची माळ, तो उतरला होता त्या खोलीत, विसरून गेला. रंगनाथने ती माळ पाहिली. त्याने ती माळ सर्व धर्मशाळांची व्यवस्था पाहणाऱ्या व्यवस्थापकाकडे नेऊन दिली. व्यवस्थापकाने रंगनाथाच्या त्या प्रामाणिकपणाची प्रशंसा करून वरील अधिकाऱ्याला कळविले. रंगनाथाला त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल पन्नास रुपयांचे पारितोषिक मिळाले.

त्या दिवसापासून देवळाच्या व्यवस्थापक मंडळाने इमानदार नोकरांना त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल पन्नास रुपये बक्षिस देण्याचे ठरविले. ती गोष्ट सर्व नोकरांस कळविण्यात आली.

देवळातल्या धर्मशाळांत काम करणाऱ्या नोकरात सोमनाथ नावाचा एक नोकर एका धर्मशाळेत काम करीत असे. तो लबाड होता. त्याने पारितोषिकाच्या लोभाने अधिकाऱ्यांच्या डोळ्यात धूळ फेकायला सुरवात केली.

त्याने आपल्या एका नातेवाइकाला उतारू म्हणून निरनिराळ्या नावाने धर्मशाळेत उतरायला सांगितले व प्रत्येक वेळी तेथे एखादी वस्तू सोडून जायला सांगितले.

सोमनाथ प्रत्येक वेळी ती वस्तू व्यवस्थापकांकडे नेऊन देई व ठरलेले इनाम घेऊन जाई.

असे बरेच दिवस होत राहिले. एका महिन्यात एकाच धर्मशाळेत एकाच तऱ्हेच्या पुष्कळ गोष्टी घडल्यामुळे व्यवस्थापकांना संशय आला व त्यांनी सोमनाथवर पाळत ठेवण्यासाठी एका दोघां जणांना नेमले.

परंतु सोमनाथ इतका हुशार होता की त्याने त्या दोघां पाळत ठेवणाऱ्यांनासुद्धां सामील करुन घेतले व व्यवस्थापकांच्या जाळ्यातून निसटला.

तेव्हां मुख्य व्यवस्थापकाने आणखी एक उपाय करण्याचे ठरविले. त्याने आपल्या एका नातेवाईकाला तीर्थयात्री म्हणून त्याच धर्मशाळेत उतरविले. त्या नातेवाइकाला व्यवस्थापकाने सर्व गोष्टी समजावून सांगितल्या होत्या. त्याप्रमाणे त्याने धर्मशाळा सोडून जाण्यापूर्वी आपली एक सोन्याची अंगठी न्हाहाणीघरात सोडली आणि धर्मशाळा सोडून गेला.

सोमनाथाला ते जाळे टाकले असल्याची गोष्ट माहीत नव्हती. त्याला ती अंगठी सापडली. अंगठीचे किंमत तीन एकशे तरी असेल असे समजून त्याने ती कनवटीला ठेवून दिली. व्यवस्थापकाला अंगठी दिली तर पन्नास रुपयांचे पारितोषिक मिळेल. परंतु अंगठी विकली तर तीनशे रुपये तरी मिळतील. असा विचार करून सोमनाथ ती अंगठी आपल्या घरी घेऊन गेला. त्याच्या पाठोपाठ एक पोलीस अधिकारी वेष पालटून चालला होता. परंतु सोमनाथला ती गोष्ट माहीत नव्हती.

सोमनाथ घरात पाऊल टाकू लागला तेव्हां दोन शिपायांनी पुढे येऊन त्याच्या हातात हतकड्या घातल्या व त्याला पोलीस ठाण्यावर नेले.

सोमनाथने आपला रोब दाखवून पाहिला परंतु पोलीस अधिकाऱ्यांनी त्याची झडती घेऊन त्याच्या कनवटीची अंगठी काढून दाखविल्यावर त्याला आपला अपराध कबूल करावा लागला





# महाबली हनुमान

वालीने प्राण सोडला नव्हता. त्याने डोळे उघडून जवळपास कोणी आहे का पाहिले. त्याच्या मुलाजवळ सुग्रीव उभा असलेला त्याला दिसला. तेव्हां वाली सुग्रीवाला म्हणाला–"मी तुला राज्यातून हाकुन तुझ्या बायकोचे अपहरण केले म्हणून मला दोष देऊ नकोस. आपण दोघांनी राज्य वाटून घेऊन सुखाने रहावे हे आपल्या भाग्यात नव्हते, म्हणून माझी बुद्धी तशी फिरली होती. आतां मी या जगाचा निरोप घेतो आहे. तेव्हां तू वानरांचे राज्य आतां सांभाळ. मी आपली अखेरची म्हणून एक इच्छा प्रगट करतो आहे. तेवढी पुरी कर. मला प्राणाहून प्रिय हा माझा मुलगा अंगद आहे. त्याला तू आपल्या स्वत:च्या मुलासारखा वागव. त्याला कोणत्याही प्रकारची उणीव भासू देऊ नकोस. आतां तुझ्याशिवाय त्याला कोण आहे? तो तुझ्यासारखाच पराक्रमी आहे. प्रत्येक बाबतीत तो तुझ्या बरोबर राहील असा आहे. सुषेणाची मुलगी व माझी बायको म्हणजे तारा फार हुषार आहे. पुढे येणाऱ्या संकटाची तिला प्रथमच कल्पना असते. म्हणून तिचा सल्ला घेत जा. नाही तर तुला तुझ्यावर येणाऱ्या नाना संकटांना तोंड द्यावे लागेल. मला देवेंद्राने दिलेली कांचनमाला मी तुला देतो आहे. मी प्राण सोडल्यावर याची कांती जाईल."

वाली म्हणाला त्या सर्वाला सुग्रीवाने मानेने होकार दिला आणि वालीने दिलेली कांचनमाला घेतली.



नंतर वालीने अंगदाला जवळ बोलाविले व कांही त्याच्या हिताच्या गोष्टी सांगीत म्हणाला–"तू यापुढे माझ्याशी वागलास तसा सुग्रीवाशी वागत जा. सुग्रीवाच्या शत्रूला तू कधी फितूर होता कामा नये; सुग्रीव सांगील ती कामे मन लावून करीत जा; कोणावर अत्यधिक प्रेम दाखवू नकोस किंवा मुळीच प्रेम नाही असेही दर्शवू नकोस, तीसुद्धां चूकच." एवढे सांगून वालीने प्राण सोडला. सर्व वानर त्याच्या शोकाने खूप रडले. वालीने केलेल्या चांगल्या कामाची आठवण काढून त्याचे गोडवे गाऊ लागले. वालीने मागे गोलभ नांवाच्या गंधर्वाशी पंधरा वर्षे युद्ध करून शेवटी त्याचा वध केला होता. तो जिवंत असेपर्यंत वानरांना जगात कोणाचे भय म्हणून नव्हते. ती गोष्ट सर्वांना त्या वेळी आठवली.

ताराने पतिनिधनानंतर जो शोक केला तो तिच्यासारख्या साध्वीला साजेसाच होता. नील नावाच्या वानराने वालीच्या छातीत रुतलेला बाण काढला. ताराने सांगितल्याप्रमाणे अंगदाने बापाच्या पायांवर मस्तक ठेवून त्याला शेवटचे नमन केले. ताराचा तो शोक पाहून व आपणच मोठ्या भावाच्या वधाला कारण झालों हे आठवून सुग्रीव फार दु:खी होऊन पश्चात्ताप करू लागला. तो डबडबलेल्या डोळ्यांनी रामाला जाऊन भेटला. म्हणाला–

"रामा! तू आपले वचन पाळलेस आणि वालीचा वध करून मला राज्य दिलेस. परंतु मला आता स्वत:च्या जीवितावर प्रेम उरलेले नाही. तारा व सर्व वानर असा शोक करीत असता मला राज्य कशाला? असे मला वाटू लागले आहे. मी या पूर्वी मला वालीने जो त्रास दिला त्याबद्दल वालीचा वध तू करावास अशी विनंती केली होती. परंतु आतां वालीचा वध झाल्यावर पश्चात्तापाने माझे मन मलाच दोष देत आहे. माझ्या भाग्यात ऋष्यमूक पर्वतावर ऋषी मुनींच्या [illegible] तेच बरोबर आहे आतां मला स्वर्ग मिळाला तरी तो नको वाटतो आहे. वालीने मला जिवंत सोडला आणि मी त्याचा जीव घेतला. माझ्याहून मोठा पापी आणखी कोण असणार? मला त्याने युवराजपद दिले होते त्या लायकसुद्धां मी नव्हतो, आतां राजा कसा काय होणार? मीदेखील वाली-बरोबर स्वत:ला जाळून घेतो. वानर तुझे सर्व काम पुरे करतील, तेच सीतेला सोडवून आणतील."

तारा रामाकडे पाहून म्हणाली–"तू ज्या बाणाने वालीचा वध केलास त्याच बाणाने माझा वध कर आणि मला वाली आहे तेथे पाठव. मी बरोबर नसेन तर तो सुखी होणार नाही. सीतेच्या वियोगाने तू जसा दु:खी आहेस तसाच वाली स्वर्गातही माझ्या वियोगाने दु:खी होईल. तू माझा वध केलास तर वालीचा वध केल्याचे पाप तुझ्या माथी राहणार नाही. उलट माझा वध हे एक पुण्य कार्य ठरेल."

राम तिचे सांत्वन करीत म्हणाला–"तू वीरपत्नी आहेस. तू असा शोक करता कामा नये. वाली असताना ते सुखी होतीस, तशीच वाली नसताना सुद्धा तू मुलाचा गौरव व पराक्रम पाहून सुखी होशील. तुझा मुलगा पराक्रमी आहे. तो युवराज होणार आहे, तो तू पाहशील."

नंतर राम वानरांना म्हणाला–"किती शोक केलात तरी जो परलोकी गेला





त्याला परत आणणे किंवा सुखी करणे शक्य होईल का? विचार करून पहा आणि वालीला सुखाने स्वर्ग प्राप्ती व्हावी, यासाठी काय तो प्रयत्न करा."

तेव्हां लक्ष्मण शोक करीत बसलेल्या सुग्रीवाला. म्हणाला–"सुग्रीवा! वालीचा अग्निसंस्कार केला पाहिजे. वानरांकरवी चंदनादी वृक्षांची वाळलेली लाकडे आणव. अंगदाचे सांत्वन करून त्याची समजूत घालून त्याच्या हस्ते अग्नि देवविण्याची तयारी कर. यापुढे किष्किंधेचा राजा तू होणार आणि तूच रडत बसून राहलास तर कसे चालेल? तुला कोण धीर देईल? अंगदाच्या हस्ते, फुले, वस्त्रे, तूप, तेल व सुगंधी द्रव्यें मागव आणि वानरांना जमा करून वालीच्या स्मशानयात्रेसाठी सर्व तयारी कर."

लक्ष्मणाने सांगितल्यावर तार नावाचा वानर किष्किंधेला धांवला व अन्त्येष्टी जोगी पालखी तयार करून घेऊन आला. सुग्रीव अंगद दोघांनी मिळून वालीचा देह अलगद पालखीत ठेवला. सुग्रीवाने वालीच्या देहावर पुष्पवृष्टी करण्यास वानरांस आज्ञा केली. प्रेतयात्रेला वालीचे तार आदि वानर नातेवाईक व स्त्रिया निघाल्या. एका नदीकाठी वाळूत चिता रचून वालीचा अग्निसंस्कार पूर्ण करण्यात आला आणि तर्पणादी संस्कार संपले. रामाने स्वतः हजर राहून सुग्रीवाकरवी व अंगदाकरवी सर्व संस्कार विधिवत् करविले.

सुग्रीव स्नान करून ओल्या वस्त्रांनीच रामलक्ष्मण होते तेथे आला. सर्व वानर त्याच्याच जवळ येऊन उभे राहले. तेव्हां हनुमान रामाला म्हणाला–"रामा! तुझ्या कृपेने सुग्रीवाला राज्यप्राप्ती झाली. आतां तुझी अनुमती असेल तर तो किष्किंधा नगरीत प्रवेश करण्याच्या विचार करीत आहे. राज्याभिषेक शास्त्रोक्त रीतीने झाल्यावर तो तुझा सत्कार करणार आहे. म्हणून तू किष्किंधेला येऊन स्वहस्तेच तो राज्या-
[illegible] वानरांस



सुखी करावेस अशी सर्व वानरांची इच्छा आहे."

राम म्हणाला–"हनुमाना! मी पित्याच्या आज्ञेने चवदा वर्षे वनवास भोगीत असतां कोणत्याही गावात अगर नगरात प्रवेश करून राहणे बरोबर होणार नाही. म्हणून सुग्रीवाला घेऊन जाऊन थाटामाटाने राज्यारोहण समारंभ उरकून घ्या. त्याचप्रमाणे अंगदचा युवराज्याभिषेक पण करून घ्या. श्रावण महिना सुरू होत आहे. चार महिने पावसाळा आहे. युद्ध आरंभ करण्यास योग्य वेळ नाही. म्हणून तुम्ही सर्वजण किष्किंधेला जा. मी व लक्ष्मण या पर्वतावरच राहातो. या पर्वतातल्या गुहा रहायला मोठ्या व सोयीच्या आहेत. जवळच पाण्याची उत्तम सोय आहे. कार्तिक महिना आला की नंतर रावणाशी युद्धाची तयारी करतां येईल."

अशा तऱ्हेने रामाच्या अनुज्ञेने सुग्रीवाने किष्किधा नगरीत प्रवेश केला. सर्व वानर त्याच्या पाठोपाठ किष्किंधेला गेले. सुग्रीवाने त्याला भेटण्यासाठी जे जे वानर वीर आले त्यांचा सल्ला घेऊन तारांचे सांत्वन करण्यासाठी अंत:पुरात गेला.

सुग्रीव वालीच्या अंत:पुरातून बाहेर आला तोंपर्यंत वानरांनी सुग्रीवाच्या राज्यारोहणासाठी सोन्याने मढविलेले छत्र चामर, सर्व प्रकारची मणि माणिक्ये, निरनिराळ्या प्रकारची धान्ये, औषधी द्रव्ये, फुले, फळे, हळदी कुंकू, गुलाल, शेंदूर वगैरे, मध, तूप, दूध, दही वगैरे पंचगव्य इत्यादी वस्तू सिद्ध करून ठेवल्या. रानडुकराच्या कातड्याची पादत्राणें शिवून तयार करविण्यात आली.

त्यानंतर ब्राह्मणांनी अग्निहोत्र जागवून त्याची पूजा केली व सुग्रीवाचा राज्याभिषेक विधिवत् पुरा केला. गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, हनुमान, जांबुवंत व नलने सुवर्ण कलश, वृषभशृंग इत्यादि उपकरणांनीं सुग्रीवाचा अभिषेक केला.

रामाने सांगितल्याप्रमाणे सुग्रीवाने अंगदाचा युवराज्याभिषेक करविला. तसे केल्याबद्दल वानरांनी सुग्रीवाची खूप वाखाणणी केली व अशातऱ्हेने राज्यारोहण समारंभ पार पडला.

सुग्रीवाने रामाला भेटून सर्व वर्णन केले व परतल्यावर त्याची पत्नी रुमासह सुखाने राज्य व सुख उपभोगू लागला.

रामलक्ष्मणांनी पावसाळाभर प्रस्त्रवण पर्वतावरच्या गुहेत वास केला. तो पर्वत अत्यंत रमणीय होता. गुहेजवळच एक सुंदर कमळे असलेले सरोवर होते. गुहेचे द्वार नैऋत्य दिशेला असल्या कारणाने पाऊस आत येणे शक्य नव्हते. पूर्वेकडचा वारादेखील आत येणे शक्य नव्हते. गुहे समोर स्वच्छ समतल प्रदेश होता. जवळच एक सुंदर नदीदेखील होती. किष्किधा नगरी तेथून तशी फार दूर नव्हती. किष्किंधेत चालू असलेल्या उत्सवाचा कोलाहल व वाद्यध्वनी स्पष्ट ऐकू येत होता.

अशा रम्य स्थानी रहात राम एका बाजूला सीतेच्या विरहामुळे दु:खी होता तर रावणाशी युद्ध करण्यास सुग्रीव सहाय्य करीत असल्याबद्दल आनंदित होता. तो शरद ऋतु केव्हां सुरू होतो याची वाट पहात होता. तो पावसाळा म्हणजे रामाला एक संकटकाळच वाटत होता.

पावसाळा गेला आणि शरद ऋतू सुरू झाला. परंतु सुग्रीव रामाचे काम करण्याची



गोष्ट पार विसरून गेल्यासारखे हनुमानाला वाटू लागले. कारण सुग्रीव सर्व राज्यकारभार मंत्र्यांच्या हातात देऊन स्वत: अंत:पुरात सुखोपभोगात मग्न झाला होता. त्याची बायको रुमा असूनही त्याच्या वडील भावाची बायको तारांशीदेखील तो विवाहबद्ध झाला.

ते कळतांच हनुमान सुग्रीवाला जाऊन भेटला व त्याला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून देत म्हणाला–"तुला राज्यवैभव प्राप्त झाले. तू आपल्या मित्रबांधवांशी तुझे जे कर्तव्य आहे त्याचे पालन नको का करायला? स्वत:चे काम गेले तरी मित्रांचे काम करून दाखविणाराला

कधी नकसान सहन करावे लागत नाही. आपण सीतेचा शोध लावण्याचे कबूल केले आहे. ते काम आतांच सुरू केले पाहिजे. राम सज्जन आहे; म्हणून धीर धरून तुझी वाट पाहतो आहे. सीतेच्या शोधार्थ लवकरच वानरांना पाठव."

ते ऐकून सुग्रीव जणुंकाही झोपेतून जागा झाला. त्याने नीलला बोलाविले आणि चतुर्दिक पसरलेल्या वानरसेनेला एकत्र करण्यास आज्ञा केली. पंधरवडयाच्या आत जे कोणी येणार नाहीत त्यांना मृत्यदंड दिला जाईल, असे जाहीर केले.

मध्यंतरी राम पावसाळा संपला तरी सुग्रीव न आलेला पाहून मोठ्या कष्टाने लक्ष्मणाला बोलावून म्हणाला–"सुग्रीव शरत्काल संपताच सीतेच्या शोधार्थ लागण्याचे वचन देऊन गेला खरा, परंतु वचन दिल्याप्रमाणे तो वागला नाही. त्याला माझ्या बाणाचे लक्ष्य होण्याची इच्छा आहे, वाटते. तू जाऊन त्याला मला या बेफिकीरपणाचा राग आला असल्याचे सांग. वालीला ज्या मार्गाने पाठविले त्याच मार्गाने सुग्रीवाला पाठवीन असे मी म्हणाल्याचे सांग. मी फक्त वालीचाच वध केला आहे, सुग्रीवाने वचनभंग केल्यास त्याला व त्याच्या सर्व बंधुबांधवांस त्याच मार्गाने पाठवीन. हे सर्व त्याला कसे सांगायचे हे तूच ठरवून सांग."

लक्ष्मणाला देखील सुग्रीवाचा फार राग आला. म्हणाला–"हा सुग्रीव त्याला राज्य लाभ कसा झाला, हे विसरला आहेसे वाटते. त्याचे राज्य टिकणार नाही. मी हा निघालोंच. त्या सुग्रीवांचा वध करून अंगदाच्या सहाय्याने सीतेच्या शोधार्थ जातो." असे सांगून लक्ष्मण निघाला तेव्हां रामाने त्याला थोडे थांबायला सांगितले व म्हणाला–"लक्ष्मणा! तसे काही करू नकोस. त्याचा व आपला परस्परांशी जो स्नेह आहे तो विसरू नकोस. सुग्रीवाशी नीटच बोल. तो सरळ वागला नाही एवढेच, त्याने आतांपर्यंत आपल्याविरुद्ध काही केले नाही, हे विसरू नकोस."





# अमरवाणी

अर्थिना मुपपन्नानाम्
पूर्वं चाप्युपकारिणाम्,
आशां संश्रित्य यो हन्ति
स लोके पुरुषाधमः ।। ।। १ ।।

[ पूर्वी ज्यांनी उपकार केला आहे आणि जे सुशील चांगले आहेत त्यांनी मदत मागितली असतां देण्याचे मान्य करून दगा देणारे या जगात अधम व नीच गणले जातात.]

शुभं वा, यदि वा पापं,
यो हि वाक्य मुदीरितम्,
सत्येन प्रतिगृण्हाति
स वीरः पुरुषोत्तमः ।। ।। २ ।।

[ आपण दिलेले वचन, मग ते बरं असो वा वाईट ते जो पालन करतो तोच खरा शूर पुरुषोत्तम होय.]

कृतार्था ह्यकृतार्थानां
मित्राणां न भवन्ति ये,
तान्मृता नपि क्रव्यादाः
कृतघ्ना न्नो प्रभुंजते ।। ।। ३ ।।

[ उपकारकर्त्या मित्राला प्रसंग आला असतां प्रत्युपकार न करणाऱ्यांना मृत्यू आल्यावर कावळे, घारीसुद्धां तोंड लावीत नाहीत. (तात्पर्य, इतका तो घृणित होय.) ]












# मित्रभेद

[ २२ ]

### लबाड माणसाची गोष्ट

कोशल देशाची राजधानी अयोध्या नगरी येथे सुरथ नावाचा एक चक्रवर्ती राजा राज्य करीत असे. त्याच्या साम्राज्यात अनेक लहान मोठी संस्थाने होती.

एकदा जंगलातल्या संस्थानिकांच्या शाखेवरचा अधिकारी फार आतुरतेने येऊन राजाला म्हणाला–"महाराज! विध्यक नावाच्या एका बंडखोराने बंडाचे निशाण उभारले आहे. हे बंड चिरडून टाकण्याचे काम मला जमले नाही. म्हणून आपण ते कार्य पुरे करावे अशी विनंती आहे."

राजाने बंडखोरांना शिक्षा देण्यासाठी बलभद्र नावाच्या हुशार व पराक्रमी मंत्र्याला पाठविले.

बलभद्र निघून गेल्यानंतर उन्हाळ्याच्या अगदी शेवटाला अयोध्येला एक दिगंबर संन्यासी आला. तो पत्रिका हात वगैरे पाहून ज्योतिष सांगत असे. तो जन्म पत्रिका करून देई, शकुन व अपशकुनांची फलिते सांगे. मनातल्या काही गुप्त गोष्टी व नावे सांगून त्याने नागरिकांच्या मनात आपल्या ज्योतिष्यावर विश्वास उत्पन्न केला.

त्या ज्योतिष्याच्या विषयी ऐकून राजाने त्याला राजवाड्यात बोलावून विचारले–"स्वामीबुवा! आपण मनातली गोष्ट सांगता हे मी ऐकतो. होय ना?"

"ते विचारून चवकशी करून पहावी, म्हणजे आपली खात्री पटेल!" असे सांगून संन्याश्याने, आपल्या 'मोठमोठ्या' कामांचे तिखट मीठ लावून वर्णन केले.

राजाने त्या संन्याश्याला आपल्या राजवाड्याच्या आवारात मठ बांधून देऊन त्याच्या जेवणाची सोय करून दिली. राजा दररोज त्याच्या दर्शनाला जाई.

एके दिवशी संन्यासी राजवाड्यात सायंकाळी येऊन म्हणाला–"राजन्, मला स्वर्गातल्या देवांनी फारफार आग्रह करून स्वर्गात भेटायला बोलाविले आहे. मी 'नको नको' म्हणत असता ते जण काही धरणेच देऊन बसले. तेव्हा मी आपला भौतिक देह भूलोकात म्हणजे मठात सोडून सूक्ष्मदेह धारण करून स्वर्गाला जाऊन आलो आणि या भौतिक देहात प्रवेश केला. देवांनी आपली कुशल वार्ता विचारून आपल्या मनात काही विचारावयाचे असल्यास विचारून यायला सांगितले आहे."

ते ऐकून राजा आश्चर्यचकितच झाला. म्हणाला–"महात्मन्! आपण स्वर्गात कसे काय गेलात?"

"राजन्! तो तर माझ्यासारख्या योग्याचा एक खेळ समज. मी दररोज स्वर्गाला जाऊन येतो." संन्यासी म्हणाला.

राजाचा तो भाबडेपणाच होता. कदाचित संन्याश्याला अष्टसिद्धी प्राप्त असाव्यात असेही त्याला वाटले. संन्याश्याने अनेक अविश्वनीय असे चमत्कार करून दाखविल्याचे राजाने ऐकले होते. या सर्वांचा त्याच्या मनावर फार परिणाम झाला होता. त्याने राज्यकारभाराच्या



कामात लक्ष द्यायचे सोडले, राणीची फिकीर किंवा काळजी करायची सोडली आणि रात्रंदिवस त्या संन्याश्याच्या शेजारी बसून त्याच्या स्वर्गलोकात जाऊन याच्या कथा ऐकू लागला. त्यामुळे राज्याची व राजकीय परिवाराची स्थिती फारच बिघडली.

त्याच सुमारास रानटी जातीचे बंड मोडून मंत्री बलभद्र राजधानीस परतला. राजधानीत पाऊल टाकताच त्याला राजा संन्याश्याच्या हातातले एक बाहुले होऊन गेल्याचे कळले. त्याने खास महालात जाऊन पाहिले तर तिकडे शुकशुकाट होता. चोपदार शिपाई कोणी नव्हता. एका खोलीत एकांतात राजा त्या संन्याश्याजवळ बसलेला

बलभद्राला दिसला. संन्यासी राजाला काही अत्यंत गुप्त अशा गोष्टी सांगत होता आणि राजा संन्याश्याच्या तोंडची 'मुक्ता फळे' झेलीत होता.

ते सर्व पाहताच सर्व परिस्थिती मंत्र्याच्या लक्षात आली. त्याने राजाला– "महाराजांचा जयजयकार असो" असे म्हणत साष्टांग नमस्कार केला. तो ज्या कामासाठी गेला होता त्यात यशस्वी झाल्याचे राजाने मंत्र्याला विचारले नाही व संन्याश्याकडे संकेत करून ह्यांना ओळखलेत का?" असे विचारले.

"अनेक थोर पुरुषांना आपले शिष्य करून घेणाऱ्या थोर साधूस कोण ओळखणार नाही? हे मधूनमधून स्वर्गात जाऊन येतात असेही मी ऐकले आहे." बलभद्र म्हणाला.

"यात शंका कसली?" राजा म्हणाला. आपल्या विषयी इतक्या गौरवनीय शब्दात मंत्र्याला बोलतांना ऐकून संन्यासी फुलून जाऊन मंत्र्याला म्हणाला–"मंत्रीवर्यांना ते पाहण्याचे कुतूहल असेल तर प्रत्यक्षच पहायला मिळेल." असे म्हणत संन्यासी मठात जाऊन आतून कडी लावून बसला.

काही क्षण गेल्यावर मंत्री राजाला म्हणाला–"ते स्वर्गातून केव्हा परत येतील, काही कल्पना आहे का, महाराजांना?"

"तशी घाई का? ते आपला भौतिक देह मठात सोडतात आणि सूक्ष्मदेह धारण करून स्वर्ग प्रवेश करतात." राजा म्हणाला.

"ते खरे असेल तर लाकडे व अग्नी आणवून मी मठाला अग्नी देतो." मंत्री म्हणाला.

राजाने आश्चर्याने विचारले–"का ते?"

"कशाला म्हणून विचारता? हा देह लाकडांसारखा जळून गेल्यावर ते सूक्ष्म देहाने आपणांस भेटायला येत जातील. त्यामुळे जगात आपली कीर्ती सर्वत्र पसरेल. या संदर्भात मी आपल्याला नागकुमाराची गोष्ट सांगतो." मंत्री कथा सांगू लागला.





# तिळ्या बहिणी

[१०]

[दाढीवाल्याला भेटायला गेलेला राक्षस त्याच्याकडून तिळ्या भावंडांनी त्याला फसविल्याचे कळल्यावर परतला. मध्यंतरी सुहासिनीच्या मदतीने संध्याकुमार व निशीथ उभयतांना पुन्हां मानवरूप मिळाले आणि ते राक्षसाच्या भुयारात कसे जावयाचे त्याचा विचार करू लागले. पुढे–]

त्यांच्या जवळ दाढीवाल्याकडून आलेली भस्मे व अंजने राक्षसाच्या भुयारात कुचकामाची आहेत हे कळल्यावर दुसरा काही उपाय आहे का तिथे विचार करू लागले. तेव्हां त्यांच्या मनात एक शंका आली. हा राक्षस जगात कोठून कोठून हिंडून हुडकून जुळ्यांनाच धरून आणतो आहे तर आपण आतांपर्यंत कसे काय त्याच्या नजरेतून सुटलो?

दुसऱ्या दिवशी ते राजकन्यांना भेटले तेव्हां उदयनने त्यांना तोच प्रश्न केला. ते ऐकून त्यांनादेखील आश्चर्य वाटले. परंतु सुभाषिणी म्हणाली–"तुम्ही विचारलेत ते बरोबर आहे. आम्हांला नाही ही गोष्ट कधी सुचली. एक कारण असू शकेल, तो तुमच्या वाटेला न येण्याचे. नाही तर त्याने तुम्हांला सोडलेच नसते. कारण असे..." बोलतां बोलतां ती मध्येच थांबली.



"विचार नां काही हरकत नाही. तुला वाटते ते कारण असेल तर सावध रहायला बरेच की!" निशीथ म्हणाला.

तेव्हां सुभाषिणी म्हणाली–"तसे काही नाही. जुळया किंवा तिळयांच्या अंगात किंवा अवयवात काही व्यंग असेल तर ती जुळी किंवा तिळी त्या राक्षसाने घेतलेल्या व्रताप्रमाणे बळी द्यायला उपयोगी नाहीत. बळी देण्यापूर्वी फार सावधपणे तो ही मनाची खात्री करून घेतो, तसे तुमच्यात तर काही व्यंग दिसत नाही. म्हणूनच ते कसे विचारायचे, म्हणून मी मागे पुढे करीत होते."

ते ऐकल्यावर तिघे एकदम म्हणाले–"तुला वाटले त्यात गैर काहीच नाही, उलट ते अगदी बरोबर आहे."

त्यानंतर उदयनने त्याच्या व त्याच्या भावंडांच्यात अंगांत जन्मापासून जे व्यंग होते ते सविस्तर सांगितले आणि दाढीवाल्याच्या अंजनांचा प्रयोग केल्यावर तिघांच्या डोळ्यातले व्यंग कसे नाहीसे झाले हेदेखील सांगितले.

त्या सर्वांचे असे बोलणे चालू असतां राक्षस येण्याची खूण, म्हणजे वावटळ आली. तिघी राजकन्यांनी सरोवरात पटापटा उड्या टाकल्या. परंतु तिघां भावंडांना वांचविणे त्यांना शक्य झाले नाही. उदयन जवळचे पांढरे भस्म काढून स्वतःवर टाकणार इतक्यात राक्षसाने त्यांना आपल्या मुठीत उचलून धरले.

तिघे भाऊ मनात घाबरून गेले होते. तरी तोंडावर त्यांनी मनातला घाबरटपणा उमटू दिला नाही.

राक्षसाने त्यांना विचारले–"कोण रे तुम्ही? माझ्या या प्रदेशात कसे काय आलात? खरं काय ते सांगा, नाही तर यापूर्वी आलेल्यांची जी गत झाली, तीच तुमची होईल, हे विसरू नका."

उदयन जणुंकाही त्याला भीती मुळीच वाटत नव्हती अशा स्वरात म्हणाला–"होय रे बाबा! या प्रदेशात प्रवेश करणे कठीण आहे, कष्टाचे आहे, धोक्याचे आहे या तुझ्या प्रदेशात पाऊल टाकल्यावर आम्हांला कळले. आधी आम्हांला ते माहीत नव्हते. आतां आम्ही जिवंत वांचणे शक्य नाही हे कळले तरी आम्ही म्हणतो ते प्रथम ऐकून घे आणि त्यानंतर तुला जे करावयाचे असेल ते खुशाल कर."

"दिसतो आहेस वीतभर, पण गप्पा-मात्र मैल भराच्या मारतो आहेस की रे! माझ्या धाकट्या भावाला फसविले ते तुम्हीच नाही का रे? ते सोडा, प्रथम हे सांगा, गुलामांनो, तुम्ही या प्रदेशात व या माझ्या महालात चोरासारखे शिरलांतच कशाला?" राक्षसाने विचारले.

"ते मात्र बरोबर नाही. आम्ही चोरासारखे नाही शिरलो. तसे येण्याचे कारणच नाही. आम्ही आलो ज्या कारणासाठी..." असे उदयन काही सांगत असतां मध्येच "काय, काय झाले? मला फसविण्यासाठीच तर." असा आवाज ऐकू आला.

तिघां भावंडांनी आवाज आला त्या बाजूला वळून पाहिले तेव्हां त्यांनी पूर्वी ज्याला फसवून दाढीवाल्याकडे पाठविले होते तोच राक्षस लांबलांब पावले टाकीत रागाने त्यांच्याच बाजूला येत असल्याचे त्यांना दिसले.

राक्षसजवळ आल्याबरोबर दुसऱ्या राक्षसाला म्हणाला–"दादा! यांच्या समाचाराला मी येथे आहे. तू वेळ फुकट घालवू





नकोस. तू आपल्या शिकारीला निघून जा, कसा!"

धाकट्या भावाने सांगितल्याबरोबर मोठा भाऊ 'म्हणजे हे एक मोठेच प्रकरण दिसते आहे. म्हणजे हे तिघे माझ्या धाकट्या भावाच्या माहितीचे दिसत आहेत. मग त्यालाच काय ते करू द्यावे. असा विचार करून व मनाशी ठरवून पुन्हा गृढ रूपाने आकाशात उडून अदृश्य झाला.

त्यानंतर पाठोपाठ धाकटा भाऊ तिघां भावंडांना घेऊन तो पाहारा देत उभा होता त्या वाड्यात घेऊन गेला. त्यांना त्याने स्वस्थ बसायला सांगून विचारले—"काय रे पोरांनो! तुम्ही दाढीवाल्याला फसविलेत आणि मलाही फसवायला निघाला होता. परंतु तुमची लबाडी फसली आणि तुम्ही माझ्या तावडीत सापडलात. दाढीवाल्याजवळ तुम्हांला ती अंजने व भस्मे मिळाली होती आणि तो पंचा मिळाला होता, कोठे आहेत ती? काढा ती आणि समोर ठेवून मुकाट्याने उभे रहा कसे. नंतर इतर गोष्टी सांगायच्या असतील त्या बोला."

तिन्ही भावंडे काय करणार? त्यांनी सर्व वस्तू तोंडातून एक 'ब्र' काढल्याशिवाय राक्षसासमोर ठेवल्या. नंतर राक्षस म्हणाला—"काय रे पोरांनो! मी किती दिवसांपासून येथे पाहरा देतो आहे. परंतु आजपर्यंत कोणी माझ्या डोळ्यात धूळ फेकून आत पाऊल टाकू शकला नाही. कोणी आलाच तर माझ्या हातात सांपडलाच आणि दगडाची मूर्त होऊन राहला उभा जागच्या जागी. ते पहा सर्व आपल्या लबाडीचे फळ भोगीत उभे आहेत तेथे! मला तुम्ही त्या दिवशी फसविलेत ना, तेव्हांपासून मला झोप नाही. मी पोटभर खाल्लेसुद्धा नाही. खूप भूक लागली आहे. गेला एक महिना तुम्हांला शिव्या देत कसा काढला असेल माझे मलाच माहीत. आज मात्र मनसोक्त खाऊन घेणार आहे." असे म्हणत त्याने तो मंतरलेला पंचा अंथरला. त्यावर पुष्कळ खाद्य पदार्थ होते.

भावंडांनासुद्धा त्याने त्यातली फळफळावळ खायला दिली. त्यांनीसुद्धा पोटभर खाऊन घेतले. नंतर त्याने तिघांना एका दोरखंडाने छान बांधून "मी थोडे तापवलेले पाणी पिऊन तुम्हांलासुद्धा देतो." असे म्हणत सरोवराच्या दिशेने निघून गेला.

काही वेळाने तो तीन पानाच्या द्रोणात पाणी घेऊन आला आणि तिघां भावंडांना त्याने ते प्यायला दिले.

त्याने आपल्यावर केवढे उपकार केले असे वाटले तिघांना आणि तिघे काही एक विचार न करतां गटागटा ते पाणी प्याले. आणखी काय होणार? पाणी प्याल्यावर तिघे दगडाचे पुतळे होऊन गेले.

ते पाहून खदखदां हसत राक्षस तेथून वाड्यात निघून गेला. त्याच्या हसण्याने सारा वाडा दुमदुमला. परंतु थोड्या वेळाने परत येऊन त्याने ते तिन्ही पुतळे, तो पाहारा देत उभा होता, तेथे नेऊन ठेवले.

इकडे त्या तिघां तिळ्या मुलांची ही गत झाली आणि तिकडे दानशील राजा, राणी पद्ममुखी काळजीत मोठ्या कष्टाने दिवस काढीत होते. आपल्या मुलींना शोधून आणायला ती गोजिरवाणी मुले गेली होती, त्यांना मीच नाही का घोडे निवडून दिले होते! अजून कां बरे परत आली नाहीत? याच विचारात दोघं राजाराणी दिवस आणि रात्र काढीत होती. त्याने त्यांना पाठविले त्याच दिवशी एक काम केले होते. त्याने















आपल्या किल्ल्याच्या सर्वोच्च बुरुजावर एक खोली बांधविली होती त्या खोलीत बसून पाहिले तर दृष्टी जाई तेवढा दूरचा प्रदेश व त्यात हिंडणारा प्रत्येक मनुष्य प्राणी राजाला स्पष्ट दिसत होता.

तिळी भावंडे जाऊन पांच वर्षे लोटली. आजपर्यंत ती कोठे आहेत काय करीत आहेत कळायला मार्ग नव्हता. म्हणून राजाची काळजी दिवसेदिवस वाढतच गेली. परंतु त्याने अद्याप आशा सोडली नव्हती. तो मधूनमधून ज्योतिष्याला बोलावून विचारी—"मुली आहेत तिथे खुशाल आहेत ना? त्यांच्या जिवाला काही अपाय नाही ना कुशल" आणि ज्योतिषी पूर्वक परत

म्हणून राजा मनाचे समाधान करून घेऊन दिवस मोजीत पडून होता.

एके दिवशी पहाटे अंधुक उजेडात राजा नित्याप्रमाणे त्या खोलीत बसून पहात होता. अंधुक उजेडात राजाला दूर दोन घोडे भरधाव त्याच्या वाड्याकडे धावत येत असलेले दिसले. त्या घोड्यांचा रंग, त्यांच्यावर बसलेल्या स्वारांचा आकार आणि त्यांना बांधलेले काळे झेंडे पाहून राजा मोठ्याने ओरडला आणि स्वतःच्या छातीत खंजीर खुपसून जीव द्यायला निघाला. परंतु ओरडल्याबरोबर उठून पाहरेकरी धावले. म्हणून राजाचा जीव वांचला. परंतु भोवळ येऊन पडलाच.

राजाने डोळे उघडायला व ते घोडे येऊन समोर उभे रहायला एकच गाठ पडली.

ते परतलेले घोडे त्याने स्वतः तिघांना दिलेल्यापैकीच होते. परंतु त्यांच्यावर बसून आलेले स्वार मात्र त्या तिळ्या भावंडांपैकी नव्हते. ते त्यानेच शोधार्थ पाठवलेल्या नोकरांपैकी दोघेजण होते.

राजाने उठून त्यांच्याकडे धावत जाऊन त्यांना विचारले—"कोठे आहेत मुली? कोठे आहेत ती मुले? हे घोडे कोठे मिळाले तुम्हांला?" राजाने प्रश्नांची झडीच सुरू केली.

सेवक म्हणाले–"महाराज! क्षमा करा, राजकन्यांचा किंवा त्या मुलांचा पत्ता लागला नाही. आम्ही गावोगाव शोध काढीत हिंडत जात असतां आम्हांला एका मैदानात हे घोडे दिसले. त्यांना ओळखून आपल्या राजकन्या व तिळी भावंडे जवळ-पासच कोठेंतरी असतील असे समजून जवळपासची जागा हुडकून पाहिली. परंतु बराच वेळ शोध काढल्यावरही काही खूण देखील न मिळालेले पाहून निराश होऊन, निदान ही गोष्ट आपणांला कळवावी म्हणून धावत आलो. कदाचित सर्व दुसऱ्या वाटेने सुखरूप पोचले असतील असेही वाटले."

"नशिबात काय आहे, कोणास ठाऊक?" असे म्हणत राजा पुन्हां भोवळ येऊन पडला.

राजवाड्यातली सर्व लहानथोर मंडळी जमली व राजाच्या मनाचे सांत्वन झाल्या-वर त्याने आलेल्या घोडेस्वारांना जवळ बोलाविले आणि विचारू लागला–"अरे, तुम्हांला मुलांना हुडकून आणायला पाठविले होते आणि तुम्ही रिकाम्या हातांनी परतलातच का? त्यांना शोधायला गेलेली तिळी मुले कोठे आहेत? बिचारी तीसुद्धां कोणत्या संकटात सांपडली आहेत, न कळे! नाहीतर त्यांचा पत्ता इतके दिवस लागू नये म्हणजे काय? माझा जीव तर कंठापर्यंत आला आहे. क्षणभर देखील सरळ उभे राहवत नाही. तुम्हांला पाहून काहीतरी शुभ समाचार कळणार असे वाटले होते. तेव्हां जाऊन पुन्हा पहा, काही पत्ता लागतो का. तुम्ही येईपर्यंत मी राहतो की जातो, ते त्या परमेश्वरालाच माहीत! बरं तर निघा!" असे म्हणत राजाने त्यांना पुन्हां पाठविले.

नोकर आल्याची बातमी अंतःपुरात ही पोचली. त्या दुःखाने खचून गेलेल्या राणीच्या मनाला पुन्हा धक्का बसला व ती भ्रमिष्टासारखी बडबडू लागली.

(क्रमशः)



# तीन धनुर्धारी

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू फार मोठा प्रतिभावान आहेस ही गोष्ट खरी असली तरी जगात एकाहून एक प्रतिभावान लोक आहेत ही गोष्ट विसरून चालणार नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला सव्य-साचीची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका गावी डाव्याउजव्या दोन्ही हातांनी बाण मारू शकणारा एक हुशार धनुर्धारी होता. तो उडत्या पक्ष्यांनादेखील नेम धरून मारीत असे. म्हणून त्याला सव्यसाची हे नाव मिळाले. सर्व लोक आपल्या धनुर्विद्येची वाखाणणी करीत आहेत, हे तरी आपल्या-पेक्षा कोणी जास्त निष्णात आहे का

## वेताळाच्या गोष्टी



पहावे, या विचाराने तो अशा हुशार धनुर्धाऱ्याच्या शोधार्थ निघाला.

बरेच दिवस प्रवास केल्यानंतर तो एका गावाला आला. तेथे त्याने चवकशी केली तेव्हां त्याला कळले की दसरा आला आहे आणि मोठमोठे धनुर्विद्याविशारद आपल्या कौशल्याचे प्रदर्शन करायला जमले आहेत. तेव्हां सव्यसाचीने आपल्या प्राविण्याचे प्रदर्शन करण्याचे ठरविले.

चारीबाजूला लोक बसले होते आणि मध्यभागी रिकाम्या मैदानात एक घंटा बांधलेली होती. एका आंधळ्या माणसाने धनुष्यावर बाण चढविला आणि घंटा वाजल्याबरोबर त्या घंटेचा नेम धरून बाण सोडला. बाण घंटेला लागला. प्रेक्षकांनी टाळ्या वाजवून त्या अंध धनुर्धाऱ्याच्या कौशल्याची वाखाणणी केली.

सव्यसाची त्या अंध धनुर्धाऱ्याला भेटला. म्हणाला—"दादा! मी दोन्ही हातांनी नेम धरून बाण मारतो, उडत्या पक्ष्याचा नेम धरू शकतो. परंतु फक्त आवाज ऐकून तुझ्यासारखा नेम नाही धरता येत मला."

"म्हणून तर मला लोक शब्दवेधी म्हणतात. ज्या लोकांना दिसते ते डोळ्यांवर पट्टी बांधून शब्दवेधी बाण मारतात. परंतु माझ्यासारखा जन्मांध कोणी जगात नाही." आंधळा शब्दवेधी म्हणाला.

सव्यसाची म्हणाला—"धनुर्विद्येत किती प्रकार आहेत, हे पाहण्यासाठी मी हिंडतो आहे."

"अस्सं! तरमग चल. मीसुद्धां तुझ्या बरोबर येतो." आंधळा धनुर्धारी म्हणाला.

दोघे निघाले आणि धर्मपुरीच्या सरोवराच्या काठाने एका दाट अरण्यात येऊन पोचले. आणखी पुढे गेल्यावर त्यांना एक चकित करून सोडणारे दृश्य पहावयास मिळाले. एका बांबूच्या बेटाच्या सावलीत एक थोटा मनुष्य बसलेला होता. त्याला दोनही हात नव्हते. केव्हां तरी अपघाताने तुटले होते. तो डाव्या पायाने धनुष्य धरून तोंडाने बाणाचा नेम धरून बसला होता.

तो बाण त्याने सोडला आणि दुसऱ्या क्षणाला झाडाच्या टोकाला पक्ष्यांचे एक जोडपे बसले होते त्याला लागला. तत्क्षण पक्ष्यांचे ते जोडपे जमिनीवर पडले.

तो चमत्कार पाहून सव्यसाचीने आंधळ्याला त्याचे वर्णन करून सांगितले.

अंध धनुर्धारी आश्चर्यचकित होऊन म्हणाला—"हा आपणां दोघांहून जास्त निष्णात आहे की नाही?"

दोघे त्या थोटया धनुर्धाऱ्याला भेटून त्याच्या धनुर्विद्येची स्तुती करीत म्हणाले—"दोन्ही हात नाहीत तुम्हांला, तरी तुम्ही अचूक नेम मारलात! आम्ही इतका तरबेज धनुर्धारी कोठेही आजपर्यंत पाहिला नाही!"

दोघांनी त्याला आपल्या कौशल्याची माहिती सांगितली.

"माझ्यासारखा हात नसून अचूक नेम मारणारा धनुर्धर मी जगात कोठे पाहिला नाही. मग तुम्ही तरी कोठून पाहणार? मला दोन्ही हात असते तर मी पायांबरोबरच धनुर्विद्येच्या इतर प्रकारांत प्राविण्य मिळविले असते." तो थोटा म्हणाला.

सव्यसाची अंध व थोटया धनुर्धाऱ्यांना म्हणाला—"आपण तिघेही धनुर्विद्येत आपापल्या परीने निष्णात आहो. मग आपल्या या कलेची गोष्ट राजाला कळली नाही,



तर काय उपयोग? म्हणून आपण धर्मपुरीच्या महाराजांकडे जाऊ या आणि आपल्या कलेचे प्रदर्शन करू या. आपल्याला कीर्ती मिळेल व चार पैसेदेखील मिळतील."

"परंतु महाराजांकडून जे इनाम मिळेल, ते आपसात वाटून कसे काय घ्यायचे?" थोटयाने विचारले.

"तिघे मिळून सर्व बक्षिसे सारखीसारखी वाटून घेऊ या. त्यात कठीण काय आहे?" सव्यसाची म्हणाला.

परंतु त्या गोष्टीस थोटा कबूल झाला नाही. त्याचे वाटत होते की सर्वांनी सारखेसारखे वाटे करून घेतले तर त्याचे फार मोठे नुकसान होईल. कारण महाराज



त्यालाच सर्वात मोठे पारितोषिक देतील. तसे तो म्हणाला देखील.

शब्दवेधी म्हणाला–"असे कां रे वाटावे तुला? मला तर दोन्ही डोळे जन्मल्यापासून नाहीत तुम्हां दोघांना छान दिसते. डोळ्यांशिवाय नेम धरणे म्हणजे सामान्य गोष्ट आहे का? महाराज मला मोठे पारितोषिक देतील."

दोघांचे ते भांडण ऐकून सव्यसाची म्हणाला–"हे भांडण सोडा, महाराजच कोण उत्तम धनुर्धारी आहे, हे ठरवितील."

थोड्या अंतरावर उभी राहून एक कातकरीण त्यांचं ते संभाषण ऐकत होती. आतां ती त्या तिघां धनुर्धाऱ्यांजवळ ऐकून म्हणाली– धर्मपुरीचे महाराज तुम्हां तिघांना योग्यतेप्रमाणे बक्षिसे देतील अशी खोटी समजूत करून घेऊ नका. बक्षिसे कशी वांटून घ्यायची हे प्रथमच तुम्ही आपसांत ठरवून घ्या."

सव्यसाचीला राग आला म्हणाला–"तू आमचे आपसांत भांडण लावून गंमत पाहणार आहेस, वाटते? जणुकाही महाराजांनी बक्षिस दिलेच आणि आम्ही डोकी फोडून घेतलीच, तू असे काही बोलते आहेस. चल, चालू लाग."

ती तरुण कातकरीण खदखदां हसू लागली.

"तू कां ग हसलीस?" शब्दवेधीने तिला विचारले.

"हंसू नाही तर काय रडू? तू आहेस आंधळा. याला हात नाहीत आणि हा हात पाय असलेला चांगले डोळे असलेला. हा तुम्हां तिघांना खूप बडवून सर्व बक्षिसे एकटा बळकावून बसेल. म्हणून पहिल्यानेच काय ते ठरवून घ्यायला मी सांगितले. तुमच्यात लहान थोर कोण हे तुम्हीच ठरविणे बरं नाही का?" ती कातकरीण म्हणाली.

ते ऐकून थोटा म्हणाला–"बरोबर बोललीस! परंतु आमच्यात लहान थोर कोण हे नाही आम्हांला ठरविता येणार. तुला धनुर्विद्येची कल्पना आहे. तेव्हां तूच सांग, आमच्यापैकी सर्वात जास्त थोर कोण? तू देशील तो निवाडा आम्हांला मान्य आहे."

"तरमग प्रथम मला तुमचे धनुर्विद्येतील प्राविण्य प्रत्यक्ष पाहू दे." ती म्हणाली.

तिघांनी त्या गोष्टीस मान्यता दिली. थोटयाने लगेच डाव्या पायाने धनुष्य धरून तोंडाने बाण ओढून तीर सोडला. त्याने झाडावरच्या एका पक्ष्याचा नेम धरला होता. बाण लागताच पक्षी क्षणार्धात खाली जमिनीवर पडला. शब्दवेधीने आणखी एका झाडावर बोलत असलेल्या पक्ष्याला बाण मारून त्याला ठार केले. सव्यसाचीने दोन्ही हातांनी वेगवेगळे बाण सोडून दोघां उडत्या पक्ष्यांना ठार करून दाखविले.

सर्व पाहून घेतल्यावर ती कातकरीण सव्यसाचीला सर्वोत्तम धनुर्धारी व त्यानंतर शब्दवेधी असल्याचे सांगून जास्त काही बोलल्याशिवाय तेथून निघाली.

थोटयाला राग आला. तो ओरडून म्हणाला–"ए पोरी! तुला काय ग कळते धनुर्विद्येत असा निवाडा द्यायला? जंगलात भटकणारी तू, धनुष्य कसं धरायचे हे तरी कळतं का तुला? आम्ही नाही मानणार तुझा हा निर्णय!"



"तुम्हांला माझा निर्णय मान्य नसेल तर नका मानू. तुम्हीच निवाडा करायला सांगितलात. आतां मला या धनुर्विद्येत काय कळते, हे पाहणार आहां का? तुमचे ते धनुष्य आणि बाण द्या इकडे." असे म्हणत त्या कातकरणीने थोटयाचे धनुष्यबाण मागून घेतले.

तिने झाडाच्या टोकाला पक्ष्यांचे जोडपे होते ते दाखवून त्यांच्यामध्ये किती अंतर आहे ते पहायला सांगितले आणि बाण सोडला. "त्या गरीब पक्ष्यांना कां ठार करतेस पोरी?" थोटयाने विचारले.

"तूच पहा!" असे म्हणत तिने बाण सोडला. तो बाण त्या दोन्ही पक्ष्यांच्या

मधून पलीकडे गेला व दोन्ही पक्षी दचकले किंवा हललेदेखील नाहीत.

ते पाहून थोटा व सव्यसाची आश्चर्यचकित झाले. त्या कातकरणीने धनुष्यबाण थोटयाला दिले व तेथून निघून गेली.

शब्दवेधीने घडलेले वृत्त दोघांच्या तोंडी ऐकले. त्यानंतर तिघांनी राजाकडे जाण्याचा विचार सोडला आणि आपापल्या जागी परतले.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने राजाला विचारले–"राजा! त्या कातकरणीने आपले धनुर्विद्येतले प्राविण्य दाखविले हे खरे. परंतु तिने त्या तिघांत लहान थोर कोण, या गोष्टीचा निवाडा कोणत्या आधारे दिला? ते तिघे तरी राजाकडे कां गेले नाहीत? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"कातकरणीच्या निवाडयात चूक नव्हती. सव्यसाची खरो- [illegible] होता. कारण त्याने ठरविले असते तर इतर दोघांचे कौशल्य तो अवगत करून घेऊ शकला असता. परंतु इतर दोघांना सव्यसाची होता आले नसते. शब्दवेधीला आवाज ऐकल्याशिवाय बाण सोडतांच येणार नाही. अगदी नाइलाजाने थोटयाने प्राविण्य संपादिले होते. म्हणून इतर दोघांना नेमबाज पाहिजे तर म्हणता येईल. धनुर्विद्याप्रवीण म्हणतां येणार नाही. आतां ते राजाकडे कां गेले नाहीत हा प्रश्न. एका रानटी भटकणाऱ्या पोरीतच धनुर्विद्येत इतके प्राविण्य आहे तर तोच धंदा म्हणून करणाऱ्या धनुर्धाऱ्यात फार मोठे कौशल्य असणार यात त्यांना शंका राहिली नाही. तेव्हां आपलं हंसे करून घेण्यापेक्षा मुकाटयाने घरी परत जाणे त्यांना शहाणपणाचे वाटले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ नाहीसा झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# डाव फसला

एका गावी सीतापती व लक्ष्मीपती नावाचे दोघे अत्तराचे व्यापारी रहात असत. सीतापती सचोटीने व्यापार करी. तो खरे व उच्चप्रतीचे अत्तर विकी. या उलट लक्ष्मीपती लबाडी करी. चांगल्या अत्तरात साधे तेल मिसळून ते खरे अत्तर म्हणून विकी. त्याची ही लबाडी गिऱ्हाईकांना कळू लागली आणि त्याचा धंदा मंद पडू लागला. तेव्हां त्याने सीतापतीला त्याच्यासारखाच लबाडीचा धंदा करायला सुचविले. परंतु त्याने तिकडे दुर्लक्ष केले.

सीतापतीचा मुलगा रामू स्वभावाने फार खर्चीक होता. त्याला फितूर करून घेऊन सीतापतीला व्यापारात खोट आणता येईल का या विचाराने लक्ष्मीपतीने रामूला तो तेव्हां कर्ज देऊ लागला आणि रामू ते घेऊ लागला.

काही काळ लोटल्यानंतर लक्ष्मीपती रामूला म्हणाला–"अरे, तुमच्या कडच्या केवडयाची बाटली घेऊन येतोस का?" रामू म्हणाला–"पैसे द्या, आणतो." लक्ष्मीपतीने पैसे दिले व रामूने बाटली आणून दिली.

लक्ष्मीपतीने रामूला विचारले–"काय रे, मी दिलेल्या पैशाचे काय करीत आलास?"

"कां, मी बाबांना देत आलो." रामू म्हणाला. डाव फसल्याबद्दल लक्ष्मीपती हात चोळीत बसण्याशिवाय काय करणार?













# उदरनिर्वाह

एके दिवशी विनय नावाचा एक माणूस मध्य रात्रीच्या सुमारास कसब्याच्या गावी निघाला. तो शेताच्या बांधावरून चालला होता तेव्हां त्याला एक विचित्र गोष्ट दृष्टीस पडली. एक चोर एका झाडाखाली बसून त्याने त्या रात्री चोरून आणलेले पैसे मोजीत होता.

पैसे पाहून विनयचे मन भुरळून गेले. तो आपल्या पावलांची चाहूल लागू नये या साठी मांजराच्या पावलाने एकेक पाऊल टाकीत पुढे गेला आणि तो चोर बसला होता त्या झाडाच्या आड जाऊन उभा राहला. चोराजवळचे सर्व पैसे लुबाडण्याचे त्याने ठरविले.

चोराने पैसे मोजून एका पिशवीत ठेवले आणि पिशवी शेजारी ठेवून भिंतीला टेकून थोड्याच वेळाने घोरू लागला. चोराला चांगली झोप लागली असल्याची खात्री झाल्यावर विनयने हात पुढे करून पिशवी-वर ठेवला मात्र त्याच्या हातावर लगेच कोणाचा तरी हात जोराने पडला. विन-यच्या हातातली पिशवी सुटली आणि तो तोल जाऊन खाली पडला.

चोराने विनयचे केस धरले आणि म्हणाला–“चोरी करता येत नाही तर चोरी करायला कशाला रे आलास? मूर्खा!”

विनय रडक्या आवाजात म्हणाला–“करता आली नाही खरी!”

“तोंड पहा, चोर आपले पैसे असे बाहेर ठेवून झोपेल का? तू खरा चोर असतास तर मला असा सापडलाच नसतास. तुला मांजराच्या पावलाने येताना मी पाहिले होते.”

एकट्याने सर्व कामे होत नाहीत. मदतीला कोणी साथी मिळेल म्हणून पहात होतो.” चोर म्हणाला.

“मग काय, मीसुद्धा पोटासाठी काही तरी कामाच्या शोधार्थच निघालो होतो. मला घे ठेवून!” विनय म्हणाला.

“तुला? तुला हे काम मुळीच जमणार नाही.” चोर म्हणाला.

“तसं नको समजूस. मी आमच्या गावच्या किती लोकांना फसवून इकडे आलो आहे, माहीत आहे का तुला? कर्जे काढून एक ही कर्ज फेडल्या शिवाय गावा-बाहेर पाय काढला आहे.” विनय म्हणाला.

चोर मोठ्याने हसून म्हणाला–“खुळ्या! उद्या ते सर्व लोक तुला शोधत नाही का येणार?”

“नाही येणार. मी फसवून आलो, म्हटले म्हणजे पळून आलो असे वाटलं होय? नाही. कालच सगळ्यांचं कर्ज फेडायची तारीख होती. सगळ्यांच्या हाता-वर वाटाण्याच्या अक्षता ठेवून आलो आहे. तीन मुख्य लबाड्या केल्या त्या सांगतो. ऐकून तुझ्यात बदल होईल, बघ.” असें म्हणत विनय सांगू लागला.

आदल्या दिवशी रात्री विनय रस्त्याने चालत एका गल्लीत वळत असता समोर रामशास्त्री दिसले. तो समोरच्या घराकडे तोंड फिरवून पहात चालत राहला.

शास्त्रीबुवांनी विनयला पाहिले. त्यांनी त्याचा हात धरून दरडावून विचारले–



“तिकडे कोठे पाहातो आहेस? माझ्या डोळ्यात धूळ फेकून कोठे जाणार तू?”

विनय जणुकाही नुकतेच शास्त्रीबुवांना पाहिल्याचे सोंग करीत म्हणाला–“तुम्हीच होय शास्त्रीबुवा? मीदेखील असेच घर बांधावे, म्हणतो आहे. परंतु या घराची उंची फारच कमी दिसते आहे. कोणी चोर सहज चढून वरून आत शिरू शकेल.”

“म्हणजे तू स्वतःचे घर बांधणार होय? पहिल्याने माझे पन्नास रुपये देऊन पावती घे.” शास्त्री बुवा म्हणाले.

“देतो हो! माझे दूरची नातेवाईक एक म्हातारी आहे. चितेवर एक पाय आहे तिचा. ती आपली सर्व इस्टेट मलाच देऊन



जाणार आहे. मी त्यानंतर लगेच बांधणार आहे. एवढ्या उंचीवरच्या घरावर कोणी उडी मारून चढू शकणार नाही." विनय म्हणाला.

"अशक्य! कोणी मारुतीच जन्मला पाहिजे, इतक्या उंचावर उडी मारणारा!" शास्त्रीबुवा म्हणाले.

"तुम्हाला कळत नाही का? मीच नाही का उडी मारून त्या घरावर चढणार? पाहिजे तर त्या पन्नास रुपयांचीच पैज लावा!" मी म्हटले.

"मी हारलो तर एकूण शंभर रुपये वसूल करता येतील माझ्याकडून असे वाटले शास्त्रीबुवांना आणि म्हणाले 'बरं तर, वसूल.' मी उडी मारायला गेलो आणि पडलो. "पैजमी हारलो. तुम्हांला मी पन्नास देणे आहेत. कर्जाची फिटाम् फिट करून टाका." मी म्हणालो.

शास्त्रीबुवा माझा हात पकडून मला म्हणाले—"काय म्हणालास? पन्नास घेऊन त्या पन्नासाची फिट्टाम् फिट?"

"होय! हे पन्नास अन् ते पन्नास! फिट्टाम् फीट!" मी म्हणालो.

"सुब्बुशास्त्री मला पाटलांकडे ओढून घेऊन गेले. मी पोचल्याबरोबर पाटलांना विचारले 'पन्नास आणि पन्नासाची फिट्टाम् फीट होते की नाही हो? तुम्हीच सांगा!"

पाटीलबुवा रागावून म्हणाले—"का नाही होत? चालू लागा!"

"कशी होईल हो?" म्हणत शास्त्रीबुवा बोलू लागले.

पाटीलबुवा जास्तच रागावून म्हणाले—"तुझं डोकं बिकं तर फिरलं नाही? पन्नास आणि पन्नासाची फिट्टाम् फीट होते. मी सांगतो. पुन्हां या बाजूला येऊ नकोस."

तेव्हां मी शास्त्रीबुवांना दूर ओढून घेऊन जाऊन म्हणालो—"पाटीलबुवा सुद्धां नाही का म्हणाले? आणखी त्यांना त्रास दिलात तर कोरड्यांचीच शिक्षा होईल."

[illegible] शास्त्रीबुवा मोठ्याने ओरडले. मी त्यांना घरी पोचवून आलो. ते कर्ज असे फिटलं!"

विनयने आपल्या दुसऱ्या पराक्रमाचे वर्णन केले. त्या दिवशी दुपारी शेटजींनी त्याला धरले व म्हणाले—"तुझ्या साठी हिंडून हिंडून पाय घासून गेले. माझे उधारीचे सत्तर रुपये आण इकडे!"

"मी तुमच्या सत्तर रुपयांसाठीच बाहेर पडलो होतो. तुम्ही दिलेले ते भिकेचे पैसे मी वापरले वाटले का तुम्हांला? तो पहा, त्या घराच्या ओसरीत थेरडा झोपला आहे ना, त्याला दिले. त्याला कोठून तरी सत्तर रुपये यायचे आहेत म्हणे. आले का विचारून पाहू या. चला!" विनय म्हणाला.

त्या ओसरीत खाटेवर चांगला झोपलेला होता तो म्हातारा. दाराची कडी वाजविल्यावर एका मुलीने येऊन दार उघडले. विनयने खुणेने म्हाताऱ्याला दाखवून विचारले—"कधी विचारले तर सत्तर यायचे आहे, म्हणतात ते. तू नात ना त्यांची, तुला आहे का काही माहीत?"

"सत्तर, कर्म माझे, ऐंशी आले असतील! एक कवडी देईल तर शपथ, इसर उपाशी मेले तरी याला पोसले पाहिजे!" दार बंद करीत ती मुलगी म्हणाली.



मुलीला म्हाताऱ्याचे वय विचारले होते विनयने. परंतु शेटजींना पैसेच वाटले.

"पाहिलेत! आलेले पैसे दाबून ठेवले आहेत, म्हाताऱ्याने! ऐंशी म्हणजे तुमचे व्याजाचे धरून तेवढेच होतील की. बरं तर मी जाऊ का?" म्हणत मी तेथून पाय काढला आणि एका झुडपाआड लपून पाहू लागलो काय होते ते.

म्हातारा उठेल म्हणून शेटजींनी बराच वेळ वाट पाहिली. परंतु तो उठला नाही म्हणून शेटजींनी त्याला हलवून पाहिले. म्हाताऱ्याने मांजर किंवा कुत्रे असेल असे समजून जोराने लाथ मारली ती शेटजींना लागली व तो तसाच झोपून राहिला.



लाथ लागून शेटजी ओसरीतून खाली पडले. त्यांना खूप राग आला. त्यांनी उठून ओसरीत ठेवलेले दांडके घेतले आणि म्हाताऱ्याच्या डोक्यात हाणले आणि म्हणाले–"माझे पैसे दे आणि वाटेल तेवढा झोप."

शेटजींनी मारले ते दांडके कोठे मर्मस्थानी लागले आणि म्हातारा किंकाळी फोडून थंड गार झाला. शेटजींनी जवळचे तीनशे रुपये म्हाताऱ्याच्या मुलाला दिले आणि फाशीच्या शिक्षेतून स्वतःची सुटका करून घेतली.

त्या दिवशी संध्याकाळी विनय शूर-वर्म्याला भेटला. तो होता क्षत्रीय, परंतु होता काटकोळा, सर्व हाडे बाहेरून मोजून घ्यावीत. त्याशिवाय त्याला मोठे कुबड होते. त्याचे लग्न झालेले नव्हते. सावकारी करून तो पैसे मिळवी. विनयने त्याच्याकडून दीडशे रुपये घेतले होते.

तो शूरवर्म्याला म्हणाला–"काय हो, सर्वांची कर्ज उधारी फेडून हात आतांच रिकामा झाला आणि तुम्ही काय भेटलात?"

"मी काय करावे म्हणतोस? घरातली सर्व कामे मीच करणार. तुझ्या शोधार्थ निघायला आतांपर्यंत फुरसतच मिळाली नाही." शूरवर्मा म्हणाला.

"मला माहीत नाही, म्हणून विचारतो. काय हो, तुम्ही इतके दिवस लग्न कां नाही करून घेतलेत?" विनयने विचारले.

"मुलगी कोण देतो मला?" शूरवर्मा म्हणाला.

"तुम्हांला मुलगी न द्यायला काय झालं हो? त्या घरात पार्वतीबाई म्हणून एक श्रीमंत बाई राहते. तिला तारा नावाची मुलगी आहे. नक्षत्र आहे, मुलगी म्हणजे. तुमच्या सारख्या थोर श्रीमंताला देऊन लग्न करायचे आहे पार्वतीबाईना आपल्या मुलीचे. विचारा जाऊन. पार्वतीबाईंना माकडे आणि कुत्री म्हणजे जीव की प्राण. माकडासारखा आहे अमुक मनुष्य म्हटले म्हणजे तिला तो फार आवडतो. कुत्र्या-सारखा ठेवीन म्हटले की ती खूष. ही गोष्ट विसरू नका म्हणजे झालं."

ते ऐकून पैशाची गोष्ट शूरवर्म्यांने काढली नाही आणि पार्वतीबाईच्या घरी गेला. तिने दार उघडून विचारले–"कोण पाहिजे, तुम्हांला?"

"मी तुमच्या ताराला पाहायला आलो आहे. तुमचा जावई होईन म्हणतो." शूर-वर्मा म्हणाला.

पार्वतीबाई घरात गेली आणि चूल पेटवून शिरा करायला कढई तापत ठेवली. परत येऊन शूरवर्म्याला म्हणाली–"माझ्या ताराचे केवढे नशीब? तिच्याविषयी तुमचे काय मत आहे?"

शूरवर्मा तिची वाखाणणीच जणुकाही करीत म्हणाला–"ते काय विचारायला हवं? छान माकडासारखी आहे."

"बरं जावई बापू! मला कधी तुमच्या घरी यावं लागलं तर चार दिवस ठेवून घ्याल ना?" पार्वतीबाईंनी विचारले.

"कुत्र्यासारखं ठेवीन तुम्हांला. कमी करीन वाटलं का तुम्हांला?" शूरवर्मा म्हणाला.

पार्वतीबाई भडकली. घरात गेली छान तापलेले उलथणं घेऊन आली आणि शूर-वर्म्याच्या पाठीवर तीन डाग ओढले. "चालता हो, मूर्ख कोठला. तुझं तोंड



पाहून कोण मुलगी देईल रे तुला?" असे म्हणत शूरवर्म्याला धक्के देऊन घराबाहेर काढले तिने.

शूरवर्मा थोडा काळोख पडल्यावर घरी जायचा विचार करून वाट पहात बसला. तेवढ्यांत विनयने त्याला गाठले आणि विचारले–"पैसे घेतल्या शिवाय निघालात का हो? पार्वतीबाईंनी दिल्या वाटते, दोन एक?"

"गप्प बस बाबा! हे सर्व तुझ्यामुळेच झाले, तू पैसे द्यायची गरज नाही. परंतु ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळता कामा नये, एवढे मात्र लक्षांत ठेव. गाव-भर पसरेल ही बातमी." असे म्हणत

शूरवर्म्याने विनयच्या हातात पंचवीस रुपये ठेवले–आणि निघून गेला.

विनयने सुद्धा पार्वतीबाईच्या हातचे पाठीवर डाग ओढवून घेतले होते. शूरवर्म्याने 'नको नको' म्हणून किती म्हटलं, परंतु तिकडे दुर्लक्ष करून विनयने त्याच्या डागांना दुखविले आणि काळोख पडल्यावर गावाबाहेर पाय काढल्याचे सांगितले.

विनयचा सर्व पराक्रम ऐकून चोर म्हणाला–"तुझ्यासारखा बिलंदर आणखी कोठे पाहिला नाही. परंतु या सर्व पराक्रमांचे चांगले फळ तुला मिळालं असलं तरी त्यात तुझी अक्कल कोठे ती नाही दिसली. रामशास्त्री होता भोळा. मी असतो तर मी तुला डाव्या हाताने उचलून त्या घरावर फेकला असता. शेटजींच्या बाबतीत म्हणशील तर म्हातारा अगदी अनपेक्षित पणेच मेला नाही का? म्हणून तुला फावले. शूरवर्मा पार्वतीच्या फंदांत पडला नसता तर तो तुझ्या जवळून दुप्पट तिप्पट पैसे वसूल केल्याशिवाय राहला न[illegible] कीचा नाहीस, एवढे मात्र खरे."

चोर निघून गेल्यावर विनय झाडाखालीच बसून विचार करू लागला. कर्ज काढायचे व उधारी करायची म्हणजे त्याला भीती वाटत होती. या शिवाय मोठ्या शहरात त्याला कर्ज देणार तरी कोण? चोरी करायचीसुद्धा लायकी नाही. विद्या नाही, चारपैसे हातात नाहीत. पोट कसे भरायचे?

उजाडायची वेळ होत आली होती. लोक शेतावर कामाला निघाले होते. विनय उठून उभा रहीला. "मी काम करायला तयार आहे. मी येऊ का तुमच्या बरोबर?" त्याने त्यांना विचारले.

"चल की, त्यात विचारायचे काय? पण कष्ट करावे लागतील." ते म्हणाले.

विनयला उपजीविकेचे एक साधन मिळाले. तो त्यांच्या बरोबर सूर्योदया पासून सूर्यास्त होईपर्यंत काम करून पोट भरू लागला.



# निवाडा

गोपाळ नावाच्या एका शिष्याने गुरूजवळ न्यायशास्त्राचा अभ्यास केला. विद्याभ्यास पुरा करून तो घरी निघाला तेव्हां गुरुने गुरुदक्षिणा म्हणून त्याला एक हजार वराह द्यायला सांगितले.

तेव्हां गोपाळ म्हणाला–"गुरुवर्य! मी आतां नाही देणार. मी पहिला कज्जा जिंकला म्हणजे एक हजार रुपये देईन." गुरुने त्या गोष्टीस मान्यता दिली.

गोपाळ निघून गेल्यावर गुरुने न्यायालयात गोपाळकडून एक हजार वराह येणे असल्याची तक्रार नोंदविली.

न्यायाधिशाने त्याला बोलवून विचारले–"यावर तुझे काय म्हणणे आहे?"

"गुरुवर्यांनी माझ्याकडून गुरुदक्षिणा म्हणून एक हजार रुपये मागितले ही गोष्ट खरी आहे. मी पहिला कज्जा जिंकल्यावर ती रक्कम देतो, हे कबूल केले होते हेदेखील खरे आहे. परंतु आपण माझ्याकडून त्यांना एक हजार वराह देवविलेत तर मी पहिल्याच कज्जात हारल्यासारखे होईल आणि त्यांना गुरुदक्षिणा देण्याची गरज राहणार नाही. या कज्जांत मी जिंकलो तर त्यांना मी द्यावयाची रक्कम मी देण्याची गरज नाही. असाच तुम्ही दिलेल्या निवाड्याचा अर्थ होईल." गोपाळ म्हणाला.

न्यायाधिशाला काय निवाडा द्यावा सुचेना, म्हणून या कज्जाची चवकशी आणखी शंभर वर्षांनंतर विचारासाठी घेण्याचे त्याने सांगितले.





# बाटलीत अंडे

एका गावात जनक नावाचा एक लोभी व क्षुद्रबुद्धीचा माणूस रहात असे. पैशासाठी तो वाटेल ते काम करायला सिद्ध असे.

जनकाचा मुलगा बापाच्या अगदी विरुद्ध होता. तो आपल्या गावापासून पन्नास मैलावरच्या एका व्यापाराच्या गावी एका व्यापाऱ्याकडे नोकरी करीत असे. म्हणून त्याला आपल्या गावी राहणे शक्य नव्हते.

दोन वर्षांपूर्वी मुलाची आई वारली. जनकाला दोन वेळचा सैपाक करून वाढायला कोणी राहले नाही. तेव्हां त्याने सुलता नावाच्या एका मुलीशी मुलाचे लग्न करून देऊन सून आणली. सुलतेचे वडील घरचे श्रीमंत होते. त्यांनी जांवयाला हुंडा व संसाराला लागणाऱ्या अनेक वस्तु लग्नाच्या वेळी दिल्या.

सुलता स्वभावाने व अंगाने थोडी नाजूकच मुलगी, परंतु हुशार होती. लग्नापूर्वी तिने घरीच आपल्या चुलत्याजवळ थोडा विद्याभ्यास केला होता. त्यांचे नाव देवदत्त होते. ते शाळामास्तरकी करीत. थोडी जादू वगैरेची सुद्धा त्यांना माहिती होती.

सुलता सासरी आली ती घरची मोलकरीणच झाली. घरातली भांडीकुंडी घासणे व कपडे धुणे ही कामेसुद्धा सुलतालाच करावी लागत. नवरा परगावाहून मधून मधून दोन तीन दिवस येई तितकेच दिवस थोडे आनंदात जात. बाकी घरातली चाकरी तिला सकाळपासून संध्याकाळपर्यंत करावी लागे. तिला नको जीव वाटू लागले.

जनक सुनेला कधी माहेरी जाऊ देत नसे. लग्न झाल्यावर दोन वर्षांत फक्त एकदांच सुलता नवऱ्याबरोबर माहेरी गेली होती.

दोन वर्षे झाली तरी सुनेच्या पोटी एकाही नातवंडाचे तोंड पहायला मिळालं नाही म्हणून जनकाची ओरड चालूच होती. एक दोनदां तो रामूला म्हणाला– "या बायकोला दे सोडून दुसरे लग्न कर. आपले गावकरी गंगाधरराव आहेत ना, त्यांची सुलोचना कशी नक्षत्रासारखी मुलगी आहे. तिच्याशी लग्न केलेस तर गंगाधर चांगला हुंडा देईल. पाच एकर चांगली सुपीक जमीन देईल आणि वर हजार दोन हजार रोख देईल."

तो म्हणाला–"सुलताने कोणती चूक केली म्हणून तिला सोडू म्हणता? सुलोचनेला तरी मूल होईल हे कशावरून? माझ्या कपाळावर कदाचित पितृत्व लिहिलं नसेल देवाने?"

तरी जनकाने आशा सोडली नाही. मुलाचे दुसरं लग्न करून द्यायचा हट्ट फक्त लोभीपणामुळेच होता. गंगाधराच्या शेतावर व पैशावर जनकाची नजर होती. सुलोचना फक्त तिचे नावच होते. कारण तिच्या एका डोळ्यात फूल पडले होते.

सुलताच्या माहेरून तिला भेटायला दर महिन्यात कोणी तरी येई आणि बरोबर कापडचोपड भाजीपाला व काही तरी गोडधोड आणी. म्हणून त्यांच्या येण्याजाण्याला जनकाकडून अटकाव नव्हता. सुलताची आई प्रत्येक वेळी मुलीला पहावेसे वाटते म्हणून निरोप पाठवी. परंतु जनकाने सुनेला एकदांदेखील पाठविले नाही. समोर सासऱ्याशी कसे बोलायचे म्हणून सुलता कधी काहीच बोलत नसे.





एकदां सुलताचा चुलता स्वतःच तिला भेटायला आला. म्हणाला–"तुझ्या नावाचा जप करते आहे तुझी आई. तिने अंथरूण धरले आहे. तू भेटल्याशिवाय ती बरी होणार नाही असे वैद्य म्हणत आहेत."

सुलतेची धोंड गळ्यातून काढायला चांगली संधी चालून आल्यासारखे जनकाला वाटले. तो देवदत्ताला म्हणाला–"मी तिला चांगलासा दिवस पाहून माहेरी पाठवून देतो." ते ऐकून देवदत्त निघून गेला.

जनकाने बराच वेळ विचार करून गंगाधराला मनातली गोष्ट कळविल्यावर तो दुजोरा देत म्हणाला–"सुलतेची धोंड बाजूला सारायला याहून चांगला उपाय असणेच शक्य नाही."

जनक घरी आल्यावर सुलतेला म्हणाला–"सुनबाई! मी उद्या तुला माहेरी पाठवायचे म्हणतो आहे. परंतु एक अट आहे. ती तू मान्य केली पाहिजेस."

"मामंजी! मला सर्व मान्य आहे." सुलता म्हणाली.

"ही पहा, बाटली. तू परत येतांना या बाटलीत सर्वांना चकित करील, असे काही तरी घेऊन परत आले पाहिजेस. कळलं का? तसं तुला करतां आले नाही तर तू परत येण्याची सुद्धा गरज नाही. रामूचे दुसरे लग्न करून देईन." असे सांगून जनकाने एक चिंचोळ्या तोंडाची गोल बाटली सुलतेच्या हातात दिली.

सुलताने क्षणभर डोळे मिटून विचार केला व म्हणाली–"मामंजी, कळलं मला."

"ही अट तू मान्य केली आहेस, होय ना?" जनकाने सुनेला जास्त जोर देऊन विचारले.

"होय, मान्य आहे. परंतु माझी सुद्धा एक अट तुम्ही मान्य केली पाहिजे, मामंजी! अट म्हटली म्हणजे दोन्ही बाजूंनी मान्य झाली पाहिजे, होय की नाही?" सुलतेने विचारले.

"तुझी काय अट आहे, ऐकू तर दे!" जनकाने विचारले.

"मी तुमची अट कबूल करून ती पुरी केली तर मी येथेच राहले पाहिजे असं होता कामा नये. मला वाटले व सोयीचे असेल तर यांच्याबरोबर मला त्या गावी जायला मिळाले पाहिजे." सुलताने ही अट घातली.

जनकाने विचार करून ठरविले की माझी अट पुरी करणे हिला मुळीच शक्य नाही. तेव्हां तिची अट मी पुरी करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. म्हणून त्याने तत्काळ होकार दिला.

सुलता आपल्या सासऱ्याला देवळात घेऊन गेली आणि देवासमोर तिने व सासऱ्याने आपापल्या अटी सांगून आणाशपथा घेतल्यानंतर सुलता सासऱ्याने दिलेली बाटली घेऊन माहेरी निघून गेली.

"ही बाटली कसली ग?" आईवडिलांनी व चुलत्याने सुलतेला विचारले.

"ती एक गंमत आहे. माझ्या मामंजींनी मला सोडचिट्ठी देवविली आहे." असे सांगून सुलतेने घडलेले वृत्त सांगितले.

देवदत्त ते सर्व ऐकून स्मित करीत म्हणाला–"एवढेच ना? त्यासाठी तू मुळीच काळजी करण्याचे कारण नाही. इतके दिवस माझ्या जादूची गरज कधी कोणाला भासली नव्हती. आता तिचा नक्कीच उपयोग होणार. तू येथे एक आठवडाभर अगदी बेफिकीर होऊन रहा. मी तुझ्या सासऱ्याचे डोके ठिकाणावर आणतो. तू



जातांना या बाटलीत नक्कीच काही तरी अद्भुत घेऊन जाशील."

देवदत्ताने एका काचेच्या रुंद तस-राळ्यासारख्या भांड्यात हरभऱ्याच्या डाळीचा आमटीसारखा आंबट द्रव ठेवला आणि बाटलीच्या तोंडाहून मोठे अंडे एक अंडे त्या द्रवात पांच दिवस ठेवले. नंतर ते काढून पाहिले तर अगदी मऊ झाले होते. त्या स्थितीत त्याने ते अंडे हळूहळू दाबून त्या बाटलीच्या तोंडातून आत खुप-सून बाटलीत सोडले. नंतर त्याच तोंडावाटे बाटलीत थंडगार पाणी सोडले. ते अंडे पुन्हा पहिल्यासारखे फुगून कडक झाले.

सुलता सासरी पोचण्यापूर्वी रामूला निरोप गेला होता. तो सासुरवाडी आला. सुलतेबरोबर तो तिचे आईवडील व चुलता सगळे जनकाच्या घरी गेले.

सासरी पोंचताच सुलतेने सासऱ्याला ती बाटली दाखवून त्याने सांगितल्याप्रमाणे त्या बाटलीत सर्वांना आश्चर्य वाटेल अशी एक वस्तू आणल्याचे दाखविले.

जनकाने ती बाटली हातात घेऊन खालीवर करून चारीबाजूला कोठे भेगचीर तर गेलेली नाही ना या गोष्टीची खात्री करून घेतली. परंतु आत अंडे होते. कसे गेले? एक आश्चर्य करण्यासारखीच गोष्ट होती. एवढे मोठे अंडे इतक्या बारीक तोंडातून आत कसे गेले?

"हा अद्भुत् चमत्कार आहे, आहे ना मान्य, मामंजी?" सुलतेने विचारले.

"होय, आहे कबूल!" पडलेल्या स्वरात जनक म्हणाला.

"म्हणजे तुम्ही घातलेली अट पुरी केली मी. आता माझी अट तुम्ही पुरी केली पाहिजे. मला ह्यांच्याबरोबर ह्यांच्या कामाच्या गावी पाठवा आता." सुलता म्हणाली.

त्यानंतर ती आपल्या नवऱ्याबरोबर जाऊन त्या मोठ्या गावात राहू लागली. दोघांचा संसार सुखाचा झाला. आतां त्यांना दोन मुले आहेत–एक मुलगा आणि एक मुलगी!





# चोर भुते

एका गावात दोन चोर होते. एक चोरी करण्यात वस्ताद होता तर दुसरा निसटून पळून जाण्यात पटाईत होता. दोघे परस्परांना मदत करीत आणि अशातऱ्हेने त्यांचा चोरीचा धंदा खूप चाले.

एकदां त्या गावचे भटजी घराला कुलूप लावून बायकोला बरोबर घेऊन परगावी गेले. चोरांना संधी सापडली. दोघे रात्री त्या घरात शिरले आणि घरात जे काही हाती लागले ते सर्व घेऊन बाहेर पळून जाण्याचा बेत करू लागले.

त्याच वेळी एका शेतकऱ्याला चोरांचा संशय आला आणि तो मोठ्याने ओरडू लागला–"चोर, चोर!" ऐकून गावकरी धावले आणि त्या भटजींच्या घराच्या चारी बाजूला वेढा देऊन उभे राहले.

चोर घाबरले काय करावे त्यांना सुचेना. थोड्या वेळाने पळून जाण्यात पटाईत असलेला चोर दुसऱ्याला म्हणाला–"मित्रा! असे घाबरून चालणार नाही. काही तरी उपाय काढून येथून पाय काढला पाहिजे." असे म्हणत त्याने एक युक्ती सुचविली.

त्यानंतर दुसरा बायकी स्वरात बाहेर-च्या लोकांना ऐकू जाईल इतक्या मोठ्याने म्हणाला–"ही गडबड कसली रे?"

दुसरा आपला आवाज बदलून–"हे सर्व फुकट आहे ग. वेडे आहेत सर्व लोक! आपण भुते आहो, हे त्यांना माहीत नाही. चोर सम-जून ओरडा करीत आहेत. आपण आलो हीच चुकी केली. ह्या भटाच्या घरात आपल्याला काय मिळणार खायला? येथे कोंबडी, बकऱ्या, मेंढरे काही तरी असेल तर ना उजाडायची वेळ आहे. आपण पाटलाच्या घरात शिरू या. आपल्याला हवी तितकी कोंबडी, बकऱ्या व मेंढरे मिळतील खायला. उजाडण्यापूर्वी आपल्या बिळात जाता येईल."

बायकी आवाजात पहिले भूत म्हणाले–
"बरं मामा! आपण तसंच करू या."

बाहेरच्या लोकांनी हे सर्व ऐकले व म्हणाले–"भुते आहेत हो भुते! चला पाटीलबुवांना जाऊन सांगू या. त्यांच्या घरात शिरतील भुते." असं आपसात ठरवून सर्व लोक पाटलाच्या घरी धावले.

ते लोक तिकडे निघून गेले व इकडे चोर मोठमोठी गाठोडी डोक्यावर पाठीवर घेऊन पसार झाले.

गलका ऐकून पाटील बुवा घाबरून बाहेर आले.

"संभाळा हो संभाळा! भुते शिरायला येत आहेत तुमच्या घरात. कोंबडी, मेंढरे आणि बकऱ्या मारून खातील. भटजी-बुवांच्या घरात शिरली होती. तेथे त्यांना काही खायला मिळाले नाही, म्हणून तुमच्या घराकडे धावली." लोक म्हणाले.

ही गोष्ट एकटघादुकटघाने नाही सांगि-तली. प्रत्येक जण तेच म्हणाला तेव्हां पाटलाने घराच्या चारीबाजूला मळ्यात व गोठ्यात बंदोबस्तासाठी पाहरेकरी नेमले. भुतांना पळविणारे मांत्रिक पाटला-च्या हुकमावरून धावले. त्यांनी सुपे, केरसुण्या वगैरे मागविल्या व मोठा जाळ केला. मांत्रिक पाहारेकरी पाटलाकडून बक्षिसे घेऊन आपापल्या घरी गेले.

दुसऱ्या दिवशी भटजी सौभाग्यवतीसह परतले. लोकांनी गावात रात्री घडलेले वृत्त सांगितले. भटजींना हायसे वाटले. परंतु घरात जाऊन पाहतात तर सुताचा एक दोरादेखील दिसला नाही. चोरांनी सर्व घर झाडून नेले होते. भटजीबुवांनी गावकऱ्यांना खूप शिव्या दिल्या म्हणाले–"सर्व आंधळे होते आणि बाहेर होते. यांची अक्कल गेली होती कोठे? चोरांनी घरात शिरून सर्व लांबविले आणि हे लोक त्यांना भुते समजून निघून गेले."

पाटीलबुवाले म्हणाले–"लोक तरी काय मूर्ख आहेत? उगाच मला घाबरवून सोडलं होतं. झोप येऊ दिली नाही."



# शिकाऱ्याचा मुलगा

एका शिकाऱ्याला एक मुलगा होता. तो नेहमी शंकाकुशंका काढीत बसे आणि फुकट वेळ घालवी. एकदां बापाने मुलाला बोलावून म्हटले–"बाळा! आज मला बरं वाटत नाही आहे. तू रानात जाऊन ससा किंवा हरण सांबर जे मिळेल ते शिकार करून घेऊन ये."

मुलगा शिकारीला निघाला. बराच वेळ तो जंगलात हिंडला फिरला. परंतु त्याला एकदेखील जनावर दिसले नाही. उन्हांत वणवण फिरल्यामुळे त्याला तहान लागली म्हणून तो एका तलावाच्या काठी पाणी प्यायला गेला. तेथे त्याला पाणी पीत असलेला एक ससा व एक हरण दिसले.

लगेच तो धावत घरी गेला आणि बापाला विचारू लागला–"बाबा! मी पाणी पीत होतो, तेथे मला एक ससा व एक हरण पाणी पीत असलेले दिसले. तुम्हांला काय पाहिजे हरण की ससा?"

"अरे खुळ्या! ती जनावरे तू तेथे जाईपर्यंत तुझी वाट पहात राहतील, असे वाटले का तुला?" बाप काळजीत पडला, पुढे या मुलाचे कसे व्हायचे?





# मंदबुद्धी

एका गावात एक मंदबुद्धीचा मुलगा रहात असे. तो एका व्यापाऱ्याकडे काम मागायला गेला. तो व्यापारी कपड्याचा व्यापार करी. त्या व्यापाऱ्याने विचार केला की या मुलाला काही तरी कामाला लावावा. तो मजूरी करण्यालायकच मुलगा होता. तरी व्यापाऱ्याने त्याला प्रोत्साहन देण्यासाठी एक काम द्यायचे ठरविले.

व्यापाऱ्याने मंदबुद्धीला कापडाचे एक ठाण दिले व बाजारात हिंडून फिरून किंवा एका जागी बसून ते विकायला सांगितले.

परंतु मंदबुद्धीला काय करावे सुचेना. त्याने व्यापाऱ्याला विचारले—"काय हो, हे कोणत्याभावाने विकू म्हणता?"

व्यापारी हे समजून की त्याला कापडाची व किमतीची थोडी फार कल्पना असेल, म्हणाला—"काही नाही रे, एक आणा इकडे किंवा एक आणा तिकडे!"

मंदबुद्धी सर्व कळल्यासारखा ते ठाण घेऊन मोठ्या बाजारात जाऊन बसला. कोणी येऊन विचारले की हे ठाण केवढ्याला रे की तो म्हणे, "एक आणा इकडे किंवा एक आणा तिकडे. याहून कमी घेणार नाही. लोकांना ते काही कळत नव्हते. कोणी वेडा पीर दिसतो आहे असे समजून लोक हसत पुढे निघून जात.

एक तरुण मनुष्य हे सर्व पहात उभा होता. तो मंदबुद्धीजवळ येऊन म्हणाला—"हा घे एक आणा या हातात आणि हा एक आणा त्या हातात आणि दे ते ठाण, मी घेतो!" आणा इकडे व आणा तिकडे याचा अर्थ हाच असला पाहिजे, असे मंदबुद्धीला वाटले व त्याने दोन आणे घेऊन ते ठाण त्या माणसाला दिले.

मंदबुद्धीला नेमकी त्याच वेळी खूप भूक लागली. त्याने दोन आणे देऊन एका दुकानात एक पावरोटी विकत घेतली व ती स्वस्थपणे बसून कोठेतरी खायला बसण्यासाठी जागा पाहू लागला. तेवढ्यात त्याच्या पाठीमागून येऊन एका कुत्र्याने ती पावरोटी ओढून नेली.

मंदबुद्धीला फार भूक लागली होती. तो त्या व्यापाऱ्याकडे गेला आणि म्हणाला—"तुम्ही मला एकच एक ठाण दिलेत. चांगली दहा वीस दिली असतीत तर अवीच आतापर्यंत विकून नसती का टाकली?"

"तू विकलेस त्या ठाणाचे पैसे दे आधी. उद्यां घेऊन जा, हवी तितकी ठाणे!" व्यापारी त्याला म्हणाला.

"ठाण विकून पैसे मिळाले त्याची पावरोटी विकत घेतली होती खायला. ती एका कुत्र्याने ओढून नेली. मी अगदी खरे शपथ घेऊन सांगतो, एक तुकडादेखील खाल्ला नव्हता हो!" मंदबुद्धी म्हणाला.

ते ऐकून व्यापाऱ्याला भयंकर राग आला. तो ओरडला—"काय म्हणतोस? पावरोटी विकत घेतलीस! त्या ठाणाची किंमत येथे मोजून पुढे ठेव, नाही तर डोके फोडीन तुझे!"

मंदबुद्धी एक क्षणभरदेखील तेथे थांबला नाही. तो तेथून पळाला आणि कुत्रा



रोटी खात जेथे उभा होता तेथे गेला. परंतु कुत्रा तेथे नव्हता. त्या कुत्र्याला शोधत तो निघाला. शोधता शोधता तो कुत्रा मिठाईच्या एका दुकानासमोर टाकलेली पाने चाटत असलेला दिसला. तो त्याच्यावर ओरडू लागला—"माझे पैसे! माझे पैसे!"

तो कुत्रा त्याचे ओरडणे ऐकून भ्याला व वाट फुटेल तिकडे पळू लागला. शेवटी तो एका श्रीमंताच्या घरात शिरला. मंदबुद्धीने मागचा पुढचा काही एक विचार केला नाही आणि त्या घरात शिरला. त्या वेळी त्या घराचा मालक पैसे मोजून पिशव्या भरीत होता आणि












त्या तिजोरीत ठेवीत होता. तेवढ्यात त्याला एक क्षणभर घरात जावे लागले. मंदबुद्धी घरात आलेला त्याला दिसला नव्हता. मंदबुद्धीला छान फावले. त्याने एक पिशवी उचलली आणि पळाला आणि त्याने ती पिशवी व्यापाऱ्याला नेऊन दिली.

ठाण विकून चांगली मिळकत करून दिली मुलाने असे व्यापाऱ्याला वाटले. त्याने त्याला काही पैसे दिले आणि जायला सांगितले.

तिकडे त्या सावकाराने चोरी झाल्याचे कोतवालाला कळविले. शोध काढता काढता कोतवालाला सुगावा लागला त्यावरून हे काम मंदबुद्धीचेच असल्याची त्याला शंका आली. त्याने त्याला कैद करून विचारले– "तू सावकाराकडचे पैसे चोरून नेलेस की नाही?"

तो म्हणाला–"होय!"

"केव्हां चोरलेस?" कोतवालाने विचारले.

"कुत्र्याचा पाठलाग करीत त्याच्या घरी गेलो त्या दिवशी!" मंदबुद्धी म्हणाला.

"कुत्र्याचा पाठलाग करीत कोणत्या दिवशी गेलास?" कोतवालाने विचारले.

"पैसे चोरले त्या दिवशी!" मंदबुद्धी म्हणाला.

कोतवालाला काय विचारावे कळेना. तरी त्याने विचारले–"तुझे घर कोठे आहे रे?"

"ब्राह्मणाच्या घरासमोर!" मंदबुद्धी म्हणाला.

कोतवालाने विचारले–"ब्राह्मणाचे घर कोठे आहे?"

"माझ्या घरासमोर!" मंदबुद्धी म्हणाला.

"अरे पण ती दोन्ही घरे कोठे आहेत?" कोतवालाने विचारले.

"दोन्ही समोरासमोर आहेत!" मंदबुद्धी म्हणाला.

मंदबुद्धी मूर्ख वेडा असल्याची खात्री होऊन कोतवालाने त्याचा नाद सोडला व त्याला जायला सांगितले.





# १६०. मेरुपर्वत

उत्तर कुरु प्रांत हा इहलोकातला स्वर्ग आहे, तो मानवाला अजिंक्य अशा शिखरावर, हिमालयात अत्यंत उंच अशा जागी आहे, तेथे राहणारे लोक निष्पाप असतात, त्यांना शेत नांगरणे, रथात बसून जाणे माहीत नाही असे ऐतरेय ब्राह्मण ग्रंथात व बौद्ध ग्रंथात लिहिलेले आहे. आपण हल्ली 'पामीर' चे पठार म्हणतो तेच ते स्थान. या विसाव्या शतकातही अगदी परवांपरवांपर्यंत मनुष्य जातीला तेथे पोचता आले नव्हते. सोव्हिएट राजवटीत या भागात सभ्यतेचा विकास होत आला आणि आतां येथे उद्याने व उपवने प्रेक्षणीय अशी झालेली आहेत. मुख्य म्हणजे विजेच्या शक्तीचा उपयोग होऊ लागला आहे. तिरुपतीसारखेच येथे सात पर्वत आहेत. यालाच आपले पूर्वज मेरुपर्वत म्हणत होते.





# चमत्कार अंगाशी आला

फार जुनी गोष्ट आहे. विदर्भ देशात एक राजा राज्य करीत असे. त्याला कोणी अद्भुत चमत्कार करून दाखविला की राजा त्याला मोठे बक्षीस देऊन त्याचा सत्कार करी.

त्याच्या राज्यात प्रवर नावाचा एक मांत्रिक होता. त्याला रसायन शास्त्राचे उत्तम ज्ञान होते. त्याने पुष्कळ प्रयत्न करून एका रसायनाचा शोध लावला. कोणी ते रसायन पिण्यापूर्वी आपल्या अमुक रूप मिळावे असे इच्छून रसायन घेतले तर त्याला ते रूप नक्की मिळेल अशी त्याची खात्री झाली होती. परंतु तो चमत्कार दाखवून राजाकडून बक्षीस मिळविण्याचा त्याने प्रयत्न केला नाही. कारण ते रसायन पिऊन इच्छिलेले रूप मिळाले तर पुन्हां स्वस्वरूप मिळविण्याचे रसायन तयार करण्याची रीत त्याला माहीत असली तरी ते रसायन तयार करायला लागणारी एक वस्तु मिळणे त्याला अशक्य वाटत होते. म्हणून त्याने आपल्या रसायनाचा चमत्कार दाखवून राजाकडून बक्षीस मिळविण्याची हाव धरली नव्हती. तरी राजाला रसायन दाखवावे की नाही या द्विविध मानसिक अवस्थेत त्याने ते रसायन राजाला एका पेल्यात ओतून दाखविले व म्हणाला—"या रसायनाचा जो परिणाम होईल त्याची तोड अद्याप माझ्या जवळ नाही. त्यासाठी लागणारी वस्तु अद्याप मिळालेली नाही. म्हणून मी या रसायनाचा प्रयोग केला नाही. तेव्हा हे रसायन एक अद्भुत चमत्कार मानून आपण मला बक्षीस देऊ शकल्यास मी आपला फार आभारी होईन."

राजा म्हणाला—"परंतु या रसायनाचा प्रत्यक्ष परिणाम पाहिल्याशिवाय हे रसायन तू म्हणतोस तसे आहे या गोष्टीवर विश्वास कसा करायचा? तू आपल्या मुलाला ते पाजून दाखव." त्यानंतर राजाने त्या रसायन शास्त्रज्ञाच्या मुलाला बोलावून आणविले. त्या शास्त्रज्ञाने गयावया करून 'नको' म्हटले तरी राजाने त्या मुलाला विचारले—"बाळा, तू पक्षी होऊन आकाशात उडणार की हरण होऊन उड्या मारणार? की हत्ती होणार? कोणती ही गोष्ट मनात इच्छून हे रसायन पी."

त्या शास्त्रज्ञाने पुन्हांपुन्हां विनंती करून पाहिली. परंतु राजाने त्याचे ऐकले नाही. शास्त्रज्ञाच्या मुलाने हरणाचे स्मरण करून रसायन पिऊन टाकले. त्याबरोबर तो हरण झाला. वैद्य रडू लागला.

राजा म्हणाला—"तू रडतोस कां? तू हे बक्षीस घे तुझ्या चमत्कारपूर्ण प्रयोगाकरितां. दुसरा चमत्कारपूर्ण प्रयोग करून याला स्वतःचे रूप येईल असे रसायन शोधून काढ."

"पण महाराज, त्यासाठी हवी असलेली वस्तु कशी काय मिळणार?" शास्त्रज्ञाने विचारले.

"सांग तर नाव! मी मिळवून देण्याचा प्रयत्न करून पाहतो." राजा म्हणाला.

"महाराज, राजघराण्यात जन्मलेल्या पन्नाशी उलटलेल्या राजपुरुषाचा एक डोळा या प्रयोगासाठी हवा आहे." शास्त्रज्ञ म्हणाला.

राजा म्हणाला—"एवढेच ना. माझा शत्रू कोशल देशाचा राजा पन्नाशी उलट-



लेला आहे. त्याला जिंकून त्याचा डोळा काढून देतो." राजा म्हणाला.

शास्त्रज्ञ रडतरडत आपल्या हरण रूपात असलेल्या मुलाला घेऊन घरी गेला. राजाने बक्षिसाची रक्कम शास्त्रज्ञाकडे पोचती केली.

विदर्भ देशाच्या युवराजाचे वय शास्त्रज्ञाच्या मुलाएवढेच होते. दोघे मित्र होते. दोघे सहपाठी होते. तो आपल्या मित्राला भेटण्यासाठी त्याच दिवशी शास्त्रज्ञाच्या घरी आला. शास्त्रज्ञाने घडलेली गोष्ट त्याला सांगितली. म्हणाला—"मी हे रसायन तयार करून स्वतःचा कुळनाश केला." असे सांगून त्याने आपले ते अद्भुत रसायन त्या मुलाला दाखविले. युवराजाच्या मनात हरण रूपात आपल्या मित्राला भेटण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. त्याने मागचा पुढचा विचार न करतां हरण होण्याची इच्छा करून ते रसायन पिऊन टाकले. दुसऱ्या क्षणाला युवराजाला हरणाचे रूप आले. युवराज-बरोबर आलेले शिपाई त्या हरणाला घेऊन राजाकडे गेले व त्यांनी घडलेली गोष्ट राजाला सांगितली.

राजाला काय करावे व काय नाही, हे सुचेना. त्याने कोशल नरेशाला जिंकण्याची जी फुशारकी दाखविली होती ती प्रत्यक्षात दाखविणे त्याला अशक्य होते. त्याला कैद करण्याची गोष्ट तर सोडाच, त्या केवळ गप्पा होत्या.

शास्त्रज्ञाचा मुलगा हरण झाला तेव्हां राजाच्या मनाला काही वाटले नाही. परंतु स्वतःच्या मुलालाच जेव्हां हरणाचे रूप मिळाले तेव्हां मात्र त्या रसायनाची तोड शोधण्याची काळजी राजाला वाटली. त्याचे स्वतःचे वय पन्नासावर होते. म्हणून त्याने आपला डावा डोळा काढून शास्त्रज्ञाला दिला.

शास्त्रज्ञाने आपला प्रयोग पुरा करून नवीन रसायनाचा शोध लावला. ते प्याल्यावर युवराज व शास्त्रज्ञाचा मुलगा दोघांना स्वतःचे रूप मिळाले.





# किमतीतला फरक

श्रीकृष्णदेवराय हे साहित्य प्रेमी म्हणून प्रसिद्ध होते. देशातल्या थोर विद्वानांना आदरपूर्वक बोलवून ते त्यांचा सत्कार करीत. देशातले दूरदूरचे कवि व पंडित त्यांच्या दरबारात येऊन आपल्या प्रतिभेचे प्रदर्शन कृष्ण देवरायांच्या समक्ष करीत व सम्राट त्यांना मानाची वस्त्रे देऊन त्यांचा सत्कार करीत.

सम्राटाच्या राजधानीत रामशर्मा नावाचा एक गरीब पंडित रहात असे. त्याचे काव्य सामान्यच होते. परंतु सम्राटासमोर आपले काव्यवाचन व्हावे व सम्राटाकडून आपल्याला मोठे बक्षीस मिळावे अशी त्याच्या मनात महत्वाकांक्षा होती. म्हणून त्याने पुष्कळ मेहनत करून एक कविता रचली व दरबारात जाऊन आपली कविता वाचून दाखविली.

सम्राट स्वतः थोर कवी होते. त्यांना काव्याचे मूल्य कळत होते. म्हणून रामशर्माची कविता ऐकून सम्राटाला कौतुक करण्यासारखे त्यात काही दिसले नाही. तरी सम्राटाने दरबारात आलेल्या पंडिताला रिकाम्या हाताने पाठवायचे नाही असे ठरविले असल्या कारणाने रामशर्माला एक पारितोषिक दिले.

रामशर्माला त्या गोष्टीचा राग आला. त्याने सम्राटाची त्याबद्दल निंदा केली. म्हणाला—"आपल्या काही खास खास पंडितांनाच सम्राट मोठमोठी पारितोषिके देतात. माझ्या कवितेत व त्यांच्या कवितेत काय अंतर आहे हो?"

सम्राटाला ते ऐकून वाईट वाटले. परंतु ते काही बोलले नाहीत. तिम्मरसू नावाचे त्यांचे प्रधान सम्राटाला कानात काहीतरी सांगून बाजूला झाले.

दुसऱ्या दिवशी अनपेक्षितपणे रामशर्मांच्या घरी दोन व्यापारी साड्या विकायला घेऊन आले.

रामशर्माच्या पत्नीनें साड्या पाहिल्या व आपल्या आवडीची म्हणून एक पिवळ्या रंगाची साडी निवडली. रामशर्मांनी गुलाबी रंगाची साडी निवडली. वास्तविक तीच साडी चांगली होती. रामशर्मांनी दोन्ही साड्यांची किमत विचारली.

व्यापाऱ्यांनी त्या दोन्ही साड्यांची किमत प्रत्येकी शंभर रुपये असल्याचे सांगितले.

रामशर्माला आश्चर्य वाटले. त्याला वाटत होते की गुलाबी रंगाच्या साडीची किमत जास्त असेल. परंतु रामशर्माची बायको म्हणाली—"हे व्यापारी आपल्याला फसवीत आहेत. पिवळ्या रंगाची साडीच खऱ्या रेशमाची आहे. गुलाबी रंगाची साडी नकली रेशमाची आहे. तुम्हां पुरुषांना साडीच्या बाबतीत कळत नाही."

तेव्हा रामशर्मांने व्यापाऱ्यांना विचारले—"काय रे, ही काय लबाडी? अस्सली आणि नकली रेशमाच्या साडीची किमत एकच कशी काय?"

ते ऐकून व्यापारी स्मित करीत म्हणाले—"कालच नाही का आपण सम्राटांच्या दरबारात कविते कवितेत कसला फरक करतां म्हणून म्हणाला होता? बक्षिसात फरक कसा असे नव्हते का विचारलेत? तेव्हां साडी कशीही असो किमतीत फरक कां असणार?"

रामशर्माच्या डोक्यात प्रकाश पडला. आपल्या चुकीची कल्पना आली आणि चुकीबद्दल त्याला लाजदेखील वाटली. परंतु त्याला आश्चर्य वाटले की ती गोष्ट या व्यापाऱ्यांच्या कानापर्यंत कशी काय पोचली? त्याच वेळी सम्राट व प्रधान दोघांनी आपला व्यापाऱ्याचा वेष काढून टाकला. रामशर्माने सम्राटाची क्षमा मागितली. सम्राटाने औदार्याने दोन्ही साड्या रामशर्मांच्या पत्नीला देऊन तिच्या मनाचे समाधान केले आणि स्मित करीत प्रधानाबरोबर राजवाड्यात निघून गेले.





# महाबली हनुमान

रामाने सांगितल्याप्रमाणे लक्ष्मण किष्किंधेला निघाला. तो धनुष्यबाण घेऊन सुग्रीवाकडे गेल्यावर त्याच्याशी कसे बोलायचे याचा विचार करू लागला. मी हे सांगेन, सुग्रीव असे उत्तर देईल, त्याला पुन्हां मी हे विचारीन वगैरे गोष्टी मनातल्या मनात ठरवीत तो चालत होता. रागाने त्याचे रक्त खवळलेले होते.

वानरांनी लक्ष्मणाला दुरून येतांना पाहिले व कोणी शत्रू तर येत नसेल अशी शंका त्यांच्या मनात आली. हाताला आले ते झाड उपटून किंवा मोठमोठे दगड घेऊन ते सिद्ध होऊन उभे राहले. ते पाहून लक्ष्मणाच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन पोहोचली. त्याच्या चेहऱ्यावर संतापाच्या खुणा स्पष्ट दिसत होत्या. त्याच्या मुखावरची तेजस्विता पाहून वानरांची गाळणच उडाली व ते सुग्रीवाकडे धावले व लक्ष्मण आला असल्याचे त्याला कळविले. परंतु सुग्रीवाने तारेच्या अंतःपुरात असल्याने त्या वार्तेकडे दुर्लक्ष केले.

अंगद मात्र भयभीत होऊन लक्ष्मणाला नम्रपणे भेटायला गेला. लक्ष्मण त्याला म्हणाला—"मुला, मी आलो आहे, म्हणून सुग्रीवाला जाऊन सांग. माझे दादा फार दुःखी मनाने बसले आहेत. म्हणून मी आलो आहे, मला येऊन ताबडतोब भेट म्हणून सांग."

अंगद सुग्रीवाजवळ गेला आणि लक्ष्मण भेटायला आला असल्याचे व खूप रागात असल्याचे त्याने सांगितले.



ते ऐकून सुग्रीव आपल्या मंत्र्यांना म्हणाला-"मी काही राग येण्यासारखं बोललो की केलं? मग लक्ष्मणाला एवढा राग कसला आला आहे? माझ्या शत्रूंनी त्याचे कान भरले की काय? मी घाबरलो-भ्यालो आहे असे नाही. मला काय, राम असो की लक्ष्मण असो, दोघे सारखेच, भय कोणाचे असण्याचे कारणच काय? मित्रांनीच विनाकारण असा राग करायला सुरवात केली तर मनाला साहजिकच वाईट वाटते. मला आणखी भय दुसरे कसलेही नाही, रामाने माझ्यावर जसा उपकार केला आहे तसा प्रत्युपकार मी करू शकेन का अशी शंका येते आहे माझ्या मनात."

तेव्हां बुद्धिवान असा जो हनुमान तो हे सर्व ऐकत होता. तो सर्व मंत्र्यांच्या समक्षच सुग्रीवाला म्हणाला-"राजा! तू रामावर प्रत्युपकार करण्याची गोष्ट विसरतां कामा नये. तू अंतःपुरात राहून आपले हे कर्तव्य विसरलास. आता शरद ऋतू सुरू झाला आहे. युद्धाची तयारी करायला हीच खरी वेळ आहे. त्यासाठीच लक्ष्मण आला असणार. पत्नीला घालवून बसलेल्या रामाने दुःखामुळे तुला जरा कटू शब्दात निरोप पाठवला असेल. पण तो तू सहन केला पाहिजेस. तू आपले कर्तव्य विसरलास. तेव्हां लक्ष्मणाशी मिळते घेऊन बोलण्या व्यतिरिक्त दुसरा उपाय नाही, असे मला तरी वाटते. मी तुझा मंत्री आहे. तुझ्या हिताची गोष्ट मंत्रणा म्हणून सांगणे माझे कर्तव्य आहे. तू स्वतः मुलाला व इतर बंधुबांधवांना बरोबर घेऊन लक्ष्मणाला जाऊन भेट व नम्रपणे नमस्कार करून तो सांगेल तसे कर!"

अंगद लक्ष्मणाला आदरपूर्वक बोलावून घेऊन आला. लक्ष्मण प्रमुख वानरांची घरे पहात सुग्रीवाच्या वाड्यात आला. तो वाडा म्हणजे इंद्रभवनासारखा होता. अंतःपुरातून वीणावादनाचा आवाज बाहेर ऐकू येत होता. तेथे अनेक सुंदर स्त्रिया होत्या.



सुग्रीव एका मोठ्या विलासी पुरुषासारखा राहतो - आहे, हे स्पष्टच दिसत होते. लक्ष्मणाला आलेला पाहून एका द्वारपालिका दासीनं सूचना देण्यासाठी दोरी ओढून मोठ्याने घंटा वाजविली.

तो आवाज ऐकून सुग्रीवाला लक्ष्मण आल्याची गोष्ट कळली. त्याची छाती धडधड करू लागली. घशाला कोरड पडली. तो ताराला म्हणाला—"तारा! हा लक्ष्मण स्वभावाने सुशील नरम आहे म्हणतात, मग त्याला आतां एवढा राग येण्यासारखं काय ग झालं? मी काही चूक केली का? काही असो, तू पुढे चल. त्याला गोड बोलून थोडा शांत कर. नंतर मी येतो."

मद्याचा वास येत होता आणि आताच अंथरुणावरून उठल्यासारखे तिच्या विखुरलेल्या केसांवरून आणि वस्त्राभरणांवरून स्पष्ट दिसत होते. तिचे ते रूप लक्ष्मणालाच बरं नाही वाटले. त्याने तिच्याकडे पाहिले नाही.

तारा म्हणाली—"लक्ष्मणा! तुला राग येण्यासारखा कोण रे वागला? कोणाची एवढी हिंमत झाली रे?"

लक्ष्मण म्हणाला—"तू पतीच्या हिताची गोष्टच सदा मनात बाळगतेस. तो सदा मद्य पिऊन स्त्रीलोलुप होऊन आपले कर्तव्य विसरला आहे. उपकाराबद्दल प्रत्युपकार न करणे हे धर्माविरुद्ध आणि अर्थाविरुद्धच कार्य नव्हे का? आमच्या कार्याकडे असे दुर्लक्ष त्याने केले तर ते त्याच्या हिताचे आहे की अहिताचे याचा विचार तूच करून पहा. आम्ही काय करणे बरोबर होईल याचा तूच विचार करून सांग."

तारा म्हणाली—"लक्ष्मणा! किती झाले तरी सुग्रीव हा तुझा मित्र आहे. मित्रावर इतके रागवून कसे चालेल? तुमचे काम त्याला करायचेच आहे. थोडी दिरंगाई झाली. तुझ्यासारख्या थोर पुरुषांनी सामान्य माणसावर इतका राग काढणे बरोबर नाही. त्याने तुमचे काम करायला थोडा उशीर केला त्याला कारण मी जवळ होते हेच आहे. तेव्हां तू सुग्रीवाला क्षमा कर. थोर थोर ऋषींचे सुद्धा स्त्रीसमोर काही चालत नाही, मग सुग्रीव तर अगदीच सामान्य आहे!"

ती असे बोलून लक्ष्मणाला आत बोलावून घेऊन गेली. सुग्रीवाच्या अंगावर मूल्यवान रत्नहार व आभूषणे होती. पुष्पमालांनी सजविलेल्या सिंहासनावर तो बसला होता. त्याच्या चारीबाजूला अनेक अप्सरांसारख्या सुंदर स्त्रिया उभ्या होत्या. सुग्रीवाच्या बाजूला रूमा बसलेली होती. ते दृश्य पाहून लक्ष्मणाला महारुद्रासारखा राग आला.

लक्ष्मणाला पाहतांच सुग्रीव भयभीत होऊन सिंहासनावरून खाली उतरला. त्याच्याबरोबर सर्व स्त्रियादेखील उठून उभ्या राहल्या.

सुग्रीव नमस्कार करून समोर उभा राहल्यावर लक्ष्मण म्हणाला—"रामाच्या हातून तुझे काम भागल्यानंतर तू रामाचे काम नको का करायला? तू कृतघ्न आहेस, असत्यभाषी आहेस! आजपर्यंत तू सीतेचा शोध काढण्याचा प्रयत्न का केला नाहीस? खूप पिऊन अंत:पुरात बसून काय करतो आहेस? तू असा आहेस हे माहीत



असते तर रामाने तुला वानरांचे राज्य दिले असते का? तुला आपल्या बाणाने मी वालीच्या शोधार्थ पाठवितो."

तारा पुन्हा सुग्रीवाच्या वतीने बोलू लागली—"लक्ष्मणा! सुग्रीव द्रोही, दुराचारी, कृतघ्न नाही. कित्येक दिवस कष्टात दिवस काढल्यानंतर आतां कोठे त्याला श्वास घ्यायला थोडा वेळ मिळाला. तेव्हां या थोड्याशा अपराधाबद्दल तू क्षमा केली पाहिजेस. रामाकरिता तो मला, रूमाला, एवढेच नव्हे तर त्याच्या सर्वस्वाला सोडायला तयार आहे. तो सीतेला आणून देण्याची जबाबदारी घेऊ शकेल. त्यासाठी तो रावणाशी युद्ध करू शकेल. तुमच्या



कामासाठीच त्याने सर्व वानर प्रमुखांना हजर राहण्यासाठी निरोप पाठविले आहेत. ते सर्व थोड्यांच वेळाने येतील. आजच खरोखरी त्यांनी यायला हवे. म्हणून तू आपला राग थोडा आवर."

ते ऐकून लक्ष्मणाच्या मनाचे थोडे समाधान झाले. ते पाहून सुग्रीवालादेखील तोंड उघडायला धीर आला. म्हणाला—"लक्ष्मणा! माझ्या हातून थोडा प्रमाद घडला, त्याबद्दल क्षमा कर. या जगात कोणाच्या हातून चूक होत नाही?"

लक्ष्मण शांतपणे त्याला धीर देत म्हणाला—"रावणाशी युद्ध करण्यासाठी तुझी मदत असल्यावर त्याहून जास्त आम्हांला काय पाहिजे? तेव्हां तू माझ्याबरोबर चल, आणि पत्नी-विरहाने दुःखी झालेल्या रामाचे सांत्वन कर."

सुग्रीव जवळच उभा असलेल्या हनुमानाला म्हणाला—"जगात जेथे कोणी वानर वीर असतील त्यांच्याकडे निरोप देऊन दूत पाठव. मी यापूर्वी पाठविलेल्या दूतांना लवकर निरोप पोचवून कामे पुरी करायला ताकीद कर. दिरंगाई करणाऱ्या आळशी दूतांना माझ्याकडे घेऊन ये. दहा दिवसांच्या आत येथे जो वानर हजर होणार नाही त्याला मृत्युदंड दिला जाईल असे जाहीर कर."

हनुमानाने सुग्रीवाच्या आज्ञेप्रमाणे किष्किंधेत जे वानर होते त्यांच्याकडे निरोप देऊन वानर दूत पाठविले.

सुग्रीवाने एक सोन्याची पालखी आणविली आणि स्वतःबरोबर तीत लक्ष्मणाला बसवून वानरांच्या लवाजम्यासह थाटाने राम निवास करीत होता तेथे आला. सुग्रीव व लक्ष्मण पालखीतून उतरले आणि रामासमोर हात बांधून उभे राहले. नंतर सुग्रीवाला सांष्टांग नमस्कार करताना पाहून रामाने त्याला उठविले व प्रेमाने भेटून त्याची खुशाली विचारली. नंतर सर्व रामाच्या व लक्ष्मणाच्या सूचनेप्रमाणे यथा स्थान बसले.

रामाने सुग्रीवाला युद्धाची वेळ जवळ येऊन ठेपल्याची आठवण करून दिली.

तेव्हां सुग्रीव म्हणाला—"रामा! एकाहून एक शूर व वीर असे कोटयवधी वानर तुला मदत करण्यासाठी येत आहेत. ते रावणाला सकुटुंब परिवार समेत ठार करून सीतेला सोडवून आणून तुझ्याकडे पोचती करतील."

आपल्यासाठी सुग्रीवाने सुरू केलेल्या तयारीचे वर्णन ऐकून रामाच्या मनाचे समाधान झाले. राम म्हणाला—"सुग्रीवा! तुझ्या मदतीने मी नक्कीच आपल्या शत्रूचा नाश करू शकेन असा आत्म-विश्वास मला वाटू लागला आहे."



त्याच वेळी आकाशात धुळीचे लोट लागले. वानरांच्या झुंडीच्या झुंडी येऊ लागल्या होत्या. नदी किनाऱ्याला राहणारे, डोंगराळ प्रदेशात राहणारे, कोटयावधी वानर जमा होऊ लागले होते. काही वानर तांबड्या रंगाचे होते, तर काही भुरकट रंगाचे होते. अशा वानरांना बरोबर घेऊन शतबली नांवाचा एक प्रमुख वानर वीर येत होता. सोनेरी रंगाचा शूर वानरप्रमुख सुषेण, म्हणजे ताराचा पिता काही कोटी वानरांना घेऊन आला होता. त्याचप्रमाणे ताराचे पिता तार नावाचा वानरदेखील आला. बावीस हजार वानरांना घेऊन हनुमंताचा बाप केसरी आला. गवाक्ष, धूम्र वानर भल्लूक सैन्य (अस्वलांचे सैन्य) घेऊन आले. नील वानर काळया वानरांचे सैन्य घेऊन आला. गवय कोटी वानरांचे सैन्य घेऊन आला. दरीमुख, मेंद, द्विविद, गज असंख्य वानरांना घेऊन आले. जांबवान दहा कोटी भल्लूकांचे सैन्य घेऊन आला. गंधमादन, अंगददेखील मोठमोठे वानरबरोबर घेऊन आले. एकूण जगात जेथेजेथे म्हणून वानरवीर होते सर्व किष्किंधेला जमा झाले त्यांच्या आवाजाने आसमंत दुमदुमत होते.

सर्व वानरांनी एकत्र जमून सुग्रीवाचे अभिवादन केले. सुग्रीवाने त्या सर्वांना

रामासमोर हजर केले आणि त्यांची ओळख करून देऊन तो त्यांना म्हणाला–"तुम्ही आपापले सैन्य सोयीची जागा पाहून दऱ्या-खोऱ्यांत किंवा नदीच्या काठी उतरवा आणि त्यांची विचारपूस करीत रहा."

तो रामाला म्हणाला–"रामा! तू आज्ञा करशील ते करायला कोट्यावधी वानर जमा झाले आहेत. त्यांत काही कामरूप, म्हणजे इच्छिलेले रूप घेणारे आहेत, पर्वताकार आहेत, कामगमन करणारे आहेत आणि महापराक्रमीदेखील आहेत. तू त्यांना वाटेल ती आज्ञा कर. त्यांना काम द्यावे हे मला कळते. परंतु ते कसे आणि काय करायचे या गोष्टीची आज्ञा तूच कर."

राम आनंदाने आणि प्रेमाने सुग्रीवाला भेटला व म्हणाला–"सुग्रीवा! सीता जिवंत आहे की नाही? रावण कोठे राहतो? या गोष्टींची माहिती काढायला हवी. सीता जिवंत असल्याचे कळले तर त्यानंतर काय करावयाचे ते आपण दोघे ठरवू या. तेव्हां मी सुचविले त्याचा विचार करून तूच वानरांना काय ती आज्ञा कर."

सुग्रीवाने विनत नावाच्या पर्वताकार वानराला बोलावून त्याला बरोबर एक लाख वानरांना घेऊन पूर्वीकडे जायला सांगितले. त्या दिशेला रावणाच्या देशाचा व सितेचा शोध लावून एका महिन्याच्या आत मिळालेली माहिती येऊन सांगायला सांगितले.

अशा तऱ्हेने सुग्रीवाने दक्षिणेकडे काही वानरांना पाठविले. दक्षिणेकडे जाणाऱ्या वानरांत नील, हनुमान, जांबुवान, सुहोत्र, शरारी, शरगुल्म, गज, गवाक्ष, गवय, ऋषभ, मेंद, द्विविद, विजय, गंधमादन, उल्कामुख, अनंग, अंगद वगैरे वानर होते. त्यांच्या बरोबर एक विशाल वानरसैन्य देखील होते.

त्यानंतर सुग्रीवाने तारेचे वडील सुषेण यास अनेक वानरांसह पश्चिमेकडे पाठविले. शतबलीला एक लक्ष वानर बरोबर देऊन उत्तरेकडे पाठविले.





# अमरवाणी

न कर्ता कस्यचित्, कश्चित्
नियोगे चापि नेश्वरः,
स्वभावे वर्तते लोकः,
तस्य कालः परायणम् ॥ ॥ १ ॥

[कोणी कसलाही कर्ता नसतो, कोणी कोणालाही प्रेरणा करण्यास समर्थ नसतो. हे जग नैसर्गिक रीत्या चालत असते. त्याच्या मुळाशी काल असतो.]

न कालः काल मत्येति,
न कालः परिहीयते,
स्वभावम् च समासाद्य
न कश्चि दतिवर्तते ॥ ॥ २ ॥

[काळ हा स्वतंत्र असतो. तो कोणाला जुमानीत नाही. कोणी त्याचे अतिक्रमण करणे शक्य नाही.

न कालस्यास्ति बंधुत्वम्,
न हेतुर्न पराक्रमः,
न मित्रज्ञातिसंबंधः,
कारणम् नात्मनो वशः ॥ ॥ ३ ॥

[काळाला नातेगोते नाही. पराक्रम, मित्र, ज्ञातिसबंध तो मानीत नाही. तो स्वतंत्र आहे.]



# मित्रभेद

[ २३ ]

### नागकुमाराची गोष्ट

राजगृह नामक गावी देवशर्मा नावाचा एक ब्राह्मण रहात असे. त्याला मूल-बाळ नव्हते म्हणून त्याची बायको नेहमी मुसमुसत कोठेतरी कोपऱ्यात पडून राही. देवशर्माला ते पाहवले नाही. एकदां तो बायकोला म्हणाला–"अग! असं मनाला लावून घेऊन कसं चालेल? निराश होऊन भागणार नाही. मी पुत्रकामेष्टी यज्ञ करतो आणि देवाला प्रसन्न करून पुत्र-प्राप्तीचा वर मागतो. देव आपल्याला मदनासारखा सुंदर, बृहस्पतीसारखा बुद्धि-मान आणि बलभीमासारखा बलवान मुलगा देईल."

ते ऐकून त्याच्या बायकोला फार आनंद झाला व देवावर सर्व भार टाकून तिने मनाचे समाधान करून घेतले.

सांगितल्या प्रमाणे त्या ब्राह्मणाने पुत्र-कामेष्टी यज्ञ केला आणि आश्चर्य म्हणजे त्याच्या बायकोला खरोखरच दिवस राहले. आतां आपल्याला मुलगा होणार या आनं-दात ती बाई आपले सर्व दुःख विसरून गेली. परंतु तिच्या पोटी पुत्ररत्न जन्माला येण्याऐवजी एक नाग जन्मला. त्या सापाला पाहून शेजार-माहेरच्या बायका म्हणाल्या–"त्या सापाला काढा घराबाहेर! हा अप-शकुन आहे!"

परंतु त्या बाईने आपले रक्त अटवून पोटात वाढविलेल्या त्या सापाला घराबाहेर काढायचे नाकारले. तिने त्याला एका मडक्यात ठेवून लहानाचा मोठा केले. त्याला ती दूध, लोणी वगैरे गोरस खायला प्यायला घाली. तो पौष्टिक आहार मिळाल्याने तो नाग खूप मोठा व बलिष्ठ झाला.

काही वर्षे लोटल्यावर शेजारच्या एका मुलाचे लग्न झाले. ते पाहून ब्राह्मणाला त्याची बायको म्हणाली–"तुम्हांला साऱ्या जगाची काळजी असते, घरचीच काळजी नसते. आपल्या मुलाच्या लग्नाची गोष्ट कधी काढलीत का कोणाजवळ?"

ब्राह्मण म्हणाला–"अग! सापाला कोण आपली मुलगी देणार? पाताळलोकात जाऊन वासुकीजवळ त्याच्या मुलाला मागणी घालावी लागणार!"

ते ऐकून बायको छाती बडवून रडू लागली. ते पाहून ब्राह्मणाला राहवले नाही. तो बायकोच्या प्रेमाखातर आपल्या नागकुमारासाठी मुलीच्या शोधार्थ निघाला.

बरेच दिवस फिरत राहल्यावर तो ब्राह्मण कुट्कुट नावाच्या एका गावी आला. तेथे त्याचा एक मित्र व नातेवाईक असा एक श्रीमंत गृहस्थ रहात असे, त्याच्या घरी आला. त्या दिवशी स्नानसंध्यादी आटोपून जेवणखाण करून तो त्याच्याच घरी राहला. दुसऱ्या दिवशी सकाळी उठून तो पुढल्या मुक्कामावर निघाला, तेव्हां त्याच्या मित्राने त्याला विचारले–"पण काय रे तू आलास कशासाठी आणि निघालास कोठे? काहीच बोलला नाहीस की!"

"मी आपल्या मुलासाठी वधूच्या शोधार्थ निघालो आहे." ब्राह्मण म्हणाला.



"एवढेच ना! मग माझी मुलगी आहे लग्नाची. पहा तर, नक्षत्रासारखी सुंदर आहे. आपली आर्थिक स्थिती व वय वगैरे सारखे आहे. आपली परस्परांची ओळख आहे. परस्पर व्याही व्हायला काय हरकत आहे?" त्याने विचारले.

ब्राह्मण त्या गोष्टीस आनंदाने कबूल झाला. त्या वधूला व तिच्या दासदासींना तो बरोबर घेऊन राजगृहाला निघाला.

वधूचे रूप पाहून तिचे लग्न एका सापाशी करून देणार असल्याचे ऐकून शेजार पाजारचे लोक व गावकरी चकित झाले आणि त्या ब्राह्मणाच्या घरी जमा झाले. सर्वांना फार वाईट वाटले. म्हणाले–

"न्याय, नीती, धर्म थोडा तरी पाळणारे असा देखण्या मुलीचे लग्न कधी सापाशी करून देतील का?"

दासदासींनी ती गोष्ट वधूला जाऊन सांगितली. जमलेले लोक त्या मुलीला पाहून हळहळले. त्यांच्यातली जी वडील-धारी मंडळी होती ती म्हणाली–"हे पहा, या मुलीला सोडविलेच पाहिजे. त्यासाठी बलप्रयोग करावा लागला तरी हरकत नाही, परंतु तिच्या आयुष्याचे मातेरे होऊ देता कामा नये."

ते सर्व ऐकून ती मुलगी–"तुम्ही सर्व कृपा करून आपापल्या घरी जा. राजा जी आज्ञा करतो ती कधी मागे घेत नाही. सज्जन माणूस जे वचन देतो ते कधी भंग होऊ देत नाही. तसेच कन्यादान हे एकदां झाले की ते मागे घेणे शक्य होत नाही, असे थोरामोठ्यांचे म्हणणे आहे. दैवाची जी इच्छा असते तेच होते. विधिलिखित असते ते कधी पुसले जात नाही. पुष्पकाचे मरण देवच बदलू शकले नाहीत!"

"ती पुष्पकाची काय गोष्ट आहे?" जमलेल्या लोकांनी तिला विचारले. त्या वधूने पुष्पकाची कथा सांगितली ती अशी :

### पुष्पकाची कथा

इंद्राकडे एक सकल विद्यासंपन्न एक सुंदर पोपट होता. त्याचे नाव पुष्पक असे होते. एकदा तो इंद्राच्या मांडीवर बसून बोलत असतां, यमाला पाहून उडून गेला. "असा कां रे पळालास?" देवांनी त्याला विचारले. तो म्हणाला–"प्राणीमात्राचा जीव हरण करणाऱ्याला पाहून पळून जाणार नाही तर काय करीन?"

तेव्हां देव यमाला म्हणाले–"तू पुष्पकाचा जीव घेऊन जाऊ नकोस!"

"मी काळाचा नोकर आहे. माझ्या हातात काही नाही. तुम्ही जाऊन काळाला पाहिजे तर विचारा." यम म्हणाला.

त्यांनी काळाला जाऊन विचारले तेव्हां त्याने मृत्यूला जाऊन विचारायला सांगितले. देवांनी मृत्यूला विचारले. परंतु मृत्यूला पाहतांच पोपटाने प्राण सोडला.





# तिळ्या बहिणी

[ ११ ]

[ राक्षसाच्या तळघरात आपल्या भस्मांचा व अंजनांचा काही एक उपयोग नाही हे तिळ्या भावंडांना कळले. राक्षसाने मंत्रवलेल्या पंचाच्या सहाय्याने आवश्यक असलेले खाद्यपदार्थ खाऊन व तिळ्या भावंडांना खायला घालून त्याने त्यांना दगडाच्या मूर्ती करून टाकले. मुलींचा शोध लागला नाही, म्हणून दानशील राजा व राणी दोघं काळजीत होते. पुढे– ]

तिळी भावंडे राक्षसाच्या हातात सापडल्याचे व त्याने त्यांना आपल्या धाकट्या भावाच्या हातात दिल्याचे तलावांतून हंसरूपात असलेल्या राजकन्या पहातच होत्या. उदयन पांढऱ्या भस्माची डबी काढून ते स्वतःवर शिंपडू लागला तेवढ्यात राक्षस तेथे आला म्हणून भस्म शिंपडणे शक्य झाले नाही आणि खाली पडलेली डबी उचलून घेणे शक्य झाले नाही म्हणून तिळ्या भावंडांनी ती तेथेच सोडली होती. दोघा राक्षसांचे त्या गोष्टीकडे लक्ष गेले नाही हे देखील राजकन्यांनी पाहिले होते.

तेव्हां दोघे राक्षस आपापल्या मार्गाने निघून गेल्यावर त्या सरोवरातून बाहेर आल्या. परंतु त्यांना ती डबी सापडली नाही.

राजकन्या आश्चर्यचकित झाल्या. सुहासिनी म्हणाली–"मग गेली कोठे ती डबी?



आपण तिघांनी ती खाली पडतांना पाहिली होती! एकदम अदृश्य कशी काय झाली? इकडेच कोठे तरी नक्कीच असणार!"

त्या तिघी जवळपास ती डबी शोधू लागल्या. परंतु सरोवरापासून पुष्कळ दूर ती डबी पडलेली त्यांना दिसली. आतां ती डबी कोठे लपवून ठेवायची, या गोष्टीचा तिघी विचार करू लागल्या. शेवटी सरोवराच्या कांठीच एक लहानसा खड्डा खणून त्यात त्यांनी ती डबी पुरून ठेवली.

नंतर त्या तिळ्या भावंडांना कसे सोडवायचे या गोष्टीचा त्या विचार करू लागल्या. शेवटी सुकेशिनी म्हणाली–"मला एक युक्ती सुचते आहे!"

ते ऐकून सुभाषिणी व सुहासिनी दोघी एकदम म्हणाल्या–"ऐकू तर दे ती युक्ती!"

तेव्हां सुकेशिनी म्हणाली–"काही तरी करून त्या राक्षसाला तेथून हलवून बाजूला आणलं पाहिजे. आपण सर्व मिळून त्याला जाऊन भेटू या आणि त्याला आपण नृत्य दाखविणार आहो असा त्याच्या मनात विश्वास उत्पन्न करू या. तो नृत्य पाहण्यात गर्क झाला की आपल्या पैकी एकीने ते मंत्रवलेले पाणी त्या तिघांच्या पुतळ्यांवर शिंपडावे. त्यांना त्यांचे स्वस्वरूप लाभेल. राक्षसाच्या नकळत एकीने तिकडेच राहून हे काम करतां येण्यासारखे आहे. पुढे काय करायचे ते त्या मुलांशी बोलून विचार करून ठरवू या."

ते ऐकून सुहासिनी म्हणाली–"तो सामान्य माणूस आहे का, आपल्या जाळ्यात पडायला? आपण त्याला फसवून तिकडून दूर घेऊन गेलो समज, त्याच्या वाड्यात राहून हे सर्व करणे म्हणजे गप्पा वाटल्या का तुला? आपण जर का फसलो आणि त्या राक्षसाला आपण त्या मुलांना सामील आहों हे कळले तर आपण व ती भावंडे सर्वांची वार्ता जगात कोणालाच कळणार नाही. ही युक्ती चांगली आहे, परंतु ती प्रत्यक्षात उतरणे मला अशक्य वाटते."

त्यावर सुकेशिनी म्हणाली–"ते ठीक आहे ग! परंतु साहस केल्याशिवाय कोणत्याच कामात कधी यश येते का? आपण संकटात आहोच याहून आणखी काय मोठे संकट येणार आहे? प्रयत्न केला तर कदाचित या संकटातून आपण मोकळे होऊ!"

दुसऱ्या दिवशी सरोवरातले सर्व हंस बाहेर आले. बाहेर आल्याबरोबर त्यांना मनुष्यरूप आले. तिळ्या मुलींसारखीच ती जुळी किंवा तिळी मुले होती. राक्षसाने त्यांना धरून आणून या सरोवरात टाकले होते. त्यांत मुले होती व मुली पण होत्या.

सर्व मुलांना सुहासिनीने सरोवरात परत जायला सांगितले. ती सरोवरात निघून गेली. उरलेल्या सर्व मुलीच होत्या. त्या सर्व गाणी म्हणत फुले तोडीत राक्षसाच्या वाड्याकडे जाऊ लागल्या.

त्यांचा आवाज ऐकू आल्यावर राक्षस त्यांच्याकडे स्वतःच आला. व म्हणाला–"कोठे निघालात तुम्ही सर्व? माझ्यावर सर्वांनी मिळून हल्ला करायचा विचार केला आहे की काय?"

सुकेशिनी सर्वात पुढे होती. ती म्हणाली–"तुझ्यासारख्यावर हल्ला करण्याची कोण हिंमत दाखवील! नवीन तिळी मुले आली होती ना ती कोठे गेली, पहायला आली होती."



ते ऐकून राक्षस खदखदां हसून म्हणाला–"कोठे गेली? यापूर्वी आले त्यांचे काय झाले??" असे म्हणत राक्षस त्यांना आपल्या वाड्यात बोलावून घेऊन गेला आणि ते तिघे दगडाच्या मूर्ती होऊन उभे होते ते त्याने त्यांना दाखविले.

सुकेशिनी त्यांना पाहून म्हणाली–"बरं आहे की रे, हे तुझं काम! परंतु एक शंका आहे माझ्या मनात. आम्ही इतक्या जणी आहो, तरी नुसते बसून कंटाळा येऊ लागला आहे आम्हांला. तुझा दादा आमचा बळी की काय देणार आहे ना, तो देऊन कां टाकीत नाही लवकर? हे कंटाळवाणे जीवित नकोसे वाटू लागले आहे आम्हांला.



आणि तुला पाहून तर आम्हांला आश्चर्यच वाटते. वर्षानुवर्षे तू या वाड्यात एकटा या दगडाच्या मूर्तीवर पाहारा देत उभा किंवा बसलेला असतोस!"

ते ऐकून राक्षस म्हणाला—"मलासुद्धा कंटाळा वाटतोच. कंटाळा येत नाही, असे वाटले का, तुम्हांला? पण काय करणार? ही जागा सोडून गेलो तर तुम्हांला सर्वांना बळी देण्यापूर्वी माझाच गळा कापील माझा दादा. काय करावे, माझे मलाच सुचत नाहीसे झाले आहे."

सुकेशिनीला जणुकाही पाहिजे होते तेच उत्तर मिळाले. म्हणाली—"किती दिवस न तरी असा राहणार? काही वेळ आमच्याबरोबर मोकळेपणाने गप्पा मारायला आलास तर काय बिघडेल? तुझी करमणूक नाही का करून देऊ आम्ही? तुझी करमणूक व्हावी म्हणून आम्ही नाचू आणि गाऊसुद्धा. आम्हांला सुद्धा काही वेळ विरुगळा होईल. ये तर गमत पहायला." या शब्दात तिने राक्षसाच्या मनांत उत्साह उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला.

"बापरे बाप! म्हणजे हा वाडा सोडून येऊ म्हणता? मी एवढा डोळ्यात तेल घालून पाहारा देतो आहे, तरी ही पोरें माझ्या डोळ्यात धूळ टाकून वाड्यात नाही का शिरली? आतां वाडा सोडून कोठे गेलो तर मेलोच!" राक्षस म्हणाला.

"तुझा हा केवळ भ्रम आहे, भ्रम! कोणी या वाड्यात पाऊल तरी टाकू शकेल का? आलाच समज, तुझ्या हातात सापडणारच! जातात कोठे? बरं ते असू दे, काही वेळ आमच्या पैकी कोणी पाहारा दिला तर चालेल की नाही? आमच्या बरोबर काही वेळ गंमत करून पुन्हां ये आपल्या जागेवर पाहऱ्याला." सुकेशिनी म्हणाली आणि ते राक्षसाला आवडल्यासारखे भासले.

"तरमग, माझ्याऐवजी पाहारा कोण देईल म्हणतेस?" त्याने विचारले.

सुकेशिनी बराच वेळ त्यांच्याकडे तशीच पहात राहून म्हणाली—"आणखी कोण विचारतोस? आमची अक्का आहे ना!" त्याप्रमाणे सुहासिनीला वाड्यात सोडून त्या सर्वांच्याबरोबर राक्षस सरोवराच्या बाजूला निघाला.

सरोवराच्या काठी त्यांनी राक्षसाला मधोमध बसविले आणि चारीबाजूला वेटोळे करून नृत्य करू लागल्या. त्यांच्या नृत्यगानात राक्षस मग्न होऊन गेला. म्हणाला—"दररोज असे गाणे म्हणायला आणि नृत्य करायला काय हरकत आहे?"

दररोज तिघींपैकी एक राक्षसाऐवजी पाहाऱ्यासाठी वाड्यात जाऊन बसू लागली आणि राक्षस त्यांचे नृत्यगान पहायला येऊ लागला. चार दिवस असेच गमतीत गेल्यावर राक्षसाच्या मनात शंका राहली नाही. वाडा सोडून जायला तो भीत असे, परंतु त्याला थोडीदेखील भीती वाटत नाहीशी झाली. आतां तर तो स्वतःच बाहेर येऊन त्यांना बोलावून गायला व नाचायला सांगू लागला. ते ओळखून सुकेशिनीने आपला डाव टाकायला हीच संधी असल्याचे ठरविले.

आतांपर्यंत ठीकच होते. तिळी भावंडे दगडाच्या मूर्ती होऊन गेली होती त्यांच्यावर मंत्रवलेले पाणी टाकून त्यांना त्यांचे स्वस्वरूप येण्यासाठी काय व कसे करतां येईल, याचा ती विचार करू लागली. पाणी आणायचे म्हणजे कोठून तरी एखादे














भांडे किंवा पातेले आणावे तर राक्षसाची नजर चुकविणे कठीण. तरमग काय करायचे? पुन्हां ती विचारात पडली. परंतु सुकेशिनीसारख्या हुशार मुलीला हे काम काही तसं मोठं नव्हते म्हणा! तिला युक्ती सुचली.

दुसऱ्या दिवशी राक्षसाला बोलावून आणायला निघताना सुकेशिनीने आपल्या पदराचे टोक त्या मंत्रवलेल्या सरोवराच्या पाण्यात छान बुडवून घेतले. नंतर दुसरे टोक सुद्धां पाण्यात बुडवून घेतले.

अशा तऱ्हेने सर्व तयारी करून घेऊन सुकेशिनी राक्षसाकडे गेली. म्हणाली– "आजा पाहरा द्यायची पाळी माझी आहे. मी नसते वेळी माझ्या बहिणीचे नृत्य तुला कसं काय आवडले ते मला परत आल्यावर सांग, बरं का!"

"सांगतो हो!" असे म्हणत राक्षस एक क्षणभरही तेथे न थांबतां सरोवराकडे गेला. त्याला येताना पाहून सरोवरातल्या राजकन्या नृत्यगान करण्यात मग्न झाल्या.

राक्षस वाड्यातून निघून जातांच सुकेशिनी दगडाच्या मूर्ती झालेल्या तिळ्या भावंडांवर मंत्रवलेले पाणी शिंपडण्यासाठी धावली. तिने पाणी शिंपडले. दुसऱ्या क्षणाला त्यांना स्वस्वरूप लाभले. ते आश्चर्यचकित होऊन म्हणाले–"तू इकडे कशी काय आलीस? तो राक्षस कोठे गेला?"

तेव्हा सुकेशिनीने टाकलेला डाव व त्यात तिला मिळालेल्या यशाचे वर्णन थोडक्यात सांगितले व म्हणाली–"तो नृत्यगानात स्वत:ला विसरून गेल्याचे पाहून त्याला कसे ठार करता येईल याचा विचार करता आला तर करा." तिने तिळ्या भावंडांना सुचविले.

"ते आतां शक्य होईलसे वाटत नाही. कारण भस्म व मंत्रवलेले अंजन वगैरे आता आहे कोठे?" उदयन म्हणाला.

भस्माची गोष्ट सुकेशिनी स्वत:च विसरली होती. उदयनने त्या गोष्टीची आठवण करून देताच ती म्हणाली–"होय ते तर आहे. बरं मग आता असं करू या. तुम्हांला पुन्हां दगडाच्या मूर्ती करून जाते. उद्यां येतांना भस्म घेऊन येते."

ते ऐकून तिळ्या भावंडांना फार आनंद झाला. लगेच तिने भिजलेल्या पदराचे सरोवरातले पाणी त्यांच्या तोंडात पिळले. ते पुन्हां दगडाच्या मूर्ती होऊन गेले.

तेवढ्यात राक्षस तिकडे आला व म्हणाला–"तू काही म्हण, तू असलीस म्हणजे जी मजा वाटते ती नाही आली आज." तो सुकेशिनीला म्हणाला.

"खरंच का? की थट्टा करतो आहेस? तरमग मी नक्की येईन. मी आपल्या अक्कालाच इकडे पाहाऱ्याला पाठवीन." असे म्हणत सुकेशिनी सरोवराकडे निघून गेली.

त्यानंतर तिघी राजकन्यांनी भस्म आणायचे ठरविले आणि तिघींनी तो खड्डा खणून पाहिला तर तेथे ती डबी सापडली नाही. त्यांना काय करावे काही सुचेना. तेव्हां सुकेशिनी म्हणाली–"आपण अशा विचार करीत बसून राहलो तर काय उपयोग? आज वाड्यात पाहऱ्याला तूच जा. जे घडले ते त्या मुलांना सांग. त्यानंतर ते सांगतील तसे पुढे करू या." असे सांगून तिने सुभाषिणीला पाठविले.



सुभाषिणी ते मंत्रजल घेऊन गेली. तिने तसाच पदर आणि साडीचें दुसरे टोक भिजवून घेतले होते. तिने वाड्यात जाऊन राक्षसाला बाहेर पाठवून दिले व पाहाऱ्याला म्हणून सांगून त्याच्या जागी बसली. तो निघून गेल्याबरोबर तिने दगडाच्या मूर्तींवर पदराचे पाणी पिळून शिंपडले. परंतु तिने मंत्रजल पिळण्या ऐवजी सरोवरातले पाणीच चुकून पिळले. म्हणून दगडाच्या मूर्तींना त्यांचे स्वस्वरूप लाभले नाही. "अरे रे! केवढी मोठी चूक केली मी?" म्हणत तिने आतां मंत्रजल पिळले. लगेच तिळी भावंडे स्वस्वरूपात आली.

तेव्हां सुभाषिणीने भस्म हरवल्याचे त्यांना सांगितले आणि मंत्रजला ऐवजी सरोवरातले पाणी चुकून प्रथम शिंपडल्याचे सांगितले.

ते ऐकून उदयन म्हणाला–"याचा अर्थ असा की आपल्या सर्व प्रयत्नात विघ्नेच येत आहेत. नाहीतर पदोपदी असे अपशकुन कां घडत आहेत?" त्याच्या आवाजात थोडी निराशा होती.

मध्ये निशीथ म्हणाला–"यश न यायला काय झाले? देव आपली सत्वपरीक्षा घेत आहे, एवढेच. थोड्यासाठी आपण असे निराश होणे बरोबर नाही."

"बरं तर राक्षस पुन्हां वाड्यात पोचण्याच्या आत आपण स्वत:चा बचाव करून गेले पाहिजे, नाही...! असे तो म्हणत होता.

परंतु सुभाषिणी मध्येच म्हणाली–"मला एक युक्ती सुचते आहे. येथे ज्या इतर दगडाच्या मूर्ती आहेत. त्यातल्या तीन उचलून या जागी आणून ठेवाव्या. तो हत्तीसारखा देहाचा मोठा आहे. पण त्याची बुद्धी हत्तीसारखी सूक्ष्म नाही. नुसते बटाटे भरले आहेत डोक्यात त्याच्या. आपण मूर्ती बदलून ठेवल्या तर त्याला मुळीच कळणार नाही. तुम्ही तिघे त्या झाडीत जाऊन लपा. तो वाड्यात गेल्याबरोबर तुम्ही आम्ही आहो तिकडे या. त्यानंतर काय करायचे ते ठरवू."

सुभाषिणीने सांगितलेला उपाय बरा आहे म्हणतांच ते देखील चांगला आहे म्हणाले. उशीर कशाला आणखी असा विचार करून, तिळी भावंडे व सुभाषिणी चौघांनी मिळून दगडाच्या तीन मूर्ती आणून त्यांना राक्षसानें ठेवले होते, त्या जागी आणून ठेवल्या आणि बाहेर येऊन एका झुडपाआड बसले.

काही वेळाने राक्षसाने परत येऊन सुभाषिणीला परत जायला सांगितले. लगेच सुभाषिणी तिळी भावंडे होती तेथे गेली आणि त्यांच्याबरोबर सरोवरात निघून गेली.



# राजयोग

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! नशिबात जे लिहिलेले असते ते खोटे ठरविण्यासाठी केलेले सर्व प्रयत्न जसे निरुपयोगी असतात, अगदी तसेच ते खरे ठरविण्यासाठी केलेले प्रयत्न देखील निरर्थक असतात. त्याचे एक उदाहरण म्हणून मी तुला एका माणसाची गोष्ट सांगतो. तू लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी चंदनपूर नावाच्या गावी नंदनवर्मा नावाचा राजा राज्य करीत असे. त्याला बरेच दिवस मूल झाले नाही. परंतु पुष्कळ नवस वगैरे केल्यावर एक मुलगा झाला. तेव्हां राजाने आपल्या दरबारी ज्योतिष्याला बोलावून त्याची जन्मकुंडली





तयार करून आणायला सांगितले. ज्योतिषी घरी गेला आणि त्याला त्याच वेळी मुलगा झाला असल्याचे कळले. तेव्हां त्याने आपल्या मुलाची जन्मकुंडलीसुद्धा तयार करायचे ठरवून पंचांग काढले आणि ग्रहनक्षत्र वगैरे पाहून दोन्ही जन्मकुंडल्या तयार केल्या. तेव्हां त्याला दोन्ही कुंडल्या पाहून आश्चर्य वाटले.

त्याच्या मुलाला वीस वर्षांनी राजयोग होता, तर युवराजाला त्याच वेळी दोन यमगंड होते. ज्योतिष्याने प्रथम दोन्ही कुंडल्यांचे फलित जसे आहे तसे राजाला सांगण्याचे ठरविले. परंतु थोडा विचार केल्यावर खरे सांगणे बरोबर नाही असे त्याला वाटले. कारण त्याच्या मुलाच्या कुंडलीतल्या राजयोगाचा आणि युवराजाच्या कुंडलीतल्या यमगंडाचा परस्पर काही तरी संबंध तर नाही ना, अशी एक शंका त्याच्या मनात आली. नंतर त्याला असेही वाटले की राजा ग्रहदोष दूर व्हावा म्हणून शांती वगैरे करील किंवा आधीच राज्याभिषेक करील.

असा विचार करून ज्योतिष्याने राजाला खोटे भविष्य सांगितले. आणि म्हणाला–"महाराज! युवराजांची कुंडली दिव्य आहे. परंतु विसावे वर्ष लागल्यावर त्यांचा राज्याभिषेक वगैरे करावा. त्यापूर्वी केल्यास अनेक अरिष्टे येण्याची शक्यता आहे."

युवराजाचे नांव आनंदवर्मा आणि ज्योतिष्याच्या मुलाचे नांव सुंदरसेन असे ठेवण्यात आले. दोघांचा विद्याभ्यास एकाच गुरूजवळ झाला. दोघे विद्याभ्यास संपवून सर्व विद्यांत प्रवीण झाले. दोघांना विसावे वर्ष लागले.

एके दिवशी ज्योतिष्याचा मुलगा सुंदरसेन आपल्या वडिलांना म्हणाला–"बाबा! मला ज्योतिष्यशास्त्रात चांगले पांडित्य संपादन करण्याची इच्छा आहे. म्हणून काही दिवस देशाटनास जावे म्हणतो."

बाप म्हणाला–"जायला हरकत नाही, परंतु सहा महिन्यात परत आले पाहिजे. ते शक्य नसेल तर जाऊच नकोस."

सुंदरसेनाने त्या गोष्टीस होकार दिला आणि देशाटनास निघाला.

सहा महिने लोटले तरी सुंदरसेन परतला नाही. ज्योतिष्याला काळजी वाटू लागली. आणखी पांच महिने लोटले. तरीदेखील सुंदरसेन परत आला नाही. युवराजांवर कोणत्याही प्रकारचे अरिष्ट आले नाही. याशिवाय आणखी दोन महिन्यांनी युवराजाचा राज्याभिषेक करण्याचे ठरले असल्याचे राजाने जाहीर केले.

ज्योतिषी काळजीत पडला. आपले ज्योतिष्य खोटे होणे शक्य नाही अशी त्याची खात्री होती. आनंदवर्मा थोड्याच दिवसात मरणारच. त्याचे मरण टळणे शक्य नाही. त्याच बरोबर आपल्या मुलाचा राजयोगदेखील अटळ आहे.

आपले ज्योतिष्य खरे ठरावे यासाठी प्रयत्न करण्याचे ज्योतिष्याने मनाशी ठरविले. त्यासाठी त्याने मनात एक बेत ठरविला.

युवराज दररोज संध्याकाळी राजोद्यानात फिरायला जाई आणि तेथे एका झाडाखालच्या चौथऱ्यावर येऊन बसे. ही गोष्ट ज्योतिष्याला माहीत होती. म्हणून त्याने एक दगड एका दोरीला बांधून त्या झाडाच्या शेंड्याला युवराजाच्या ठीक डोक्यावर पडेल अशा तऱ्हेने पानांच्या आड



लपवून ठेवला. दोरीचे दुसरे टोक दूरच्या एका झाडाजवळ ठेवून स्वतः ज्योतिषी ते धरून बसला. युवराज आनंदवर्मा नित्यनियमाप्रमाणे त्या झाडाच्या चौथऱ्यावर येऊन बसला. ज्योतिष्याने युवराज बसल्याबरोबर दोरीचे दुसरे टोक सोडून दगड खाली सोडला. त्याच वेळी युवराज एक फळ तोडायला म्हणून पुढे गेला आणि त्याच्या पाठीमागे चौथऱ्यावर दगड पडला. युवराजाने मागे वळून पाहिले तेव्हा दगडाला दोरी बांधलेली दिसली. दोरीचे दुसरे टोक वर लोंबकळत होते. त्यावरून कोणीतरी आपला वध करण्यासाठी तो कट केला असल्याचा युवराजाला अर्थातच संशय



आला. परंतु युवराजाने त्या गोष्टीचा गवगवा केला नाही आणि गुपचुप राजवाड्यात परतला.

ज्योतिषीमात्र त्याचा प्रयत्न फुकट गेला म्हणून खूप हळहळला. त्याचे डोके फिरल्यासारखे झाले. त्याने मागचा पुढचा काही एक विचार केला नाही आणि एक सुरा घेऊन काळोख पडल्यावर राजवाड्यात शिरला. गंमत अशी की त्या दिवशी वाड्याची सर्व दारे उघडी होती आणि पाहरेकरी द्वाराबूर झोपले होते. म्हणून ज्योतिषी सरळ युवराजाच्या झोपण्याच्या खोलीत गेला आणि गाढ झोपलेल्या युवराजाच्या छातीत सुरा भोसकण्यासाठी सुरा उगारला. परंतु आश्चर्य म्हणजे युवराजाने ज्योतिष्याचा तो हात वरच्या वर घट्ट धरून ठेवला. सर्व पाहरेकरी आले व त्यांनी ज्योतिष्याला कैद केले.

युवराजाने ज्योतिष्याला विचारले की त्याच्या खुनाचा विचार त्यांच्या मनात कसा काय आला? तेव्हां ज्योतिष्याने सर्व गोष्टी सविस्तर सांगितल्या व म्हणाला– "माझा तो प्रयत्न हुकला. याबद्दल दैवालाच दोष देण्याशिवाय दुसरे काही करण्यासारखे नाही."

परंतु युवराज म्हणाला– "तुमचे ज्योतिष्य चुकले असे कां म्हणतां? तुमच्या मुलाला राजयोग आहे तर तो माझ्याच हक्काच्या गादीवर बसेल हे जे तुम्हांला वाटले ते चुकीचे होते. तो दुसऱ्या एखाद्या राज्याचा अधिपती झाला नसेल कशावरून? माझ्याविषयीचे तुमचे भविष्य खरे नाही का ठरले? माझ्यावर दोन गंडांतरे आली व त्यांतून मी वांचलो.

युवराजाने ज्योतिष्याच्या मुलाविषयी फक्त कल्पनेने म्हटले ते खरेच होते. ज्योतिष्याच्या मुलाने एका देशाच्या राजाला त्या देशाच्या बंडखोरांच्या हातून बांचविले होते. त्या राजाला मूलबाळ नव्हते. म्हणून त्या राजाने ज्योतिष्याच्या मुलालाच आपला वारस मानून त्याला आपल्या गादीवर बसविले. म्हणूनच एक वर्ष लोटले तरी तो आपल्या बापाला दिलेल्या वचनाप्रमाणे घरी परत येऊ शकला नव्हता.

आनंदवर्माने ज्योतिष्याला कोणतीही शिक्षा वगैरे केली नाही व त्याला त्याच्या मुलाकडे न पाठवितां आपल्याच दरबारात ठेवून घेतले. परतु ज्योतिषीच तोंड दाखवायला लाज वाटत असल्याने आपल्या मुलाकडे निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! त्याचा दोन वेळां वध करण्याचा प्रयत्न करणाऱ्या ज्योतिष्याला आनंदवर्माने कां क्षमा केली? दैवात जे असते त्याला माणसाचा प्रयत्न हा सहायक होतो, असे म्हणतात. मग ज्योतिष्याचा प्रयत्न अयशस्वी कां झाला? त्याचे प्रयत्न अयशस्वी होऊन दैवात होते तेच घडले. तेव्हां मानव यत्न फुकट म्हणावयाचा का? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर तुला परिणाम माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला– "ज्योतिष्याचे भविष्य अमोघ आहे हे ओळखून आनंदवर्मा त्याला दरबारात रहायला आग्रह करीत होता. ज्योतिष्याच्या डोक्यात खुनाचे वेड शिरले होते एवढेच. त्याच्या मनात युवराजाविरुद्ध सुडाची भावना मुळीच नव्हती. त्यात त्याचा खुनाचा प्रयत्न अयशस्वी झाला. म्हणून आनंदवर्म्याने त्याला क्षमा केली. तो थोर मनाचा होता यात शंका नाही. ज्योतिष्याचा प्रयत्न अयशस्वी झाला असला तरी मानव प्रयत्न व्यर्थ म्हणता येणार नाही. कारण त्या प्रयत्नाचा परिणामच आनंदवर्म्याचा जीव वांचण्यात झाला आणि त्याच्या वरची दोन गंडांतरे टळली."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# मंत्र्याचे चातुर्य

एका देशाचा राजा महामूर्ख होता. तो प्रजेच्या हिताचे काही काम करीत नसे. कारण त्याच्यात ती लायकीच नव्हती. परंतु राजाचा मंत्री फार हुशार होता.

एकदा राज्यात दुष्काळ पडला, तेव्हां प्रजा राजाकडे आपले गाऱ्हाणे घेऊन आली. प्रजेने राज्याची कोठारे खुली करण्यास राजाजवळ विनंती केली. प्रजा पैसे देऊन धान्य खरेदी करायला देखील तयार होती. मंत्र्याने देखील शिफारस केली. परंतु राजाचे हृदय द्रवले नाही.

राजा मंत्र्याला म्हणाला—"प्रजा कोठारे लुटील की काय ही शंका वाटत आहे. तेव्हां कोठारातले सर्व धान्य परदेशात पाठविण्याची व्यवस्था करावी."

मंत्र्याने सरकारी नोकरांकरवी कोठारातील सर्व धान्य समुद्र किनाऱ्यावर पाठविले. काही दिवसांनी त्याने राजाला कळविले की जहाजे बुडून सर्व धान्य समुद्रात बुडाले. ते ऐकून राजाने प्रजेला ते काढून न्यायला सांगायला सांगितले. तेव्हां मंत्र्याने धान्य प्रजेला वाटून टाकले.





# कर्तबगार

एक गावी एक विधवा बाई होती. तिला दोन मुलगे होते. मुले लहानच होती आणि तिने अंथरूण धरले. तेव्हां बहिणीची चवकशी करायला तिचा भाऊ सोमेश्वर आला. बहिणीने भावाला मुलांना घेऊन जाऊन त्यांना मार्गाला लावायला सांगितले आणि कायमचे डोळे मिटले.

सोमेश्वर आपल्या दोघां भाच्यांना घेऊन घरी आला. त्याने त्यांना काही तरी उद्योगधंदा शिकवून मार्गाला लावायची खूप खटपट केली. परंतु मुलांत पुढे यायची लक्षणे दिसेनात. सोमेश्वर काळजीत पडला.

सोमेश्वरला मीनाक्षी नावाची एक सुंदर मुलगी होती. त्या मुलीशी लग्न व्हावे असे दोघां भावांना वाटले व त्यांनी ती गोष्ट मामाजवळ बोलून दाखविली.

सोमेश्वर त्यांना म्हणाला—"तुमच्या दोघांपैकी एकातही काही कर्तबगारी मला दिसली नाही. तुमच्यापैकी कोणालाही मुलगी देऊन मी तिचा गळा कापू म्हणता का? तशी तिच्या लग्नाची मला घाई देखील नाही. तुम्हांला दोघांना मी चार वर्षांचा अवधी देतो. तुम्ही काही कामधंदा करा. तुमच्यापैकी जो कोणी मला कर्तबगार दिसेल, त्याच्याशी मी मीनाक्षीचे लग्न करून देईन."

ते ऐकून दोघे भाऊ कर्तबगारी करून दाखविण्याच्या हेतूने घराबाहेर पडले आणि परगावी निघून गेले.

मोठा रामू अनेक गावे हिंडत शेवटी विद्यापूर नावाच्या गावी आला. तेथल्या देवळाजवळ आला तेव्हां देवळात कोणाचे तरी पुराण प्रवचन चालू होते. एक ब्राह्मण एका उंच आसनावर बसून श्लोक वाचीत



होता आणि त्याचा चांगला अर्थ समजावून सांगत होता. त्याच्या चारी बाजूला लोक बसले होते आणि लक्ष देऊन त्याचे प्रवचन ऐकत होते. रामूसुद्धां इतरांबरोबर शेवट-पर्यंत पुराण ऐकत बसला

पुराणिक पुराण संपल्यावर निघाले तेव्हां रामू त्यांच्या पाठोपाठ त्यांच्या घरापर्यंत गेला आणि त्यांचे पाय धरून म्हणाला–"मला आपला शिष्य करून घ्या आणि विद्याध्ययनाला सवड द्या."

पुराणिक रामूला हात धरून उभा करीत म्हणाले–"तुला विद्याभ्यास करावयाचा असेल तर मला शिकवायला आनंदच

तेव्हांपासून रामूने गुरूजवळ बसून विद्याभ्यास सुरू केला. तो गुरूची सेवा करी आणि गुरू त्याला शिकवी. काही दिवसांनी विद्याभ्यास संपवून रामू राम-शास्त्री झाला.

तिकडे धाकटा भाऊ रंगा बरीच गावे फिरल्यानंतर रामपूरच्या धर्मशाळेत आला आणि तेथे चौथऱ्यावर येऊन बसला. त्याच वेळी कोणी मोठा माणूस धर्मशाळे-समोर येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच धर्मशाळेचा व्यवस्थापक व इतर नोकर-चाकर त्याची विचारपूस करायला पुढे धावले. त्यांनी त्याला नमस्कार केला, परंतु त्यांच्याकडे त्याने वळूनसुद्धा पाहिले नाही आणि ऐटीत पुढे निघून गेला.

रंगाला ते सर्व काही विचित्र वाटले. त्याने धर्मशाळेच्या व्यवस्थापकाला त्या माणसाविषयी विचारले.

व्यवस्थापक म्हणाला–"तो या गावचा सर्वात श्रीमंत सावकार आहे. वीस पिढ्या बसून खाऊ शकतील एवढे वैभव जमा करून ठेवले आहे त्याने, म्हणून गावकरी त्याच्याशी नम्रपणे त्याची मर्जी संभाळून बोलतात."

पैसे लोक कशाला जमवितात त्याचा अर्थ रंगाला कळला. त्याने विचार केला

कसे मिळवायचे हे त्याच्याकडून शिकून घ्यायचे.

असा विचार करून तो धावत धावत त्याच्या पाठोपाठ त्याच्या घरी गेला. तो त्या श्रीमंत सावकाराच्या नोकरांना भेटला आणि त्याच्या पदरी नोकरी देवविण्यास शिफारस करायला त्याने त्यांच्याजवळ विनंती केली. रंगाला त्या श्रीमंताच्या पदरी नोकरी मिळाली.

रंगा नोकरी करू लागला. थोड्याच दिवसात त्याला आढळून आले की तो एक कवडीदेखील सोडीत नाही. फार लोभी आहे. जवळ इतके पैसे असूनही त्याचा पैशाचा लोभ सुटला नाही. पैसे मिळविण्यासाठी तो वाटेल ते बरेवाईट काम करायला तयार होता. इतर नोकरां-कडून त्याला हे सर्व कळले.

सोमेश्वराने जो अवधी दिला होता तो संपत आला. परंतु रंगा तसे काही मिळवू शकला नाही. त्याला काही काम-धंदासुद्धा आला नाही. एके दिवशी त्या श्रीमंताच्या घरचे सर्व लोक व नोकरचाकर ढाराढूर झोपलेले होते. त्या वेळी कसला तरी आवाज ऐकून रंगा जागा झाला. वेळेला काम येईल, असा विचार करून त्याने एक मोठे दांडके घेतले आणि आवाज आला, त्या बाजूला मांजराच्या पावलाने गेला.

दोघे चोर भिंतीला भोक पाडून आत शिरले होते. त्यांनी बरेचसे काही जमा



केले होते आणि ते घेऊन पळून जाण्याच्या तयारीत होते. रंगाला व त्याच्या हातातले दांडके पाहून ते घाबरून गेले. रंगाने त्यांच्या टाळक्यात दांडके मारण्यासाठी उगारले मात्र एक चोर थरथर कापत म्हणाला–"तू आम्हांला मारू नकोस. चोरीच्या मालाचा अर्धा वांटा तू घे. आमचा जीव घेऊन तुला काय मिळणार?"

रंगा नरमला. थोडा वेळ काय करावे, त्याला सुचेना. चोरीच्या मालातला अर्धा वांटा घेणे पाप आहे असे त्याला वाटले. परंतु पुन्हां त्याच्या मनात विचार आला, हे पैसे मिळवायला त्याच्या मालकाने काय थोडे का पाप केले आहे. म्हणून त्याने अर्धा वांटा घ्यायचे मान्य केले. चोरांनी अर्धा वांटा त्याला दिला आणि ते पसार झाले. रंगाने आपला वांटा लपवून ठेवला.

दुसऱ्या दिवशी मालकाने आपल्या सर्व नोकरांना खूप शिव्या दिल्या. चोरांचा पुष्कळ शोध केला, परंतु काही फायदा झाला नाही.

काही दिवसांनी रंगा नोकरी सोडून आपल्या गावी चोरलेले धन घेऊन आला. त्याच वेळी रामूसुद्धा परतला.

दोघात झालेला बदल पाहून सोमेश्वर खूष झाला. रामू एक ग्रंथ काढून त्यातला एक श्लोक वाचून त्यांचा अर्थ सांगू लागला. विशेष अर्थदेखील समजावून सांगू लागला. भाच्याचे पांडित्य पाहून सोमेश्वर खूष झाला.

रंगाने आपल्या कर्तबगारीचे वर्णन करून सोन्याच्या नाण्यांची पिशवी ओतली. ते पैसे पाहून सोमेश्वरचे डोळे दिपले. त्याने पूर्वी कधी इतके पैसे पाहिले नव्हते. म्हणून त्याने आनंदाने आपल्या मुलीचे रंगाशी लग्न करून दिले.

रामू स्वतःशीच हसला आणि त्याने स्वखुषीने आपल्या धाकट्या भावाचे लग्न करून दिले आणि त्याच्या विद्येचा जेथे आदर होणे शक्य होते, ती जागा शोधीत निघून गेला.





# फुकट सल्ला

नारूला त्याच्या वाडवडिलांपासून चालून आलेले, काय ते एक झोपडे होते. त्याला लागून एक मोठे परडे देखील होते. परड्यात त्याने केळीची रोपे लावली होती. केळीची झाडे वाढून लोंगर लोंबू लागले म्हणजे पाहणाराच्या मनाला आल्हाद होई.

एके दिवशी नारू आपल्या बागेत झाडांना पाणी लावीत असता जमीन-दाराची जुनी घोड्याची गाडी त्याच्या बागेसमोर येऊन उभी राहली. नारू चकितच झाला. गाडीतून जमीनदाराचे कुटुंब उतरले आणि जमीनदारणीने नारूला हाक मारली.

नारू हात धुवून ते पुशीत पुढे आला.

जमीनदारणीने त्याचे नाव विचारून घेऊन त्याला विचारले–"काय रे नारू! तुला ही झोपडी आणि हे परडे कशाला, तुझ्या झोपडी बरोबर हे परडे विकतोस का आम्हांला?"

नारूला आश्चर्य वाटले. तो काही बोलला नाही. जमीनदाराच्या कुटुंबाला आपल्या या झोपड्याची व परड्याची गरज कां पडावी? त्याला कळेना.

"तू पैशाबद्दल फिकीर करू नकोस. पांचशे रुपये देते!" ती म्हणाली.

नारूला स्वतःच्या कानावरच विश्वास होईना. त्याच्या त्या खोपटाला कोणी दोनशे रुपयेसुद्धा दिले नसते. परंतु तिने पांचशे देऊ केलेले पाहून त्याला काय उत्तर द्यावे, सुचेना.

तो काही बोलत नाही हे पाहून कदाचित तेवढी रक्कम त्याला पुरत नसेल असा विचार करून जमीनदारीण म्हणाली–"बरं मी साडे सातशे देते. परंतु नकार देऊ नकोस."



नारूला ते ऐकून भोवळ आल्यासारखे झाले. साडे सातशे रुपये! ते घेऊन पाहिजे तो व्यापार करतां येईल, त्याला वाटले.

तरी तोंडाने तो होकार देत नाहीसे पाहून व त्याला पैशाचा मोह झाला असावा असे समजून जमीनदारीण थोड्याशा रागात म्हणाली–"हे बघ! अगदी शेवटची किंमत म्हणून सांगते, एक हजार देते. तू आपले झोपडे देतोस की नाही ते बोल!"

नारू होकारार्थी मान हलवीत म्हणाला–"संध्याकाळपर्यंत आम्ही झोपडे रिकामे करतो. तुम्ही संध्याकाळी येऊन झोपडे ताब्यात घ्या."

"संध्याकाळी पैसे पाठविते एका माणसाबरोबर!" असे सांगून जमीनदारीण खूष झाल्यासारखी गाडीत बसून निघून गेली.

ती निघून गेल्यावर नारू आपल्या बायकोला आनंदाने गुदगुल्या झाल्यासारखा म्हणाला–"आपले नशीब उघडलं!"

जमीनदाराची गाडी झोपडीसमोर येऊन उभी राहली तेव्हांपासून शेजारपाजारचे लोक गंमत पहायला जमले होते. त्यांनी सर्व बोलणे ऐकले होते. ते नारूला आश्चर्याने विचारू लागले–"म्हणजे तू खरेच का झोपडे विकलेस नारू?"

"एक हजार रुपये, आल्यावर देऊ नको तर काय करू?" नारूने त्यांना विचारले.

"अरे अकलेच्या कांद्या! तुझ्या या भिकार खोपटाची किंमत एक हजार रुपये द्यायला जमीनदारीण कां तयार झाली, कळलं का तुला? काही तरी फायद्याची गोष्ट असल्याशिवाय ती बाई तुला हजार रुपये देईल असे वाटलं होय तुला? बाबा! तुझ्या परड्यातल्या केळ्यांवर तिची नजर आहे. काय वाटेल ते झाले तरी तू ही झोपडी सोडू नकोस. तुझ्या हिताचे म्हणून सांगतो आहो. तुला आज एक हजार दिसत आहेत. परंतु तुझ्या या झोपडीत व बागेत सोन्याचा साठा पुरलेला आहे. तो तिला दिसतो आहे! कित्येक दिवसांपासून आम्ही सुद्धा ते ऐकतो आहो" सर्वांनी हा सल्ला नारूला दिला आणि तेथून निघून गेले.

तो सल्ला नारूला पटला. त्याची बायकोसुद्धा म्हणाली–"ते म्हणाले ते बरोबर आहे. उद्या मुलीचे लग्न आहे, या खोपटातच कन्यादानाचे पुण्य मिळालं पाहिजे."

संध्याकाळी जमीनदाराचा नोकर पैसे घेऊन आला तेव्हां दोघां नवराबायकोंनी झोपडे विकण्याचा विचार त्यांनी सोडला असल्याचे सांगितल्यावर नोकर आश्चर्य करीत परत गेला.

त्या दिवशी रात्री कंदील लावून दोघां नवराबायकोंनी सारी केळ्याची बाग खणून काढली. झोपडीची जमीनसुद्धा खणून पाहिली. परंतु पुरून ठेवलेला धनाचा किंवा सोन्याचा सांठा कोठे सापडला नाही. त्यांनी सर्व छप्पर चाळून पाहिले, परंतु काही सांपडले नाही.

उजाडल्यावर नारू आपल्या बागेकडे व झोपड्याकडे पाहून रडू लागला की सोन्या-चांदीच्या आशेने सोन्याच्या किंमतीने जाणाऱ्या झोपड्याला मी स्वतःच्या हाताने माती मोलाचे केले.

"त्यात अजून काय गेले हो? उद्या सकाळी त्या जमीनदारणीला जाऊन भेटा आणि सांगा की मी झोपडे आणि परडे










एक हजाराला द्यायला तयार आहे!" बायको म्हणाली.

नारू जमीनदाराच्या घरी जाऊन जमीनदारणीला म्हणाला–"स्वतःची अक्कल न वापरतां मी इतरांच्या डोक्याने चाललो आणि झोपडे विकायचे नाही म्हणालो. आतां विकावे, म्हणतो आहे. तुम्हांला

गोष्टीला त्यांनी नकार दिला आणि ती वडिलार्जित संपत्ती असल्याचे सांगून ती ते विकायला तयार नसल्याचे सांगितले. त्याला उदाहरण म्हणून त्यांनी नारूचे वडिलार्जित झोपडे मला दाखविले होते." ती म्हणाली.

दोघांनी एकेक हजाराची पैज लावली होती व ती हारल्याचे मुद्दां जमीनदारणीने





# चंद्रद्वीपावरचा व्यापारी

चंद्रद्वीपावर राहणारा चंद्रसौदागर नावाचा एक प्रसिद्ध व्यापारी ढाक्याची मलमल, मुर्शिदाबादचे हस्तिदंती सामान, कांशाच्या वस्तु, उंची चंदनी लाकूड वगैरे माल तीन गलबतात भरून घेऊन सातशे खलाशांबरोबर जावा द्वीपाच्या प्रवासाला निघाला.

काही दिवस प्रवास सुखाचा झाला. तिसऱ्या आठवड्यात एका सामुद्रधुनीजवळ काही विचित्र विचित्र गोष्टी यात्रेकरूंच्या नजरेस आल्या. विवेकी व शहाणा चंद्रसौदागर ते सर्व पाहून काही बोलला नाही. परंतु किती झाले तरी मानव स्वभावच. एका दृश्यावर त्याची नजर खिळलीच. त्याला पाण्यावर एक पांढरा हत्ती नाचत असलेला दिसला. त्या हत्तीचे दात सोन्याचे होते. त्याने खलाश्यांना हाकारले आणि काय वाटेल ते करून त्या हत्तीला धरायला सांगितले.

त्याच्या गलबतांनी त्या हत्तीला चारी बाजूनी घेरले. परंतु तो हत्ती कसा तरी निसटून जाई आणि दूर जाऊन पुन्हां पाण्यावर नाचू लागे. पुन्हां सौदागराची गलबते जवळ जाऊन त्याला धरण्याचा प्रयत्न करू लागली. पुन्हा तो हत्ती निसटला आणि दूर जाऊन पुन्हा नाचत असलेला दिसला. परंतु या प्रयत्नात गलबते आपली वाट चुकून खोल समुद्रात जाऊन पोचली. दुर्दैवाने त्याच वेळी सूर्यास्त झाला आणि तेवढ्यात एक मोठे वादळ आले आणि गलबताना ओढून घेऊन गेले. थोड्यावेळाने सर्व गलबते एका खडकावर आदळली आणि फुटून त्यांचे तुकडे तुकडे झाले. माल व यात्री सर्व पाण्यात बुडाले.

गलबताच्या पाण्यावर तरंगणाऱ्या फळ्या धरून चंद्रसौदागर व सहा नाविक तरंगत



स्वतःचा जीव वांचवून दोन दिवसांनी एका अपरिचित डोंगराळ किनाऱ्याला येऊन लागले. भुकेने व तहानेने त्यांचा जीव कासावीस झाला होता. त्यांनी वाऱ्याने खाली पडलेले नारळ आपटून फोडले व आपली तहानभूक अल्प का होईना, भागविली.

ते सात जण ज्या बेटावर पोचले होते ते द्वीप समुद्राच्या पातळीपासून बरेच उंचीवर होते. त्यावर झाडी भरगच्च होती आणि आकाशाला शिवणारे उंच वृक्ष होते. त्यांच्यावर चढणे तर अशक्यच होते. त्यांनी खूप हिंडून पाहिले तेव्हां त्यांना पश्चिमेकडील भागात एक बिळासारखे दिसले. ती एका गुहा होती आणि गुहेच्या तोंडावर पाहरेकरी उभे होते.

त्या अनोळखी सात जणांना पाहतांच पाहारेकऱ्यांनी कैद केले आणि गुहेत शिरून बोगद्यासारख्या वाटेने आपल्या राजधानीच्या गावात घेऊन गेले. त्यांची भाषा चंद्रसौदागराला कळत नव्हती. चंद्रसौदागर व त्याचे साथी नाविक गावातल्या रस्त्याने चालत असतां चकित होऊन पहात होते, त्या राजधानीतली संपत्ती आणि वैभव पाहून चंद्रसौदागराचे व त्याच्या साथीदारांचे डोळे दिपून गेले. संध्याकाळच्या सुमारास पाहारेकऱ्यांनी आपल्या कैद्यांना तुरुंगात टाकले.

दुसऱ्या दिवशी पाहरेकऱ्यांनी आपल्या राजासमोर आपल्या कैद्यांना उभे केले. चंद्रसौदागर आणि त्याच्या साथी खलाशांनी वांकून राजाला नमस्कार केला. ते पाहून राजा खूष झाला.

राजाने त्यांना आपल्याभाषेत विचारले—"तुम्हांला काय पाहिजे."

चंद्रसौदागर आपल्या भाषेत उत्तरला—"आपण काय म्हणालात ते आम्हांला कळले नाही."

त्यांना परस्परांची भाषा येत नव्हती. आतां राजाने मुक्यांसारखे खुणेने बोलायला सुरवात केली. चंद्रसौदागाराने खुणेनेच त्या प्रश्नांची उत्तरे दिली. त्याने खुणेने राजाला सांगितले की तो व त्याचे साथी समुद्रात अपघातात सापडले आणि कसाबसा जीव वांचवून त्यांच्या द्वीपात आले. सुदैवाने ते सर्व राजाला कळले.

राजाने एक ग्लास व पाण्याचे भांडे मागविले आणि पेला तंतोतंत भरेल एवढे त्यात पाणी ओतले. नंतर त्याने त्या नव्या सात जणांच्या अंगठ्या घेऊन त्या पाण्यात टाकविल्या. पेल्याबाहेर पाण्याचे ओघळ वाहू लागले. राजाला खुणेने असे सांगावयाचे होते की पेल्यातल्या पाण्यासारखे राजधानीत लोक भरले आहेत आणि जास्त लोक आले तर राजधानीत इतकी गर्दी होईल की अशांतता पसरेल.

ते पाहून चंद्रसौदागर व त्याचे साथी थोडे हताश झाले. परंतु त्यांची कीव येऊन राजाने त्यांना गावात फक्त दोनच दिवस राहायला परवानगी दिली.

एक खलाशी चंद्रसौदागरला म्हणाला—"आपण एक नवे जहाज तयार करून स्वदेशी जाईपर्यंत याच द्वीपात रहायला काही मार्ग निघतो का पाहूं!"

"मी तोच विचार करतो आहे." असे सांगून चंद्रसौदागर त्याच्या साथी मित्रांना बरोबर घेऊन राजधानी पहायला निघाला. ते फिरत फिरत बाजारातल्या एका दुकाना-



समोर उभे राहले. त्या दुकानात घरात लागणाऱ्या सर्व वस्तू मिळत होत्या. त्या वस्तू पाहून चंद्रसौदागरला एक गोष्ट सुचली.

त्याने लगेच आपल्या हातातल्या तीन अंगठ्यापैकी एक अंगठी गहाण ठेवून एक लांब नळी असलेले लहानसे फनेल आणि एक कांचेचा पेला विकत घेतला.

त्याच्या साथी मित्रांनी विचारले—"कशाला हो?"

"तुम्ही पहात रहा गंमत!" चंद्रसौदागर म्हणाला.

तो आपल्या साथीमित्रांबरोबर दरबारात गेला. त्याच्या हातात फक्त तो कांचेचा

पेला होता. फनेल खिशात लपवून ठेवलेले होते. त्याने राजाला नमस्कार करून शेजारच्या खोलीत काही वेळ जायला परवानगी मागितली. राजाने अनुज्ञा दिल्यावर तो आपल्या मित्रांबरोबर एका भांड्यात पाणी घेऊन आत गेला. काही वेळ आत राहून तो बाहेर आला आणि त्याने महाराजांना आत बोलाविले.

राजा आत आल्यावर चंद्रसौदागरने आपली एक अंगठी आणि आपल्या सहा मित्रांच्या अंगठ्या एकूण सात अंगठ्या एकेक करून काठापर्यंत पाण्याने भरलेल्या त्या पेल्यात सोडल्या. एक थेंबभरसुद्धा पाणी बाहेर सांडले नाही. पेलाभर पाण्याने सातही अंगठ्यांना आत रहायला जागा दिली.

राजाने सौदागराच्या कौशल्याचे कौतुक केल्यासारखे स्मित करीत त्याची पाठ थोपटली. नंतर राजाने आपली एक अंगठी काढून सौदागराला बक्षीस देत मंत्र्याला काही तरी कानात सांगितले. मंत्र्याने खुणेने व हावभाव करून आमच्या राजधानीत पाहिजे तितके दिवस रहायला महाराजांनी सर्वांना परवानगी दिली असल्याचे सांगितले.

चंद्रसौदागरला थोडीशी जादू येत होती त्याचा उपयोग त्याला व त्याच्या मित्रांना झाला.

त्याने खोलीत काय केले ? त्याने पेल्याचा काठ फडक्याने चांगला पुसला. काठावर पाणी किंवा दुसरे काही राहू दिले नाही. नंतर त्याने त्या फनेलात पाणी ओतून हळूहळू नळी द्वारे पेल्यात सोडले. तेव्हा त्याने काठाला थेंबभर देखील पाणी लागणार नाही याची काळजी बाळगली. त्याच्या जादूतली तीच मुख्य बाब होती. पेल्याच्या काठाला थोडा जरी ओलेपणा राहाला असता तर पाण्याचे ओघळ पेल्याबाहेर आले असते. त्याच प्रमाणे पेल्यात अंगठ्या सोडताना पाणी हलू दिले नाही आणि पेल्याचा काठ भिजू दिला नाही.





# १६१. प्राचीन स्मशानाचे अवशेष

क्रिमिया द्वीपकल्पाच्या ईशान्येकडील प्रदेशात गेल्या वर्षी (१९७४) एक प्राचीन स्मशान आढळून आले आहे. त्याला नर्गाचिन्सकी टेकडी म्हणतात. या जागी कांशाचा आरसा, चांदीची भांडी, सोन्याचे गोठ, सांखळी वगैरे वस्तू मिळाल्या आहेत. या दोन हजार वर्षापूर्वी नर्मातिया ग्रीस कारागिरांनी केलेल्या आहेत. ही सर्व रत्नजडित आभूषणे कोणत्यातरी नर्मातिया राणीची असावीत असे अनुमान आहे. या चित्रात दागिन्यातले कौशल्य चांगले दिसून येईल.







# दोन मित्र

फार पूर्वी अजीकर्त्ता नावाच्या एका मुनीजवळ दोन शिष्य होते. त्यांपैकी शुनश्शेप हा अत्यंत क्रोधी होता. त्याचे त्याचा सहाध्यायी रोहित याच्याशी या ना त्या कारणावरून सदा न कदा भांडण होई. म्हणून रोहित त्याच्यापासून थोडा दूरच राही. अजीकर्ता मुनींना आश्चर्य वाटले की त्यांचे दोन्ही शिष्य परस्पर मैत्रीने नेहमी रहात, ते परस्परांपासून दूर राहू लागले. त्यांना या गोष्टीचे फारच आश्चर्य वाटले. म्हणून त्यांनी एक दिवस रोहितला बोलावून विचारले–"काय रे, तुम्ही दोघं परस्परांशी ओळख नसल्यासारखे दूर दूर कां राहता? तू एका वर्षाने मोठा आहेस म्हणून मी तुलाच विचारले.

रोहित म्हणाला–"काही नाही, त्याला राग फार येतो. दोघे मिळूनमिसळून राहात होतो, परंतु लहानसहान गोष्टीवरून भांडणे व्हायला लागली. त्याचा राग संसर्ग दोषाने आपल्याला सुद्धा कदाचित येईल म्हणून मीच दूर राहू लागलो."

"त्याच्यावर तुझ्या मनात प्रेम आहे एवढे त्याला कळले की पुरे! संसर्गदोषाची तुला जशी भीती आहे तसा तुझा शांत स्वभाव संसर्गाने त्याला मिळणार नाही कशावरून? त्याचे उदाहरण म्हणून मी एक गोष्ट सांगतो. ऐक." असे सांगून अजीकर्त्तामुनी गोष्ट सांगू लागले.

एका गावी रमानंद व सीमानंद नावाचे दोन शेतकरी मित्र रहात होते. दोघे परस्परांना व गावातल्या लोकांना सहाय्य करीत. गावकरी त्यांना जुळे मित्र म्हणून ओळखत.

पुढे एका क्षुल्लक कारणावरून दोघां मित्रांच्या मनात भेद उत्पन्न झाला आणि हळू हळू दोघांचे परस्परांशी वैर वाढत गेले. त्यामुळे दोघांचे थोडे फार नुकसानसुद्धा झाले. त्यांनी गावकऱ्यांना पूर्वीसारखी मदत करण्याचे सोडून दिले. मित्रता असली की कोणी तिऱ्हाईत ती वाढविण्याच्या भानगडीत पडत नाही. परंतु वैर असेल तर ते वाढविणारे पुष्कळ विघ्नसंतोषी निघतात. गावातल्या विघ्नसंतोषी लोकांनी त्यांचे परस्परांविरुद्ध कान भरायला सुरवात केली. म्हणून परस्परांमध्ये सख्य स्थापित होण्याची शक्यता राहिली नाही.

अशा परिस्थितीत गुरुनाथ नावाच्या एका वडीलधाऱ्या गृहस्थांनी दोघां मित्रांत पुन्हा मैत्री स्थापन करण्यासाठी एक उपाय योजला.



गावात सर्वत्र अशी बातमी पसरली की, गावाबाहेरच्या एका पारावर एक योगी आला आहे. तो सर्वांच्या मनातले व्याधी दूर करतो. शारीरिक रोगसुद्धा दूर करतो. कित्येकांनी त्याच्या दर्शनास जाऊन आपल्या मनातल्या गोष्टी सांगितल्या व त्या योग्याने योगबलाने व इतर रीतीने त्यांचे मानसिक अगर शारीरिक रोग बरे केले.

रमानंद देखील त्या योग्याच्या दर्शनाला गेला. योगी त्याला म्हणाला–"मला तुझ्यात एक विशेष गुण दिसतो आहे. तू कोणाला प्रेमाने भेटलास व आलिंगन केलेस तर तो मनुष्य खूप श्रीमंत होईल. त्याच्यामुळे तुलासुद्धा मोठा फायदा होईल. परंतु तू ज्याला आलिंगन करणार तो मनुष्य तुझं बरे व्हावे हा विचार सदा मनात बाळगणारा असला पाहिजे. तेव्हां आलिंगन करताना तो विचार तुझ्या मनात असला पाहिजे."

नंतर रमानंद कोणाला बरे आपण जवळचा समजून आलिंगन करावे याविषयी विचार करू लागला. त्याला तशी कोणी व्यक्ति दिसली नाही. सीमानंदाशी वैर असले तरी तोच एकटा आपला खरा हितैषी आहे, हे त्याला वाटले.

मध्यंतरी सीमानंददेखील त्या योग्याला भेटायला गेला. योगी त्याला म्हणाला–

"तुला कोणी मैत्रीभावाने आलिंगन केले तर तुझे सर्व मानसिक व शारीरिक कष्ट दूर होतील आणि तू श्रीमंत होशील, परंतु तू स्वत: होऊन कोणाला आलिंगन केलेस तर तो तुझ्या डोळ्यादेखत मरण पावेल."

आपल्याला मैत्री भावाने कोण आलिंगन करतो यागोष्टीचा विचार करीत सीमानंद आणि रमानंद आलिंगन करण्या लायक कोण व्यक्ती आहे याचा विचार करीत गावभर भटकले. म्हणून दोघांच्या अनपेक्षितपणे दोनतीनदां भेटी झाल्या.

सीमानंद बरीच वाट पाहील्यावर विचार करू लागला हा रमानंद मेल्याशिवाय मला स्वत: होऊन आलिंगन करणारी कोणी व्यक्ती भेटेल की नाही शंकाच वाटते आहे. असा विचार करून त्याने रमानंदाला आलिंगन केले. आपल्याला सांगितले तसेच सीमानंदाला सुद्धा योग्याने सांगितले असावे, असा विचार करून रमानंद सीमानंदाला त्याचे बरे व्हावे या विचाराने मैत्रीभावाने भेटला.

नंतर दोघे परस्परांशी बोलले तेव्हा योग्याने दोघांना निरनिराळ्या तऱ्हेने सांगितले असल्याचे कळले. म्हणून दोघे योग्याला भेटायला गेले.

सीमानंद योग्याला म्हणाला—"मी दुर्बुद्धीने रमानंदाला मरण यावे या विचाराने त्याला भेटलो. परंतु आतां वाटते की तुम्ही त्याला काही तरी करून वांचवावे."

"भिण्याचे कारण नाही. तू पहिल्यासारखा त्याच्याशी प्रेमाने वागलास तर त्याच्यावर कोणतेही संकट किंवा गंडांतर येणार नाही. दोघांमध्ये पुन्हां सख्य व्हावे म्हणून मी ही युक्ती केली होती." असे सांगून गुरुनाथाने आपला योग्याचा वेष काढून फेकून दिला.

त्यानंतर रमानंद आणि सीमानंद दोघांमध्ये पुन्हा पहिल्यासारखी मैत्री व सख्य स्थापन झाले.

ती गोष्ट ऐकून रोहित म्हणाला—"आजपासून मी शुनश्शेपूशी पूर्वीसारखाच प्रेमाने वागेन."





# रत्नहार

सुंदरपूर नांवाच्या राज्याचा माधव नांवाचा एक अधिपती होता. तो हुशार व प्रजावत्सल राजा होता. त्याला दोन राण्या होत्या. एकदा त्याच्या दरबारात एक परदेशी जव्हेरी रत्नहार विकायला घेऊन आला. माधवने त्याच्या जवळचा एक अत्यंत सुंदर व मूल्यवान रत्नहार विकत घेतला आणि तो आपल्या मोठ्या राणीला प्रेमाची भेट म्हणून दिला. त्यामुळे धाकटी राणी सवतीमत्सराने आतल्या आत जळफळत राहिली. त्या रत्नहाराची बातमी जवळपासच्या राज्यात पसरली.

माधवाच्या पदरी त्रिनाथ नावाचा एक मंत्री होता. त्याला एकुलती एक मुलगी होती. परंतु ती मुकी असल्याने तिचे लग्न होऊ शकले नाही. ते मंत्र्याच्या आयुष्यभराचे एक दु:ख होते.

एकदां शेजारच्या राज्याचा मंत्री अचानकपणे लव्याजम्यासह त्रिनाथाच्या घरी आला आणि एकांतात त्रिनाथाला भेटून म्हणाला—"मी एका अटीवर तुमच्या मुलीला आपली सून करून घ्यायला तयार आहे. तुम्ही आपल्या मोठ्या राणीसरकारांचा नवीन रत्नहार मिळवून आम्हाला दिला पाहिजे."

त्रिनाथाला ते काही कळेना, चकित होऊन विचारू लागला "काय म्हणतां? राणी सरकारांचा हार मला कसा काय मिळणार?"

तो म्हणाला—"ते सर्व मला काही कळत नाही. तो रत्नहार मिळाल्याशिवाय हे लग्न होणार नाही."

त्रिनाथ हा एक स्वामिभक्त मंत्री होता. तो रात्री आपल्या बायकोला म्हणाला—"तो मंत्री फक्त त्या रत्नहारासाठी आपल्या मुलीला सून करून घ्यायला तयार



आहे. आपल्या मुलीचे लग्न झाले नाही तरी चालेल, परंतु मी राजद्रोह कदापि करणार नाही."

त्रिनाथ आपल्या बायकोशी हे सर्व बोलत असतां वेष पालटून फिरत असलेल्या राजाने बाहेरून ते ऐकले. राजाने विचार केला, काय वाटेल ते झाले तरी अशा स्वामिभक्त मंत्र्याच्या मुलीचा विवाह झालाच पाहिजे. असा विचार करून तो मंत्र्याच्या घरात शिरला.

मंत्र्याने राजाला न ओळखून विचारले–"कोण रे तू?"

"खरे सांगायचे झाले तर मी एक चोर आहे. मी चोरी करायला तुमच्या घरात शिरलो होतो. परंतु तुमचे संभाषण ऐकून मला एवढे कळले की तुम्ही दोघं आपल्या मुलीच्या लग्नाची काळजी करीत आहां. तुम्ही हे स्थळ हातचे जाऊ देऊ नका. मी काही तरी करून राणीचा तो हार आणून तुम्हांला देतो." चोराच्या वेषातला राजा म्हणाला.

"नाही. नको मला तो हार. मला त्याची मुळीच गरज नाही." मंत्री म्हणाला.

"तुम्ही घाईगर्दीत असा अविचार करून मुलीच्या आयुष्याचे मातेरे करू नका. चोरी मी करणार, तुम्ही नाही आणि ती मी तुमच्या हितासाठी करणार आहे, स्वार्थासाठी नाही." राजा म्हणाला.

त्रिनाथची बायको नवऱ्याला म्हणाली–"काय हरकत आहे हो तुम्हांला? मुलीचे लग्न झाल्यावर आपण स्वतःच जाऊन महाराजांना सर्व सांगू आणि जो दंड भोगावा लागेल तो भोगू!"

मोठ्या कष्टाने त्रिनाथ कबूल झाला.

दुसऱ्या दिवशी राजाने एक हुशार सोनाराला बोलाविले आणि एका गुप्त जागी त्याला बसवून एका आठवड्याच्या आत त्या रत्नहारासारखा नकली हार तयार करविला. त्याला चांगले पारितोषिक देऊन निरोप दिला. त्यानंतर वेष पालटून राजा तो नकली हार मंत्र्याला देत म्हणाला–"आतां तुम्ही मुलीचे लग्न आनंदाने करून टाका."

मंत्र्याच्या मुलीचे लग्न निर्विघ्नपणे पार पडले. राजाने स्वतः लग्नप्रसंगी हजर राहून वधुवरास वस्त्र व आभूषणे अहेरादाखल दिली आणि आनंदाने आपल्या घरी परतला.

त्यानंतर राणीने राजाला आपला खरा हार दाखवीत विचारले–"महाराज! या हारात पूर्वीसारखी चमक राहिली नाही."

राजाने त्या रत्नहाराची पारख करविली व राजाला तो हार नकली हिऱ्यांचा असल्याचे कळले. राजाला संशय आला की आपण नकली समजून खरा हार तर मंत्र्याला नाही दिला? तेव्हां राजा चोराचा वेष करून व आपल्या शिपायांना सुद्धा चोराचा वेष करायला सांगून शेजारच्या राज्याच्या मंत्र्याच्या घरात शिरला.

तेथे जो माल हाती लागला त्यात रत्नहार होता. परंतु तोसुद्धा नकलीच होता. तेव्हां त्याच्या मागचे गुपित राजाला कळेना.

दुसऱ्या दिवशी त्रिनाथने राजाला भेटून निवेदन केले–"महाराज! आमच्या व्याह्यांच्या घरात शिरून चोरांनी सर्व रत्ने व आभूषणे चोरून नेली आहेत. त्यांत माझ्या



हातून त्याहून घोर अपराध घडला आहे. मी राणीसरकारांचा हार एका चोरा करवी चोरी करवून तो आपल्या जावयाला भेट म्हणून दिला. म्हणून मला यथोचित दंड करावा."

राजा मंत्र्याला म्हणाला–"तुम्ही नाहीं ना चोरी केलीत? आपल्या व्याह्यांच्या घरी जो माल चोरीला गेला आहे, तो मी शोधून त्यांच्याकडे पोचता करण्याचा यत्न करतो." असे सांगून राजाने मंत्र्याला निरोप दिला.

त्यानंतर राजाने सोनाराला बोलवून विचारले–"तू मला जेव्हां नकली रत्नहार करवून दिलास त्या वेळी खरा हार परत

केला नाहीस? एक नकली हार करून दिलास. असे कसे झाले? तू खरं खरं सांगितले नाहीस तर तुला सुळावर चढवीन!"

सोनाराने राजाचे पाय धरले आणि म्हणाला–"महाराज! मला क्षमा करावी. मी दोन नकली हार तयार केले. अंतःपुरातून धाकट्या राणीसरकारांच्या दासीने मला भेटून मला पुष्कळसे बक्षीस दिले आणि एका ऐवजी दोन नकली हार तयार करायला सांगून ती गोष्ट गुप्त ठेवायला सांगितली. मी नकली दोन आणि खरा एक असे तीन हार एका पेटीत ठेवले. मला वाटत होते की छोट्या राणीसरकारांनी दुसरा नकली हार उचलून नेला असावा आणि मी उरलेले दोन हार पेटीत ठेवून आपणास दिले."

राजाने सोनाराला निरोप दिला आणि छोट्या राणीची दासी मंजिरी हिला बोलावून दंड शिक्षा वगैरेच्या धमक्या दिल्या. तेव्हां घाबरून जाऊन तिने सोनाराला फसवून खरा रत्नहार चोरून नेल्याचे कबूल केले आणि तो हार छोट्या राणीसरकारांकडे असल्याचे सांगितले.

राजाने धाकट्या राणीला ही लबाडी करण्याचे कारण विचारले. तेव्हां ती म्हणाली–"महाराज! सर्व बायकांना दागिन्यांचा व सुंदर वस्त्रांचा मोह असतोच. त्यात सवतीला मिळाले ते आपल्याला मिळाले नाही, हे मला पाहवले नाही. पण आपणांजवळ बोलून विचारण्याची मला हिंमत नव्हती. आपण कधी माझी फिकीर केलीच नाही. म्हणून मला हा डाव टाकावा लागला. आपणांला माझा हा अपराध अक्षम्य वाटत असल्यास आपण सांगाल ती शिक्षा भोगायला मी तयार आहे."

राजा शहाणा व विवेकवान होता. म्हणून त्याने आपली चूक कबूल केली आणि त्याच सोनाराकडून अगदी तसाच दुसरा हार तयार करवून धाकट्या राणीला देवविला.



# न्याययुक्त मजुरी

गोपाळरावांच्या कडे मोठा चौकोर फरशीचा दगड होता. त्यांना त्याचे चार तुकडे करून हवे होते. त्यांनी दगडू नावाच्या गवंड्याला बोलावून ते काम दिले.

दगडूने एक तासभर मेहनत करून त्या लादीच्या एका कोपऱ्यातला चौकोर तुकडा काढला आणि निघून गेला. म्हणून गोपाळरावांनी लखू गवंड्याकडून बाकी तीन चौकोर तुकडे काढून दिले.

नंतर गोपाळरावांनी मजुरी म्हणून दगडूला एक रुपया दिला आणि लखूला तीन रुपये दिले.

तेव्हां दगडूने विचारले–"मी एक तासभर काम केले आणि लखूने पण एकच तासभर काम केले. परंतु मजुरी मात्र त्याला तीन रुपये आणि मला फक्त एक रुपया कां? दोघांना दोन दोन मिळाले पाहिजेत."

गोपाळराव म्हणाले–"तू एक तुकडा कापून काढलास म्हणून तुला एक रुपया दिला, त्याने तीन काढले म्हणून तीन दिले. दोन दोन दिले तर ते बरोबर होणार नाही. अन्याय होईल."

तेवढ्यात रघुनाथरावांनी तिकडून जातांना त्यांचे बोलणे ऐकले होते, ते म्हणाले–"दोघांनी सारखेच काम केले नाही कां? एकाने एक कोपरा कापला आणि दुसऱ्याने दुसरा कापला. तो कापला म्हणून दोन कोपऱ्यांचे तुकडे आपोआप झाले!".

तेव्हां गोपाळरावांना कळले की दोघांचे काम सारखेच होते.





# खरा न्याय

एका गावी विठू नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याच्याजवळ फक्त एक एकर जमीन होती. आपल्याच गावाच्या गणूशेटकडून त्याने काही कर्ज काढले आणि कर्जाची रक्कम फेडण्यासाठी म्हणून आपली एक एकर जमीन त्याला दिली.

आता विठूजवळ स्वत:ची अशी फक्त एक दुभती गाय तेवढी उरली. विठू गाईचे दूध गणूशेटकडेच रतीबाने देत असे आणि त्याच्या दुकानातून कणीक, डाळ वगैरे विकत घेत असे.

काही दिवसांनी गणूशेटची नजर विठूच्या गाईवर गेली. त्याने विचार केला की गाय आपण घेतली की विठूला कणीक, डाळ वगैरे वस्तू रोख पैसे देऊन विकत घ्याव्या लागतील व आपल्याला आणखी जास्त फायदा होईल.

एकदा मुसळधार पाऊस पडला. गाईला बाहेर चरायला नेणे विठूला अशक्य वाटले. दिवसभर गोठ्यातच बांधून ठेवावे लागले. गोठ्यात गवताची एक काडीदेखील नव्हती. त्याला त्या दिवशी रात्रभर झोप आली नाही. उद्यां गाईने दूध दिले नाही, तर रतिबाचे दूध कसे घालायचे?

परंतु रात्री गाय दावे तोडून गणूशेटच्या शेतात शिरली. तिने पोटभर खाऊन घेतल्यावर ती गोष्ट विठूला कळली. परंतु आतां काय करणार?

दुसऱ्या दिवशी उजाडतांच गणूशेट चार चौघां गावकऱ्यांना बरोबर घेऊन विठूच्या घरी भांडायला आला. म्हणाला—"तुझ्या गाईने माझ्या उभ्या पिकाचा नाश केला. वर्षभराची कमाई एका रात्रीत फस्त केली तुझ्या गाईने."

विठूने विचारल्यावर इतर गावकरी म्हणाले—"गणूशेटचे म्हणणे आम्हांला तरी बरोबर वाटते."

गणूशेट तीच संधी पहात होता. म्हणाला—"माझे शेत म्हणजे रान वाटलं काय तुला. दोनशे रुपयांवर नुकसान झाले आहे उभे पीक नष्ट झाले."

गावकरी म्हणाले—"तू आपली गाय देऊन टाक गणूशेटला आणि आपली गाय सोडवून घे." गणूशेटने त्यांना तेच पढवून ठेवले होते.

गणूशेटने गावच्या पाटलाकडे तक्रार केली. पाटलाने सर्व गोष्ट ऐकून निवाडा दिला. म्हणाला—"विठू! तुझ्या निष्काळजी-पणामुळे गणूशेटचे उभे शेत नष्ट झाले. नुकसान भरपाई खातर तू आपली गाय गणूशेटला दिली पाहिजेस."

गावकऱ्यांनी तो निवाडा बरोबर असल्याचे सांगितले.

निरुपाय होऊन विठूने आपली गाय गणूशेटला दिली आणि आतां पुढे काय या विचारात तो कपाळावर हात धरून बसला. तो घरी आला खरा, परंतु त्याला काही सुचत नव्हते. पाटलाने आपल्यावर घोर अन्याय केला आहे, असे त्याला मना-पासून वाटले. तेवढ्यात त्याला एक गोष्ट आठवली. त्या देशाचा न्यायाधीश फार थोर मनाचा म्हणून प्रसिद्ध होता. म्हणून विठूने त्याच्याकडे जाऊन न्याय मागायचे ठरविले.



न्यायाधिशाने विठूचे गाऱ्हाणे शांतपणे ऐकून घेतले व विठूच्या घरची स्थिती आणि गणूशेटशी त्याचा कसा संबंध होता याविषयी चवकशी करून घेतली. तो गोड-शब्दात म्हणाला–"विठू! तुझ्यावर हा अन्याय झाला आहे, यात शंका नाही. मी तुझ्या फिर्यादीसंबंधी सर्व चवकशी करतो. मी उद्यां गणूशेटला व त्याच्या साक्षीदारांना हजर रहायला समन्स पाठवितो. उद्यां तू पुन्हां याच वेळी न्यायालयात ये."

दुसऱ्या दिवशी सर्व लोक न्यायालयात हजर झाले. न्यायाधिशाने सर्व गोष्टींची चवकशी करून विठूला विचारले–"तू दावे कोठून विकत घेतलेस?"

विठूने गणूशेट कडून विकत घेतल्याचे सांगितले.

नंतर त्याने गणूशेटला विचारले–"तुझ्याकडूनच दावे विकत घेतले होते का?"

त्याने होकार दिला. त्याने गणूशेटला विचारले–"तुझ्या शेताच्या चारी बाजूला भिंत आहे की कांटेरीकुंपण आहे?"

गणूशेट म्हणाला–"कुंपण वगैरे काही नाही."

नंतर न्यायाधिशाने सर्व गोष्टींचा विचार करून निवाडा दिला की, विठूच्या गाईने शेताची नासाडी केली हे खरे आहे. परंतु दावे कच्च्या सुंभाचे असल्यामुळे तुटले. याशिवाय कुंपण नसल्यामुळे गाय शेतात शिरली. तेव्हां विठूच्या निष्काळजीपणापेक्षां गणूशेटचाच निष्काळजीपणा जास्त दिसून येतो. त्याने कांटेरी कुंपण शेताच्या चारी-बाजूला लावायला हवे होते. थोडक्यात म्हणजे गणूशेटच शेताच्या नासाडीला मुख्यत: जबाबदार आहे. गणूशेटच्या या बेजबाबदारपणाबद्दल विठूला शिक्षा करणे अन्यायाचे आहे. म्हणून गणूशेटने विठूची गाय परत करावी."

एकूण, शेवटी विठूला न्याय मिळाला आणि त्याची गाय त्याला परत मिळाली. विठू आनंदाने घरी परत गेला. गणू-शेटला मात्र मान खाली झाल्यासारखे वाटले.





# पालट

सुमारे शंभर वर्षांपूर्वी श्रीपुर नामक गावी रघुनाथराव इनामदार नावाचे एक जमीनदार रहात होते. ते उदार व दानी होते. रघुनाथरावांचे औदार्य पाहून गावातली इतर श्रीमंत मंडळीदेखील उदार होऊ लागली.

त्याच गावी गोपाळशेट नावाचा एक श्रीमंत सावकार रहात असे. तो व्याजाने गोरगरिबांना कर्ज देई आणि त्यांना पिळून काढी.

एकदां अतिवृष्टीमुळे पिकांची नासाडी झाली. गरीब लोक भुकेने पटापट मरूं लागले. रघुनाथरावाने त्यांच्याजवळ होते नव्हते ते गोरगरीबांना वांटून दिले.

परंतु एकट्याचे धन सर्व गावाला कसे पुरणार?"

परंतु रघुनाथराव इनामदारांनी इतर श्रीमंतांना मदत करायला सांगितले तेव्हां सर्व म्हणाले–"आम्ही करून करून किती मदत करणार? गोपाळशेटने आपली तिजोरी उघडली तर सर्व गाव वांचेल."

रघुनाथरावांना एक युक्ती सुचली. ते गोपाळशेटला भेटून म्हणाले–"शेटजी! मला पांच हजार रुपयांची गरज आहे. परंतु तुम्ही ती रक्कम कर्ज म्हणून देण्याऐवजी मला तुम्ही दान केली आहे, असे एका कागदावर लिहून द्या. मी संध्याकाळी ती रक्कम तुमची तुम्हांला परत करीन."

परंतु गोपाळशेटला कळेना कीं, ही रक्कम दान म्हणून लिहून घेण्याचा हेतु काय आणि संध्याकाळी परत करीन, म्हणताहेत, हे काय? त्याने तसे विचारलेहि.

इनामदार स्मित करून म्हणाले–"शेट-साहेब! सर्व लोकांचा तुमच्यावर आरोप आहे की तुम्ही कधी दान करीत नाही. तेव्हां तुम्हीच इतकी मोठी रक्कम दान

म्हणून दिलीत तर इतर लोक तुमची बरोबरी करण्यासाठी चढाओढीने मोठ्या रकमा दान देतील. लोक उपाशी मरत आहेत, इतर लोकांकडून दान मिळाले की तुमचे पांच हजार मी बाजूला काढून ठेवून ते संध्याकाळपर्यंत परत करीन. उरलेली रक्कम गोरगरिबांना वांटायला पुरेल. परंतु या दानधर्माचे पुण्य एक पैचा खर्च केल्याशिवाय मिळेल."

गोपाळशेट खूष झाला. त्याने पांच हजार रुपये तिजोरीतून काढून दिले आणि एक चिट्ठी लिहून ती रक्कम दान केल्याचे जाहीर केले. त्याने इनामदारांना मात्र बजावून सांगितले की संध्याकाळपर्यंत सर्व रक्कम परत केली पाहिजे.

गोपाळशेटने लिहून दिलेली चिट्ठी दाखवून इनामदारांनी गावातल्या इतर श्रीमंतांकडून पुष्कळ पैसे वसूल केले आणि गरीबांना वांटले. संध्याकाळी गोपाळशेटला त्यांची रक्कम परत द्यायला गेला. म्हणाला–"शेटजी! मला वाटले होते तसे तुम्ही दिलेल्या रकमेमुळे मी गावातल्या श्रीमंतांकडून मोठमोठ्या रकमा वसूल केल्या. तुमच्या औदार्याबद्दल मी आभारी आहे. तुम्ही आपली रक्कम परत घ्या."

परंतु गोपाळशेटने ती रक्कम परत घेतली नाही. इनामदारांना आश्चर्य वाटले. त्यांनी गोपाळशेटला विचारले–"कां हो घेत नाही?"

गोपाळशेट म्हणाले–"इनामदारसाहेब! तुम्हांला माहीत नसेल. माझ्या या दानाची गोष्ट ऐकून किती लोक आले माझे अभिनंदन करायला! मला आयुष्यभरात पहिल्याने इतका आनंद अनुभवायला मिळाला. दानी माणसालाच दान केल्याच्या आनंदाची कल्पना येऊ शकेल. आजपासून मी सढळ हाताने दान करीन. हे घ्या आणखी पांच हजार रुपये." असे म्हणत गोपाळशेटने आणखी पांच हजार रुपये जमीनदाराला दिले.

गोपाळशेटच्या मनात झालेला तो पालट पाहून इनामदार चकित झाला.





# महाबली हनुमान

इतर वानरांपेक्षां हनुमानाच्या हातून कार्यसिद्धीसहज होण्यासारखी आहे हे ओळखून सुग्रीव हनुमानाला बोलावून म्हणाला–

"महाबली हनुमाना! आकाशात पाण्यात किंवा भूमीवर तुझी गती अबाध्य आहे, हे मला चांगले माहीत आहे. तुलासुद्धा माहीत आहे. तुला माहीत नाही असा लोक नाही, नदी नाही, समुद्र नाही की पर्वतही नाही. तुला अणिमा गरिमा आदिक अष्टसिद्धी प्राप्त आहेत. तू वायुदेवासारखा वेगाने संचार करू शकतोस. या पृथ्वी तलावर शक्ती व सामर्थ्यात तुझी बरोबरी करू शकेल असा एकही प्राणी नाही. म्हणून सीतेचा शोध तुझ्याच हातून होऊ शकेल. शक्ती व बुद्धी याचा देश काल पाहून तू उपयोग करू शकतोस. पराक्रमात ही तू अद्वितीयच आहेस."

सुग्रीवाला हनुमानाशी असे बोलताना पाहून, सुग्रीव कामाची सर्व जबाबदारी हनुमानावर टाकीत आहे हे रामाने ओळखले. सुग्रीवाला हनुमानाच्या शक्तिसामर्थ्याची चांगली कल्पना असली पाहिजे. म्हणून रामाची सर्व आशा हनुमंताच्या शक्तिसामर्थ्यावर एकवटली. त्याने आपली अंगठी काढून हनुमानाच्या हातात दिली व म्हणाला–"हे वानरश्रेष्ठा! ही अंगठी तू आपल्याजवळ खुणेसाठी ठेवून घे. सीतेला ही चांगली माहीत आहे. ही तुझ्या जवळ पाहिली तर सीतेला तुझी भीती वाटणार नाही किंवा तिच्या मनांत काही संशय



राहणार नाही. तू माझ्याकडून आला असल्याची तिची खात्री पटेल. तुझ्या हातून नक्की काम होईल असे समजूनच सुग्रीवाने तुझ्यावर सर्व जबाबदारी टाकली आहे. मी देखील तुझे शक्तिसामर्थ्य ओळखले आहे व माझ्या मनात आतां मुळीच शंका उरली नाही. तू यशस्वी होशील."

हनुमानाने ती अंगठी घेऊन आदरपूर्वक कपाळाला लावली व तिला आणि रामाला त्याचे चरण शिवून नमस्कार केला. त्यानंतर तो निघाला. तेव्हां राम पुन्हा एकदा त्याला म्हणाला–"हनुमाना! मी पूर्णपणे तुझ्या शक्तिसामर्थ्यावर अवलंबून आहे. तू आपल्या शक्तीचा पूर्ण उपयोग करून सीतेचा शोध लाव." त्यानंतर वानर सर्व दिशांना निघाले. सुग्रीवादिक वानरप्रमुखही इतर जबाबदाऱ्या सभाळण्यासाठी निघून गेले. त्यांना परत यायला एका महिन्याचा अवधी देण्यात झाला होता.

वानरसैन्य निरनिराळ्या दिशांना निघून गेल्यावर राम व लक्ष्मण वानरांना त्यांच्या कार्यात यश देवो असे चिंतीत प्रस्रवण पर्वतावर ते परत येईपर्यंत वाट पाहू लागले.

विनता बरोबरचे वानरसैन्य पूर्वेला आणि सुषेणाबरोबरचे पश्चिमेला गेले. आणखी काही वानर उत्तरेकडे गेले तर हनुमान, तार, अंगद आदि वानर दक्षिणेकडे निघाले. सर्व वानरांना चारही दिशांना पाठवून झाल्यावर आपण रामाच्या मनाचे समाधान होईल अशी सीतेच्या शोधाची व्यवस्था केल्याचा आनंद सुग्रीवाला वाटला. त्यानंतर तो पुन्हां आपल्या संवयीप्रमाणे भोगविलासात जगाला विसरला.

सुग्रीवाने पाठविलेल्या वानरांनी मन लावून सीतेच्या शोधाचा प्रयत्न केला. ते जेथे जेथे जात तेथे सरोवरे, नद्या पर्वत, झाडी आदि दिवसभर हुडकून पहात आणि रात्री जमून त्या दिवशी केलेल्या कामाचा आढावा घेऊन दुसऱ्या दिवशी करावयाच्या कामाची आखणी करीत. दररोज अशातऱ्हेने झाडाच्या सावलीत किंवा गुहेत रात्र काढून वानर पुढल्या मुक्कामावर जात. पूर्वेकडे, पश्चिमेकडे व उत्तरेकडे गेलेले वानर सुग्रीवाने सांगितल्याप्रमाणे एक महिनाभर सीतेच्या शोधार्थ हिंडून निराश होऊन परतले आणि त्यांनी आतांपर्यंत सीतेचा शोध लागला नाही असे सुग्रीवाला सांगितले. त्यावेळी सुग्रीव अंतःपुरातून नुकताच बाहेर येऊन प्रस्रवण पर्वतावर रामलक्ष्मणांना भेटायला गेला होता.

सर्व वानर परतले तरी सुग्रीवाने हात टेकले नाहीत. कारण दक्षिण दिशेला गेलेले वानरवीर अद्याप परतले नव्हते. सीतेला घेऊन गेलेला रावणदेखील दक्षिणेकडेच गेला होता. म्हणून हनुमान नक्कीच सीतेला भेटून येणार या गोष्टीची त्यांना खात्री वाटत होती.

हनुमान वगैरे सीतेच्या शोधार्थ दक्षिणेकडे जात जात विंध्यपर्वतावर येऊन पोचले. तो एक फार विस्तीर्ण असा प्रदेश होता. त्या पर्वतात अनेक गुहा होत्या. मोठ मोठी शिखरे त्या पर्वताला होती. अरण्ये होती. मोठमोठ्या नद्या होत्या. त्या ओलांडून जाणे शक्य नव्हते. आकाशाला शिवणारे उंच वृक्ष होते. कंदमुळे व फळे खात वानरांनी त्या पर्वतावरची सर्व भूमी हुडकून काढली. परंतु त्यांना यश



मिळाले नाही. तरी निराश न होतां वानर पुढे जात राहिले.

एका प्रदेशात झाडे झुडपे नव्हती की मनुष्यवस्ती नव्हती. झाडे होती ती उभीच्या उभी जळून करपून गेलेली होती. नद्या आटून गेल्या होत्या. लता, पुष्प, कंदमुळे फळे काही नव्हती. प्राणी पक्षी चिटपाखरूही नव्हते. तो प्रदेश दिसायलाच भयंकर वाटत होता.

त्या अरण्यात कंडुमहर्षी रहात होते. ते जेवढे मोठे तपस्वी होते तेवढेच जास्त तापट व कोपिष्ट होते. त्यांचा एकुलता एक मुलगा लहान वयात म्हणजे सोळाव्या वर्षीच वारल्यामुळे त्या ऋषींनी त्या जंगलाला



शाप दिला आणि त्यामुळे सर्व अरण्य जळून बेचिराख झाले. त्या शून्य वनातही वानरांनी सीतेचा शोध केला.

फिरत फिरत वानरवीर एका भयंकर अरण्यात येऊन पोचले. तेथे त्यांना एक राक्षस दिसला. त्या विशाल देहधारी राक्षसाला पाहून वानर त्याच्याशी युद्ध करायला तयार झाले.

तो देखील कमी नव्हता. तो वानरांना पाहून म्हणाला–"थांबा, मी तुम्हांला सर्वांना ठार करून खातो." असे म्हणत तो मूठी घट्ट आवळून वानरांवर धावला. अंगदाने त्याला पाहून व तोच रावण असावा असे समजून त्याच्या डोक्यावर मोठ्याने प्रहार केला. तो एक प्रहारच त्याचा काळ ठरला. तो रक्त ओकू लागला आणि जमिनीवर आदळला. तो पुन्हां उठला नाही.

रावण मेला व सीता त्याच्या गुहेत असेल असे समजून वानरांनी त्याची गुहा खूप हुडकून पाहिली. परंतु सीता तेथे नव्हती. त्या गुहेजवळची आणखी एक गुहासुद्धा वानरांनी हुडकून पाहिली. सर्व अरण्य हुडकून पाहिले. परंतु सीता कोठेही दिसली नाही तेव्हां सर्व निराश होऊन झाडाखाली बसून राहले.

तेव्हां अंगद त्यांना म्हणाला–"आपण आतांपर्यंत अनेक रानेवने, पर्वत, डोंगर, नद्या, सरोवरे, गुहा पाहिल्या, परंतु सीतेचा शोध लागला नाही. तिला उचलून नेणारा रावण कोठे आहे, हे देखील आपल्याला कळले नाही. सुग्रीवाची आज्ञा भयंकर आहे. आपण हताश होऊन बसलो तर काम करणे आपल्याला अशक्यच होईल. सुस्तपणा चालणार नाही. पुन्हां एकदा हे अरण्य हुडकून पहा. तुम्ही आतां येथे झोपा काढणे बरोबर नाही. याहून आणखी निराळ्या तऱ्हेने काही करतां येण्यासारखे असेल तर ते सांगा."

गंधमादनसुद्धा अंगद म्हणाला तेच म्हणाला.

तेव्हां सर्व वानरांनी पुन्हां मन लावून विंध्यपर्वतातल्या अरण्यात सीतेच्या शोधार्थ प्रयत्न सुरू केला. चांदीच्या शिखरासारखे एक टोक त्यांना विंध्यपर्वतात दिसले. वानर ते शिखर चढून गेले. परंतु तेथे देखील सीतेचा शोध लागला नाही. तेव्हां ते खाली उतरले आणि काही वेळ विश्रांती घेऊन पुन्हा त्यांनी शोध सुरू केला. ते विंध्यपर्वतात सीतेचा शोध काढीत हिंडत असतांच सुग्रीवाने जो एक महिन्याचा अवधी दिला होता तो संपला.

वानर सर्व विंध्यपर्वत पहात पहात त्या पर्वताच्या नैऋत्य दिशेला आले.

तेथे जमलेल्या वानरप्रमुखांमध्ये हनुमान, गज, गवाक्ष, गवय, शरभ, गंधमादन, मैंद, द्विविद, सुषेण, जांबुवंत, नल, युवराज अंगद आणि तार नावाचे वानर वीर होते.

ते प्रत्येक गुहेत पहात एका खोल गुहेजवळ आले. ती गुहा मयासुराने निर्मिली होती. त्या गुहेच्या तोंडावर लतावेली वाढल्या होत्या आणि आत प्रवेश करायला जागाच नव्हती. वानरांना तर भूक लागली होती आणि त्यांचा जीव कासावीस होत होता. कोठे पाण्याचा एक थेंबही दिसत नव्हता. ते फार दमलेले सुद्धा होते.

परंतु त्या गुहेतून बाहेर बगळे, हंस वगैरे पाण्यात राहणारे पक्षी बाहेर उडत येत असलेले दिसले. ते पाहून हनुमान वगैरे वानरप्रमुखांना आश्चर्य वाटले, म्हणून ते त्या गुहेजवळ जाऊन पाहू लागले.





हनुमानाला पर्वत व अरण्ये यांची चांगली माहिती होती. तो सर्व वानरांना म्हणाला–"हे पहा! या गुहेतून पाण्यातले पक्षी बाहेर येत आहेत. यावरून गुहेत आत कोठेतरी विहीर तरी असली पाहिजे किंवा सरोवर तरी असले पाहिजे. गुहेचे तोंड तर लतावृक्षांनी बंद दिसते आहे आणि आपणांला खूप तहान लागली आहे."

हनुमानाची ती सूचना वानरांना पुरली. ते लतावृक्षांना बाजूला सारून त्या गुहेत शिरले. आंत हाताला हात दिसणार नाही, इतका काळोख होता. तरी वानर चाचपत आत जात होते. ते कोठे जात आहेत हे त्यांचे त्यांनाच कळत नव्हते. परंतु तसाच काही वेळ चालत राहल्यावर त्यांना थोडा उजेड दिसू लागला. नंतर कंचन, उंबर, ताड, अशोक वगैरे वृक्ष दिसू लागले. काही फळझाडे व फुलझाडे दिसली. फुलां-फळांच्या भाराने ती झाडे वाकलेली होती. तेथे एक लहानसे तळे होते व त्यांत सुवर्ण कमळे, सोनेरी मासे व सोनेरी कासवे होती.

त्या प्रदेशात वानरांना मोठमोठ्या इमारती सुद्धा दिसल्या. त्यांच्या खिडक्या सोन्याच्या होत्या. छप्परेसुद्धा सोन्याचांदीची होती. घरांच्या दारात मोत्यांची तोरणे बांधलेली होती. काही तोरणे हिऱ्यामाणिक्यांची सुद्धा दिसत होती.

या प्रदेशात दिवसाच्या उजेडासारख्या उजेडात वानरांना वृक्ष लतांवर फुलां फळांचे घोस लोंबत असलेले दिसले. निरनिराळ्या प्रकारची मंचे दिसली आणि रत्नजडित खुर्च्या व पलंग आणि रथ दिसले. जागोजागी सोन्याचांदीच्या भांड्यांचे ढीग ठेवलेले दिसले. त्याच प्रमाणे अगर, चंदन, नागरमोथा, वाळा वगैरे सुगंधीद्रव्ये, पेय पदार्थ, रेशमी वस्त्रे, लोकरीची पांघरुणे, व सोन्याचे ढीग दिसले.

वानर सीतेला शोधीत ज्या ठिकाणी आले होते तेथे त्यांना एका जागी एक स्त्री दिसली. ती मृगाजिनावर मृगाजिनच धारण करून तपश्चर्या करीत बसली होती. तिच्या सर्वांगातून एकतऱ्हेची ज्योती बाहेर येत होती. तिला पाहून सर्व वानर आश्चर्यचकित व भयभीत होऊन जागच्या जागी थबकले.

हनुमानाने जवळ जाऊन नम्रपणे तिला विचारले–"हे तपस्विनी! तू कोण? ही गुहा कोणाची?" नंतर हात जोडून तिला हनुमान पुढे म्हणाला–

"आम्ही हिंडून फिरून दमून भागून भुकेने तहानेने जीव कासावीस झाल्याने काही खायला व प्यायला मिळेल या आशेने आंत काळोख होता तरी साहस करून या गुहेत प्रवेश केला आहे. परंतु आत या सर्व अत्यद्भुत वस्तू पाहून ही एखाद्या राक्षसाची माया तर नसेल असे आम्हांला वाटले. ही सोन्याची झाडे, ही चांदी हे सोने आणि या इमारती कोणाच्या? या सरोवरातली ही सोनेरी कमळे कोणी निर्मिली? सोनेरी कासवे, सोनेरी मासे ही कोणाची कल्पना? हे सर्व पाहून आम्हांला ही सर्व माया असावी, असे वाटू लागले आहे. आम्हांला काही सांगू शकशील का?"

ती तपस्विनी हनुमानाला म्हणाली–"मयासुर नावाचा थोर राक्षस आहे. तो येथे रहात असे तो दानव जातीचा विश्वकर्मा आहे.

"त्याच्या मायेने ही सोन्याची झाडे व हे वन निर्मिले गेले. त्याने मोठी तपश्चर्या करून ब्रह्मदेवाला प्रसन्न करून हे सर्व



वैभव संपादन केले. तो हेमा नावाच्या एका अप्सरेबरोबर येथे निवास करीत असतां इंद्राला राग आला व त्याने वज्रायुधाचा त्याच्यावर प्रहार केला. त्यानंतर ब्रह्मदेवाने हा प्रदेश हेमाला दिला. मी मेरुपर्वताची कन्या आहे. माझे नाव स्वयंप्रभा असे आहे. हेमाला मिळालेल्या या प्रदेशाचे रक्षण करीत मी येथे राहते आहे. मी हेमाची मैत्रीण आहे. संगीत नृत्यशास्त्रात ती फार निपुण आहे. तिने मला दिलेल्या वराच्या प्रभावाने मला कोणी जिंकू शकणार नाही. तुम्ही कशासाठी या बाजूला फिरत आलात? प्रवेश करायला अत्यंत कठीण अशा जागी तुम्ही कसे काय आलात? तुम्ही प्रथम फळे खाऊन व पाणी पिऊन आपला सर्व वृत्तांत सांगा!"

हनुमानाने काही राखून ठेवल्याशिवाय सर्व गोष्टी सविस्तर सांगितल्या. शेवटी तो तिला म्हणाला—"हे तपस्विनी! तू आम्हांला खायला प्यायला देऊन आमचे रक्षण केले आहेस. या उपकाराची फेड आम्ही कशा तऱ्हेने करावी, कृपा करून सांगा!"

"फार छान बोललास! परंतु मला तुमच्याकडून कोणत्याही प्रकारच्या प्रत्युपकाराची अपेक्षा नाही." ती म्हणाली.

हनुमान म्हणाला—"देवी! सुग्रीवाने दिलेला अवधी संपला आहे. या गुहेतून आम्हांला लवकर बाहेर जाता येईल असे काही तरी कर. आमचे रक्षण कर. आम्ही येथेच अडकून राहलो तर सीतेचा शोध करण्याचे काम अपुरे राहील."

स्वयंप्रभा म्हणाली—"मी आपल्या तपोबलाने तुम्हांला बाहेर पोचविते तुम्ही सर्व डोळे मिटून बसा."

सर्व वानरांनी डोळे मिटून थोड्या वेळाने उघडून पाहिले तर ते त्या गुहेबाहेर पोचलेले होते. त्यांच्याबरोबर बाहेर स्वयंप्रभा आली होती. ती त्यांना म्हणाली—"हा विंध्यपर्वत आहे. तुम्हांला तुमच्या कार्यात यशलाभ होवो." असा आशीर्वाद देऊन ती निघून गेली.





# अमरवाणी

सत्वा, भिजनसंपन्न,
स्स्वानुक्रोशो, जितेन्द्रिय:,
कृतज्ञ, स्सत्यवादी च,
राजा लोके महीयते ॥ १ ॥

[बलवान, कुलवान, आर्तदु:खितांविषयी करुणा असलेला, जितेन्द्रिय, सत्यवचनी अशा राजाची लोक वाखाणणी करतात.]

यस्तु राजा स्थितो धर्मे
मित्राणा मुपकारिणाम्
मिथ्या प्रतिज्ञाम् कुरुते
को नृशंसतर स्तत: ॥ २ ॥

[अधर्माचरण करणारा आणि आपल्या उपकारकर्त्यांशी असत्याचरण करणारा फार पापी राजा म्हणून म्हटला जातो.]

अमित्राणाम् वधे युक्तो
मित्राणाम् संग्रहे रत:
त्रिवर्गफल भुक्तातु
राजा धर्मेण युज्यते ॥ ३ ॥

[शत्रूचा नाश करून, मित्रांचे रक्षण करणारा राजा धर्मार्थ काम या त्रिफळांचा उपयोग करीत आपल्या धर्माचे उत्तम तऱ्हेने पालन करतो.]



# मित्रभेद

[ २४ ]

वधू येथवर गोष्ट सांगून पुढे म्हणाली–

"तेव्हां विधिलिखित कधी टाळता येत नाही. मी या सापाशी लग्न केले नाही तर माझ्या वडिलांना शंभर कन्यांचा वध केल्याचे पाप लागेल." आणि तिने सापाशी थाटामाटाने लग्न करून घेतले आणि पतिसेवा श्रद्धाभक्तिपूर्वक करू लागली.

एक दिवशी रात्री तो साप त्याला ठेवले होते त्या टोपल्यातून उठून सुंदर मानव देह धारण करून आपल्या बायकोच्या बिछान्यावर शेजारी येऊन बसला. कोणी परपुरुष असावा असे वाटून ती चटदिशी उठून दार उघडून बाहेर येऊन उभी राहिली.

तो म्हणाला–"प्रिये! मी तुझा पती आहे!"

तिला विश्वास वाटावा म्हणून टोपल्यात त्याचा जो निर्जीव देह पडला होता त्यात त्याने प्रवेश केला आणि थोडा वेळ तो जिवंत झाल्याचे दाखवून पुन्हा बाहेर आला.

आपल्या नवऱ्याला मानवरूप आल्याचे पाहून तिला परमानंद झाला. त्याच्या डोक्यावर किरीट व अंगा खांद्यावर राजवस्त्रे व आभूषणें पाहून तिने त्याला नमस्कार केला.

ती नवरा बायको झोपून उठल्यावर आपला जावई मनुष्यच असल्याचे देवशर्माला कळले. त्याने सापाचा तो निर्जीव देह जाळून टाकला.

ती गोष्ट पुरी झाल्यावर बलभद्र म्हणाला–"आपण या मठाबरोबर या महापुरुषाचा देह जाळून टाकावा म्हणजे तो दैवीशरीरात कायमचा राहील!"

राजाने होकार दिल्यावर बलभद्राने मठाला आग लावली आणि त्यात तो कपटी संन्यासी जळून गेला.

कपटी संन्याशाची गोष्ट पुरी करून करटक म्हणाला–"तुझा हा कट फार धोक्याचा आहे. तो सोडून दे."

तेव्हां दमनक म्हणाला–"हे मात्र अगदी निरर्थक म्हणावे लागेल. तू कोट्यावधी तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सांगितल्यास तरी मी करीत असलेल्या प्रयत्नाची बरोबरी करू शकणार नाहीस. तेवढा विचार करण्याची गरजच नाही. ही प्रत्यक्ष गोष्ट आहे. हा बैलाचा देह आपल्याला कित्येक महिने पुरेल जगायला. त्याचा देह माझ्या डोळ्यासमोर नाचतो आहे. परंतु त्या हुशार कोल्ह्यासारखी माझी युक्ती फळास आल्याशिवाय ही गोष्ट गुप्तच राहू दे."

"काय रे ती गोष्ट?" करटकाने दमनकाला विचारले.

दमनकाने गोष्ट सांगायला सुरवात केली :

### हुशार कोल्हा

एका जंगलात वज्रदंष्ट्र नावाचा एक सिंह रहात असे. त्याच्या पदरी तिघे मंत्री होते. चमरक नावाचा एक कोल्हा, एक लांडगा व एक उंट.

एके दिवशी सिंहाचे एका पिसाळलेल्या हत्तीशी युद्ध झाले आणि त्यांत सिंहाला



फार लागले. त्या दिवसापासून त्याला आपल्या गुहेबाहेर येणे देखील अशक्य झाले. भुकेने व तहानेने त्याचा जीव कासावीस झाला. त्याला शिकार करणे अशक्य वाटत होते. म्हणून त्याने आपल्या मंत्र्यांना बोलावून सांगितले की तुम्ही शिकार करून कोणता तरी प्राणी धरून घेऊन या.

परंतु त्याच्या मंत्र्यांना एकही प्राणी शिकार करून आणणे जमले नाही.

तेव्हां चमरक कोल्हा मनात विचार करू लागला–"या उंटाला ठार केला तर आपल्या सर्वांना काही काळ पोटभर खायला मिळेल. परंतु उंट मंत्री व मित्र असल्या कारणाने सिंह त्याला ठार करायला

कबूल होणार नाही, म्हणून उंटाने स्वत: मरण्याची तयारी दाखविण्यासाठी काही तरी युक्ती काढली पाहिजे."

तो उंटाला म्हणाला–"मित्रा! आपला मालक खायला न मिळाल्याने उपाशी मरणार असे दिसते आहे. मालक मरण-पावले तर आपणांला सुद्धां मरण येणार. म्हणून तुला व मालकाला दोघांच्या हिताची एक गोष्ट मी सुचवावी म्हणतो."

"मग सांग काय सूचना आहे ती. मी करतो त्याप्रमाणे. मालकाची मदत केल्याचा पुण्यलाभ होईल." उंट म्हणाला.

"बाबारे! तू आपला देह आपल्या मालकाला शंभर टक्के व्याजाने दे. मरण पावल्यावर तुला दुप्पट जीवनसत्वे असलेला जन्म लाभेल." कोल्हा उंटाला म्हणाला.

"मृत्युदेवतेला ही अट मान्य असेल तर मला सुद्धा हरकत नाही." उंट म्हणाला.

कोल्हा सिंहाला जाऊन म्हणाला–"मालक! आम्ही किती फिरलो आणि खूप शोध केला, परंतु एकही प्राणी मिळाला नाही." सिंह हताश झाल्यासारखा झाला. तेव्हां कोल्हा म्हणाला–

"परंतु एक चांगली गोष्ट पण सांगावी म्हणतो. आपला मित्र उंट आपला देह आपणांस शंभर टक्के व्याजाने द्यायला तयार झाला आहे. आपण मृत्यु देवतेला तेवढी विनंती करावी की त्याने उंटाला त्याचा देह शंभर टक्के व्याजाने पुढल्या जन्मी परत करावा.

सिंह त्या गोष्टीस कबूल झाला. त्याने उंटाचे आभार मानले आणि त्याने मृत्यु-देवतेला साक्षीदार ठेवून वचन दिले आणि उंटाला ठार केले. कोल्ह्याने व लांडग्याने उंटाचा देह फाडला आणि लचके तोडायला सोयीचा करून ठेवला. त्या कोल्ह्याची ती युक्ती उंटाचा देह खायला मिळावा ह्यासाठी होती.

सिंहाचा सर्व देह रक्तबंबाळ झाला होता. कोल्हा म्हणाला–"महाराज! आपण नदी-वर जाऊन स्नान करून यावे. तोंपर्यंत उंटाच्या देहावर पाहारा ठेवतो."





# तिळ्या बहिणी

[ १२ ]

[पाहारा देणारा राक्षस सुकेशिनीच्या म्हणण्यावर विश्वास करून सरोवराच्या काठी होणाऱ्या नृत्यगानात भाग घेण्यासाठी दररोज जाऊ लागला. त्या संधीचा फायदा घेऊन सुभाषिणीने दगडाच्या मूर्तींवर मंत्रजल शिंपडून त्यांना स्वस्वरूपात आणले. नंतर सर्व मिळून सरोवराच्या काठी आले. पुढे–]

राक्षसाला फसवून तिळी भावंडे कशीबशी बाहेर पडली खरी, परंतु त्यांना भयभीती व शंका वाटतच होती. कारण राक्षसाच्या दृष्टीस न पडण्यास किंवा अदृश्य होण्यास आवश्यक असलेले भस्म ते घालवून बसलेले होते. बरं, राजकन्यां-बरोबर हंसरूपात सरोवरात रहायचा विचार करावा तर राक्षसाला सरोवरात किती हंस आहेत, हे चांगले माहीत होते. म्हणजे तो सहजी वाढलेली संख्या पाहून ओळखू शकला असता. म्हणून हंस होणे शक्यच नव्हते. तेव्हां काय करावे, सुचेना. त्यांना एकेक क्षण युगासारखा वाटू लागला.

एके दिवशी सुभाषिणी तिळ्या भावंडांना म्हणाली–"यापुढे तुम्ही येथे राहणे धोक्याचे आहे. आपण त्याला फसविले आहे तेव्हां राक्षस आपल्यावर सूड उगविल्याशिवाय राहणार नाही. त्याच्या हातात तुम्ही किंवा



आम्ही सांपडलो तर आपल्या जिवाला धोका आहे. उद्या तो आमच्याबरोबर नृत्यगानात सामील व्हायला आला की तुम्ही येथून पाय काढा. तुम्ही स्वतःला कसं वांचवायचे याचा विचार करा. आम्हांला वांचवून नेण्याचा विचार मनातून काढून टाका."

उदयन म्हणाला—"ते कदापि आम्ही मानणार नाही. आमच्या जिवात जीव आहे तोपर्यंत आम्ही तुम्हांला वांचविण्याचा प्रयत्न करणार."

"तसं असेल तर एक उपाय आहे. उद्या तो इकडे येईल तेव्हां आमच्या बरोबर, नृत्यगानासाठी सरोवरातल्या सर्व राजकुमारांना देखील आम्ही घेऊन येऊ. त्यांच्या बरोबर तुम्ही देखील असलात म्हणजे कोणाला संशय येण्यास जागा राहणार नाही. नंतर राक्षस नृत्यगानात गर्क झाला की तुम्ही संधी पाहून त्याचे डोके उडवा." सुभाषिणीने सुचविले.

तिळ्या भावंडांना ते मान्य झाले व त्यांनी त्याला होकार दिला. दुसऱ्या दिवशी राक्षस राजकुमारींबरोबर नृत्यगानास आला तेव्हां सुभाषिणी म्हणाली—"तू एकटा पुरुष इतक्या मुलींमध्ये येणे बरं दिसत नाही, म्हणून सरोवरात जे तरुण पुरुष आहेत त्या सर्वांनासुद्धां नृत्यगानास आणणे बरे होईल. म्हणजे कोणाला काही बोलता येणार नाही. ते जगाविरुद्ध दिसणार नाही."

"एवढ्याशा गोष्टीसाठी माझी परवानगी पाहिजे का? तसेच कर." राक्षस सुभाषिणीच्या हेतू न कळल्यामुळे म्हणाला.

लगेच सरोवरातले सर्व हंस बाहेर आले. त्यांना मानवरूप प्राप्त झाले. त्यांत तिळी भावंडे होती. परंतु नृत्यगानात गर्क झालेल्या राक्षसाच्या ते लक्षात आले नाही.

राजकुमार व राजकन्या मिळून मिसळून नृत्य करीत असतां राक्षसाला त्याच्यावर केवढा मोठा प्रसंग ओढवणार आहे त्याची कल्पनादेखील नव्हती. राक्षस देहभान विसरून स्वतः नाचू लागलेला पाहून उदयनने एका वारात राक्षसाचे मुंडके उडवले व ते जमिनीवर गणगळत सरोवरात जाऊन पडले. सरोवराचे पाणी लालभडक होऊन गेले.

त्याच बरोबर आणखी एक अद्भुत गोष्ट घडली. राक्षस मेल्याबरोबर तो पाहारा देत होता तो वाडासुद्धा अदृश्य झाला. तिळ्या भावंडांसारखेच राक्षसाच्या हातात सापडलेले राजकुमार दगडाच्या मूर्ती होऊन गेले होते. त्या मूर्ती किंवा पुतळे मात्र जागच्या जागी तसेच राहून गेले होते.

तेव्हां सुहासिनी म्हणाली—"पहात उभे कशाला राहला आहां? मंत्रजल आणून शिंपडा त्यांवर व त्यांना मानव रूपात येऊं द्या." तसे केल्याबरोबर सर्व प्रतिमांना मानव रूप मिळाले. त्या लोकांत लहान थोर सर्व पातळीचे लोक होते.

त्या सर्वांनी तिळ्या भावंडांची खूप वाखाणणी केली आणि त्यांचे आभार मानले. स्वप्नांत देखील त्यांना कधी या गोष्टीची कल्पना नव्हती की त्यांना पुन्हां मानवरूप मिळेल व ते माणसासारखे चालू बोलू लागतील. परंतु त्या आनंदांत ही त्या सर्वांना एका गोष्टीची भीती व काळजी वाटत होती. परत आपापल्या घरी आपण पोहोचूं की नाही, यापेक्षा दुसऱ्या राक्षसाच्या दृष्टीस पडलो तर काय होईल, हीच एक चिंता व काळजी सर्वांना वाटत होती.





याविषयी विचार करण्यासाठी सर्व जमले. परंतु कोणालाच काही सुचेना. शेवटी उदयन म्हणाला–"तुम्ही येथेच राहणे तुमच्या हिताचे नाही. तुम्ही येथून पाय काढा. या सर्व राजकन्या व मुलींना त्यांच्या घरी पोचते करण्याची जबाबदारी आम्ही आपल्यावर घेतो. म्हणून तुम्ही आपापल्या घरी निघून जा."

परंतु त्या गोष्टीस कोणी कबूल झाला नाही. त्यांच्या पैकी एक वृद्ध म्हणाला–"मुलांनो! आम्ही आपापल्या घरी पोचणे म्हणजे गप्पा वाटल्या का? त्या दाढी-वाल्याची नजर चुकवून जाणे आम्हांला शक्य तरी होईल का? आपणांला एकच एक गोष्ट साध्य होईल. तुम्ही आम्हांला पुन्हा दगडाच्या मूर्ती करून ठेवा."

त्या गोष्टीस तिळ्या भावंडांना कबूल करावे लागले, कारण दुसरा उपायच नव्हता. म्हणून त्यांनी त्यांना दगडाच्या मूर्ती करून टाकले.

आतां आपला बचाव कसा करावयाचा या विचारात ते असतां दुसरा राक्षस आला. यावेळेस तो रिकाम्या हातांनी आला नव्हता. एका राजकन्येला घेऊन आला होता. तो जवळ येत असल्याच्या सूचना मिळताच घाईत तिळ्या भावंडांनी सरोवरात उड्या मारल्या आणि हंस होऊन गेले.

दुसऱ्या क्षणाला राक्षस सरोवरावर आला. त्याने बरोबर आणलेल्या राज-कन्येला सरोवरात टाकले. तिलादेखील हंस रूप मिळाले.

त्या राजकन्येला सरोवरात टाकल्या-नंतर तो राक्षस हंस मोजू लागला. आतां-पर्यंत सरोवरात एकंदर सत्तेचाळीस हंसच होते. नवीन राजकन्येला टाकल्यानंतर अट्ठेचाळीस व्हायला पाहिजे होते. त्याचे व्रत पुरे व्हायला एकंदर पन्नास पाहिजे होते. त्यांपैकी अट्ठेचाळीस झाले होते. आतां फक्त दोघांचीच गरज होती. परंतु त्याने हंस मोजून पाहिले ते अट्ठेचाळीस नसून एक्कावन्न झाले होते. ते पाहून तो आनंदाने उड्याच मारू लागला. परंतु दुसऱ्या क्षणाला त्याच्या मनात शंका आली. म्हणून त्याने सर्व हंसांना किनाऱ्यावर यायला सांगितले. ते सर्व हंस बाहेर आल्यावर राक्षसाने करड्या आवाजात विचारले–"तुमच्या पैकी नव्याने आलेले तिघे कोण? मुकाट्याने बोला!"

तिळी भावंडे पुढे येऊन म्हणाली–"हे आम्ही! तू या सर्व भोळ्या भाबड्या राजकन्यांना आणून येथे कशासाठी कैद करून ठेवले आहेस? अजून काही बिघडले नाही. सोड यांना आतां तरी! नाही तर तुझ्या धाकट्या भावाची गत झाली ती तुझी होईल, सांगून ठेवतो!" तिघांनी राक्षसाला धमकावले.

"काय? माझ्या धाकट्या भावाची काय गत झाली? आहे कोठे तो? काय झाले काय?" दुसऱ्या राक्षसाने विचारले.

"काय होणार? मातीचा देह मातीत गेला. त्याच्या बरोबर तुझी माया तो वाडासुद्धा..." तिळी भावंडे असे म्हणत असतांच राक्षस एक क्षणभर ही न थांबता, त्याच्या भावाला भेटायला म्हणून धावला. परंतु जाऊन पाहतो तर तेथे काहीच नव्हते? वाडा अदृश्य झाला होता आणि तेथे फक्त होत्या त्या दगडी मूर्ती!



त्याच्या डोळ्यातून काळजीने आणि रागाने जणुंकाही निखारे बाहेर पडत होते. त्याच स्थितीत तो परतला. त्या अवधीत तिघे भाऊ उद्यानात गेले आणि त्यांनी आंबे तोडून खाल्ले आणि माकडे होऊन झाडावर चढून बसले. ते राक्षसाच्या नजरेस न पडतां एका झाडावरुन दुसऱ्या झाडावर उड्या मारीत धुमाकूळ घालू लागले.

शेवटी जीव नकोसा वाटून राक्षस म्हणाला पाहतो, तुम्ही किती वेळ असा स्वतःचा बचाव करता ते." असे म्हणत पुन्हा घारीचे रूप घेऊन आकाश मार्गे निघून गेला.



आणखी काही वेळाने माकड होऊन तिळी भावंडे हिंडत होती तेथे तो दाढीवाला अचानक आला.

माकडांना पाहून म्हणाला–"बरी शिक्षा मिळाली! नाही तर वाढलेली चरबी उतरायची कशी? बरं तर बरं, त्याने तुम्हांला जिवंत सोडलें!"

तो असे बोलण्यात गर्क असता एका माकडाने अनपेक्षितपणे दाढीवाल्याच्या डोक्यावर उडी मारली. दाढीवाला वर पाहून त्याला बाजूला सारण्याच्या प्रयत्न करू लागण्यापूर्वीच दुसऱ्या माकडाने त्याची दाढी धरून दाढीवाल्याला फरफटत

मोठ्याने ओरडू लागला–"मेलो! मेलो!" परंतु त्या माकडांनी त्याला सोडले नाही. दाढी धरून ओढणाऱ्या माकडाने त्याला एका झाडावर ओढून नेऊन लोंबकळत ठेवले. त्याची दाढी एका फांदीला बांधून घट्ट गाठी बांधून ठेवल्या. त्यानंतर झाडाखाली उगवलेल्या बेडकाची छत्री खाल्ल्यावर माकडांना पुन्हा मानवरूप आले.

त्यांना पाहून दाढीवाला म्हणाला–"इकडल्या किड्या मुंग्यांची सुद्धा तुम्हांला चांगली माहिती असल्याचे दिसते आहे. मला हे माहीत नव्हते म्हणून खुळ्यासारखा मी जवळ आलो. माझी तुम्ही केलीत ती फजिती आता पुरे करा आणि या गरीबाला सोडा पाहू!" असे म्हणत दाढीवाला गयावया करू लागला.

"या खेपेस तुला मुळीच सोडणार नाही, लक्षात असू दे! या पुढे तू राक्षसाचा नोकर नसून आमचा आहेस. असेल कबूल तर आम्ही सांगू तसे वागले पाहिजे. तुझी ती मंत्रवलेली गळ्यातली माळ इकडे टाक आणि राक्षसाविषयी आणखी जी जी गुपिते असतील, निमूटपणे आम्हांला सांग. तू तसे केलेस तर तुला आम्ही मुक्त करू. नाही तर तुला असेच लोंबकळत रहावे लागेल." उदयन शाप दिल्यासारख्या

तेव्हां दाढीवाला म्हणाला–"फार मोठमोठ्या अटी घातल्यात की रे! तुमचा नोकर किंवा चाकर राहण्यास मला मुळीच हरकत नाही. माझा मंत्रवलेला हार सुद्धा मी द्यायला तयार आहे. परंतु राक्षसाविषयीची गुपिते तुम्ही विचारू नका. ती मी उघड सांगितली तर माझ्या डोक्याची शकले होऊन मी तत्काळ मरेन, हे मी पूर्वीच नाही का तुम्हांला सांगितले? ते सांगून मी मेलो तर तुमची सेवा कशी होईल माझ्या हातून? तर मी ती गुपिते सांगून मरू की जिवंत राहून तुमची सेवा करू, हे तुम्हीच सांगा! तरी तुम्ही प्रयत्न केल्यास राक्षसाची गुपिते तुम्हांला सहजी व नक्कीच कळतील!"

मंत्रवलेला हार हाती येतांच उदयनने तो गळ्यात घातला. दाढीवाल्याला सामान्य मानवरूप आले आणि उदयनला दाढीवाल्याचे रूप आले. त्याबरोबर त्याला भस्मे, अंजने, पंचा वगैरे मंत्रवलेल्या वस्तू प्राप्त झाल्या.

लगेच उदयन सरोवराच्या काठी गेला. त्याने हंस रूपात असलेल्या राजकन्यांना बाहेर यायला सांगितले. सर्व बाहेर येऊन रांगेने बसल्या. मंत्रवलेल्या पंच्याच्या कृपेने सर्वांना मोठी मेजवानी मिळाली. नंतर दगडाच्या मूर्ती होऊन गेलेल्या राजकुमारांना मानवरूपात आणून त्यांना मेजवानी देण्यात आली. मेजवानी संपल्यावर उदयन दाढीवाल्याला म्हणाला–"या सर्वांना



घेऊन जाऊन त्यांच्या घरी पोचत्या करून ये!"

ते ऐकून दाढीवाला म्हणाला–"ते तर फार कठीण काम आहे! राक्षसाच्या नजरेस पडलो तर जिवंत सुटणार नाही. म्हणून यांना दगडाच्या मूर्तीरूपाने किंवा हंस रूपाने या सर्वांना आणखी काही काळ येथेच राहू दे. संधी पाहून यांना त्यांच्या घरी पोचते करतां येईल."

तिळ्या भावंडांना ती गोष्ट मान्य करावी लागली. म्हणून त्याप्रमाणे सर्व दगडाच्या मूर्ती होऊन अगर हंस होऊन आपापल्या स्थानी पोचते झाले.

तेवढ्यात राक्षस आला. तो येत असलेला पाहून दाढीवाल्याच्या रूपात असलेल्या उदयनने आपल्या जवळचे भस्म आपल्या दोघां भावांवर टाकले आणि दाढीवाल्यावर टाकले. राक्षस तेथे आला त्या वेळी दाढीवाल्याच्या रूपात एकटा उदयन त्याला दिसला. तो आपला नोकर दाढीवालाच असावा असे समजून राक्षस म्हणाला–"ती माकडे कोठे गेली रे?"

"कोठे जाणार, मालक! त्यांना बांधून आवळून ठार केले!" उदयन म्हणाला.

"कोठे आहेत मग ती?" राक्षसाने उत्सुकतेने विचारले.

"या दाखवतो!" असे म्हणत उदयन राक्षसाला एक जुन्या पडक्या विहिरीकडे घेऊन गेला आणि आत पहायला सांगितले.

राक्षसाने घाई घाईने आत वाकून पाहिले. राक्षस पहायला वाकल्याबरोबर उदयनने आपली तलवार उपसून राक्षसाचा शिरच्छेद केला. राक्षसाचे डोके विहिरीत पडले. परंतु विचित्र गोष्ट अशी की त्याच्या धडावर दुसरे डोके उगवले.

राक्षस चटकन मागे वळला आणि दाढीवाल्याच्या रूपात असलेल्या उदयनला आपल्या मुठीत आवळून धरीत म्हणाला–"माझे मीठ खाऊन माझ्याच विरुद्ध उलटलास होय?" असे म्हणत त्याने उदयनला विहिरीत फेकले. (क्रमशः)





# नरकात निवास

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! आपण असे ऐकतो की कित्येक लोक सशरीर स्वर्गाला जातात. परंतु सशरीर नरकात निवास करणाऱ्याची गोष्ट तू कधी ऐकली नसशील. मी अशी एक गोष्ट तुला सांगणार आहे, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला:

हेमंत देशात एक विधवा बाई रहात असे. तिला कुसुमवती नावाची एकुलती एक मुलगी होती. ती लहान असतानाच तिच्या बापाला मरण आले. म्हणून त्या विधवा बाईला चौपदरी होती धरावी लागली. ती कोणावर आपला किंवा मुलीचा



भार न ठेवतां गावोगावी हिंडून भीक मागे. अशाच परिस्थितीत कुसुमावती लहानाची मोठी झाली.

कुसुमावती चांगली वयात आली तो पर्यंत तिच्या आईची प्रकृती पूर्णपणे ढासळली होती. तिला हिंडणे फिरणे अशक्य झाले होते. म्हणून कुसुमावती आपल्या आईला म्हणाली–"आई! मी कुलक्षणी जन्माला आले तेव्हांच बाबा गेले आणि तुला अनेक क्लेश सहन करावे लागले. तुझ्या प्रेमाने व देवाच्या कृपेने माझी प्रकृती बरी आहे. आतां आपण गावोगावी हिंडून भीक मागण्याची गरज नाही. कोणत्यातरी गावी एखाद्या प्रतिष्ठित कुटुंबात काम करून मी स्वतःच्या पोटासाठी मिळवीन व आयुष्यभर तुला कोणत्याही गोष्टीची उणीव भासू देणार नाही."

आईचा होकार मिळताच कुसुमावती आईला एका गावी घेऊन गेली. सायंकाळच्या सुमारास समोर एक प्रतिष्ठित कुटुंब राहते आहे हे पाहून कुसुमावती घरमालकिणीला भेटून म्हणाली–"आई! आजची रात्र काढायला मला व माझ्या आईला परवानगी द्याल का आपल्या पडवीत?"

त्या बाईने होकार दिला. एवढेच नव्हे तर तिने दोघींना जेवायला वाढले व आनंदाने रात्रभर रहायला सांगितले.

दुसऱ्या दिवशी कुसुमवती घर मालकिणीला म्हणाली–"आई! मी एक गरीब बाई आहे, माझी अशक्त आई माझ्या बरोबर आहे. आपण मला सांगाल ते काम मी करीन. मला पगार नको, मला व माझ्या आईला चार घास खायला मिळाले की आम्ही भागवून घेऊ!"

घरमालकीण म्हणाली–"मुली! कामाला काय ग, आमच्या घरात वाटेल तेवढे काम असते. तुझ्यासारखी धडधाकट मुलगी कामाला मिळाली तर आणखी काय पाहिजे? तुम्ही दोघी माझ्या घरी आनंदाने रहा!"

त्या घराच्या मागच्या पडवीला लागून एक खोली होती. कुसुमावती त्या खोलीत आईबरोबर राहू लागली. झाडलोट, भांडीकुंडी, कपडे धुणे, हीच कामे करावी लागत. त्या शिवाय निवडण दळण वगैरे कामे असतच. सर्व वेळ काम मन लावून करी. तिचे काम पाहून घरची मंडळी खुष होती. हळूहळू ओळख वाढली आणि घरच्या व दारच्या सर्व लहान थोर गोष्टी घरमालकिणीच्या तोंडी कुसुमावतीला कळल्या.

एके दिवशी सायंकाळी कुसुमावती घागर भरून घेऊन येत होती तेव्हां घराच्या मागच्या बाजूला तिला चांगली शरीर यष्टी असलेला एक तरुण दिसला. त्याने तिला विचारले–"तू या घरातली दिसत नाहीस कोठून आलीस, काय करतेस?"

"मी या घरची नाही, परगावची! घरकाम करते! पण तुम्ही कोण?" तिने विचारले.

"मी काही दिवसांपासून येथे रहात नाही. तू मला थोडी मदत केली पाहिजेस! तू एक वर्षभर मी कोण कोठे राहतो, हे गुप्त ठेवलेस तर नरकलोकातून मला मुक्ती मिळेल. मी या घरचा एकटा मुलगा, कुलदीपक आहे! मी मूर्खपणाने भुतापिशाच्चांच्या नादी लागून त्यांचा अपमान केला आणि नरकवास भोगीत आहे. मला एक वर्षभर नरकात निवास करावा लागणार आहे." तो म्हणाला.





"मी तुमचे गुपित गुप्त राखीन. सांगा, माझ्याकडून तुम्हांला कोणत्या मदतीची अपेक्षा आहे?" कुसुमावतीने विचारले.

"या घराची मालकीण माझी आई मी नाहीसा झालो त्या दिवसापासून तिने माझी खोली बंद करून कुलूप लावून ठेवले आहे. तू ती खोली स्वत:ला राहण्यासाठी मागून घे. तिने नकार दिला तर तू काम सोडून जाण्याची धमकी दे." असे सांगून तो तरुण अदृश्य झाला.

कुसुमावतीने मालकिणीजवळ ती खोली स्वत:ला राहण्यासाठी मागितली. म्हणाली— "ती खोली दिलीत तर मला शांत झोप मिळेल व कामाला हुरूप येईल."

परंतु मालकिणीला राग आला. म्हणाली— "तुझी हिंमत तर बरीच दिसते की ग! ती खोली माझ्या मुलाची आहे. तो हे जग सोडून गेला त्या दिवशी त्याचे प्रेत बाहेर काढल्यानंतर आम्ही कोणाला त्या खोलीत पाऊल टाकू दिले नाही. आम्ही अंतिम संस्कारात लागलो असतां त्याचे प्रेत एकाएकी अदृश्य झाले. लोक म्हणतात की भुते प्रेत उचलून घेऊन गेली. ती खोली तू मागते आहेस?"

"तर मग! मला निरोप द्या! मी आईला घेऊन आणखी कोठे तरी जाईन!" कुसुमावती म्हणाली.

ते ऐकून मालकीण भीत भीत म्हणाली— "त्या खोलीत तू राहणार? ती खोली उघडून झाडलोट करायची सुद्धा आमची छाती होत नाही. तू म्हणते आहेस तर देते खोली उघडून. पहा, बाई! तेवढ्यासाठी काम सोडून जाण्याची गरज नाही." असे सांगून मालकिणीने किल्ली दिली. कुसुमावतीने आभार मानून खोली झाडून पुसून काढली.

त्या खोलीत एक पलंग व अंथरुण पांघरुण सर्व काही होते. कुसुमावती त्या बरच झोपली. मध्यरात्रीच्या सुमारास तो तरुण खोलीत आला. दोघं बराच वेळ बोलत राहली. त्याने तो सशरीर नरकात कसा गेला हे सांगितले. तो खरोखरी मरण पावला नव्हता. भुतांनी माया करून त्याला मृत माणसासारखे बेशुद्ध केले व त्याला सशरीर नरकात नेले. तेथे त्याला भुतांची चाकरी करावी लागे. त्याच्या मुक्तीला एक वर्ष उरले होते. दररोज एक तासभर त्याला कोठेही जाण्यायेण्याची परवानगी होती. परंतु आपल्या कुटुंबातील कोणत्याही व्यक्तीच्या नजरेस पडतां कामा नये, अशी एक अट पाळावी लागे.

तो तरुण कुसुमावती बरोबर एक तासभर राहून निघून गेला.

त्या दिवसापासून तो दररोज रात्री कुसुमावतीकडे येऊ लागला. तिच्याबरोबर तासभर राहून पुन्हा भुतांबरोबर नरकलोकात जाऊ लागला. काही दिवसांनी कुसुमावतीला दिवस राहले. ती गोष्ट घरमालकिणीच्या लक्षात आली. तिने निरनिराळ्या तऱ्हेने कुसुमावतीच्या पोटांतल्या मुलाचा बाप कोण हे विचारून पाहिले व तपास केला. परंतु कुसुमावतीने ते गुपित कोणाला कळू दिले नाही.

एके दिवशी कुसुमावती कामाला आली नाही, मालकिणीने दाराच्या आडून आत चाललेले संभाषण लक्षपूर्वक ऐकलें. कोणी तरी पुरुष बोलत असल्याचे तिला कळले. तिने दाराच्या फटीतून पाहिले. तेव्हां कुसुमावती एका लहान बाळाला दूध पाजीत असलेली दिसली. तिच्यासमोर बसलेला पुरुष दुसरा तिसरा कोणी नसून मालकिणीचा मुलगाच होता.





तेव्हां तिला मुलाचे प्रेत नाहीसे झाल्याचे आठवले. ती धाईघाईने निघून गेली.

काही दिवसांनी कुसुमावतीने दार उघडले. तेव्हां घरांतल्या दुसऱ्या मोल-करणीने, मालकिणीने एक मोठी पेटी खोलीत ठेवायला सांगितल्याचे सांगितले.

कुसुमावतीने पेटी खोलीत ठेवायला नकार दिला नाही. संध्याकाळी ती पेटी खोलीत पोचती झाली. पेटीत मालकीण बसली होती आणि किल्लीच्या जागच्या भोकांतून खोलीतला प्रकार पहात होती.

मध्यरात्रीच्या सुमारास तिचा मुलगा आला आणि कुसुमावतीच्या शेजारी बसून तिच्याशी बोलू लागला. आतां मात्र माल-किणीला राहवले नाही. ती पेटीतून उठून बाहेर आली व मुलाला पोटाशी धरून म्हणाली–"बाळ! कोठे रे होतास इतके दिवस?"

परंतु आईला भेटून मुलाला आनंद झाला नाही. उलट रागाने तो म्हणाला–"आई! तू हे काय केलेस? फक्त एक महिना तू धीर धरला असतास तर मी परत आलो नसतो का? आतां मला सात वर्षे नरकात वास करावा लागणार!"

आई म्हणाली–"बाळ! माझ्या जिवात जीव असे पर्यंत मी तुला जाऊ देणार नाही."

"आई! भुतां पिशाच्चांच्या हातून तू मला सोडवू शकणार नाहीस." मुलगा म्हणाला.

आई खोलीबाहेर जाऊन भुतांपिशाच्चांची वाट पाहू लागली. बराच वेळ झाला, तिला मुलाचा आवाज ऐकू येईनासा झाला. तिने खोलीत डोकावून पाहिले, तिचा मुलगा खोलीत नव्हता. तिची नजर चुकवून तो कसा गेला, तिला कळेना.

पिशाच्चे त्याला उचलून घेऊन गेली. त्यापूर्वी कुसुमावती त्याला म्हणाली होती–"माझ्या आईचा व बाळाचा सांभाळ करण्याची जबाबदारी कोणी घेतली तर मी तुमच्या ऐवजी सात वर्षे नरकात आनं-दाने राहून भुतांची चाकरी करीन."

तो म्हणाला होता,– ती जबाबदारी मी खुशीने घ्यायला तयार आहे." त्याने पिशाच्चांना सर्व गोष्टी समजावून सांगि-तल्या. पिशाच्चांनी संमती दिली.

त्यानंतर ठरल्याप्रमाणे कुसुमावतीने मुलाला प्रेमाने पोटाशी धरून व त्याचे मुके घेऊन त्याच्या बापाच्या हातात त्याला दिले व स्वतः पिशाच्चांबरोबर नरकलोकात निघून गेली. घरमालकिणीला मुलगा परत आल्याबद्दल व नातवाबरोबर आल्याबद्दल परमानंद झाला.

थोड्या वेळाने कुसुमावतीला नरकवास किती कष्टाचा असतो हे कळले. परंतु आपल्या पतीला ती नरकवासातून सोडवू शकली व त्याला पुन्हां आईवडिलांबरोबर राहण्याची संधी देऊन सुखी करू शकली याबद्दल तिला समाधान वाटले. आपल्या मुलाची व आईची काळजी घेण्याचे पतीने कबूल केले होते, म्हणून तिला नरकयातना भोगणे कष्टाचे वाटले नाही.

शेवटी तिला सात वर्षांनी नरकलोकातून मुक्ती मिळाली. पिशाच्चांनी तिला तिच्या पतीच्या घरी आणून सोडले. त्या वेळी तिला घरात मंगलकार्याची गडबड दिसली. कुसुमावतीने चवकशी केली तेव्हां तिला कळले की घरमालकिणीच्या मुलाचे लग्न आहे. तिला त्या गोष्टीवर विश्वास होईना.



अवधी पुरा होईपर्यंत पती वाट पाहील याची तिला खात्री होती. परंतु तो त्या-पूर्वीच दुसऱ्या मुलीशी लग्नाला तयार झालेला पाहून तिला आश्चर्य वाटले. तिची आई काही दिवसांपूर्वीच वारल्याचे पण तिला लोकांकडून कळले.

गरीबांना अन्नवस्त्रे दान करण्यात येत होती. तिचा पती पुरुषांना, सासू बायकांना व सात वर्षांचा मुलगा लहान मुलांना अन्न वस्त्रे वांटीत होते. तिघांनी कुसुमावतीला ओळखले नाही. सासूच्या हातून साडीचोळी घेऊन कुसुमावती तेथून निघून गेली.

वेताळाने येथवर गोष्ट सांगून विचारले–"राजा! कुसुमावती आपल्या पतीच्याबद्दल

नरकात वास करायला कां गेली? पति प्रेमामुळे की पत्नीचे एक कर्तव्य समजून? इतका त्याग करून ही तिने पतीला दुसरे लग्न करण्यापासून कां अडविले नाही? या शंकाची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस, तर परिणाम तुला माहीत आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला—"कुसुमावतीला कष्ट सहन करण्याचे भय वाटले नाही. दुसऱ्याला कष्टात पाहणे तिला कष्टाचे वाटत होते. म्हणून थोडी समजूत येताच ती आईसाठी सर्व कष्ट सहन करू लागली. तिचे पतीवर मनापासून प्रेम होते या गोष्टीचे काही प्रमाण दिसत नाही. पतीला नरकवासात कष्ट होत आहेत हे पाहून ती त्याचे कष्ट दूर करण्यासाठी त्याची पत्नी व्हायला व त्याच्या ऐवजी स्वत: नरकलोकात जाण्यास तयार झाली, त्याचे आणखी एक कारण असू शकेल. पतीला नरकवासातून मुक्ती मिळवून देण्या-बरोबर आईला व मुलाला सुखी करण्याचा हेतुदेखील तिच्या मनात होता. पतीचे प्रेम तिच्यावर होते या गोष्टीचे प्रमाण मिळत नाही. त्याने नरकवासातून स्वत: मुक्त होण्यासाठी कुसुमावतीचा उपयोग करून घेतला. कुसुमावती आपल्या पतीच्या जागी नरकलोकात जायला तयार झाली तेव्हां त्याने कोणत्याही प्रकारे नाखुशी दर्शविली नाही. सात वर्षांचा अवधी संपल्यावर तो दुसऱ्या मुलीशी लग्नाला तयार झाला. कुसुमावतीला आपल्या आईसाठी व मुलासाठीच जणुकाही जीविताची फिकीर होती. आतां तिची आई वारली होती व पुत्र सुखी होता. तिने सात वर्षे नरकलोकात चाकरी केली होती तिला या जगात पुढले आयुष्य घालविणे कष्टाचे वाटायला कारणच नाही. म्हणून तिने आपली ओळख देखील दाखविली नाही व निघून गेली."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# योग्य सेनापती

रत्नगिरी नामक राज्याचा राजा रुद्रदेव हा एक अत्यंत निपुण शासक म्हणून प्रसिद्ध होता. तो एक प्रजावत्सल राजा होता. तो नेहमी आपल्या मंत्रिमंडळाच्या सल्ल्याप्रमाणे वागे. त्याने कधी त्यांची मने दुखविली नाहीत. सर्व दरबारी राजाच्या प्रत्येक शब्दाला मान देत.

रुद्रदेवाला शिकारीचा नाद होता. तो शिकारीला जाताना प्रत्येक वेळी फक्त एकाला बरोबर नेत असे. आपल्या दरबारातल्या किंवा मंत्रिमंडळातल्या एखाद्या अधिकाराच्या मुलालाच बरोबर नेण्याचा त्याने एक प्रघात पाडला होता.

एकदा राजाबरोबर राजवैद्यांचा मुलगा रत्नाकर शिकारीला गेला. त्याचे वय अवघे वीसबावीस वर्षांचे होते. अंगापिंडाने तो बळकट व धाडसी होता. उजाडतांच राजा व रत्नाकर जंगलात पोचले. दुपार उलटली तरी एक देखील शिकार नजरेसमोर आली नाही. दोघे दमून भागून एका झाडाखाली बसून विश्रांती घेऊ लागले.

इतक्यात अचानक समोरून एक गेंडा त्यांच्यावर धावत येत असलेला त्यांना दिसला. तो जोराने धावत होता. त्याला कसे ठार करावे किंवा थोपवावे, राजाला कळेना. स्वत:चाच जीव वांचण्याची शंका वाटू लागली. राजा थोडा घाबरलाच. परंतु रत्नकुमार चटदिशी उभा राहिला. गेंड्याचे कातडेजाड असते. त्यात भाला किंवा तीर शिरणे अशक्य हे त्याला माहीत होते. म्हणून रत्नकुमाराने समोर एक केळ दिसली ती तलवारीने कापली व ती गेंडा अगदी जवळ पोचतांच त्याने गेंड्याच्या नाकावरच्या शिंगावर आपटली. केळीचा खांब शिंगात रुतला.



केळीचा खांब पायात अडकून गेंडा तोल जाऊन जमिनीवर पडला. रत्नकुमारने लगेच गेंड्याच्या डोळ्यातून तलवार खुपसून मेंदूपर्यंत नेली. गेंडा जागच्या जागी आक्रोश करीत तडफडून गार झाला.

या अनपेक्षित घटनेचा राजाच्या मनावर फार परिणाम झाला. किंकर्तव्यविमूढ मनाने स्वत: सर्व दृश्य पहात असतां रत्न-कुमाराने गेंड्याला लोळविलेले पाहून राजाने त्याची पाठ थोपटली. रत्नकुमाराचे प्रसंगावधान व धाडस राजा मंत्रमुग्ध होऊन पहात होता. त्या दिवशी रत्नकुमाराने स्वत:चा व राजाचा जीव वाचविला,ही गोष्ट

त्यापूर्वी राजा रुद्रदेव आपल्याबरोबर शिकारीला आपल्या दरबारी सरदारांच्या कित्येक मुलांना घेऊन गेला होता. परंतु रत्नकुमाराचे धाडस अद्वितीय होते. आज पावेतो जंगलात जेव्हां कधी धोका वाटला राजा स्वत:हिंमत करून इतरांचे नेतृत्व करीत असे. परंतु या खेपेस तो अवाक् होऊन सर्व पहात उभा राहला होता. याउलट रत्नकुमाराने हिंमत करून धोक्यातून स्वत:ला व राजाला वाचविले होते.

त्यानंतर अनेकदां रत्नकुमाराने आपल्या शक्तीचे व सामर्थ्याचे प्रदर्शन केले होते. म्हणून हाच आपला सेनापती झाला तर बरे होईल, असे राजा रुद्रदेवाला वाटले. परंतु प्रघात निराळा होता. सर्व पदे वंशपरंपरागत होती. सेनापतीच्या पदावर राजाने त्या प्रथेच्या विरुद्ध सेनापतीच्या मुलाला न बसवितां रत्नकुमाराला बसविले असते तर कोणी विरुद्ध बोलला नसता. परंतु अनुमोदन स्वखुशीने केलेच असते असे मात्र नाही. म्हणूनच तसे करणे राजाला गैर वाटत होते.

कित्येक वर्षे लोटली. वृद्ध सेनापती परलोकवासी झाले. मंत्र्यांनी रिवाजा-प्रमाणे सेनापतीच्या मुलाला सेनापती नेमण्यास विनंती केली. सेनापतीच्या

परंतु राजाला तो सल्ला रुचला नाही. म्हणून तो आपल्या मंत्र्यांना म्हणाला— "आज आपल्या सरदारांच्या मुलांमध्ये पुष्कळ कर्तबगार व शूर साहसी आहेत. त्यांच्यापैकी एखाद्याला निवडून नेमल्यास काय हरकत आहे?"

"महाराज! सेनापतीच्या पदावर सेना-पतीच्या मुलालाच नेमण्याचा रिवाज पिढ्यान् चालून आला आहे. तो नियम मोडणे बरोबर होणार नाही." मंत्र्यांनी सल्ला दिला.

"तुमचे म्हणणे बरोबर आहे! मी तुमच्या मनाविरुद्ध काही एक करणार नाही. मी फक्त तुमचा विचार घेतला." राजा म्हणाला.

त्यानंतर दरबारी जादुगार रंगराजने पुढे होऊन राजाला नमस्कार केला व निवेदन केले—"महाराज! आपण कोणत्या तरी काळ-जीत आहां, सेवकाला सेवेची संधी द्यावी!"

"विशेष काही नाही. नवीन सेनापती कोणाला नेमावयाचे एवढाच प्रश्न आहे!" राजा म्हणाला.

"सेनापतीचे चिरंजीव आहेत ना!". रंगराज म्हणाला.

"नाही, माझ्या मनात आणखी एकाला त्या पदावर नेमावे, असे आहे. परंतु तसे करून सर्वांना दुखविणे मला पसंत नाही." राजा म्हणाला.

"सेवकाला संधी दिलीत तर सेवक काही मार्ग काढू शकेल." रंगराज म्हणाला.





"अरे! खरंच, मी तुझी गोष्ट पारच विसरलो होतो! तुझ्या अद्‌भुत शक्तीचा व जादूचा प्रयोग ह्यां पेचप्रसंगातून काही तरी मार्ग नक्कीच काढील!" राजा म्हणाला.

"महाराज! जादूची गरजच काय? एक लहानशी युक्ती केली की आपले काम बनेल!" रंगराज म्हणाला.

दुसऱ्या दिवशी ती युक्ती सांगतो, असे सांगून रंगराजाने राजा रुद्रदेवाचा निरोप घेतला.

दुसऱ्या दिवशी रंगराज राजाला भेटायला आला व म्हणाला—"महाराज! युक्ती तयार आहे. आपण कोणाला सेनापती पदावर नेमणार, हे सांगण्याची कृपा करावी!"

"आपले दरबारी वैद्य आहेत ना, त्यांचा मुलगा रत्नकुमार याला. माझ्या मते तोच या पदावर नेमण्यास योग्य आहे." राजाने आपले मत दिले.

"महाराज! तरमग युद्धविद्येच्या चढाओढीचा कार्यक्रम ठेवावा आणि अनुक्रमे सर्वांत उत्तम अशा चार जणांची निवड करावी. त्या चढाओढीत रत्नकुमार व सेनापतीचे चिरंजीव उत्पलसिंह दोघांनी भाग घ्यावा असे सांगावे. रत्नकुमाराला निश्चितच यश मिळेल ना?" रंगराजाने राजाला विचारले.

"मला त्यांत मुळीच शंका नाही!" राजा म्हणाला.

"ठीक तर! महाराज आपण चढाओढीची गोष्ट जाहीर करावी. ही चढाओढ फक्त हौशीखातर आहे, असेही जाहीर करावे. त्याचबरोबर याखेपेस सेनापती पदाची नेमणूक नव्या तऱ्हेने होणार असल्याचे आणि ह्या निर्णय पूर्णपणे ईश्वराच्या इच्छेवर अवलंबून आहे, असे आपल्या मंत्रिमंडळातल्या सर्व सभासदांना अवश्य सांगावे." रंगराजाने सुचविले.

चढाओढ उत्तम प्रकारे संपली. तीत रत्नकुमार पहिला, उत्पलसिंह दुसरा, न्याय विभागाच्या मंत्र्याचा मुलगा अर्जुन तिसरा [illegible] नावाचा तरुण युवक चवथा आला.

दुसऱ्या दिवशी दरबार बोलावून रुद्रदेव आपल्या मंत्र्यांना व सरदारांना संबोधन करून म्हणाला—

"दरबारी व सरदार बंधूंनो! मी जी सूचना करतो आहे, ती आपणां सर्वांना मान्य होईल, या गोष्टीची मला खात्री आहे. कालच झालेल्या चढाओढीत चार तरुणांनी आपले नैपुण्य सर्वांच्या नजरेस आणून दिले आहे. आपल्या मयत सेनापतीचे चिरंजीव उत्पलसिंह हेदेखील त्यांपैकी एक होत. सेनापती पद कोणाला द्यावयाचे या गोष्टीचा निर्णय थोड्या निराळ्या तऱ्हेने व्हावा असे मला वाटते. ही गोष्ट रिवाजाप्रमाणे नाही, हे मी ओळखतो. परंतु नवीन मार्ग हुडकल्याशिवाय कधी प्रगती होत नाही, हे आपणा सर्वांना नव्याने सांगण्याची गरज नाही, असे मला वाटते. म्हणून मी जे योजले आहे, त्याला आपली संमती मिळेल या गोष्टीची मी पूर्ण आशा बाळगतो."

अनेक दरबाऱ्यांनी रुद्रदेवाविषयी त्यांच्या मनात जो आदर वसत होता त्यामुळे नवीन योजनेस होकार दिला.



"तरमग नवीन योजनेचा प्रयोग सुरू करू या." असे म्हणत शेजारी बसलेल्या राणीकडे वळून महाराज म्हणाले—"महाराणीने स्वतः या प्रयोगास हातभार लावावा, म्हणजे काम जास्त सुलभ होईल."

महाराणीने होकार दिला.

त्यानंतर पुठ्ठयाचे चार तुकडे व चार कागदी पाकिटे राणीसरकारांच्या हातात देण्यात आली. चारही पुठ्ठयांवर चौघांची नावे निरनिराळी लिहिण्यात आली.

राणी शेजारच्या खोलीत एकटी गेली. एकेक पाकिटात एकेक पुठ्ठयाचा तुकडा

महाराजांच्या हातात देण्यात आली.

राणीने पहिले पाकीट दाखविताच राजाने उत्पलसिंहाचे नाव उच्चारले. मंत्र्याने त्या पाकिटावर उत्पलसिंहाचे नाव लिहिले. राणीने दुसरे पाकीट पुढे केल्यावर राजाने 'संपत' नाव उच्चारले. मंत्र्याने ते नाव त्या पाकिटावर लिहून राजाच्या हातात ते पाकीट दिले. अशाच तऱ्हेने तिसऱ्या पाकिटावर रत्नकुमाराचे व चवथ्यावर अर्जुनाचे नांव लिहिण्यात आले. प्रत्येक वेळी राजाने सांगितले व मंत्र्याने लिहिले.

त्यानंतर राजा सर्व दरबारी मंडळींना संबोधून म्हणाला–"पाकिटांत कोणाचे नाव आहे, मला माहीत नाही. मला जे नाव तोंडास आले ते मी घेतले व मंत्र्यांनी ते लिहिले. परंतु योगायोगाने पाकिटावरचे व आतल्या पुठ्ठ्यावरचे नाव एकच निघाले तर मी त्या व्यक्तीला आपला सेनापती नेमीन."

तेव्हां ... पुठ्ठ्यावर ... रत्नकुमारला सेनापतीपद मिळाले आणि तो आपल्या शक्ती व सामर्थ्याचा परिचय प्रजेला पटवू लागला.

राजा व राणी एकांतात बसले असतां राणी म्हणाली–"आपली युक्ती यशस्वी होण्यास माझ्या मदतीचा उपयोग झाला म्हणावयाचा!"

"कोणत्या नावाचे पाकीट कसे काढावयाचे हे रंगराजाने तुला समजावून सांगितले होते. तू ज्या पाकिटाचा खालचा कोपरा धरला होतास त्यात उत्पलचे नाव, वरच्या कोपऱ्यात पकडल्यास अर्जुनचे नाव आहे हे मला माहीत होते. म्हणून रत्नकुमारचे नाव मी बरोबर ओळखले आणि इतर नावे चुकीची सांगितली."

अशा तऱ्हेने रंगराज राजाला मदत करू शकला. राजाने त्याला मोठे इनाम देऊन त्याचा गौरव केला





# १६२. मिठाचा पर्वत

या चित्रात आपल्याला स्वच्छ मीठ दिसत आहे. हा डोमिनिकन रिपब्लिक (पश्चिमी द्वीपसमूहांच्या कक्षालच्या) शेजारी असलेला पर्वत आहे. हे मीठ इतके स्वच्छ आहे की याच्या गोळ्या करून बर्फाचे तुकडे म्हणून सांगून प्रवाशांच्या हातात दिल्यास ते आपल्या थंडगार पेयांत नक्कीच टाकतील हा पर्वत एका काळी समुद्राच्या तळाशी होता.



      




# गोपूचे भूत

एका गावी गोपू नावाचा शेतकरी रहात असे. त्याच्या बायकोचे नाव राधाबाई होते. त्यांना शिवू नावाचा मुलगा होता. मुलगा दिसायला अगदी बापासारखा होता.

शेतात रोपणीचे काम चालू होते. एके दिवशी पहाटे गोपू शेतात निघाला. थोड्या वेळाने चार जण गोपूचे प्रेत घेऊन त्याच्या घरी आले. काळोखात त्याला साप चावला होता. शेजारपाजारच्या लोकांच्या सहाय्याने शिवूने बापाची उत्तरक्रिया उरकून घेतली.

गोपूची बायको राधा पती गेल्यावर स्वतःला अनाथ मानून बेशुद्ध होऊन पडली. त्या बेशुद्धीच्या अवस्थेतच ती ओरडू लागली की तिचा पती भूत होऊन स्मशानातल्या झाडावर बसला आहे. तो पारंब्या धरून उतरतो, आकाळविकाळ ओरडतो आणि अदृश्य होतो. ती ते सांगत कधी अर्धवट शुद्धीवर येई तेव्हां वडीलधाऱ्या बायका तिची समजूत घालण्याचा प्रयत्न करीत. ती चांगली शुद्धीवर आली तेव्हां त्यांनी विचारले–"राधे! तू काही स्वप्नबिप्न पाहिलंस का?"

राधा स्वप्नाचे वर्णन सांगून म्हणाली–"होय! ते भूत होऊन येथेच कोठे तरी आहेत!"

गोपू मरण पावला त्याच्या तिसऱ्या दिवशी स्मशानातल्या वडाच्या झाडाखाली एक वाणी बेशुद्धावस्थेत सकाळी लोकांना दिसला. औषधोपचार करून त्याला शुद्धीवर आणल्यावर लोकांनी विचारले तेव्हां त्याने रात्री त्याच्यावर गुजरलेला प्रसंग वर्णन करून सांगितला.

तो शेजार गावचा एक वाणी होता. दुकानात विकायला ठेवण्यासाठी सामान विकत घ्यायला तो त्या वाटेने पहाटे जात असतां त्याला कोल्हाकुईचे ओरडणे ऐकू आले. तो न घाबरतां स्मशानातल्या वडाच्या झाडाखाली पोचला तेव्हां एक पांढरी वस्त्रे नेसलेले भूत पारंब्यांवरून उतरून आले आणि ओरडून म्हणाले–"ए वाण्या! तुझ्याजवळ असेल नसेल ते काढून समोर ठेव. माझ्या बायको व पोराचे पोट भरले पाहिजे. तू नाही का ओळखलेस मला? मी गोपू आहे गोपू!"

वाणी म्हणाला त्या गोष्टी गावकऱ्यांना खऱ्या वाटल्या. ते वाण्याला बरोबर घेऊन गावात गेले आणि शिवूला व राधाला बाहेर हाक मारून दरडावून विचारू लागले–"गोपूच्या भुताने आणून दिलेले धन कोठे लपवून ठेवले आहेस, ते काढा!" त्यांनी गोपूच्या घराची झडती घेतली परंतु एक पै पैसा काही मिळाले नाही.

राधा तो अपमान सहन करू शकली नाही. ओक्साबोक्शी रडू लागली. तिला हे कळत नव्हते की देवमाणसासारखा तिचा नवरा भूत का झाला आणि त्याने वाटमाऱ्याचे काम कसं काय सुरू केले!

त्या दिवसापासून गावकरी राधाबाईशी बोलायचे भेटायचे टाळू लागले. त्यांच्या वागणुकीत एकदम बदल झाला. तिला पाहून दुरूनच लोक तोंड फिरवून निघून जात. ही गोष्ट राधाबाईला असह्य झाली.

दुसऱ्याच दिवशी त्या गावातली एक बाई परगावाहून परत येत असतां भुताने तिचे सर्व दागिने काढून घेऊन तिला





म्हटले–"हे दागिने घातले तर माझी बायको किती छान दिसेल!"

दुसऱ्या दिवशी गावकऱ्यांनी पुन्हा राधाबाईच्या घराची झडती घेतली. परंतु त्यांना घरात काही सापडले नाही. गावकऱ्यांनी राधाबाईला व तिच्या मुलाला दटावून म्हटले–"तुझा नवरा मेला आणि या गावावर दैवाचा कोप झाला. त्याला येथून पिटाळून लाव, नाही तर तुलाच आम्ही पिटाळून लावू!"

राधाबाईला काय करावे, कळेना. गावकऱ्यांना वाटे की तिचा पती तिला भूतरूपे येऊन भेटत असावा व तिचे घर भरत असावा. भुताला कसे पळवून लावायचे?

त्यानंतर गावातल्या तिघांना गोपूचे भूत दिसले. काळोख पडल्यावर कोणी त्या वाटेने जाण्याचे धाडस करीनासा झाला.

गावकऱ्यांनी आपसात सल्ला करून राधाबाईला बजावून सांगितले–"हे पहा बाई! तू व तुझा मुलगा गाव सोडून गुण्यागोविंदाने निघून जा कसे! म्हणजे तुझ्या नवऱ्याचे भूत निघून जाईल. उद्या सकाळच्या आत तुम्ही गेला नाहीत तर आम्हीच धक्के देऊन तुम्हांला बाहेर काढू!"

घरदार सोडून जायचे तर कोठे! राधाबाईने साहस करून नवऱ्यालाच विचारायचे ठरविले. रात्री ती स्मशानाकडे निघाली. तिला कोल्हेकुई ऐकू आली. ती वडाच्या झाडाजवळ आली असेल तेव्हां तिला ऐकू आले–"ए असशील तिथे उभी रहा. माझ्या बायकोचे व मुलाचे पोट कसे भरणार? तुझ्याजवळ असेल ते समोर काढून ठेव. मी कोण आहे, ओळखले नाहीस वाटते? मी गोपू आहे गोपू!"

राधाबाई ते ऐकून थक्कच झाली. तो आवाज तिच्या नवऱ्याचा नव्हता. ती चटदिशी मागे वळली आणि घरी येऊन तिने मुलाला सगळे सांगितले. म्हणाली–"बाळा! कोणी तरी लबाड तुझ्या बाबांचे भूत होऊन त्यांना बदनाम करीत आहे. त्या लबाडाला पकडले पाहिजे."

तेव्हा शिवूने एक युक्ती योजली आणि त्याने ती आपल्या आईला सांगितली. राधाबाईला ती युक्ती आवडली.

दुसऱ्या दिवशी ती गावकऱ्यांना म्हणाली–"उद्यां आम्ही गांव सोडून जातो. तुम्हांला त्रास कशाला?"

त्या दिवशी रात्री आईने व मुलाने जेवून घेतले. शिवूने आपल्या केसात पांढरी पावडर घातली तेव्हां तो गोपूसारखा दिसू लागला. दोघे स्मशानात गेले. शिवू पांढरे धोतर नेसून व पांढरा सदरा घालून वडाच्या झाडाच्या ढोलीत लपून बसला. राधाबाई एका झुडपाआड लपून बसली.

थोडया वेळाने एक मनुष्य पांढरे धोतर नेसून व पांढरा सदरा घालून तेथे आला. तो झाडावर चढून एका फांदीवर बसला. नंतर तो घुबडासारखा व कोल्ह्यासारखा ओरडू लागला.

राधाबाई उद्विग्न मनाने मुलगा केव्हां बाहेर येतो हे पहात झुडपाआड बसली होती. इतक्यात शिवू बाहेर आला आणि झाडावरच्या माणसाला म्हणाला–"लबाडा! तू मला बदनाम करण्यासाठी माझे सोंग करून दररोज येथे येऊन बसतोस काय? पहा, आतां मी तुझ्या समाचाराला येतो. तू मला ओळखलेस का? मी गोपू आहे गोपू!"

ते ऐकून झाडावर बसलेला माणूस थरथर कापू लागला. त्याची बोबडीच वळली. तो झाडावरून खाली पडला आणि म्हणू



लागला—"गोपू! मी चुकलो! कान धरतो! पुन्हा तुझ्या वाटेला जाणार नाही. मला माफ कर. मी तुझे पाय पकडतो!"

"मी तुझे काही बरे वाईट करणार नाही. परंतु प्रथम हे सांग, तू आजपर्यंत वाटमारी करून धन व दागिने लुटलेस ते कोठे ठेवले आहेस?" गोपूच्या वेषात शिवूने विचारले. तो चोर थरथर कापत होता. त्याने वडाच्या झाडाखाली एका जागी जमीन उकरायला सुरवात केली.

मुलाची युक्ति फळास आलेली पाहून राधाबाईला आनंद झाला. ती धावत गावात गेली व झोपलेल्या गावकऱ्यांना जागे करून तिने स्मशानात घडलेली वृत्त सांगितले व म्हणाली—"चला, आणि स्वतःच्या डोळयांनी पहा, त्या लबाडाला?" कित्येक गावकरी तिच्या बरोबर स्मशानात आले. त्याना पाहून तो चोर घाबरला. त्याने सर्व माल काढून समोर ठेवला.

"चोरा! भामट्या! तू इतके दिवस बिचाऱ्या गोपूला बदनाम केलेस!" असे म्हणत [illegible] व अर्धमृतावस्थेत तेथेच सोडून निघाले.

त्यावेळी शिवू ढोलीतून बाहेर येत म्हणाला—"काय आहे काय भानगड? माझा थोडा डोळा लागला होता म्हणून विचारतो."

राधाबाई व गावकरी थक्क होऊन त्याच्याकडे पाहू लागले. त्याने हे सर्व नाटक रचले होते हे कळल्यावर गावकऱ्यांनी शिवूची पाठ थोपटली व राधाबाईची माफी मागितली. म्हणाले—"आम्ही गैरसमजूत करून घेऊन तुम्हांला उगाच, शिव्याशाप देत राहलो! शेवटी 'गोपूच्या भुतानें'च तोतया भुताला पकडून दिले." चोरी गेलेला सर्व माल मिळाला व तो ज्याचा त्याच्याकडे पोचता झाला.

राधाबाईची माफी मागून गावकऱ्यांनी तिला गावातच रहायला विनवण्या केल्या. भुताचे सोंग करणारा उजाडण्यापूर्वी गाव सोडून पसार झाला. त्यानंतर कोणाला गोपूचे भूत दिसले नाही.





# श्यामूचा आत्मा

एका गावी श्यामराव नावाचे एक श्रीमंत सावकार रहात होते. त्यांची मित्रमंडळी त्यांना श्यामू म्हणून हाक मारीत. त्यांना भीमू नावाचा एक मुलगा होता. भीमूची आई वारल्यावर श्यामूने घरकाम करणाऱ्या चंदाशी संबंध ठेवला. तिला एक मुलगा झाला. त्याचे नाव रामू होते.

श्यामराव राजाच्या खजिन्यात कारकून होते. उतारवयी त्यांना नोकरी सोडावी लागली. काही दिवसांनी ते आजारी पडल्यावर चंदा व तिचा मुलगा रामू यांचा कोण वाली, या गोष्टीची त्यांना चिंता वाटू लागली.

एके दिवशी त्यांनी भीमूला जवळ बोलाविले आणि म्हणाले—"बाबा रे! मी आतां चार दिवसांचा पाहुणा आहे. चंदाला आणि रामूला घराबाहेर काढू नकोस. त्यांचे पाप काही नाही. त्यांना माझ्या पापाची फळ चाखावी लागू नये, एवढीच इच्छा आहे. पूर्वेच्या बाजूला जी एक एकर पडीत जमीन आहे, ती एक खोपट बांधून ठेवले आहे. तुला शक्यच झाले नाही तर त्यांना सांग तेथे रहायला.

भीमूने बापाला, त्या दोघांना उणे न पडू देण्याचे वचन दिले.

नंतर श्यामरावांनी चंदाला एका पुठ्ठ्यावर आपला फोटो चिकटवून देत म्हटले—"रामू मोठा झाल्यावर तू हा फोटो न्यायालयात दाखव आणि या फोटोत माझी इच्छा मी लिहिली आहे ती पाहून काय ते तुला व रामूला द्यावे असे सांग." एवढे सांगून श्यामरावांनी डोळे मिटले.

श्यामरावांची मित्रमंडळी धावली व त्यांनी त्याची उत्तरक्रिया भीमूच्या हाती करविली. रामू त्यावेळी पांच वर्षांचा होता. त्याला बारावे वर्ष लागेपर्यंत भीमूने त्याला



व त्याच्या आईला सांभाळले. नंतर त्याने दोघांना त्या पडीत जमिनीतल्या खोपटात रहायला सांगितले. दररोज तो शिधा पाठवी. लोकांनी त्याला विचारले—"काय रे भीमू, तू जसा, तसा रामू तुझ्याच बाबाचा मुलगा आहे, श्यामूच्या आत्म्याला काय वाटेल?"

भीमू म्हणाला—"मी आजपर्यंत त्यांना सांभाळले. आता रामू मोठा झाला आहे. त्याने स्वतःच्या पोटापाण्याची फिकीर करावी. त्याला शक्य होईपर्यंत मी शिधा पाठवीत जाईन."

एकदां रामूने आईला विचारले—"मी व दादा दोघांचे बाबा एकच. मोठा भाऊ रेशमी कपडे घालतो आणि गोडधोड खातो आणि मला मात्र अर्धपोटी झोपावे लागते हे कां?"

रामूची आई काय उत्तर देणार? तेव्हां रामू भीमूकडे गेला. तेव्हा भीमू त्याला म्हणाला,—"आपल्या बाबांना तू मोठा झाल्यावर असेच काही तरी बडबडशील याचा अंदाज होता. म्हणून त्यांनी ती जमीन व ते खोपट तुला व तुझ्या आईला राहण्यासाठी द्यायला सांगितले होते. तू आईला, नाही तर गावात कोणालाही विचार."

चंदाने एके दिवशी पतीने दिलेला फोटो काढला व न्याहाळून पाहिला. परंतु त्यावर श्यामरावांच्या चित्राव्यतिरिक्त तिला काही दिसले नाही. ती तो फोटो घेऊन पाटलाकडे गेली व नवऱ्याने सांगितले होते तसे सांगितले. तोच सर्व भांडणे सोडवी व न्याय निवाडा करी.

पाटलाने फोटो मागून पुढून न्याहाळून लक्षपूर्वक पाहिला. परंतु त्याला कोडे उलगडेना. नंतर त्याने फोटो हळून पुठ्ठ्यावरून सोडविला तेव्हा पुठ्ठ्यावर लिहिले होते ते त्याने वाचले.

"न्यायाधिशास, श्यामूचा नमस्कार. माझा थोरला मुलगा भीमू याला मी सांगितले होते की त्याने माझ्या धाकट्या मुलाला वडिलार्जित इस्टेटीचा वांटा देणे शक्य होत नसेल तर कमीत कमी पूर्वेकडची एक एकर पडीत जमीन व जमिनीतले खोपटे तरी अवश्य द्यावे. रामू मोठा झाल्यावर ती जमीन व खोपटे त्याच्या मालकीचे होईल. भीमूचा त्यावर अधिकार राहणार नाही. हा फोटोच माझा आत्मा समजून आपण माझ्या या शेवटच्या इच्छेचे पालन होण्यास हातभार लावावा."

पाटील थोडा वेळ विचारात पडला. नंतर गावातल्या पांच वडीलधाऱ्या मंडळींना बरोबर घेऊन भीमूच्या घरी गेला. म्हणाला—"भीमू! श्यामूचा आत्मा मला भेटून म्हणाला—माझ्या घरी जाऊन माझ्या मुलाला समजावून सांगा की एक एकर पडीत जमीन व जमिनीतले खोपट रामूला द्यावे. तुला एक भाऊ व त्याची आई आहे ना?"

"होय! मी त्यांना पूर्वेकडची ती जमीन व ते खोपटे रहायला दिले आहे." भीमू म्हणाला.

"तू म्हणतोस ते बरोबर आहे. परंतु तेवढ्याने भागणार नाही. तुझ्या बाबांची जी इस्टेट आहे तिचा अर्धा वांटा त्याला मिळाला पाहिजे. तुला ते मान्य नसेल तर ती पडीत जमीन व ते खोपट त्यांना कायमचे देऊन मोकळा हो." पाटील म्हणाला.

"मी तेवढी जमीन व खोपट लिहून देईन. या पलीकडे मी काही करू शकणार नाही." भीमू म्हणाला.

पाटलांनी भीमूच्या हाती तेवढे लिहून घेऊन त्यात स्पष्ट केले की त्या जमिनीवर किंवा खोपटावर यापुढें पूर्ण अधिकार रामूचा राहील.

त्यानंतर पाटलाने त्या कागदावर गावच्या प्रमुख मंडळींच्या साक्षीच्या सह्या घेतल्या आणि त्यांच्या समक्ष तो कागद रामूच्या हाती दिला.

रामूने कायम राहण्यासाठी खोपट पाडले तेव्हां श्यामूने भिंतीत ठेवलेले सोने व चांदी सापडली. त्या सर्वांवर रामूचा अधिकार भीमूला मानावा लागला. रामूचे पुढील आयुष्य सुखाचे झाले.





# मूल चोर

एका गावी पार्वती नावाची एक बाई रहात असे. तिला सहा वर्षे वयाचा एक मुलगा होता. तो रस्त्यात खेळत असतां त्याला चकाकत असलेले काही तरी दिसले. ती सोन्याची अंगठी होती. ती घेऊन तो घरी जाऊ लागला.

सोनदेव नावाच्या माणसाने अंगठी उचलत असता त्याला पाहिले आणि विचारले—"काय रे बाळा ते? पाहू तर दे!"

मुलाने मुठीतली अंगठी काढून दाखविली. सोनदेव त्याला म्हणाला—"वेड्या! तू अंगठी घेऊन काय करणार? तुझ्या बोटात यायची नाही. मी तुला पैसे देतो, जाऊन पेपरमीट, बिस्कीट काही तरी घेऊन खा. ती अंगठी देऊन टाक मला." असे सांगून मुलाला चार पैसे दिले आणि त्याच्या कडून अंगठी काढून घेऊन खिशात टाकली. मुलगा पेपरमिटाच्या आशेने गप्प राहिला.

मुलाच्या हातात पेपरमीट पाहून आईने त्याला विचारले—"कोणी रे दिले तुला हे पेपरमीट?"

"कां, मी दुकानात विकत घेतले आई!" मुलगा म्हणाला.

"अरे पण विकत घ्यायला पैसे कोठून आणलेस?" आईने विचारले.

"कां, मला सोनदेवकाकांनी दिले होते पैसे!" मुलगा म्हणाला.

"खुळचा! कोणी पैसे दिले तर घ्यायचे का? तुला लोक भिकारी म्हणतील." आईने थोड्याशा रागाच्या स्वरात विचारले.

"मी भीक मागायला नव्हतो गेलो. सोनदेवकाकांनी अंगठी घेऊन चार पैसे दिले!" मुलाने खरी गोष्ट सांगितली.

"अंगठी?" आईने रागाने विचारले.

मुलगा आतां मात्र भ्याला. त्याने त्याला अंगठी कशी मिळाली ते सांगितले.

पार्वतीला सोनदेवाचा राग आला. तिने त्याला विचारले—"काय हो! तुम्ही मुलाच्या हातातली अंगठी कां काढून घेतलीत? मी हाडाची काडे करून मुलाच्या बोटात अंगठी घातली आणि तुम्ही चार पैसे देऊन ती त्याच्या बोटातून काढून घेतलीत! दिवसा ढवळ्या रस्त्यावर चोरी करायला तुम्हाला लाज नाही वाटली?"

सोनदेव म्हणाला—"ताई! तुम्ही अशा भांडायला काय निघालात? कसली अंगठी आणि अंगठीच चोरी ती काय? मी लहान मुलगा आहे, असे समजून चार पैसे पेपर-मिटासाठी दिले होते. अंगठीची गोष्ट मला नाही माहीत!"

पण पार्वती गप्प बसते का? तिने राईचा पर्वत करून सोनदेवाशी भांडणच सुरू केले. गर्दी जमा झाली गंमत पहायला.

तितक्यात एक वृद्ध गृहस्थ आपला खिसा चाचपत पहात जवळ येऊन विचारू लागला—"थोड्या वेळापूर्वी मी इकडून जात होतो. त्या वेळी माझी अंगठी खिशातून खाली पडली. कोणाला ती सापडली असल्यास मेहरबानी करून द्या."

तेथे जमलेल्या लोकांनी खरी गोष्ट त्या म्हाताऱ्याला सांगितली.

पार्वतीला व सोनदेवाला तो म्हणाला—"तुम्ही तरी विचित्रच दिसतां की हो!



दुसऱ्या कोणाची तरी अंगठी आणि ती बळकावण्यासाठी तुम्ही दोघं भांडता आहां! ती अंगठी आहे माझी. मुकाट्याने ती द्या आणि चालू लागा पाहू!"

पार्वती व सोनदेव दोघांनी परस्परां-कडे पाहिले आणि आपला स्वर एकदम बदलून बोलू लागले. म्हणाले—"आम्ही मुलाच्या भांडणावरून बोलत होतो. मध्ये तुम्ही येऊन आमच्याशी भांडता आहां. चालू लागा. येथे कोणाजवळ अंगठी नाही."

तो म्हातारा बावळट नव्हता. त्याने जग पाहिले होते. म्हणाला—"अस्सं! तुम्ही दोघं आतां एक झालात नाही का? चला



पाटलाकडे, तेथं होऊ द्या, व्हायचा असेल तो न्याय निवाडा!"

पाटलाचे नाव ऐकताच दोघांच्या अंगाचा थरकांप उडाला. तरी हातातली अंगठी सोडायला तयार नव्हते ते. दोघं पाटलाकडे जायला तयार झाली.

पाटील न्यायाधिशाचे सुद्धा काम करी. तो लाचखोर होता. त्याचा न्याय म्हणजे ज्याच्याकडून जास्त पैसे मिळतील त्याचा बाजूचा न्याय असा नियम होता. तरी राजाच्या कानापर्यंत त्याच्या विरुद्ध गाऱ्हाणे न्यायला कोणी तयार नव्हता.

म्हाताऱ्याने पाटलाला भेटून अंगठी हरवल्याचे आणि पार्वती व सोनदेवा-जवळ ती असल्याचे सांगितले. त्या दोघांनी त्यांना त्या अंगठीविषयी काही एक माहिती नसल्याचे सांगितले. ते असे म्हणाले की तो म्हातारा त्यांना व्यर्थ बदनाम करीत आहे. परंतु पाटील पहिल्या नंबरचा वस्ताद होता. त्याने निरनिराळ्या प्रकारे प्रश्न करून त्या दोघांपैकी एकाजवळ अंगठी असल्याचे कबूल करविले. त्याने त्यांना प्रत्येकी वीस रुपयांचा दंड केला. दंड भरून व अंगठी पाटलाला देऊन पार्वती व सोनदेव दोघं निघून गेली.

ती दोघं निघून गेल्यावर तो म्हातारा पाटलाला म्हणाला—"तुम्ही मला जी मदत केलीत त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. आतां मी आपली अंगठी घेऊन परत जावे म्हणतो."

परंतु वस्ताद पाटील स्मित करून म्हणाला—"काका! अशी घाईगर्दी करून कसे भागेल? तुम्ही ही अंगठी घेऊन जाल आणि उद्या दुसरा कोणी उपटसुम्भ्या येऊन ती अंगठी त्याची असल्याचे सांगू लागला तर मी त्याला काय उत्तर देणार? तेव्हां तुम्ही विश्वास करण्या-लायक एखादे प्रमाण सांगा आणि अंगठी घेऊन जा. तोपर्यंत ही अंगठी माझ्याजवळ राहू द्या."

निर्भय होऊन त्या म्हाताऱ्याला मुका-ट्याने जावे लागले.

त्या दिवशी रात्री पाटील त्या गावचा सोनार गणूशेटकडे गेला व म्हणाला—"हे पहा गणूशेट! एका जरूरीच्या कामाने आलो आहे तुमच्याकडे. तुम्हांला माहीत आहे, मी कोणाकडे कर्ज मागायला जात नाही. म्हणून बायकोची ही अंगठी तिच्या बोटातून काढून घेऊन आलो आहे. या अंगठीची किंमत असेल तेवढी द्या."

गणूशेटने अंगठी लक्षपूर्वक पाहिली व म्हणाला—"ही अंगठी फार किमतीची आहे पाटील, कमीत कमी चारशे रुपयांची असेल. परंतु माझ्याजवळ आतां फक्त दोनशेच आहेत. याहून जास्त एक पैदेखील नाही. म्हणून तुम्ही ही अंगठी आणखी कोणाकडे नेऊन द्या."

पाटलाने विचार केला, ही गोष्ट चार कानी गेली तर बिंग बाहेर पडेल. म्हणून गणूशेटला म्हणाला—"गणूशेट! त्यात काय हो, दोनशे आतां द्या आणि बाकी रक्कम मागाहून सवडीने द्या."

गणूशेट दोनशे रुपये घेऊन आला. पाटील ते घेत म्हणाला—"पण हे पहा गणूशेट! ही गोष्ट या कानाची त्या कानाला कळता कामा नये बरं का! माझी मान खाली होईल!"



दुसऱ्या दिवशी पाटलाने गणूशेटकडे बाकी रुपये मागितले.

"रुपये! कसले रुपये, पाटील? कशासाठी मी देऊ म्हणता? मी केव्हां घेतले तुमच्या-कडून?" गणूशेटने पाटलाला चीतच पाडले.

"गणूशेट! माझ्या वाटेला जाऊ नकोस. मी तुझे डोके उडवीन, सरकारात जाऊन! तुला माहीत आहेच माझा इंगा!" पाटलाने धमकावले.

गणूशेट त्या धमकीला थोडादेखील भ्याला नाही. तो पाटलाबरोबर सरकार दरबारी गेला आणि पाटलाने केलेली तक्रार बरोबर असल्याचे त्याने मान्य केलं. राजाने गणूशेटला दंड केला.







गणूशेट हात जोडून राजाला म्हणाला– "महाप्रभो! आपण इतर लबाडांना जसा दंड व शिक्षा करता तशी या लाचखोर व लबाड पाटलाला दंड किंवा शिक्षा करावी."

राजाने चकित होऊन विचारले–"पाटलाने काय लबाडी केली रे?"

गणूशेटने अंगठीची गोष्ट अथपासून इतीपर्यंत राजाला सांगितली व पाटलाने ते सर्व खोटे असल्याचे सांगितले.

तेव्हां गणूशेट म्हणाला–"सरकार, मी ही अंगठी मूळ एका अधिकाऱ्याला करून दिली होती. परंतु त्या अधिकाऱ्याने परत येऊन सांगितले की त्यांच्या बायकोला हिऱ्याची अंगठी हवी होती. परंतु तेवढे पैसे खर्च करण्याची त्या अधिकाऱ्यात शक्ती नव्हती. म्हणून मी एक खोट्या हिऱ्याची कमी किमतीची अंगठी करून दिली. घरी घेऊन जात असता ती त्याच्या हातातून रस्त्यात पडली. पाटलांनी लबाडी करून तीच अंगठी कोठून तरी बळकावली आहे. मी ज्या अधिकाऱ्याला ही अंगठी करून दिली होती, ते आता दरबारात हजर आहेत."

गणूशेटच्या तोंडचे ते शब्द ऐकून तो अधिकारी चटदिशी उभा राहिला. त्याने गणूशेट म्हणाला ते खरे असल्याचे मान्य केले. पाटलाच्या लबाडीबद्दल राजाला राग आला. नंतर राजा गणूशेटला म्हणाला– "पण तूसुद्धा लबाडीच नाही का केलीस?"

गणूशेट स्मित करून म्हणाला– "आमच्या गावचे पाटील असली लबाडी वर्षानुवर्षे करीत आले आहेत, त्यांना आपल्यासमोर उभे करायला मला ही चांगली संधी मिळाली. म्हणून मी हे सर्व नाटक रचले, सरकार! मी लबाड असेन तर या नकली अंगठीसाठी मी दोनशे रुपये कां दिले असते?"

गणूशेटचे चातुर्य राजाच्या नजरेस आले. राजाने त्याची पाठ थोपटली व त्याला एक हजार रुपये बक्षीस म्हणून देऊन त्याचा गौरव केला. नंतर पाटलाला कामावरून काढून दंड दिला.





# खरा भक्त

एका गावी शंकरराव नावाचे एक मध्यम वर्गीय कुटुंबातले एक गृहस्थ रहात होते. त्यांनी आयुष्यातली सर्व सुखदुःखे भोगली होती. उतारवय झाले तेव्हां त्यांचे मन संसारातून विटले. त्यांनी सर्व संग परित्याग करून काशीला जायचे ठरविले. म्हणून चांगलासा दिवस पाहून ते काशी-यात्रेला निघाले.

वाटेत शंकररावांना आणखी तिघे यात्री येऊन भेटले. ते तिघे एकाच गावातले राहणारे होते. एकहोते, लखूशेट. ते सोन्या-चांदीचा व्यापार करीत. लक्षावधी रुपये मिळविले तरी त्यांना मानसिक शांती लाभली नाही. म्हणून पुण्य संपादन करण्यासाठी ते काशीयात्रेला निघाले होते.

उरलेले दोघे सख्खे भाऊ होते. थोरला यादवराव काशीला जाऊन पैसे मिळवावे या हेतूने निघाला होता. धाकटा चंद्रराव विद्याभ्यास करून पांडित्य संपादन करण्यासाठी निघाला होता.

चौघे पायी प्रवास करीत एका जंगलात येऊन पोचले. एका जागी झाडीत त्यांना चकाकत असलेली एक वस्तू दिसली. त्या वस्तूच्या शेजारी एका माणसाचे डोके आणि हाडे पसरलेली होती.

ती वस्तू पाहून शंकररावाखेरीज इतर तिघांच्या मनांत निरनिराळे विचार येऊ लागले. तिघे झाडीत शिरले. लखूशेट जव्हेऱ्याने तो हिरा असल्याचे सांगून चांगली किमत येईल असे सांगितले. म्हणाला–"एखाद्या राजबिंड्याच्या मुकुटात शोभेल असा हिरा आहे. हिऱ्याच्या मालकाला वाघाने गाठून खाल्ले असावे.

हिरा विकून पैसे कसे मिळवायचे व त्यांची वाटणी कशी करावयाची या गोष्टीचा तिघे मनातल्या मनात विचार करू लागले.



यादवराव विचार करू लागला–"याची किमत चौघांनी सारखी सारखी वाटून घ्यावी. मग काशीला जायची गरजच काय? एवढे पैसे असल्यावर गावातच व्यापार करतां येईल."

चंद्रावने विचार केला–"काशीला जाऊन किती विद्याभ्यास केला तरी किती पैसे मिळणार? या हिऱ्याच्या किमतीतून आपला वांटा मिळाला की आयुष्यभर काळजी करण्याचे कारण उरणार नाही. मोठ्या भावाबरोबर व्यापारात पैसे लावीन आणि खूप पैसे मिळवीन."

लखूशेट पुण्य संपादनाची गोष्ट पार विसरला. हा हिरा कमी किमतीत विकत घेऊन मोठ्या किमतीला विकला तर खूप फायदा होईल. तो का घालवावा?

परंतु शंकररावाच्या मनात हिरा पाहून कोणत्याही प्रकारची चलबिचल झाली नाही. मेलेल्या माणसांच्या हाडात सांपडलेला तो हिरा पाहूनच त्याच्या मनात घृणा उत्पन्न झाली होती. म्हणून त्याने त्या हिऱ्याचा किंवा तो विकल्यावर मिळणाऱ्या वांट्याचा मोह ठेवलाच नाही.

तिघांनी शेजारी एखादे गांव किंवा पेठ असेल तर हिरा विकून टाकण्याचा विचार केला. चंद्रराव सर्वांत लहान होता. तो एका उंच झाडावर चढला व मनुष्यवस्ती कोठे आहे का पाहू लागला. त्याने झाडावरून उतरून जवळपास कोठेही मनुष्यवस्ती नसल्याचे सांगितले.

काळोख पडू लागला होता. म्हणून तिघांनी रात्रभर त्या जंगलातच रहायचे ठरविले. त्यांनी तो हिरा उचलून झाडाच्या ढोलीत ठेवला आणि वाळक्या काटक्या गोळा करून त्यांचा जाळ केला. रानटी श्वापदे रात्री येतात व जाळ पाहून पळून जातात हे त्यांनी ऐकले होते. पाळीपाळीने एकाने पाहरा द्यायचे ठरले.

सकाळी उठून त्यांनी पाहिले तर चंद्रराव नव्हता. झाडाच्या ढोलीत ठेवलेला हिरादेखील नव्हता. चंद्रावच हिरा घेऊन पळाला असावा, असा विचार करून तिघे पुढल्या प्रवासाला निघाले.

थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांना चंद्ररावचे प्रेत दिसले. त्याचे सर्व अंग काळे निळे झाले होते. त्याच्या तोंडातून फेस बाहेर आला होता. त्याच्या एका हातात हिरा होता.

धाकट्या भावाचे प्रेत पाहून यादवरावाला फार वाईट वाटले. म्हणाला–"त्या हिऱ्याच्या मोहाला बळी पडला बिचारा. विद्याभ्यास करून त्याने चांगले नाव मिळविले असते. परंतु त्याची बुद्धी फिरली आणि तीच नागीण होऊन डसली.

लखूशेटने यादवरावाचे सांत्वन केले. परंतु शंकररावाचे शरीर पाया पासून मस्तकापर्यंत हादरले. तो हिरा पाहूनच त्याच्या अंगाचा थरकाप उडाला. त्या हिऱ्याने एकाचा जीव घेतला होता.

तिघांनी चंद्ररावाची उत्तरक्रिया केली व पुढल्या प्रवासाला निघाले. ते एका मोठ्या शहरात आले. गावाशेजारच्या एका धर्मशाळेत तिघे उतरले. शंकररावाने स्वत: साठी निराळी खोली घेतली. उजाडल्यावर दोघांना सांगायचे की हिऱ्याच्या किमतीतला वांटा आपल्याला नको, असे त्याने मनाशी ठरविले होते.

लखूशेट व यादवराव एका खोलीत राहले. त्यांनी हिरा आपल्याजवळ संभाळून ठेवला. त्यांनी उजाडण्यापूर्वी हिरा घेऊन पळून जायचे ठरविले, म्हणजे



हिऱ्याची गोष्ट कोणाला कळणार नाही. परंतु त्यांच्यावर दाराच्या फटीतून कोणाची नजर आहे हे त्यांना कळले नाही. कोणाची तरी त्या हिऱ्यावर नजर पडली होती.

सकाळी शंकरराव उठला आणि आपण मनांत ठरविलेले दोघांना सांगण्याच्या हेतूने दोघांच्या खोलीजवळ गेला. परंतु पाहतो तर दार उघडे आणि दोघे मृतावस्थेत पडलेले होते. त्यांच्याजवळचा हिरा कोणी चोरून नेला होता. त्या हिऱ्यासाठी कोणी त्यांचा खून केला होता. त्यामुळे शंकररावाच्या मनात सुरवातीपासूनच घृणा होती ती आणखी वाढली. त्या हिऱ्याने एका मागून एक त्याच्या तिघां साथीदारांचा जीव घेतला होता.

त्यानंतर शंकरराव एकटा काशीच्या वाटेने चालू लागला. ज्या गावाला त्याच्या दोघां साथीदारांचा खून झाला होता त्या गावाबाहेर पडल्यावर त्याला बैरागी व साधूंचे थवेच्या थवे काशीयात्रेला जात असलेले दिसले. त्यांना लांब लांब दाढ्या होत्या. कपाळावर व अंगभर भस्म लावलेले होते. गळ्यात रुद्राक्षमाळा होत्या. वरून त्यांचा चेहरा शांत व गंभीर दिसत होता. त्यांच्या बरोबर चालत असतां शंकररावाच्या मनात एका भोलेनाथाशिवाय दुसऱ्या कोणाचा विचार आला नाही. त्याचे चित्त शिवलीन झाले होते. बैरागी वाटेत भक्तिगीते व भजने गात जात होते. काही लोक त्यांच्या तालावर नाचत होते. त्यांच्या बरोबर चालत असतां शंकररावाला एका झाडीत एक चकाकणारी वस्तू दिसली. त्याच्या चारीबाजूला एका माणसाचे प्रेत पडले होते. त्या हिऱ्यासाठी त्याच्या साथीदारांची जी गत झाली होती, तीच हिरा चोरून नेणाऱ्या खुन्याची झाली होती. शंकरराव तोंड फिरवून तेथून काही बोलल्याशिवाय पुढे निघून गेला.

काही दिवसांनी तो काशीस सुखरूप पोचला आणि शिवचरणी सेवेत लीन झाला.






स्वयंप्रभेच्या गुहेतून बाहेर आल्यावर वानरांना समोर समुद्र दिसला. मोठ मोठ्या लाटा येऊन किनाऱ्यावर आदळत होत्या. सर्व वानर विंध्यपर्वताच्या नैऋत्य दिशेला फुलाफळांनी गदगदलेल्या झाडाखाली एका टेकडीवर त्यावेळी येऊन पोचले होते. ते विचार करीत होते, सुग्रीवाने दिलेला अवधी तर संपत आला होता. सुग्रीवाच्या तापट स्वभावाची आठवण करून सर्व भ्याले होते.

तेव्हां वानर युवराज अंगद इतर वानरांना म्हणाला–"वानर हो! आपल्याला सुग्रीवाने एका महिन्याचा अवधी दिला होता. तो तर संपला आहे, हे तर तुम्हांला सर्वांना माहीतच आहे. खरोखरी त्या देवीच्या गुहेत असतानाच अवधी संपला. अगदी सुरवातीला हनुमानाच्या सूचनेवरून सुग्रीवाने आपल्याला पंधरा दिवसांचा अवधी देऊन बोलाविले होते. ती गोष्ट आश्विन महिन्यात झाली. लक्ष्मण रागारागाने आल्यावर सुग्रीवाने आपल्याला पुन्हां बोलाविले. त्यानंतर त्याने आपल्याला परतायला एक महिन्याचा अवधी दिला. तो अवधी आतां संपला आहे. आतां आपण काय करायचे त्या विषयी विचार करणे आवश्यक आहे. आपल्याला अद्याप सीतेचा पत्ता लागला नाही. आपण सुग्रीवाच्या आज्ञेचा दोनदा भंग केला आहे. सुग्रीव म्हणजे कसा तापट आहे, हे तुम्हांला निराळे सांगायला हवे का? तो नक्कीच आपल्याला












ठार करील. आपण तिकडे जाऊन मरणाच्या यातना भोगण्यापेक्षा येथे उपोषण करून जीव दिलेला बरा. सुग्रीवाला माझ्यावर रागही आहे. मला युवराजपद मिळाले ते रामाच्या कृपेने, सुग्रीवाच्या इच्छेने किंवा कृपेने नाही. म्हणून कारण मिळाले तर तो मला ठार केल्याशिवाय राहणार नाही. तेथे सर्वांना दुःखी करून मरण्यात काय विशेष आहे? येथेच उपोषण करून मरणे बरोबर नाही का?"

ते ऐकून सर्व वानरवीर फार दुःखी झाले. म्हणाले—"आपल्याला सीतेची खुशाली कळली तरच आपण सुग्रीवाकडे परत जायचे, नाही तर येथेच मरायचे!"

परंतु तार म्हणाला—"आपण मरण्याचे कारणच काय? आपण या गुहेत जाऊन मरण येईपर्यंत सुखाने राहू या. जास्त काळजी करू नका. येथे खायला कमी नाही. येथे आपल्याला रामाची भीती नाही की सुग्रीवाची भीती नाही."

हे सर्व हनुमान गुपचुप ऐकत होता. तो विचार करू लागला—"सुग्रीवाचे राज्य अंगद नक्कीच काबीज करणार. वालीचा हा पोरगा कुशाग्र बुद्धीचा आहे. याला देश काल परिस्थिती बरोबर कळते."

नंतर तो अंगदाला म्हणाला—"अंगदा! तू युद्धविद्येत आपल्या बापाहून मोठा आहेस नाही का? तरी एका गोष्टीचा विचार कर! हे वानर चंचल स्वभावाचे आहेत. हे नेहमी तुझ्याबरोबर तुझ्या पाठीशी राहतील, अशी मनाची समजूत करून घेऊ नकोस. मला, जांबुवंताला व इतर प्रमुख वानरवीरांना सुग्रीवाविरुद्ध फोडणे तुला शक्य नाही. ही गुहा म्हणजे लक्ष्मणाच्या बाणांना अभेद्य नाही, हे लक्षात असू दे. साधे पान फाडून टाकावे तसा तो ही गुहा फोडून टाकील. तू सुग्रीवाशी वैर करून या गुहेत शिरलास तर हे सर्व वानर तुला सोडून निघून जातील. त्यानंतर तुझी काडीचीही किंमत राहणार नाही. रामलक्ष्मण तुला जिवंत सोडणार नाहीत.

सुग्रीव उदार स्वभावाचा आहे. त्याचा तुझ्यावर राग असण्याचे कारणच नाही. याशिवाय तुझी आई म्हणजे त्याला पट्टराणीसारखी आहे. तिचा तू मुलगा म्हणून तो तुला स्वतःच्या मुलासारखाच मानणार."

हनुमान म्हणाला ते ऐकून अंगद ते मान्य करण्याऐवजी म्हणाला—"सुग्रीवात कोणता असा चांगला गुण दिसला तुम्हांला? मोठ्या भावाने त्याला गुहेबाहेर राखण करायला ठेवले आणि आतून शत्रूला बाहेर जाऊ देऊ नकोस असे बजावून ठेवले होते. अशातऱ्हेने निश्चित झाल्यावर तो आत गेला. परंतु दुष्ट तो दुष्टच. सुग्रीवाने गुहेच्या तोंडावर दगड ठेवला. रामाने त्याच्यावर इतका उपकार केला, त्या उपकाराची फेड करण्याची गोष्ट सुग्रीव पार विसरला. शेवटी तो सीतेच्या शोधार्थ निघाला तो सुद्धा लक्ष्मणाच्या भीतीने. स्वतःच्या सद्बुद्धीने गेला नाही. अशा दुष्टाच्या हातून मी वाचेन याची काय शाश्वती? इतके स्पष्टपणे बोलून दाखविले असल्याचे कळल्यावर तर तो मला कधी जिवंत सोडणार नाही. मी किष्किंधेला मुळीच येणार नाही. मी येथेच उपोषण करतो. तुम्ही सर्व किष्किंधेला खुशाल जा. मी रामलक्ष्मणाची खुशाली विचारल्याचे



अंगद इतके म्हटल्यानंतर आपल्या आईची आठवण काढून बराच वेळ उदास मनाने बसून राहला. त्यानंतर त्याने सर्व वडीलधाऱ्या वानरांना नमस्कार केला आणि जमिनीवर दर्भासन घालून त्यावर पडून राहला. ते पाहून सर्व वानर रडू लागले. अंगद दृढनिश्चयी आहे, तो बदलणार नाही, हे ओळखून सर्वांनी समुद्रात आंघोळ केली आणि दर्भासने अंथरून त्यांवर बसले. त्यानंतर ते जुन्या गोष्टी आठवून विचार करू लागले. रामाचा वनवास, सीताहरण, जटायु मरण, सुग्रीव संभाषण, वालीवध, त्यांनी सीतेच्या शोधासाठी केलेले प्रयत्न










वानरांचा कोलाहल ऐकून एक राक्षसाकार घार बाहेर आली आणि म्हणाली– "आज आपल्याला पोटभर खायला मिळणार!" ते ऐकून सर्व वानर घाबरले.

अंगद हनुमानाला म्हणाला–"आपल्यावर हे काय नवीन संकट आले आहे? ही घार म्हणजे सूर्यपुत्र संपाती आहे. रामासाठी जटायूने कसा प्राणत्याग केला हे आपणांसर्वांना माहीतच आहे, नाही का? आपण तसा प्राणत्याग रामकार्यासाठी करू शकलो नाही, हीच दुःखाची गोष्ट!"

ते ऐकून संपाती मोठ्याने म्हणाला– "माझा धाकटा भाऊ मरण पावल्याची शोकवार्ता सांगून मला दुखविणारा कोण तो? जटायूचे आणि रावणाचे युद्ध कां झाले? मी बरेच दिवसांपासून जटायूची फक्त कीर्तीच ऐकत आलो आहे."

नंतर तो वानरांना पुढे म्हणाला–"सूर्यकिरणांची तीक्ष्णता असह्य होऊ लागली तेव्हां माझे पंख जळाले. म्हणून मला या पर्वतावरून खाली येता येत नाही. तुम्ही मला खाली उतरायला मदत करा."

ज्याने प्रथम वानरांना खाऊन टाकण्याचा विचार केला होता, तो जे हे सर्व बोलला त्यावर वानरांना विश्वास होईना. परंतु त्यांनी विचार केला आपण एवी तेवी मरण्याचेच ठरविले आहे, मग भिण्याचे कारण काय?

अंगद डोंगर चढून वर गेला आणि संपातीला खाली उचलून घेऊन आला. त्याने घडलेले वृत्त थोडक्यात सांगितले. म्हणाला–

"इक्ष्वाकु कुळात जन्मलेला राजा दशरथ याचा मुलगा राम आपल्या पित्याच्या आज्ञेप्रमाणे धाकटा भाऊ लक्ष्मण व पत्नी सीता यांना बरोबर घेऊन दंडकारण्यात आला. तो जनस्थानात रहात असता रावणाने सीतेला बळजबरीने उचलून नेले. रावण आकाशमार्गाने जात असता दशरथ राजाचा मित्र जटायू रावणाला आडवा आला. त्याने रावणाशी युद्ध केले आणि काही वेळ कां होईना सीतेचे रक्षण केले. परंतु शेवटी रावणाने त्याचे पंख कापून त्याला असहाय केले. रामाने जटायूला भेटून त्याचे सांत्वन केले व त्याचा अग्निसंस्कार वगैरे केला. नंतर राम किष्किंधेच्या बाजूला आला. तेथे त्याने माझा चुलता सुग्रीव याला मदत करून माझे वडील वाली यांचा वध केला. नंतर रामाने सुग्रीवाला वानरांचा राजा केले. त्या सुग्रीवाच्या आज्ञेने आम्ही सीतेच्या शोधार्थ इकडे आलो. परंतु आज पावेतो आम्हांला सीतेचा शोध लागला नाही. आम्ही परतलो तर सुग्रीव आम्हांला मृत्युदंड देईल किंवा रामाच्या हाती आम्हांला मरण येईल."

संपाती उच्च स्वरात म्हणाला–"तुम्ही रावणाशी युद्ध करून मरण पावला म्हणालात तो जटायू माझा धाकटा भाऊ होता. मी म्हातारा झालो आहे, पंखहीन झालो आहे. आतां रावणाशी युद्ध करून आपल्या धाकट्या भावाच्या वधाचा सूड घेण्याची शक्ती माझ्या अंगात उरली नाही. काय करावे, समजत नाही. वृत्रासुराचा इंद्राने वध केला त्या काळात आम्ही दोघे भाऊ परस्पराशी चढाओढ करून आकाशात उडालो व सूर्याच्या अगदी जवळ जाऊन पोचलो. तेव्हां जटायूला सूर्यकिरणांची



उष्णता असह्य झाली. म्हणून त्याला वाचवायला मी पुढे झालो. मी त्याला आपल्या पंखाखाली घेतले व माझे पंख पोळून गेले. मी विंध्यपर्वतावर आदळलो. तेव्हांपासून मी येथेच राहतो आहे. माझ्या धाकट्या भावाची खुशाली मला आजवर कळली नव्हती."

ते ऐकून अंगदाने संपातीला विचारले– "तो राक्षसांचा राजा रावण कोठे राहतो, तुला माहीत आहे का?"

संपाती म्हणाला–"बाबांनो! तो रावण एका अत्यंत सुंदर स्त्रीला घेऊन जात होता हे मी स्वतःच पाहिले. ती मोठमोठ्याने "रामा! रामा!" असे ओरडत होती व



तडफडत होती. तेव्हां ती सीताच होती यात मला तरी शंका उरली नाही. आतां रावणाची गोष्ट विचाराल, तर तो लंकेत राहतो. तो विश्रवसूचा मुलगा आणि कुबेराचा धाकटा भाऊ आहे. समुद्राच्या मधोमध शंभर योजनांच्या अंतरावर लंका द्वीपात तो राहतो. तुम्ही समुद्र पार करून गेलात तर तुम्हांला तेथे रावण व सीता दोघे मिळतील. तुम्ही रामाकरवी त्या दुष्ट राक्षसाचा वध करविलात तर माझ्या मनाचे समाधान होईल. आतां तुम्ही समुद्र पार कसा करायचा, ते पहा!"

नंतर वानरांनी संपातीला समुद्रतीरावर नेले. तेथे त्याने आपल्या भावासाठी तर्पण आदि संस्कार पूर्ण केले. सीतेचा शोध आता लागणार या आशेने वानरांना परमानंद झाला.

जांबुवंत इतर वानरांच्या वतीने संपातीला म्हणाला–"रावणाने सीतेचे हरण केले त्याविषयी तुला आणखी काही माहीत असेल तर सांग." तेव्हां संपाती म्हणाला–

"मी पंख जळल्यानंतर या पर्वतावर पडलो तेव्हांपासून आपल्या वृद्ध पित्याला म्हणजे मला माझा मुलगा सुपार्श्व हा दररोज एक वेळ येऊन पोटभर अन्नपाणी पोचते करतो आहे. एके दिवशी तो सूर्यास्त होईपर्यंत आला नाही. त्याला यायला उशीर झाला आणि काही खाद्य पदार्थ घेऊन आला नाही. एक तर मी म्हातारा आणि त्यात काही न खाल्ल्यामुळे माझा जीव कासावीस झाला होता. म्हणून मी त्याला खूप रागावलो. तेव्हां त्याने माझे सांत्वन करीत झालेले वृत्त सांगितले. तो ठरल्या वेळीच महेंद्र पर्वतावर आहार आणायला गेला तेव्हां त्याला एक काळा कभिन्न राक्षस विजेसारख्या चकाकणाऱ्या एका सुंदर स्त्रीला नेत असलेला दिसला. त्या दोघांना आहार म्हणून धरून घेऊन येण्यासाठी माझा मुलगा त्यांना आडवा आला. तो काळा राक्षस माझ्या मुलाला नम्रपणे 'बाजूला हो' म्हणाला. म्हणून सुपार्श्वने त्याला वाट दिली. त्यानंतर तो अत्यंत वेगाने निघून गेला. नंतर माझ्या मुलाने आकाश भूतांना विचारले की तो कोण होता व ती स्त्री कोण होती? तेव्हां त्यांनी तो राक्षसांचा राजा रावण असल्याचे आणि ती स्त्री रामाची सती साध्वी स्त्री सीता असल्याचे सांगून तो तिला बळजबरीने नेत असल्याचे सांगितले. तो उशिरां येण्याचे हेच कारण होते."

त्यानंतर वानरांनी संपातीला पुन्हां पर्वतावर पोचते केले. तेव्हां त्याने त्याच्या चारीबाजूला जमलेल्या वानरांना आपला एक जुना अनुभव वर्णन करून सांगितला. म्हणाला–

"मी पंख जळल्यावर या पर्वतावर पडलो तेव्हां येथे एक आश्रम होता. तो निशाकर नावाच्या एका थोर ऋषीचा आश्रम होता. ती गोष्ट होऊन आठ हजार वर्षे लोटली. मी पर्वतावरचे खाचखळगे ओलांडत कसाबसा त्या ऋषींजवळ पोचलो. तेथे एका झाडाखाली बसून मी महर्षींच्या दर्शनासाठी वाट पहात होतो. तेव्हां मला एक विचित्र दृश्य दिसले. दक्षिणेकडून ते स्नान करून येत असतां त्यांच्याबरोबर अस्वले, हरणे, वाघ, सिंह, हत्ती, नागसाप वगैरे येत असलेले दिसले. त्यांनी आश्रमात



प्रवेश करताच ती सर्व श्वापदे निघून गेली. आत जाऊन निशाकर महर्षी काही वेळाने बाहेर आले आणि विचारू लागले,–'धारीचे राजे असलेल्या दोघां भावांना मी ओळखतो. त्यांतला मोठा तू संपाती नाहीं का? जटायू तुझा धाकटा भाऊ नाही का? तुम्ही दोघे मधून मधून मनुष्यरूपे येऊन मला नमस्कार करीत होतां. तुला काही आजार बिजार तर नाही झाला. तुझे पंख कसे काय गळले? कोणी तुला शिक्षा तर नाही केली?'

"मी त्यांना घडलेले सर्व वृत्त सांगितले. कैलास पर्वतावर ऋषींसमोर मी व माझ्या भावाने प्रतिज्ञा केली की सूर्यास्त होण्यापूर्वी









आम्ही सूर्यापाठोपाठ उडतो. आम्ही बराच वेळ उडत राहालो. पृथ्वीवरची नगरे आम्हांला गाडीच्या चाकांसारखी भासली. वाटेत आम्हांला वेदघोष ऐकू येत होता. लालवस्त्रे परिधान करून गान करीत असलेल्या स्त्रिया दिसल्या. आम्ही आणखीवर उडू लागलो. मोठमोठी जंगले कुरणांसारखी, पर्वत दगडाधोंड्यांसारखे, नद्या पाऊलवाटांसारख्या दिसत होत्या. आम्हांला दम लागला, त्याच बरोबर भयदेखील वाटू लागले. डोके फिरू लागले, डोळ्यासमोर काळोखी आल्यासारखे, म्हणजे घेरी येत असल्यासारखे वाटू लागले. आम्ही कोठे, कोणत्या दिशेने चाललो आहो, कळत नव्हते. त्यावेळी सूर्य व पृथ्वी समान अंतरावर आहेत असे वाटत होते.

"तेवढ्यात जटायूला घेरी आल्यासारखे झाले व तो खाली पृथ्वीकडे पडू लागला. मी चटदिशी खाली आलो आणि त्याला आपल्या पंखाखाली घेतले. तेव्हां सूर्याच्या उष्ण किरणांपासून त्याचे रक्षण झाले, परंतु माझे पंख जळाले. जटायू बहुतेक जनस्थानात पडला. हे सर्व मी निशाकर महर्षींना सांगितले आणि म्हणालो–'आतां मला जगण्याची इच्छा उरली नाही. पर्वतावरून उडी टाकून जीव देण्याचा विचार करीत आहे.'"

"त्या महर्षींनी मला भविष्य सांगितले की, तुम्ही सीतेच्या शोधार्थ याल, मी तुम्हांला मदत करीन आणि त्यानंतर मला पुन्हां पंख फुटतील. म्हणून त्यांनी मला येथेच रहायला सांगितले."

संपाती हे सर्व सांगत असतां त्याला पंख फुटले. तो चमत्कार वानरांनी पाहिला. ते पंख व पिसे लाल भडक होती. संपातीला फार आनंद झाला व तो म्हणाला–"निशाकर मुनींचे भविष्य खरे ठरले, मला पुन्हां पंख आले. माझ्या अंगात शक्तीचा संचार होत आहे. तुम्हांला नक्कीच यशप्राप्ती होणार. मी आपल्या पंखांत किती बळ आहे, पाहतो." असे म्हणत संपाती आकाशात उडाला आणि अदृश्य झाला.





# अमरवाणी

सर्वथा सुकरम् मित्रम्,
दुष्करम् परिपालनम् ;
अनित्यत्वाच्च चित्तानाम्
प्रीति रल्पेपि भिद्यते ॥ १ ॥

[मित्र मिळविणे सोपे आहे, त्याला टिकविणे कठीण आहे, मन स्थिर रहात नाही, म्हणून लहान सहान कारणांवरून स्नेह (मैत्री) नष्ट होतो.]

मित्रम् ह्यर्थगुणश्रेष्ठम्
सत्यधर्मपरायणम्
त द्वयं तु परित्यक्तम्
न तु धर्मे व्यवस्थितम् ॥ २ ॥

[सत्याच्या आणि धर्माच्या आधारे जो मित्र होतो तो अर्थापेक्षा (पैशा पेक्षा) अधिक मोलाचा असतो, अशा मित्राला सोडणारा धर्माचरण करूच शकणार नाही.]

परोक्षे कार्यहंतारम्,
प्रत्यक्षे प्रियवादिनम्
वर्जये त्तादृशम् मित्रम्
विषकुंभ पयोमुखम् ॥ ३ ॥

[दृष्टीआड कामाचा बिघाड करणाऱ्या आणि समोर गोडगोड बोलणाऱ्या मित्राला सोडावे. तो वर तोंडाजवळ दूध आणि खाली विष असलेल्या मडक्यासारखा आहे.]



# मित्रभेद

[ २५ ]

सिंह नदीवर स्नानाला गेल्याबरोबर कोल्हा लांडग्याला म्हणाला–"मित्रा! मालक परत यायच्या आत तू खायला सुरवात कर. फार भुकेला आहेस. सिंहाला मी सांगायचे ते सांगून गप्प करीन."

लांडग्याने मागचा पुढचा विचार न करता उंटाच्या काळजाचा लचका घेतला.

सिंहाने परत येऊन पाहिले तर त्याला उंटाचे काळीज दिसले नाही. मोठ्याने गरजला आणि विचारले–"माझ्या आधी उंटाला तोंड कोणी लावले?"

"काय सांगायचे ते सांग! बोल ना आता!" असे म्हटल्या सारखे लांडग्याने कोल्ह्याकडे पाहिले.

परंतु कोल्हा हसत म्हणाला–"लांडगोबा! माझ्याकडे डोळे वटारून कशाला पाहतोस रे? तूच तर काळजाचा लचका घेतला होतास!"

लांडगा थक्कच झाला. आपला जीव वांचविण्यासाठी त्याने धूम ठोकली. सिंहाने त्याचा पाठलाग केला. नंतर 'या एवढ्याशा लांडग्याला ठार करून काय मिळणार?' असा विचार करीत परतला.

सिंह परत येऊ लागला त्या वेळी त्याला जोरजोराने घंटा ऐकू आल्या. तेथून थोड्या अंतरावरून एक कारवान जात होते. उंटांच्या गळ्यातल्या घंटा वाजत होत्या.

"हा आवाज कसला रे?" सिंहाने कोल्ह्याला विचारले.

"पळ काढावा लागणार आपल्याला महाराज! आपल्यावर फार मोठे संकट येणार आहे!" कोल्हा म्हणाला.

"का रे? कोणाकडून?" सिंहाने कोल्ह्याला विचारले.

"आपण पूर्वी मृत्यदेवतेला वचन नव्हते का दिलेत की उंटाला ठार केल्यावर शंभर टक्के व्याज देऊन मुद्दल फेडाल म्हणून? मुद्दल आणि व्याज वसूल करण्यासाठी मृत्यु देवता येत आहे." कोल्हा म्हणाला. ते ऐकताच सिंहाने तेथून पाय काढला. त्यानंतर कोल्ह्याने कित्येक दिवस त्या उंटाच्या देहावर आपला उदर निर्वाह चालू ठेवला

* * *

दमनक गेल्यावर संजीवक विचार करू लागला: "आतां मी काय बरे करणे बरोबर होईल? हे एक फार मोठे अरण्य आहे. मला कोणी वाघ किंवा चित्ता ठार केल्याशिवाय राहणार नाही. सिंहाने तर माझ्याशी वैरच करायचे ठरविले आहे. तेव्हां आता एकच उपाय आहे, सिंहाजवळ जाऊन प्राणाची भिक्षा मागावी!"

असा विचार करून संजीवक पिंगळकाकडे गेला. दमनकाने सांगितल्याप्रमाणे सिंह आपली शेपटी ताठ करून व दोन्ही पंजे आवळून बसला होता. नजर करडी होती. ते सर्व संजीवकाने पाहिले. ढुशी मारायला शिंगे पुढे करून उभा राहला.



पिंगळकाने, दमनकाने सांगितल्याप्रमाणेच संजीवकाच्या वागण्यात सर्व लक्षणे आहेत हे ओळखले आणि संजीवकावर तुटून पडला. त्याने आपली अणकुचीदार नखे संजीवकाच्या अंगात खुपसून त्याची पाठ फाडली व पोट फाडणार इतक्यात संजीवकाने न भितां सिंहाला आपल्या शिंगांनी मारले आणि मागे सरकून पुन्हां शिंगे मारण्याच्या तयारीत होता.

दोघे परस्परांना ठार करण्यासाठी झुंजत असलेले पाहून करटक दमनकाला म्हणाला–"मित्रांमध्ये असे भांडण लावून तू फार मोठे पाप केले आहेस. हे अरण्य कसे शांत होते, तू यांत अशांतता आणलीस. तू हा मार्ग काढून आपल्या मालकाचा जीव धोक्यात टाकलास. तुझ्यासारख्या मूर्ख

मंत्र्याचा सल्ला घेऊन त्याप्रमाणे वागल्याचा पश्चात्ताप आपल्या मालकाला झाल्याशिवाय राहणार नाही. त्यांना तोंड दाखविणेसुद्धा लज्जास्पद वाटते आहे. मालकाची चूकसुद्धा काही कमी नाही. मूर्ख राजे तुझ्यासारख्या अप्पलपोट्या मंत्र्यांच्या सल्ल्याप्रमाणे वागून स्वतःचा नाश स्वतःच अंगावर ओढून घेतात. तुझ्या सारख्याला हिताची गोष्ट सांगणे हे मागे एका माकडाला त्याच्या हिताची गोष्ट सांगितल्यासारखे फुकट आहे."

"काय रे ती गोष्ट? ऐकू दे तरी!" दमनकाने विचारल्यावर करटक गोष्ट सांगू लागला :

### निरर्थक उपदेश

एका अरण्यात एक माकडांचा कळप होता. थंडीचे दिवस होते. सर्व माकडे थंडीने थरथर कापू लागली. तेवढ्यात त्यांना एक काजवा दिसला. त्याला पाहून तो बारीक निखारा असावासा त्यांना वाटले. तो आणून पाचोळा जाळून जाळ करावा व शेकावे असे त्यांना वाटू लागले. त्यांनी तो काजवा एका जागी आणून ठेवला आणि त्यावर पाचोळ्याचा ढीग केला.

त्या माकडात एका माकडाला फारच जास्त थंडी वाजत होती. लवकर जाळ व्हावा, यासाठी त्याने त्या काजव्यावर फुंकर घालायला सुरवात केली. जवळच्या झाडाच्या फांदीवर बसून सुईसारखी अणकुचीदार चोच असलेला चिमणीसारखा लहान काळा पक्षी ते पाहून म्हणाला– "मित्रा! कशाला रे हा फुकट वारा घालतो आहेस? तो विस्तव नाही, काजवा आहे!"

माकडाने तिकडे दुर्लक्ष केले आणि फुंकत राहिला.

तो पक्षी वारंवार त्या माकडाला सांगतच राहिला. त्या मूर्ख माकडाला राग आला आणि म्हणाला–"गप्प बैस!" पण तो वेडा पक्षी त्या मूर्ख माकडाला तेच तेच सांगत राहिला.





# तिळ्या बहिणी

[ १३ ]

[ उदयन व त्याच्या दोघां भावंडांनी पाहरा देणाऱ्या राक्षसाला ठार केले. त्याच्या मोठ्या भावाने तिघां भावंडांना धरण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांनी माकडाचे रूप घेऊन सुटका करून घेतली. त्याच वेळी दाढीवाला तेथे आला आणि त्यांना वश झाला. मोठ्या राक्षसाला ठार करण्याच्या प्रयत्नात उदयन स्वतः त्याच्या हाताला सापडून विहिरीत पडला. पुढे– ]

राक्षस उदयनला जेव्हां विहिरीत टाकून निघून गेला तेव्हां दाढीवाल्याच्या रूपात असलेला उदयन विहिरीत निरुपाय अवस्थेत एक आठवडाभर पडून राहिला. त्याला बाहेर निघतां आले नाही. तिकडे त्याचे भाऊ निशीथ व संध्याकुमार आणि दाढीवाला भस्माच्या प्रभावाने अदृश्य रूपात जागच्या जागी पडून होते. कारण त्यांना स्वतःचे रूप येण्यासाठी आवश्यक असलेले भस्म उदयनजवळच राहून गेले होते. इकडे तिळी भावंडे या स्थितीत असतां तिकडे राजकन्यांना काही सुचेना. क्षणाक्षणाला नजरेस पडणारी भावंडे अदृश्य झाली होती. त्यांच्यावर कोणते संकट ओढवले असेल या काळजीत तिघी होत्या. त्यांना शोधण्याची तिघींनी खूप खटपट केली. जवळपासची सर्व जागा हुडकून चाळून काढली.



राजकन्या हुडकत हिंडत असतां उदयन पडला होता त्या विहिरीजवळसुद्धा आल्या. परंतु उदयन दाढीवाल्याच्या रूपात असल्यामुळे त्याची उंची जेमतेम वीतभरच होती. म्हणून राजकन्यांना तो दिसला नाही. त्या विहिरीजवळ आल्याची चाहूल त्याला लागली होती व त्याने आपल्या परीने मोठमोठ्याने हाका मारल्या होत्या, परंतु त्याच्या आकाराप्रमाणे त्याचा आवाज देखील लहानच झाल्यामुळे तो राजकन्यांना ऐकू आला नाही.

आपण किती हाका मारल्या, परंतु त्या राजकन्यांना ऐकू न आल्यामुळे त्यांना काहीच कळले नाही, या विचाराने उदयन जास्तच निराश झाला. परंतु सुदैवाने त्याच वेळी त्याला एक गोष्ट आठवली.

राक्षसाने आपल्याला विहिरीत टाकले त्यावेळी विहिरीच्या काठावरची तलवार सुद्धा विहिरीत टाकली होती. त्यानंतर तो तेथून गेला होता, उदयनला ती गोष्ट आठवली व त्याने ती तलवार काढली आणि विहिरीबाहेर फेकली. ती विहिरीच्या काठावरच्या जमिनीवर येऊन पडली. ती नजरेस पडली तर आपण विहिरीत असल्याची गोष्ट राजकन्यांना कळू शकेल, असा उदयनचा अंदाज होता. परंतु त्याच्या अंदाजाप्रमाणे ती तलवार राजकन्यांच्या नजरेस पडली नाही.

आणखी एक आठवडा लोटला. राजकन्या पुन्हा तिघां भावंडांना शोधत विहिरीवर आल्या. तेव्हां जमिनीवर पडलेली तलवार पाहून त्यांना फार आश्चर्य वाटले. "हे कसंबाई, मागच्या खेपेस आपण आलो त्यावेळी येथे तलवार दिसली नाही आणि आतां कोठून आली. कदाचित राक्षसाने उदयनला ठार करून या विहिरीत टाकले तर नसेल?" असा विचार करून तिघींनी विहिरीत वाकून पाहिले.

त्यांना एक विचित्र दृश्य दिसले. त्यांना हे पाहून आश्चर्य वाटले की विहिरीत निरनिराळी फळे दिसत होती व अर्धी विहीर फळांनी भरली होती. फळावर दाढीवाला उभा होता. त्याच्या हातात मंत्रवलेला पंचा होता. पंचातून फळांचे ढीग एकावर एक पडत होते. फळांनी विहीर भरत आली होती.

आश्चर्याने थक्क होऊन काही बोलल्याशिवाय राजकन्या ते दृश्य पहात उभ्या होत्या. आणखी काही वेळाने फळांचा ढीग काठापर्यंत येऊन पोचला. त्या ढिगावर दाढीवाल्याच्या रूपात राजकन्यांनी उदयनला पाहिले व हात धरून बाहेर काढले. तो हसतच बाहेर आला.

तेव्हां उदयनने, त्याने राक्षसाचे डोके कसे कापून विहिरीत टाकले, ते पुन्हां राक्षसाच्या धडावर येऊन कसे बसले आणि शेवटी राक्षसाने त्याला विश्वासघातकी नोकर म्हणून तलवारीसह विहिरीत कसे टाकले, सर्व वर्णन करून सांगितले. सर्व ऐकल्यानंतर राजकन्या म्हणाल्या—"काही असो, या मंत्रवलेल्या पंचामुळे तुझा जीव वांचला खरा! परंतु याच्या मदतीने अशा तऱ्हेने आपला जीव वांचविता येईल, तुला हे सुचले, ह्याबद्दल तुझ्या डोक्याची वाखाणणीच केली पाहिजे.

नंतर सर्व निघाले आणि निशीथ, संध्याकुमार व दाढीवाला अदृश्य रूपात होते तेथे आले. उदयनने जवळचे



त्या जागवर शिंपडल्याबरोबर त्यांना आपले रूप लाभले.

तेथपर्यंतचे सर्व वृत्त ऐकून दाढीवाला म्हणाला—"म्हणजे राक्षस, मलाच त्याने विहिरीत ढकलले असे, समजला म्हणावयाचा! एका तऱ्हेने हे बरेच झाले. यापुढे काय करावयाचे याविषयी विचार करायला हवा."

तेव्हां उदयन म्हणाला—"होय! तरमग या खेपेस येईल तेव्हां तो विहिरीत मी आहे की नाही, हे नक्कीच पाहील. मी तेथे नाही हे पाहून व विहीरभर फळे भरलेली पाहून त्याला नक्कीच संशय येईल."



"तो येईपर्यंत तेथे विहीर राहली तर ना ?" दाढीवाल्याने विहीर अदृश्य करायला सुचविले.

लगेच सर्व विहिरीजवळ गेले व त्यांनी भस्म शिंपडल्याबरोबर विहीर नाहीशी झाली. त्या जागी सपाट जमीन झाली.

नंतर उदयन दाढीवाल्याला म्हणाला— "आता तू एक ज़रूरी काम करावयाचे आहे. आम्ही राजकन्यांच्या शोधार्थ निघालो त्या गोष्टीस सात वर्षे होऊन गेली. तिकडे राजा, राणी व इतर लोक आमचे काय झाले या काळजीत असतील. म्हणून तू आतांच श्रावस्ती नगरीस जायला नीघ खुशाल असल्याचे त्यांना कळव. आम्ही लवकरच परत सुखरूप परत येऊ, काळजी करू नये, असे त्यांना सांग."

दाढीवाल्याने होकारार्थी मान हलविली आणि लगेच श्रावस्ती नगरीस निघाला. तेव्हां उदयन, अगदी सुरवातीला या माया महालाकडे येत असतां खंदकात कसा पडला आणि त्याने खंदकात आपला घोडा कसा सोडला आणि कसा बाहेर आला हे सांगून म्हणाला—"तू पायी गेलास तर तुला श्रावस्ती नगरीस पोचायला फार दिवस लागतील. म्हणून घोड्यावर बसून जा. याशिवाय ते तुझ्या बोलण्यावर कदाचित विश्वासही करणार नाहीत. परंतु घोड्याला ओळखून तू आमचा निरोप घेऊन आला असशील असे त्याना साहजिकच वाटेल."

त्याप्रमाणे उदयनच्या पांढऱ्या घोड्यावर दाढीवाला निघाला. तो जात असता एका मैदानात दानशील राजाने पाठविलेल्या सैनिकांनी उदयनच्या घोड्यावर बसून आलेल्या दाढीवाल्याला पाहिले. ते सैनिक संध्या व निशीथ यांच्या घोड्यावर बसून येत होते. त्यांनी उदयनच्या पांढऱ्या घोड्याला ओळखले. एका अनोळखी माणसाला त्या घोड्यावर येत असलेला त्यांनी दाढीवाल्याला विचारले— "कोण रे बाबा, तू? तुला हा घोडा कोठे व कसा सापडला? आणि तू कोठे निघालास हे सांगा आणि त्यानंतर पुढे पाऊल टाक."

दाढीवाला म्हणाला—"मी दानशील महाराजांकडे एक शुभवार्ता पोचविण्यासाठी जात आहे. नंतर तुम्ही ज्या घोड्यांवर बसून येत आहां ते घोडे मी पूर्वी पाहिलेले आहेत. तुम्ही महाराजांचे सेवक आहां वाटते ?"

"होय! पण तू जी शुभवार्ता म्हणालास ती काय, प्रथम सांग!" सैनिक म्हणाले.

"राजकन्या व त्यांना शोधायला गेलेले तरुण युवक सुखरूप आहेत. ही गोष्ट महाराजांना कळवायची आहे." दाढीवाला म्हणाला.

"अस्सं! तर चल, आम्ही येतो तुझ्या बरोबर!" दोघे सैनिक म्हणाले.

"तसं नाही. आपण असं करू या. आपण प्रथम राजकन्या आहेत त्या जागी जाऊ या. तुम्ही दोघे तेथेच रहा. मी परत येऊन महाराजांकडे ही बातमी पोचती करतो." दाढीवाला म्हणाला.

"बरं! म्हणत ते सर्व राजकन्या व तिळी भावंडे होती त्या जागी आले. सैनिकांना तेथे रहायला सांगून दाढीवाला श्रावस्तीनगरीला निघाला.





काही अंतर गेल्यावर वादळी वारा एकाएकी सुरू झाला. राक्षस येण्याची ती खूण होती. ती ओळखून दाढीवाल्याने घोड्याला टाच मारली आणि वायुवेगाने घोडा भरधाव सोडला. परंतु राक्षसाने त्याला गाठले आणि घोड्याच्या पाठीवरून दाढीवाल्याला अलगद उचलले आणि आकाशमार्गाने निघून गेला.

परंतु घोडा इकडेतिकडे भटकत एका आठवड्याने श्रावस्ती नगरीस येऊन पोचला. तो सरळ राजवाड्यात गेला. राजाने त्याला ओळखले व धावतच जवळ आला. राजा त्याला चुचकारून उभा करीत होता. परंतु घोडा थांबायला तयार नव्हता. उलट्या दिशेने परत फिरला.

नोकरचाकर असेल. राजा त्यांना म्हणाला–"उदयन कोठे गेला आणि हा घोडा एकटा इकडे कसा काय आला आणि आतां परत कां फिरला, काही कळत नाही. त्याच्या या वागण्यावरून त्याचा मालक व इतर दोघे कोणत्या तरी संकटात सांपडले असावेत, असे वाटते. नक्कीच यात काही तरी गुपित असले पाहिजे. म्हणून घोडा ज्या दिशेला जाईल त्या दिशेने त्याच्या पाठोपाठ जाऊन, काय होईल ते परत येऊन सांगा."

राजा असे बोलत असता घोड्याला आवरणे नोकरांना अशक्य झाले. घोडा पळू लागला. राजाचे नोकर त्याच्या पाठीमागून निघाले. परंतु घोडा एकदम थांबला व 'थांब!' अशी मानेने त्याने जणू खूण केली.

ते पाहून राजाच्या मनात एक विचार आला. मंत्र्याला बोलावून तो म्हणाला– "मंत्री! हे नोकर बरोबर आलेले घोड्याला नको आहेतसे दिसते. त्यांना परत मागे पाठवा आणि फक्त तुम्ही एकटे त्याच्या पाठीमागून जा."

नोकरांना मागे महालात पाठविण्यात आले. घोडा पुन्हां पुढे चालू लागला. त्याच्या पाठीमागून एकटा मंत्री निघाला.

* * *

तेथे राजकन्या, तिळी भावंडे फार विचारात पडली होती. शुभवार्ता सांगून परत येतो, असे वचन देऊन निघालेला दाढीवाला इतका काळ लोटला तरी परत न आलेला पाहून त्यांना काळजी वाटणे साहजिक होते. दहा दिवस झाले होते. त्यांच्या डोक्यात निरनिराळ्या प्रकारच्या शंकाकुशंका येत होत्या.

शेवटी एके दिवशी उदयन आपल्या भावंडांना म्हणाला–"तो बिचारा कोणत्या संकटात सांपडला आहे, कोण जाणे? मीच स्वत: श्रावस्ती नगरीला जाऊन यावे, म्हणतो. तोंपर्यंत तुम्ही काळजीपूर्वक रहा. जरूर वाटल्यास या भस्मांचा उपयोग करा." असे सांगून त्याने त्यांना थोडे पांढरे भस्म व थोडे काळे भस्म दिले आणि निशीथाच्या काळ्या घोड्यावर बसून निघाला.

उदयन वाटेत एका राजाच्या राज्यातून जात होता. त्याला एक आंधळा दिसला. तो काठीने चाचपत हळूहळू चालत होता. दुर्दैवाने तो पाय घसरून एका खड्यात पडला. उदयनने लगेच घोडा थांबविला. त्या आंधळ्याला खड्ड्यातून बाहेर काढले. त्याने आपल्या जवळचे अंजन त्याच्या डोळ्यांना लावले आणि आश्चर्य म्हणजे आंधळ्याला छान दिसू लागले. त्याने



उदयनचे आभार मानले आणि आपल्या घरी यायला त्याला आग्रहाने विनंती केली.

ते ज्या घरी आले त्या घरचा मालक त्या देशाच्या राजाचा नोकर होता आणि तो आंधळा त्याचा बाप असल्याचे कळले. आपल्या बापाला दृष्टी आलेली पाहून मुलाला परमानंद झाला. त्याने उदयनचे आभार मानले. त्याला जणुकाही उदयनच्या रूपाने देवच पावला होता. ती बातमी गावभर, एवढेच नव्हे तर, राजाच्या दरबारात देखील पोचली.

राजाने नोकरांना पाठवून उदयनला आदरपूर्वक बोलावून आणायला सांगितले. उदयन दरबारात आला. राजाने सर्व प्रकारे

त्याचा सत्कार करून विचारले–"तू कोण? कोठून आलास? तुझ्यासारख्या देव माणसाला आजपर्यंत आम्ही कोठे पाहिले नाही. तू आमच्या दरबारात राहून दरबाराची मान प्रतिष्ठा वाढवा!"

तेव्हां उदयन म्हणाला–"महाराज! आपण माझ्यावर दर्शविलेला प्रेमादर मी कधीच विसरणार नाही. परंतु मी आज एका महत्वाच्या कामावर जात आहे. ते काम पुरे करून मी परतते वेळी महाराजांच्या दर्शनास अवश्य येईन.

राजाने अत्यंत प्रेमाने उदयनला निरोप दिला. त्यानंतर वाटेत कोणत्याही प्रकारचे विघ्न आले नाही आणि उदयन एका आठवड्याने श्रावस्तीला येऊन पोचला.

उदयनला पाहताच दानशील राजाने धावत येऊन प्रेमाने त्याला आलिंगन केले. उदयनने राजकन्या खुशाल असल्याचे सांगितले. राजाच्या मनाचे समाधान झाले. उदयनने त्या वेळेपर्यंत घडलेल्या सर्व गोष्टी थोडक्यात सांगितल्या व म्हणाला–"तुम्ही कारण नाही. आम्ही सर्व लवकरच तुमच्या मुलींना घेऊन सुखरूप परत येऊ."

ते ऐकून राजाचे हृदय भरून आले. राणीला तर काय बोलू व काय करू असे झाले. सर्व प्रजा आनंदसागरात मग्न झाली. दुसऱ्या दिवशी पहाटे उठून उदयन राजाचा निरोप घेऊन आणि आईचा आशीर्वाद घेऊन माया महालाच्या दिशेने निघाला.

त्याने बरोबर आणखी कोणाला घेतले नाही. तो एका आठवड्याने माया महालात येऊन पोचला. परंतु तेथे आल्यावर त्याने जे दृश्य पाहिले ते पाहून तो भीतीने थरथर कापू लागला. ते दृश्य भयंकर होते.

उद्यानातल्या एका झाडाला पांच फाशीच्या दोऱ्या लोंबकळत होत्या. संध्या, निशीथ व दाढीवाला आणि श्रावस्तीहून आलेले दोन नोकर सर्वांना क्रमाने बसवले होते. त्यांचे सर्वांचे हातपाय आवळून बांधलेले होते. समोर वाघासारखा राक्षस उभा होता. (क्रमशः)



# अंधत्वाची फिकीर

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन पुन्हा स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! या जगात किती मोठी योग्यता असली तरी कधी कधी मान खाली होते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला विष्णुशास्त्रीची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी वंगदेशावर चंद्रवर्मा नावाच्या राजाचे राज्य होते. तो विचारी व शांत स्वभावाचा होता; राज्यकारभारातही तो कुशल होता. परंतु त्याला ज्योतिष् शास्त्राचे इतके वेड होते की कोणी ज्योतिषी आला तरी तो त्याला आपली जन्मकुंडली दाखवून भविष्य सांगायला सांगे.



एकदां त्याच्या दरबारात विष्णुशास्त्री नावाचा एक ज्योतिषी आला. राजाने त्याला संवयीप्रमाणे आपली जन्मकुंडली दाखवून आपले भविष्य वर्तविण्यास सांगितले.

विष्णुशास्त्र्याने राजाची जन्मकुंडली लक्षपूर्वक पाहिली व म्हणाला–"जो खरा ज्योतिषी असतो त्याने कोणाच्या तोंडाकडे पाहून ज्योतिष्य सांगू नये. तेव्हां जसे आहे तसे मी सांगतो, राग मानू नये. बरोबर अठरा वर्षांनी या देशात दुष्काळ पडेल. तो दुष्काळ फक्त एक वर्षभर राहील. परंतु दुष्काळ संपल्यावर बरोबर दोन वर्षांनी आपल्या दोनही डोळ्यांची दृष्टी जाण्याची भीती आहे. मी हे भविष्य सांगितल्याबद्दल क्षमा करावी. राग मानू नये."

"परंतु शास्त्री बुवा हे संकट टळायला काही उपाय असेलच की नाही?" राजाने नम्रपणे विचारले.

विष्णुशास्त्र्याने पुन्हा आडव्या उभ्या रेखा काढल्या आणि काही गणित करून म्हटले–"एक मार्ग आहे. परंतु ती गोष्ट आपण कोणाला सांगता कामा नये. एक कुरूप असा मांत्रिक आपण बोलाविल्याशिवाय आपणांकडे येईल. त्याच्या मंत्रबळाने आपली नेत्रज्योती जाणार नाही. त्याहून जास्त मला काही सांगता येणार नाही."

राजाने विष्णुशास्त्र्यांना बिदागी देऊन आदरपूर्वक निरोप दिला.

त्यानंतर अठरा वर्षांनी विष्णुशास्त्र्याने सांगितल्याप्रमाणे देशात दुष्काळ आला. परंतु राजाने पूर्वीच काळजी वाहून अन्नधान्याचा भरपूर पुरवठा करून ठेवला असल्याने प्रजेला फारसा त्रास झाला नाही. दुसऱ्या वर्षी नेहमीप्रमाणे पाऊस पडला. दुष्काळात राजाने आपणांस वांचविले म्हणून प्रजेने राजाची फार स्तुती केली.

परंतु राजाला दुसरीच काळजी वाटत होती. अठरा वर्षांनी दुष्काळ येईल असे विष्णुशास्त्र्यांनी सांगितले होते, ते खरे ठरले त्याचप्रमाणे आपल्या डोळयांची ज्योती जाणार हे भविष्यही खरे ठरणार असे वाटून राजा काळजी करू लागला होता. कोण कुरूप मांत्रिक येऊन आपल्यावरचे ते संकट टाळण्यास मदत करतो या गोष्टीची राजा वाट पाहू लागला.

त्याच सुमारास त्याच्याकडे कलिंगदेशाच्या राजाकडून व काश्मीरच्या राजाकडून जवळजवळ एकाच वेळी एकाच तऱ्हेचा निरोप आला. त्यांच्यावर प्राणसंकट आले असतां वरुणशास्त्री नांवाच्या कुरूप मांत्रिकाने येऊन होम, जपतप करून एक मंत्रवलेले कंकण हातात बांधले व त्यामुळे जिवावरचे संकट टळले. कलिंग राजाने पुढे असे लिहून पाठविले :

"आम्ही वरुणशास्त्र्यांना आमच्या दरबारात रहावे अशी आग्रहाची विनंती केली होती. परंतु त्यांनी नकार दिला. एवढेच नव्हे तर त्यांनी जन्मस्थान आपले कोठे आहे स्वतःचे हे सांगण्याचे सुद्धा नाकारले. तरी पण आम्ही आमच्या शिपायांना त्यांच्या पाठोपाठ पाठवून ते आपल्या देशाचेच रहिवाशी असल्याची माहिती मिळविली आहे. अशा मांत्रिकाकडून आपल्याला येणारे अंधत्व टाळतां आले तर टाळावे."

ती पत्रे पाहून राजाला वाटले की तो वरुणशास्त्री आपणांकडे लवकरच येईल.

राजाचा अंदाज बरोबर निघाला. एका आठवड्याने वरुणशास्त्री आला. त्याचे वय सुमारे पंचवीस वर्षांचे होते. तो लठ्ठ,





काळा, दांत पुढे आलेले दिसायला अगदी कुरूप होता.

चंद्रवर्माने त्याचे आदरातिथ्य करून त्याला आपली जन्मकुंडली दाखविली. ती पाहून वरुण म्हणाला–"महाराज! आपण सुर्योपासना आणि जप वगैरे करायला हवेत. आपल्या डोळ्यांची ज्योति जाणार असे दिसते आहे. परंतु मी या संकटातून आपणांस वाचवू शकेन."

चंद्रवर्म्याने वरुणशास्त्रीने सांगितल्या-प्रमाणे सुर्योपासना, जप वगैरे केले. तो सर्व विधी संपल्यावर वरुणशास्त्री म्हणाला–"महाराज! आपल्याला इष्ट असेल ती

राजाने त्याला गप्पागोष्टीत विचारले–"शास्त्रीबुवा! आपले वडील कोण? कोठे राहतात व काय करतात?"

वरुणशास्त्री म्हणाला–"माझे वडील माझ्या लहानपणीच वारले."

"असं होय! अरेरे! आपल्यासारख्या प्रतिभाशाली विद्वत्‌रत्नाला जन्म देणारा तो भाग्यवान पिता कोणत्या लोकात वास करीत आहे, त्या परमेश्वरालाच माहीत! आपण आपल्या वडिलांच्या श्राद्धाच्या आधी यावे. त्यांचे श्राद्ध थाटमाटाने करू. त्यानंतर आपल्याला भरपूर बिदागी वगैरे देऊन आपला सत्कार करण्यात येईल." चंद्रवर्मा म्हणाला.

वरुणशास्त्री म्हणाला–"आमच्या वडिलांचे श्राद्ध परवां आहे. म्हणून मला लवकर घरी जाणे आवश्यक आहे!"

"तसे असेल तर जाण्याची गरजच नाही. येथेच थाटाने श्राद्ध करू. गावांतल्या सर्व ब्राह्मणांना बोलावून संतर्पण करू. परवां संध्याकाळी तुमच्या बिदागी वगैरेचा समारंभ होईल."

वरुणशास्त्रीने कोणालाच बोलाविले नाही. परंतु चंद्रवर्मा विष्णुशास्त्र्यांना खास निरोप पाठवून बोलावून वरुणशास्त्र्यांची ओळख करून देत म्हणाला–"आपण

यांच्या वडिलांचे श्राद्ध आहे. थाटा माटाने श्राद्ध झाले पाहिजे बरं का? ह्यांच्या वडिलांच्या आत्म्याला पूर्ण शांती लाभली पाहिजे!"

परंतु विष्णुशास्त्र्यांच्या तोंडावर आनंदाची एक छटासुद्धा दिसली नाही.

श्राद्धविधी संपत आला आणि पिंडदानाची वेळ आली. नेमके त्यावेळी विष्णुशास्त्री ओरडून म्हणाले–"थांबा!"

चंद्रवर्म्याने लगेच सर्व विधी थांबवायला सांगितला आणि म्हणाला–"या वरुणशास्त्र्याला एक महिनाभर तुरुंगात डांबून ठेवा. आणि या विष्णुशास्त्र्यांना ज्योतिष्य सांगण्याचा अधिकार मी काढून घेतो. यांच्या ज्योतिष्यावर कोणी विश्वास करू नये अशी राज्यभर दवंडी पिटवा."

त्या दिवशी सायंकाळी चंद्रवर्म्याने विष्णुशास्त्र्याला शंभर वराह देऊन निरोप दिला. जाते वेळी विष्णुशास्त्र्याने चंद्रवर्म्याच्या कुशाग्रबुद्धीची व उदार हृदयाची वाखाणणी केली.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–"राजा! विष्णुशास्त्र्याने श्राद्धकर्म मध्येच कां थांबविले? त्याच्या ज्योतिष्यावर कोणी विश्वास करू नये, राजाने अशी दवंडी पिटायला कां सांगितली? राजावर ओढव-



णारे संकट टाळण्याला कारण झालेल्या वरुण शास्त्र्याला तुरुंगवासाची शिक्षा कां झाली? या प्रश्नांची उत्तरे माहीत असून तू दिली नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"वरुणशास्त्री हा विष्णुशास्त्र्यांचाच मुलगा असल्याचे राजाला स्पष्ट झाले. कुशाग्र बुद्धी चंद्रवर्म्याला ती गोष्ट रुजू करण्यात यशही आले. त्याला संशय यायला मुख्य कारण झाली ती कलिंगराजाची आणि काश्मीरच्या राजाची पत्रे होती. त्या राजांना वरुणशास्त्र्यानेच चंद्रवर्म्याच्या नेत्ररोगाची









गोष्ट सांगितली असली पाहिजे. वरुण शास्त्री त्यापूर्वी चंद्रवर्म्याला भेटला नव्हता किंवा त्याने राजाची जन्मकुंडली पाहिली नव्हती. त्याला विष्णुशास्त्र्यांकडूनच राजाच्या नेत्ररोगाची गोष्ट कळली असावी. त्याच्याकडून राजाने बापाचे श्राद्ध करविले. तो दुसऱ्याचे गंडांतरे मंत्रबळाने दूर करीत होता तर त्याला देवाची फिकीर करण्याचे कारणच काय? तो खरोखरच मांत्रिक होता तर कोणाच्या दरबारात रहायला नकार देण्याचे त्याला कारणच नव्हते. आपल्याला थोर कीर्ती किंवा प्रतिष्ठा नसल्याने चंद्रवर्मा राज्यात रहायला आग्रह करणार नाही अशी वरुणशास्त्र्याची समजूत होती. स्वतःचा देश लपवून ठेवण्याची त्याला गरज नव्हती. तो शिक्षा करण्या योग्य लबाडच होता. विष्णुशास्त्री चांगला ज्योतिषी नव्हता असे म्हणता येणार नाही. कारण फार पुढे येणाऱ्या दुष्काळाची गोष्ट त्याने बरोबर सांगितली होती. परंतु आपल्या ज्योतिष्यशास्त्राच्या आड त्याने आपल्या निकामी मुलाच्या पोटापाण्याची व्यवस्था करण्याच्या हेतूने दुसरे खोटे भविष्य वर्तवले होते. एवढेच नव्हे तर दूर दूरच्या राजांना खोटे भविष्य सांगून आणि आपल्या मुलाला मांत्रिक म्हणून त्यांच्याकडे पाठवून त्यांच्यावरची खोटी संकटे दूर करविण्याचे नाटक विष्णुशास्त्र्याने केले. म्हणून विष्णुशास्त्र्याचा ज्योतिष्य सांगण्याचा अधिकार राजाने काढून घेतला. परंतु त्याच्यात प्रतिभा होती ती ओळखून चंद्रवर्म्याने त्याला शंभर वराह पारितोषिक म्हणून दिले. आपले गुपित राजाने बरोबर ओळखले हे कळल्यावर आपल्याला शिक्षा न करतां पारितोषिक देऊन राजाने निरोप दिला या बद्दल राजाच्या औदार्याची वाखाणणी विष्णुशास्त्र्याला करावी लागली."

अशातऱ्हेने राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# न्यायनिवाडा

विशाल देशाचा राजा शतानन याला आपल्या राज्यात न्यायनिवाड्यात कोणत्याही प्रकारे गडबड होता कामा नये व हंसासारखा पाण्याचे पाणी आणि दुधाचे दूध दर्शविणारा शुद्ध न्याय व्हावा असे वाटत होते. त्याने ती गोष्ट आपला प्रधान बृहन्मती यास सांगितली तेव्हां त्याने ती गोष्ट असाध्य व अशक्य असल्याचे सांगितले.

त्या काळात रघुनाथ नावाचा एक थोर वैज्ञानिक होता. मोठमोठे प्रयोग करून तो काही अपूर्व वस्तू तयार करून निरनिराळ्या देशांच्या राजांना दाखवून म्हणे,—"तुम्हांला या वस्तूचा काही उपयोग होईल का पहा." तो त्या वस्तूचा उपयोग कसा करावयाचा हे प्रत्यक्ष प्रयोग करून दाखवी. त्याला त्याबद्दल मोठमोठी बक्षिसे मिळत. या रघुनाथाने शतानन महाराजांच्या मनातली इच्छा कित्येकांच्या तोंडी ऐकली होती.

एकदां रघुनाथ विशाल देशात आला आणि शतानन महाराजांना भेटून त्याने एक पेटी त्यांना दाखविली. त्या पेटीत एक यंत्र होते. त्या यंत्राविषयी रघुनाथ शतानन महाराजांना म्हणाला.

"फार पूर्वी आपण एकदा प्रधानांना म्हटल्याचे मी कोणाकडून तरी ऐकले की बिनचूक निःसंशय असा न्याय-निवाडा कसा होईल याला काही उपाय आहे का? मी अनेक प्रयोग करून हे यंत्र तयार केले आहे. या यंत्राच्या साह्याने मनुष्याच्या शरिरात होणारा सूक्ष्मात सूक्ष्म कंप प्रगट होतो. पहा, यात एक कांटा आहे. शून्यापासून दहा पर्यंत आंकडे आहेत. कोणी हे यंत्र हातात धरून किंवा त्यावर हात ठेवून बोलला तर हा कांटा चाराच्या आंक-



डयाच्या पुढे जात नाही. परंतु जर तो त्यापुढे गेला तर तो खोटे बोलतो आहे, हे कळते. या यंत्राच्या मदतीने न्याया-धिशाला त्याच्या समोर आलेला अपराधी खरोखर आरोपी आहे की नाही हे कळेल. तो खरे बोलतो आहे की खोटे हे यंत्र बिनचूक सांगेल."

ते ऐकून प्रधान बृहत्मती म्हणाला– "विद्वत्वर! अपराध हा मनात असतो आणि हे यंत्र भौतिक देहात होणारा कंप दर्शवू शकते. म्हणून या यंत्राच्या सहाय्याने अपराधी ओळखणे कठीण आहे. मानसिक बदल व शारीरिक बदल दोन्ही या यंत्राने कळणे शक्य नाही."

रघुनाथ स्मित करून, म्हणाला– "प्रधान! मनात होणाऱ्या विकारांचा परिणाम भौतिक देहावर नक्कीच होतो आणि तो कंपनाने प्रगट होतो. तेव्हां या यंत्राद्वारे ते शक्य कां होणार नाही? अपराध हा मनात असतो हे मी मानतो. परंतु आपले शरीर हे मनाच्या आज्ञेप्रमाणेच नाही का चालत? मनात लपविलेल्या गोष्टीमुळे सारा देह लहान मोठ्या फरकाने थर थर कांपत असतो. म्हणून न्याय-निवाडा करण्यात या यंत्राचा फार उपयोग होईल. तुम्ही या यंत्राच्या सहाय्याने प्रयोग करून पहावा!"

लगेच राजाने व मंत्र्याने त्या यंत्राची परीक्षा करून पाहिली. राजा एक खोटे बोलला आणि यंत्राचा काटा सातावर जाऊन थांबला. मंत्री खोटे बोलल्यावर पांचावर थांबला.

"अद्भुत!" राजाने वाखाणणी केली.

प्रधान म्हणाला–"पण महाराज! ज्या यंत्राचा काटा आपल्या खोटे बोलण्याला सातावर जाऊन थांबला तोच माझ्या खोटे बोलण्याला पांचावरच थांबला. आणखी एखाद्याच्या बाबतीत दोनावर थांबणार नाही कशावरून?"

रघुनाथ आतां मात्र रागावला. म्हणाला–"या यंत्राविषयी मला तिळमात्र शंका नाही. आपण पाहिजे तितक्या वेळा प्रयोग करून खात्री करून घ्यावी."

राजाने प्रधानाला गप्प रहायला सांगितले आणि रघुनाथाला म्हणाला– "मला तरी या यंत्राची खात्री पटली आहे. हे यंत्र असल्यावर निरापराध्यांना मुळीच भिण्याचे कारण नाही."

रघुनाथाचा राजाने सत्कार केला आणि त्याला यथोचित पारितोषिक देऊन निरोप दिला. राजाने त्या यंत्राच्या सहाय्याने अनेकांवर प्रयोग केले. ते विश्वासार्ह असल्याचे रुजू झाले. राजा आरोप सिद्ध होण्यास त्या यंत्रावरच अवलंबून राहू लागला. त्या यंत्रावर पूर्णपणे अवलंबून न्यायनिर्णय करणे बरोबर नाही, असे प्रधानाने कित्येक वेळा सांगितले तरी राजाने त्याच्याकडे दुर्लक्ष केले.

एकदा एका गावी सिद्धेश्वर नावाच्या एका शेतकऱ्याने भर दुपारी चार प्रवासी वाटेने जात असतां त्यांच्यापैकी नारुशेट नावाच्या एका व्यापाऱ्याचा खून केला. त्याला लोकांनी धरून आणले आणि न्यायालयात उभे केले. सिद्धेश्वर स्वखुशीने न्यायालयात हजर व्हायला तयार झाला एवढेच नव्हे तर त्याने काही अपराध केला नसल्याचे म्हणाला.

सिद्धेश्वराला राजासमोर हजर केल्या बरोबर राजाज्ञेने दोघे शिपाई सिद्धेश्वराचे दोन्ही हात धरून उभे राहले. तिसऱ्या शिपा-याने यंत्र सिद्धेश्वराच्या गळयात घातले.



"तू अपराध केलास की नाही?" राजाने सिद्धेश्वराला विचारले.

सिद्धेश्वर तत्क्षण म्हणाला–"नाही!" त्या शिपायाने यंत्रातला कांटा कोणत्या आंकड्यावर थांबला हे पाहिले आणि म्हणाला–"एकावर थांबला आहे!"

"सोडा त्याला!" राजा म्हणाला.

हत्या करतांना ज्यांनी डोळ्यांनी पाहिले होते ते आश्चर्यचकित होऊन म्हणाले–"हे काय महाराज!" ते ऐकून राजाने सिद्धेश्वराला पुन्हां पुन्हां तोच प्रश्न केला आणि यंत्रातला काटा एकावरच उभा राहिला.

ते सर्व पाहून प्रधानाने सिद्धेश्वराला विचारले–"तू खून केलास की नाही?"

सिद्धेश्वर म्हणाला–"होय, केला!"

राजा ते उत्तर ऐकून थक्कच झाला. सिद्धेश्वर स्वतः तोंडाने खून केल्याचे कबूल करतो आहे, परंतु यंत्र अपराध न केल्याचे सांगत आहे. दोन्ही गोष्टी बरोबर कशा होऊ शकतील?

"तू खून केलास म्हणजे अपराध केलास, असेच नाही का?" राजाने विचारले.

"त्याने माझ्या बायकामुलांचा खून केला ही गोष्ट फक्त मला एकट्यालाच माहीत आहे! म्हणून मी त्याचा खून केला. मगतो अपराध कसा होईल?" सिद्धेश्वर म्हणाला.

बृहन्मती राजाकडे पाहून स्मित करीत म्हणाला–"यंत्र खोटे बोलले नाही. त्याने खून केला पण तो त्याचा अपराध नव्हता हे तो मनापासून मानतो आहे. म्हणून त्याने अपराध न केल्याचे यंत्र म्हणते आहे. तो शिक्षा करण्यायोग्य अपराधी आहे की नाही, हे ठरविणे यंत्राचे काम नाही."

राजाच्या लक्षात त्याची चूक आली. यंत्राच्या सुद्धा काही मर्यादा आहेत हे ओळखून राजाने सिद्धेश्वराला योग्य ती शिक्षा केली. नंतर यंत्रावरच अवलंबून न्याय निवाडा करण्याचा हट्ट सोडला.





# बाटलीत भूत

अशोकपुर हे एक श्रीमंत खेडे गाव होते.

तेथे भातशेती होती गावाच्या परिसरात खूप फळझाडे होती. गावकरी मेहनती होते. त्यांना देवाच्या कृपेने कोणत्याही गोष्टीची उणीव भासत नव्हती.

त्या गावात यदुपती नावाचा एक श्रीमंत शेतकरी रहात असे. त्याचा मुलगा रूपलाल हा एक हुशार तरुण युवक होता.

दिवाळीच्या वेळी त्या गावात दरवर्षी एक महिनाभर जत्रा भरत असे. जवळपासच्या गांवाहून व्यापारी आणि निरनिराळे खेळ दाखविणारे व सहस्त्रावधी लोक जत्रेला येत.

त्यावर्षी पीकपाणी उत्तम होते म्हणून जत्रा थाटाने भरली. जत्रेच्या व्यवस्थेची सर्व जबाबदारी रूपलालवरच होती. त्याने आपली ती जबाबदारी उत्तम प्रकारे बजावली.

जत्रा चालू असता काही रानटी जातीचे लोक तेथें येऊन आपल्या राहुट्या व तंबू उभारू लागले. ते पाहून रूपलाल तेथे गेला.

"तुमचे येथें काय काम रे?" त्याने त्यांना थोडे दटावून विचारले.

"आम्ही कंदमुळे व वनस्पती औषधीद्रव्ये विकायला आलो आंहो." रानटी लोकांचा नायक म्हणाला.

त्यांचा धंदा चोरी व लबाडी करण्याचा आहे. त्यांना मंत्रविद्यासुद्धा येते आणि भुतापिशाच्यांना वश करण्याची विद्यासुद्धा त्यांना येते हे त्याने ऐकले होते. तेव्हां त्यांच्याशी तंटा करण्यात अर्थ नाही असे समजून त्याने त्यांना झोपड्या. राहुट्या बांधू दिल्या.

त्या जंगली लोकांनी झोपड्या बांधल्या त्यानंतर दोन तीन दिवसातच गावात

श्री ए. सी. सरकार, जादूगार



भुरट्या चोऱ्या होऊ लागल्या. एका जव्हेऱ्याच्या घरात व एका व्यापाऱ्याच्या घरात शिरून चोरांनी हाताला आले ते उचलून नेले. जंगली लोकांच्या झोपड्यांची झडती घेतली तेव्हां चोरी गेलेल्या माला-पैकी फक्त एक दागिना सापडला. त्या जंगली लोकांपैकी दहाबाराजण झोपड्यात नसल्याचे कळले.

जंगली लोकांच्या नायकाला धरून खूप बडविले तरी त्याच्या अनुयायांनी चोरी न केल्याचे त्याने सांगितले. निरुपाय होऊन रूपलालने सर्व जंगली लोकांना पिटाळून लावले आणि चोरी झाल्याची नोंद पोलीस ठाण्यावर केली.

जंगली लोकांच्या नायकाने निघून जाताना रूपलालला धमकावले–"तुला मी असा सोडणार नाही. लक्षात ठेव. आमच्या मंत्रबळाची तुला कल्पना नाही असे दिसते. तुझी मानगुटी धरायला मी पाठवतो एका भुताला. तू जिवंत असेपर्यंत ते तुला आंतून पोखरून खात राहील. पहा तर!"

जंगली लोक निघून जाण्यापूर्वी पोलीस शिपाई आले आणि त्यांनी सर्व जंगली लोकांना कैद केले.

रूपलाल शूर साहसी होता, परंतु त्याचा भुताखेतांवर विश्वास होता. म्हणून त्याने बाहेरून किती फुशारक्या मारल्या तरी त्याला भुताची दहशत बसली. कोणते तरी भूत आपल्या मानगुटी बसले असल्याचे त्याला वाटू लागले. त्याला रात्री झोप येईनाशी झाली. भयंकर स्वप्ने पडू लागली. डोळे बंद करून झोपावे तर समोर भुते नाचत असल्याचा भास होई. भीतीचा किडा त्याच्या मनात शिरला आणि त्याने त्याचे सर्व धैर्य व साहस नष्ट केले.

जत्रा संपली. आतां रूपलालला तेवढा कामाचा बोजा राहिला नाही. म्हणून रात्र झाली की त्याला जंगली लोकांच्या नायकाची व त्याने म्हटले होते त्याची आठवण होई. त्याला भुते दिसू लागली. तो आपल्या खोलीबाहेर पाऊल टाकीनासा झाला. तो बडबडू लागला. त्याला उन्माद झाल्यासारखे झाले. तो मध्येच ओरडायचा–"ते पहा! ते पहा! भूत! त्या आंब्याच्या झाडावर त्या फांदीवर बसून हंसते आहे!"

गावकऱ्यांना वाटू लागले की त्या दुष्ट नायकाने रूपलालवर कोणते तरी भूत खरोखरीच सोडले आहे. सर्व गावकऱ्यांना भुताची दहशत बसली. काळोख पडल्यावर कोणी घराबाहेर पाऊल टाकीनासा झाला. गावातली कामे अस्तव्यस्त झाली.

पोलीसांनी ज्या जंगली लोकांना धरून नेले होते त्यांचे काय झाले, कोणाला काही कळले नाही. आरोप साबीत न झाल्यामुळे सर्वांना सोडण्यात आल्याची वार्ता पसरली.

रूपलाल जवळच्या शहरात शिकत असतां त्याच्याबरोबर वर्गात सोमनाथ नावाचा एक मुलगा होता. दोघे जीवश्च कंठश्च मित्र होते. त्याला मंत्रविद्या, जादू वगैरेची चांगली माहिती होती. रूपलाल-वर कोणी भूत सोडल्याचे व ते त्याच्या मानगुटीस बसल्याचे सोमनाथला मुखामुखी मित्रांकडून कळले.

रूपलालला या मनोव्याधीतून सोडविणे आपले कर्तव्य आहे असे सोमनाथला वाटले. त्याने मनोव्याधींची चिकित्सा करणाऱ्या आपल्या एका मित्राचा सल्ला घेतला.





त्या मित्राने सोमनाथला विचारले– "त्या जंगली लोकांच्या नायकाने काही तरी प्रयोग केला असावा, अशीच दहशत नाही का तुझ्या मित्राला बसलेली? त्या नायकाहून जास्त शक्ती तुझ्या मंत्रबळात आहे, असा विश्वास तुझ्या मित्राच्या मनात उत्पन्न करतां आला तर त्याच्या मनाची ही मनोव्याधी नक्कीच दूर करतां येईल. यात मला तरी मुळीच शंका नाही."

सोमनाथने यासाठी काय करतां येईल याविषयी दोन दिवस बराच विचार केला. त्याने निरनिराळे ग्रंथ चाळून एका उपाया-

आणि नंतर एके दिवशी दुपारच्या सुमारास अशोकपुर गावी येऊन मित्राला भेटला.

रूपलालला ओळखणेदेखील शक्य नव्हते इतका तो रोडावलेला होता. त्याच्यात त्राण म्हणून राहिले नव्हते. चेहरा निस्तेज व काळवंडलेला होता.

सोमनाथला पाहून रूपलाल हसला, पण त्यात फिक्केपणा व हताशाच दिसत होती. तो सोमनाथला म्हणाला–"मित्रा! या भुताने पहा, माझं सर्व रक्त शोषून घेतलं आहे आणि हाडमांस आंतून पोखरलं आहे. मरण लवकर आलं तर सुटेन असं वाटतं आहे." त्याने सुस्कारा सोडला खरा, परंतु एकदम ओरडू लागला– "ते पहा! ते पहा! त्या फांदीवर...!"

सोमनाथने त्या फांदीकडे पाहिले व आश्चर्यचकित झाल्याचे सोंग करीत म्हणाला–"खरंच की रे! ते दुष्ट रक्त-पिपासू भूत दिसलं मला!"

तेथे हजर होते ते लोक चकितच झाले. कारण त्यांना फांदीवर काहीच दिसत नव्हते.

"पाहिलंस, किती भयंकर आहे ते, सोमनाथ?" रूपलाल म्हणाला.

"त्याहून जास्त भयंकर भूत दुसरे

भूतवैद्य करतो तेव्हां अनेक तऱ्हेची भुते व पिशाच्चे मी पाहिली आहेत! परंतु इतके भयंकर भूत या पूर्वी मी कधीच पाहिले नाही." सोमनाथ म्हणाला.

"त्या दुष्ट नायकाने त्याला माझा जीव घ्यायला माझ्यावर सोडले आहे, नाहीं का रे?" रूपलालने विचारले.

"होय, मी ऐकले ते सगळं! अरे पण, त्या जंगली नायकापेक्षा मला कमी समजू नकोस. त्या बेटचाचे डोके मी ठिकाणावर आणलं नाही, तर नावाचा सोमनाथ नाही. माझ्यासारखा त्या बेटचाने अथर्ववेदाचा, तंत्रशास्त्राचा आणि उपनिषदांचा अभ्यास केला आहे का? अथर्ववेदात भुतांच्या वशीकरणाचा मंत्र आहे. मी तो आणि एक बृहदारण्यकोपनिषदांतून लिहून घेतला आहे. पहा तरी!" असे म्हणत सोमनाथने आपल्या पिशवीतून एक घडी करून ठेवलेला कागद काढून दाखविला. त्यावर देवनागरी लिपीत काही तरी लिहिलेले होते.

तो कागद पाहून रूपलालच्या तोंडावर अगदी थोडा वेळ आनंद झळकल्यासारखा दिसला आणि पुन्हां त्याचा चेहरा गंभीर विचारात पडल्यासारखा झाला.

सोमनाथ म्हणाला–"आज शनिवार आहे, भुताच्या उच्चाटनाला उत्तम वार



आहे. मी सर्व तयारी करून ठेवली आहे. आज संध्याकाळी घेतो त्याचा समाचार! आतां त्याचे दिवस भरलेच, समज!"

संध्याकाळ व्हायची वेळ होत आली. सोमनाथने जे जे करणे आवश्यक होते ते सर्व तयार करून ठेवले. यदुपतीच्या घरा-समोरच्या आंगणात सडासारवण घालून ते स्वच्छ केले. रांगोळी घालून एक मोठे वर्तुळ तयार केले. त्याच्या मधोमध एका पितळेच्या कळशात पाणी भरून त्यात आंब्याचे टाळे ठेवले. त्याच्यासमोर फुलं वाहली गेली. नंतर रूपलालला स्नान घालून व नवे कोरे धोतर नेसायला



देण्यात आले. त्याला एका गालिचावर बसविण्यात आले. त्याजवळ एक चौरंगासारखा उंच पाट ठेवण्यात आला. आंगणाच्या चारी कोपऱ्यांत चार समया लावण्यात आल्या. नंतर धूप घालून धूर त्या परिसरात तो पसरेल याची काळजी बाळगण्यात आली.

काळोख पडू लागण्याच्या सुमारास सोमनाथ रूपलालच्या जवळ बसून संस्कृत भाषेत मंत्र म्हणू लागला आणि मधून मधून रूपलालला आंब्याच्या झाडाच्या फांदीकडे पहायला सांगून "ते पहा!" "ते पहा!" असे म्हणू लागला. रूपलाल तिकडे निरखून पाहू लागला.

सोमनाथ आपल्याबरोबर शहरातून एका जणाला मदतीला घेऊन आला होता. त्याला बसण्यासाठी सोमनाथच्या सांगण्यावरून निराळी खोली देण्यात आली होती. खोलीत बसून त्याने शेगडी पेटविली व सोमनाथासाठी चहा केला. सोमनाथ चहा पिऊन येऊन आपला वशीकरण मंत्र म्हणू लागला.

आणखी पांच मिनिटे मंत्र म्हणत राहल्यावर झाडावरून आंब्याचे टाळे भराभर पडू लागले आणि एक फांदी पडली तेव्हां मोठा आवाज झाला.

"ते पहा, भूत खाली उतरून आले आहे." असे म्हणत सोमनाथने आपल्या मदतनिसाला बाटली व बशी आणायला सांगितले. त्या माणसाने प्रथम नुसती एक बशी आणली. ती कप ठेवायची बशीच होती. सोमनाथने ती फडक्याने चांगली स्वच्छ पुसून काढली व म्हणाला—"आण आता बाटली! फडक्याने धर बाटली. उघड्या बोटांनी धरू नकोस!"

त्या माणसाने फडक्यात धरून बाटली आणली. सोमनाथने ती एका फडक्यानेच धरली आणि बाटलीचे तोंड फडक्याने छान पुसून ती बाटली टेबलावर ठेवली.

त्या दुष्ट भुताला या बाटलीत बंद करतो!" आणि खाली पडलेल्या फांदीकडे पहात म्हणाला—"या म्हटले यात मुकाट्याने! चटदिशी आला नाहीत तर मारण होमच करावा लागेल. म्हणून सरळ मार्गाने या!" असे म्हणत उजव्या हाताने बोलावण्याचा अभिनय करीत बाटलीवर ती बशी थोड्या वेळाने ठेवली आणि म्हणाला—"मित्रा रूपलाल! त्या भुताला बंद केले या बाटलीत. नंतर काही वेळ मंत्रोच्चार करीत राहल्यावर म्हणाला—"बाटलीत भूत पकडले की नाही हे तुला कसे कळणार? तरमग पहा, भूत बाटलीत गेले आहे आणि म्हणून बशी बाटलीला चिकटली आहे. बशी उचलून पहा, बाटली चिकटून बसली आहे की नाही ते!"

त्याने बशी उचलून दाखविली व बशीबरोबर बाटलीसुद्धा वर उचलली गेली.

"भूत बाटलीत बंद झाले!" असे ओरडत रूपलाल मोठ्याने ओरडला आणि

भोवळ येऊन पडला. त्याच्या तोंडावर पाणी शिंपडून पंख्याने वारा घालून त्याला शुद्धीवर आणण्यात आले. आता तो निर्धास्त झालेला दिसला. त्याच्या तोंडावर समाधानाचे स्मित होते.

सोमनाथ आपल्या खोलीत ती बाटली घेऊन गेला. ती छान कपड्यात बांधली आणि दुसऱ्या दिवशी सर्वांसमक्ष नदीच्या डोहांत फेंकून देण्यात आली.

सोमनाथच्या मदतनिसाने शेगडीच्या विस्तवाचा ताप देऊन बाटली तापवून बाहेर आणून दिली. म्हणून तो ती फडक्याने धरून घेऊन आला होता. ताप लागल्याने बाटलीतली हवा विरळ होऊन उडून गेली. बाटलीवर बशी ठेवल्यावर बाटलीतली हवा थंड होऊन आकुंचन पावली. बाटलीतल्या हवेच्या दाबापेक्षा बाहेरचा दाब जास्त असल्या. कारणाने बशी बाटलीला चिकटून राहिली.

आतां झाडाची फांदी पाडण्यासाठी लोखंडी तारेचा उपयोग करण्यात आला.



# १६३. अत्यद्‌भुत माया शिल्प

रोमन साम्राज्याचे पतन होऊन युरोप खंड अंधःकार युगात होते तेव्हां अज्ञात असलेल्या अमेरिका खंडात माया जातीचे शिल्प प्रतिभेच्या पराकाष्ठेला पोचलेले होते. या चित्रातले शिल्प गौटेमालातील पियेग्रानिग्रास देवालयाच्या गोपुर द्वाराच्या घुमटावरील दगडावर कोरलेले आहे.

या दृश्यात पुजारी किंवा त्या जातीचा पुढारी आपल्या अनुयायांशी बोलत असलेला चित्रित करण्यात आला आहे. त्यांच्या देहाचे अवयव इतके प्रमाणबद्ध आहेत की खरोखरची माणसेच आहेत की काय असा भास होतो.

या शिल्पातला काही भाग अर्ध रूप असलेल्या मूर्तीचा तर काही पूर्ण रूप असलेल्या मूर्तीचा आहे. मायाशिल्प कलेचा हा एक सुंदर नमुना आहे. नायकाचे हात, इतर लोकांची डोकी हेच संपूर्ण शिल्प आहे. उरलेले शिल्प आंशिक रूपेच आहे.

दृश्याच्या सभोवती १५८ सांकेतिक लिपीतली अक्षर आहेत. तज्ज्ञ लोकांनी त्यातील सहा कालसंकेतांच्या आधारे हे शिल्प इ. स. ७६१ मध्ये तयार झाले असल्याचा अभिप्राय दिला आहे.

ह्या प्रदेशाचा शोध सन् १८९५ मध्ये लागला. १९३० मध्ये येथे सर्वांत प्रथम मोठ्या प्रमाणावर खोदकाम सुरु करण्यात आले.





# संगीताचा मर्मज्ञ

फार पूर्वी एका गावी एक थोर संगीत विद्वान होते. प्रत्येक दिवशी सकाळी उठून ते आपल्या बाहेरच्या पडवीत वीणेवर साधना करीत, तेव्हां रस्त्याने जाणारे येणारे लोक क्षणभर थांबत आणि त्यांचे वीणा-वादन ऐकून म्हणत—"किती थोर विद्वान आहेत आणि यांचे संगीत देखील किती उच्च दर्जाचे आहे!"

परंतु त्या संगीत विद्वानांची फक्त स्तुतीच होई. कारण स्वतःच्या पोटा-पाण्याची विवंचना त्यांना नेहमीच असे. त्यापुरती प्राप्तीसुद्धां त्यांना त्यांच्या विद्वत्तेवर होत नसे. आपले संगीत ऐकून स्तुती करणारे फूल नाही फुलाची पाकळी म्हणून चार पैसे देतील असे त्यांना वाटे, परंतु तसा उदार यजमान कोणी निघाला नाही. त्या वीणावादकाच्या शेजारीच एक श्रीमंत गृहस्थ रहात असत. त्यांना वेळ मिळे तेव्हां ते वीणावादकाच्या ओसरीत बसून त्यांचे वीणावादन ऐकत व त्यांच्या अत्यद्‌भुत कौशल्याची प्रशंसा करीत. त्याच्याकडून आपले आवडते राग वाजवून ऐकत. तो आपल्याला कधी तरी खूप पैसे देऊन आपली मदत करील या आशेने तो विद्वान उत्साहाने निरनिराळ्या राग-रागिण्या वाजवून त्या श्रीमंत गृहस्थाची करमणूक करी. इतके ध्यान देऊन संगीत ऐकणार गृहस्थ आपल्याला काही नाही तर कमीत कमी दूध किंवा भाजीपाला तरी पाठवील असे त्या संगीत विद्वानाच्या बायकोला वाटे. परंतु त्या विद्वानाने कधी तोंड उघडून मागितले नाही की त्या श्रीमंताने स्वतः होऊन काही दिलं नाही.

एकदां त्या विद्वानाची बायको नवऱ्याला म्हणाली—"सर्व तुमच्या विद्येची व साधनेची



इतकी प्रशंसा करतात, परंतु काय हो, प्राप्तीच्या नावाने एक पैदेखील नाही की! तो श्रीमंत गृहस्थ तर तासन्‌तास बसून ऐकत असतो आणि दुसरे काम करू देत नाही. माझे ऐका आणि त्याच्याजवळ मागा! फुकटाचे गाणं ऐकायला मात्र येऊन बसतो. नाही दिलं त्याने तर यायचं तरी बंद करील! तुम्हांला दुसरे एखादे काम पहायला सवड तरी मिळेल!"

"विद्या विकू नये असा सिद्धांत असला तरी आता निरुपाय म्हणून त्याला देखील तयार झाले पाहिजे. नाही तर उपाशी मरण्याची पाळी यायची. परंतु मी साधना करायला बसलो की मला हे सर्व आठवत नाही. म्हणून तू आठवण करीत जा." संगीत विद्वान बायकोला म्हणाला.

दुसऱ्या दिवसापासून त्या संगीत विद्वानाने त्याचे संगीत व वीणावादन ऐकायला येणाऱ्यांकडून त्यांना जे शक्य असेल ते त्यांनी द्यावे अशी मागायला सुरवात केली. म्हणून संगीत ऐकायला येणाऱ्यांची संख्या कमी होऊ लागली.

त्या श्रीमंत माणसालासुद्धा राग आला. तो त्या संगीत विद्वानाला म्हणाला–"तुमच्या तोंडून असं काही ऐकायला मिळेल, ह्याची मी स्वप्नात देखील कल्पना केली नव्हती. तुमच्या सारख्या विद्वानाने आपलं पांडित्य असं बाजारात विकावं? तुमच्या संगीताचा आम्हांला जितका आनंद मिळतो त्याहून किती तरी पटीने तो तुम्हांलाच मिळायला हवा. तुमच्या-सारख्यांना द्रव्याचा लोभ असू नये, विद्याच तुमचे सर्वस्व आहे, असे मला वाटते."

तो संगीत विद्वान म्हणाला–"तुम्ही म्हणालात ते सर्व बरोबर आहे. आपल्या या विद्येने इतरांना सुखी करण्यापेक्षा आनंदाची गोष्ट आणखी काय असू शकेल? परंतु तुम्हीच थोडा विचार करा, मला दररोज जेवले तर पाहिजे, उपाशी राहता येईल का? बायकोने सैपाक केला पाहिजे. त्यासाठी बाजारातून डाळ, तांदूळ आणले पाहिजेत. परंतु ते सर्व आणायला गाठीला काही हवं ना? खायलाच मिळालं नाही तर मला जगाचा निरोप घ्यावा लागेल आणि संगीताला मासा!"

"बरं, बरं! तुम्हांला वाटेल तसं करा! मी म्हणाल तर एक फुटकी कवडी देणार नाही. तुमचं संगीत ऐकलं नाही तर मी काही मरत नाही." असे म्हणत तो श्रीमंत तेथून निघून गेला.

तो गेल्यावर संगीत विद्वानाची बायको म्हणाली–"शनीची बाधा टळली!"

परंतु एके दिवशी उजाडतांच तो श्रीमंत उगवला व म्हणाला–"मला आवडणारा एखादा राग वाजवा की, स्वप्नात देखील ते सूर घुमत होते. अगदी राहवलं नाही म्हणून आलो." तो श्रीमंत आपल्या वीणावादनासाठी इतकी उत्कंठा दर्शवीत असल्याचे पाहून तो संगीत विद्वान फुलला आणि वीणा घेऊन वाजवू लागला. तेवढ्यात बायकोने आठवण करून देण्यासाठी त्याच्याकडे पाहिले. म्हणून तो विद्वान आपला उत्साह थोडा आवरून म्हणाला–"मी तुम्हांला पूर्वीच सांगितलं होतं, आठवण करून देतो. संगीत ऐकून काय देणार बोला!"

तो श्रीमंत संतापला व हितोपदेशाचा सूर काढीत म्हणाला–"अहो! पुन्हा तेच! विद्येला विकणे हे किती लज्जास्पद आहे?"

विद्वान भिडस्तपणा सोडून म्हणाला–"दोन तास वाजवितो, काय? दोन शेर दूध पाठवून द्या! आहे कबूल?"





श्रीमंत तो गृहस्थ दोनाऐवजी एक शेर- दिलं तर कसे या आवाजात सौदा पटविण्याच्या स्वरात बोलला. परंतु संगीत विद्वान खाली उतरायला तयारच नव्हता म्हणून त्या श्रीमंताने शेवटी कबूल केले.

संगीत विद्वानाने दोन तास वाजविले. तो श्रीमंत तितका वेळ मुंडी हलवून ऐकत होता आणि गुपचुप उठून निघून गेला. त्याने दूध पाठविलं नाही.

नंतर चार दिवस तो त्या बाजूला फिरकला नाही. पांचव्या दिवशी लाळ घोटीत येऊन म्हणाला–"अहो! ऐकू तर द्या तो राग!"

म्हणाला–"तुम्ही दोन तास संगीत ऐकलेत, पण दोन शेर दूध नाही आलं?"

"ओहो! म्हणजे तुम्हांला दूध खरोखरच पाहिजे होते तर? तुम्ही थट्टेत बोललात असं वाटलं मला." आश्चर्याचा आव आणीत तो श्रीमंत म्हणाला.

"यांत थट्टा कशाची? मला खरोखरच दुधाची गरज आहे!" तो विद्वान म्हणाला.

श्रीमंत खोटे हंसत म्हणाला–"अहो, दोन शेर कशाला, चार शेर पाठवतो. करा सुरू!"

आणखी दोन तास त्याच्या कडून वाजवून घेऊन व त्याला हवे होते ते राग ऐकून घेतले त्या श्रीमंताने नंतर घरी निघून गेला. दूध पाठविले नाही त्याने.

नंतर तो मधून मधून यायचा, संगीत ऐकायचा, दूध पाठवतो म्हणायचा आणि पाठवायचा नाही, हे बरेच वेळा झाले, दूध नाही पाठविलेत म्हणून विचारले तर म्हणायचा–"विसरलो हो!" नाही तर "नंतर नक्की पाठवतो!" म्हणायचा.

शेवटी बायकोच्या आग्रहावरून त्या संगीत विद्वानाने त्या श्रीमंताविरुद्ध न्यायाधिशाकडे तक्रार नोंदविली.

न्यायाधिशाने सर्व ऐकून घेऊन त्या श्रीमंताला बोलाविले आणि विचारले–

"तुम्ही यांना चाळीस शेर दूध दिलं पाहिजे, असे यांचे गाऱ्हाणे आहे! तुमचं काय म्हणणं आहे, सांगा!"

न्यायाधिशाच्या मनात आपल्याविरुद्ध गैरसमज न होऊ देण्याच्या हेतूने तो श्रीमंत, म्हणाला–"मी चाळीस शेर दूध दिले पाहिजे, हे खरं आहे, परंतु तेवढे दूध द्यायला भांडीच नाहीत हो, माझ्याकडे! कोणीतरी चोरून नेली सर्व भांडी. म्हणून तूर्त दूध पाठविणे शक्य होणार नाही."

परंतु न्यायाधीश दूधखुळा नव्हता. म्हणाला–"तुम्ही दूध द्यायला भांडी नाहीत म्हणतां, म्हणून मी असा निवाडा देतो की, तुमच्या गाईंपैकी सर्वांत उत्तम गाय निवडून ह्यांनी आपल्या घरी नेऊन दोन महीने बांधावी."

ते ऐकून श्रीमंताला डोक्यावर वीज पडल्यासारखे झाले. तो म्हणाला–"हा अन्याय आहे, प्रभो! माझ्या गाईंतील सर्वोत्तम गाय? म्हणजे काय झालं? ती दर रोज दहा शेर दूध देते हो! दोन महिने त्याने तिला आपल्या घरी नेली तर त्याच्यावरच कर्ज निघेल!"

"होय! त्याला कर्ज होईल हे खरे आहे. तर तो दर रोज दहा तास येऊन तुमच्या घरी वीणा वाजवीत जाईल आणि कर्जफेड करील!" न्यायाधीश म्हणाला.

आपली सर्वांत उत्तम गाय द्यावी लागली तरी आपल्याला हवा तो राग











किंवा रागिणी दहा तास वाजवून घेता येईल, काही बिघडलं नाही, असा विचार करून तो श्रीमंत ते नुकसान सहन करण्यास तयार झाला.

दुसऱ्या दिवशीच त्या संगीत विद्वानाने ती गाय आणून आपल्या घरी बांधली आणि त्या श्रीमंताच्या घरी त्याला हवा तो राग किंवा रागिणी वाजविण्यासाठी दहा दहा तास बसू लागला. तो श्रीमंत तास दोन तास आनंदाने डोलत ताल धरी आणि ऐके. तिसऱ्या तासापासून मान दुखू लागे आणि कंटाळा येई. हात दमून जात. थोड्याच दिवसांनी त्याला एक विचित्र तऱ्हेची डोकेदुखी सुरू झाली. तासन्‌तास साधना करण्याची संवय असल्यामुळे संगीत विद्वानाला कंटाळा यायचा तर बाजूलाच, त्याला साधना करायला चांगली संधी मिळाल्याबद्दल आनंदच झाला.

तो श्रीमंत एकदां त्याला म्हणाला– "अहो! आज नका तुम्ही त्रास घेऊ. उद्यां ऐकतो. आज घरी जा!"

"तसं झालं तर कर्ज कसं फिटायचं हो? मी आपलं कर्तव्य बजावून जातो." तो वीणावादक म्हणाला.

तेव्हां तो श्रीमंत मनुष्य त्या वीणावादकाला त्याच्या वीणेसह घेऊन न्यायाधिशाकडे गेला आणि म्हणाला–"महाप्रभो! या संगीत विद्वानाला आणि याच्या वीणेला मी हात जोडतो. आतां मला हे कष्ट सहन करणे अशक्य झाले आहे! तुम्हीच वांचवा आता या संकटातून!"

"मग याचं तुमच्यावरचं कर्ज फिटायचं कसे?" न्यायाधिशाने विचारले.

"ते कर्ज फेडायची गरज नाही. मला या कष्टातून वाचविलेत तर मी त्या एका ऐवजी आणखी चार गाई देतो." असे म्हणत तो श्रीमंत गळा काढून लहान मुलासारखा रडू लागला.

त्या श्रीमंताचे कर्ज फिटण्याची काळजी तर दूर झालीच, त्या विद्वानाला एकंदर पांच गाई मिळाल्या. त्यानंतर तो निश्चितपणे संगीतसाधना करण्यात निमग्न झाला.





# राजनीती

फार पूर्वी कोशल देशात कुटिलसेन नावाचा राजा राज्य करीत असता त्या राज्याला लागून मणिपूर नांवाचे एक लहानसे राज्य होते. तेथील राजाचे नाव केशवसेन असे होते. त्याचा अधिकार प्रजा मानीत नसे. ते राज्य म्हणजे पांच गावांचे मिळून एक राज्य होते. पांचही गावात पांच जमीनदार होते. प्रत्येक गावातली प्रजा आपल्या जमीनदारालाच फक्त मान देई. मणिपूरचा राजा या पांच जमीनदारांच्या हातचे एक बाहुले होता.

प्रत्येक जमीनदार स्वतः राजा होण्याच्या हेतून इतर कोणाला कळू दिल्याशिवाय कुटिलसेनाची मदत मागू लागला. त्या सर्वांच्या मदतीने कोशल राजाने मणिपूरचे राज्य काबीज केले.

कुटिलसेनाने 'गरज सरो आणि वैद्य मरो!' या म्हणीप्रमाणे गरज भागल्यावर त्या लोकांचा काटा काढण्याचे ठरविले. कोशल राजाने मणिपूरचे राज्य काबीज करून घेतले त्यावेळी त्या राज्याची स्थिती फार वाईट होती. मुळांत ते राज्य गरीब आणि एका अयोग्य राजाच्या आमदानीत पांच जणांनी सत्ता बळकावल्यामुळे राज्याची दुर्दशाच झाली होती. तेव्हां त्या पांच जणांकडूनच त्या राज्यात सुधारणा करून घ्यायचे त्याने मनाशी ठरविले.

त्याप्रमाणे त्याने पांचही जणांना बोलाविले व म्हणाला–"तुम्ही पाचही जणांनी मला मदत केलीत, त्याबद्दल मी आपली कृतज्ञता व्यक्त करून असा निश्चय केला आहे की तुमच्याच पैकी एकाला ह्या राज्याच्या सिंहासनावर बसवून मोकळे व्हावे. परंतु मी तुमच्यापैकी कोणा एकाला राजा केले तर इतर चार जणांवर अन्याय केल्यासारखा होईल. म्हणून या गोष्टीचा







निर्णय प्रजेनेच करावा असे मला वाटते. तुमच्या ग्रामसभेच्या सभासदांनीच आपला राजा कोण व्हावा याचा निर्णय घ्यावा. मी लवकरच निवडणुकीची व्यवस्था करतो."

ते ऐकून सर्व जमीनदार विचारात पडले. प्रत्येकाने विचार केला, आपला गांव व आपली ग्रामसभा पूर्णपणे आपल्या अधिकारात आहे. इतर ग्रामसभांना आपल्याकडे कसे वळवून घ्यायचे? म्हणून प्रत्येक जमीनदाराने आपल्या ग्रामसभेकडे दुर्लक्ष केले व इतर ग्रामसभांच्या उन्नतीसाठी प्रयत्न करू लागला. प्रत्येकाच्या मनात निवडणूक जिंकली पाहिजे, हा एकच विचार होता.

पाण्यासारखा पैशाचा वापर होऊ लागला. गावातल्या देवळांकडे कोणी ढुंकून पहात नसे, त्यांची डागडुजी झाली. नवीन विहिरी व नवीन तलाव खणले गेले. रस्त्यांच्या दुरुस्तीची कामे सुरू झाली. दुतर्फा झाडे लावली गेली. परिणाम असा [illegible] गावात मान कमी झाला आणि इतरांच्या गावात मान वाढला.

काही दिवसांनी कुटिलसेनाने पांचही जमीनदारांना बोलाविले व म्हणाला–

"माझ्या हेरांकडून मला असे कळले आहे की तुमच्यापैकी एकालाही स्वतःच्या गावात कोणी मानीत नाही. तुमच्या गावचे गावकरीच तुमच्याविरुद्ध तक्रारी करीत आहेत. म्हणून तुमच्यापैकी एकदेखील राजा होण्यालायक मला तरी दिसत नाही. तेव्हां निवडणुकीचा विचार मला सोडणे भाग आहे. तूर्त मी आपला प्रतिनिधी नेमून त्याच्या द्वारा राज्य व्यवस्था चालविण्याचे ठरविले आहे."

पांचही जमीनदारांनी त्यांच्याजवळ होते नव्हते ते खर्च करून शेवटी राज्यपद ही घालविले. त्यांनी परस्परांविरुद्ध केलेला कट आणि त्यांची राज्यपद मिळविण्याची दुष्ट महत्वाकांक्षा दोन्हींमुळे ते एक सामान्य नागरिक झाले.





# अकलेचा कांदा

एका गावात लखुजी आणि सखुबाई नवराबायको रहात असत. सखुबाई स्वभावाने आळशी होती. करू मागाहून आताच काय गर्दी असे नेहमी ती म्हणे.

लखुजी नेहमी तिच्यावर ओरडे 'आळशी ढोण!' 'झोपाळू!' वगैरे मोजक्या शब्दांनी तिची संभावना करी. तिचा भात नेहमी करपून जाई, दूध उतू जायचे, कण्या वाळत घातल्या असल्या तर बकऱ्या तोंड लावायच्या. ती जे काम हाती घेई ते कधी सुरळीतपणे संपायचे नाही.

लखुजीची म्हातारी म्हैस होऊन वाळून गेली. नवीन चांगली म्हैस विकत घेण्यासाठी त्याने पैसे जमा करून ठेवले होते. ते चांगले पांचशेवर होते. शेजारच्या गावच्या म्हशी चांगल्या दुभत्या असतात म्हणून प्रसिद्धी होती. दुसऱ्या दिवशी त्या गावाचा बाजार आहे हे कळल्यावर रात्रीच त्या गावी जायला लखुजी तयार झाला.

निघण्यापूर्वी तो बायकोला म्हणाला–"अग ए! आताच तू पेंगू लागलीस वाटते? मी सगळे पैसे घेऊन जाऊ की दोनशे घरी ठेवून बरोबर तीनशे घेऊन जाऊ?"

सखुबाई जांभया देत म्हणाली–"तुम्हांला कसं वाटते तसं करा!"

"घरात पैसे ठेवणे म्हणजे धोका आहे! तू ढोरासारखी झोपणार, कोणी येऊन तुला उचलून नेले तरी कळणार नाही तुला." लखुजी म्हणाला.

"तर घेऊन जा सर्व पैसे बरोबर!" सखुबाई म्हणाली.

"तीनशे रुपयांना चांगली म्हैस मिळेल. जास्त पैसे बाजारात कशाला न्या? दोनशे रुपये घरांत ठेवून जातो. मात्र तू थोडी

सावध रहा!" असे सांगून लखुजी फक्त तीनशे रुपये घेऊन निघून गेला.

नवऱ्याने पाठ फिरवल्याबरोबर सखुबाईने दार लावून घेतले आणि अंथरुणावर पडून घोरू लागली.

नवराबायकोचे बोलणे भितीला कान लावून चोर ऐकत होता. त्याला सखुबाईचा झोपाळूपणा कळलाच होता. सखुबाईचे घर थोडे एका बाजूला वस्तीपासून थोड्या अंतरावर होते. म्हणून चोराला फावले. त्याने बराच वेळ दार ठोठावले. परंतु सखुबाई उठली नाही.

आतां ती काय उठते असा विचार करून चोराने मागच्या बाजूला जाऊन भितीला भोक पाडले. कोणी आजूबाजूला नाही असे [illegible] अगदी अनपेक्षितपणे त्याच्या डोक्यात जोराने मुसळ पडले आणि एक किंकाळी फोडून चोर तेथेच बेशुद्ध होऊन पडला.

सखुबाईनेच त्याच्या टाळक्यात मुसळ घातले होते. त्याने दार वाजविले तेव्हां तिची झोप मोडली होती. परंतु घरात एकटी होती आणि अवेळ होती. म्हणून तिने दार उघडलं नाहीचोर भितीला भोक पाडतो आहे हे कळल्यावर तिला झोप कोठून येणार? ती मुसळ घेऊन त्या जागी उभीच राहली आणि चोराने डोके खुपसल्याबरोबर अंगातली सर्व शक्ती एकवटून तिने त्याच्या टाळक्यात मुसळ घातले. नंतर त्या बेशुद्धावस्थेतच त्याला ओढून नेऊन



एका खोलीत बंद करून ठेवले आणि शांतपणे पडून राहली. उजाडतांच तिने चार जणांना बोलावून चोराला त्यांच्या स्वाधीन केले. सर्वांनी तिच्या प्रसंगावधानाची वाखाणणी केली.

दुसऱ्या दिवशी बाजार भरल्यावर लखुजीने एक चांगली म्हैस पाहून ती घ्यायचे ठरविले. म्हशीच्या मालकाने चारशे रुपये मागितले आणि अगदी शेवटची किंमत म्हणून साडे तीनशेला द्यायला कबूल झाला. घरी जाऊन पैसे घेऊन यावे म्हणावे तर हातची म्हैस जाते की काय लखुजीला वाटले.

तो विचार करू लागला, उगीच दोनशे रुपये घरी ठेवले. तेवढ्यात एक मोठ-मोठ्या मिशा असलेला म्हातारा विचारू लागला–"काय रे, तुला ती म्हैस पसंत पडली का?"

लखुजीने होकारार्थी मान हलविली.

"मग थांबलास कां? घेऊन टाक!" तो म्हातारा म्हणाला.

"नाहीं किंमत थोडी जास्त आहे. माझ्याजवळ फक्त तीनशेच आहेत!" लखुजी म्हणाला.

"खरं सांगू का, ती म्हैस आहे माझी. परंतु मी त्याच्याकडून घेतलेले कर्ज फेडू शकलो नाही म्हणून त्याला म्हैस दिली. तू घेच ती विकत. ती तुझ्यासारख्या चांगल्याच्या हातात पडली तर मला बरं वाटेल!" तो म्हातारा म्हणाला.












"पण काय करू हो? माझ्याजवळ पुरेसे पैरे नाहीत ना!" लखुजी म्हणाला.

"तू ते तीनशे रुपये इकडे दे. मी त्याला समजावून सांगतो आणि म्हैस तुझ्या हातात देतो, झालं की नाही?" तो म्हातारा म्हणाला.

लखुजीने जवळचे तीनशे रुपये त्या म्हाताऱ्याला दिले. त्यानंतर तो म्हातारा जो गेला तो गेलाच! लखुजीने बराच वेळ वाट पाहिली आणि शेवटी म्हैसवाल्याला जाऊन त्या म्हाताऱ्याविषयी चवकशी करू लागला.

तो म्हैसवाला लखुजीकडे थोडचाशा रागाने पहात म्हणाला–"कोण रे मिशा-वाला म्हातारा म्हणतोस? ही म्हैस माझी, माझ्या गोठयात जन्मली, वाढली व्यायली. आज नाइलाज झाला म्हणून विकायला निघालो.

लखुजी वेडयासारखा सर्व बाजार फिरून आला, परंतु त्या म्हाताऱ्याचा पत्ता लागला नाही.

[illegible] गोष्टी कळल्यावर म्हटले–"अरे, तो लबाड लुच्चा कोणी भामटा होता!" लखुजीला सर्वांनी मूर्खात काढले. अगदी हताश होऊन संध्याकाळी रिकाम्या हाताने तो घरी आला. तेव्हां चांगला काळोख पडू लागला होता.

"नवी म्हैस कोठे आहे हो?" सखु-बाईने नवऱ्याला पाहतांच विचारले.

"डोंबल माझे! नशिबानेच पाठ फिर-विली!" असे म्हणत लखुजीने बाजारात घडलेल्या सर्व गोष्टी सुरवातीपासून सांगि-तल्या. सखुबाई सर्व ऐकून म्हणाली–"जाऊ द्या! होते नशिबात तेवढे राहले!" आणि नवऱ्याचे सांत्वन करू लागली.

नंतर बायकोने दाखविलेला पराक्रम ऐकून लखुजी थक्कच झाला. आपण बरोबर ओळखले नव्हते, म्हणून तिला तोंडाला येईल ते बोलत होतो, असा पश्चात्ताप करू लागला. त्या दिवसापासून त्याने बायकोच्या झोपळूपणाचा चुकूनसुद्धा उल्लेख केला नाही.





# डोळस आंधळा

एका गावात रामू नावाचा एक भोळा माणूस रहात असे. त्याने बापाने त्या-च्यासाठी म्हणून ठेवलेली इस्टेट वाढवून दुप्पट केली. रामूला श्यामू नावाचा मुलगा होता. त्याचे या जगाशी काही नातेच रामूला वाटे, आपण पूर्व जन्म केलेल्या पापाचे फळ म्हणून हा मुलगा आपल्या पोटी जन्माला आला आहे.

एकदां त्या गावी एक साधू आला. रामू त्याला भेटून म्हणाला–"बुवा! पूर्वजन्मी काहीतरी पाप केले होते त्याचे फळ म्हणून हा पोरटा जन्मला आहे. त्या पापातून मुक्त व्हायला काही मार्ग असल्यास सांगण्याची कृपा करावी."

"बाबा रे, मी अगदी सोपा मार्ग सांगतो. तू फक्त आजचा दिवस कोणी काही म्हटलं तरी ते न ऐकतां कोणी काही मागितले तर ते दे!" तो साधू म्हणाला.

रामू लगेच घरी गेला आणि घराची सर्व दारे बंद करून ठेवून आत स्वस्थ बसून राहला. तेवढयात कोणीतरी येऊन दार ठोठावले. रामूने घाबऱ्या घाबऱ्या थरथर कापत दार उघडले. दार ठोठा-वणारा त्याचा मुलगा श्यामूच होता.

"काय हो बाबा! सर्व दारं बंद करून बसलां आहां ऐन दुपारी?" श्यामूने बापाला विचारले.

रामूने सर्व काही मुलाला सांगितले. श्यामू थोडा विचार करून म्हणाला–"होय ना, मग आजचा दिवस तुम्ही जंगलात कोठे तरी काढा! एक पैसादेखील खर्च होणार नाही!"

वाटेत त्याला कोणीतरी भेटला आणि पाय भाजत आहेत असे म्हणत त्याने रामूकडे त्याच्या वहाणा मागितल्या. त्या दिवशी कोणी काही मागितले तरी दे








म्हणून साधूने सांगितले होते, म्हणून रामूने वहाणा काढून दिल्या.

आणखी काही अंतर चालून गेला तर एक बाई तान्ह्या मुलाला घेऊन जात होती. ऊन 'मी' म्हणत होते. तिने छत्री मागितली, ती रामूने दिली.

आतां पायात वहाणा नव्हत्या व डोक्यावर छत्री नव्हती तरी तो उन्हांत चालत राहला. इतक्यात रामूला एक म्हातारा भेटला. त्याने रामूजवळ सदरा मागितला. रामूने बोलल्याशिवाय सदरा काढून दिला.

अगदी जंगलाच्या कडेला रामू पोचला असेल, तेव्हां त्याला एका चोराने गाठले आणि म्हणाला–"मुकाट्याने कंबरेचे धोतर सोडून देतोस की...!" रामूने ते ऐकून डोक्याचे पागोटे सोडून कंबरेला गुंडाळले आणि धोतर सोडून दिले.

तो आणखी थोडा दूर गेला. त्याला कोणी थोर पुरुष दिसले व म्हणाले–"हे पहा, तुम्ही जातां आहां त्या वाटेवर ढोपरभर चिखल आहे, संभाळून जा."

त्या माणसाने सावध केले असून तिकडे दुर्लक्ष करून तो पुढे चालू लागला आणि चिखलात रुतला. परंतु तो थोर पुरुष जवळच होता. तो धावला व त्याने रामूला चिखलातून बाहेर काढले.

सर्व अंग चिखलाने भरलेले होते. रामूने आतां पुढे जायचा विचार सोडला व त्या साधूला येऊन भेटून त्याने जंगलात त्याच्यावर आलेला प्रसंग वर्णन करून सांगितला.

तो साधू स्मित करून म्हणाला–"भल्या माणसा! मी तुला सांगितलं त्याचा भलताच अर्थ करून घेतलास! कोणी मागितले असतां तू द्यायला लागल्यावर कोणी काही म्हटलं तरी तू तिकडे दुर्लक्ष कर, असा माझ्या म्हणण्याचा अर्थ होता. यापुढे तरी तू आपला लोभीपणा सोड आणि तुझ्याजवळ जे आहे त्यातले शक्य तेवढे गरजवंताला देण्याचे मनाशी ठरव. त्याहून मोठे पुण्य ते काय असणार?"





# महाबली हनुमान

संपातीने सीता कोठे आहे, हे सांगितल्यावर वानरांना इतका आनंद झाला की ते उड्या मारू लागले व रामनामाचा घोष करू लागले. वानरे समुद्र पार करण्याच्या हेतूने समुद्राच्या काठी आली. परंतु तो अफाट समुद्र पाहून त्यांची छाती धडधडली. समुद्राच्या त्या भयंकर लाटा पाहूनच त्यांचा सर्व उत्साह थंड पडला. समुद्रात भयंकर प्राणी असतात हे त्यांनी ऐकले होते. त्याच बरोबर समुद्र एका बाजूला शांत दिसला तरी दुसऱ्या बाजूला लाटांचे तांडव नृत्य चालूच होते. ते सर्व पाहून वानरांचा होता नव्हता तो सर्व धीर खचला. नदीचा दुसरा काठ अलीकडून दिसतो तसा समुद्राचा दिसत नव्हतां.

"आतां पुढे काय?" वानर हा प्रश्न करून परस्परांची तोंडे पहात होते.

आपले अनुयायी आणि साथीदार समुद्राला पाहून भ्यालेले पाहून अंगद त्यांना म्हणाला–"घाबरून जाऊ नका. भय हे आपल्यालाच आंतून पोखरून काढते. ही वेळ आपला पराक्रम दाखविण्याची आहे. हातपाय गाळून बसण्याची नाही."

ती रात्र सर्वांनी समुद्र किनाऱ्यावरच काढली. दुसऱ्या दिवशी उजाडताच अंगदाने सर्व वानर सैन्य एकत्रित केले. सर्व वानरांना एकत्रित करण्याची शक्ती फक्त अंगदाच्या व हनुमानच्या अंगात होती. इतर कोणाला ते साध्य नव्हते.



अंगद सर्व वानरांना संबोधन करून म्हणाला–"आपल्यापैकी हा समुद्र पार करून जाणारा कोणी आहे का? त्याने लंकेला जाऊन सीतेचा शोध काढावा आणि सुग्रीवाच्या आज्ञेचे पालन करून सर्वांना वाचवावे. लंका येथून शंभर योजनांवर आहे, हे आपल्याला संपातीकडून कळले आहे. तेव्हां इतके अंतर ओलांडून पलीकडे जाऊन जो परत येईल तोच आपणां सर्वांचे सुग्रीवाच्या रागापासून रक्षण करू शकेल. तोच आपल्या सर्वांच्या मुलांची भेट होऊ देण्यास आणि पुढील आयुष्य सुखाने घालविण्यास मदत करणारा होईल. सुग्रीवाला आणि लक्ष्मणाला आपले तोंड दाखवायला सहायक तोच महावीर ठरणार आहे. तेव्हां हा समुद्र पार करून लंकेला कोण जाऊन यायला तयार आहे, हे बोला. हे संकट टळेल असे काही तरी करा."

परंतु कोणी तोंड उघडले नाही. सर्वांच्या माना खालीच होत्या. दगडाच्या मूर्तींसारखे सर्व गप्प बसून होते.

सर्वांना गप्प बसलेले पाहून अंगद पुन्हां म्हणाला–"तुम्ही सर्व थोर पराक्रमी शूर व वीर आहां! प्रसिद्ध व थोर कुळात तुम्ही जन्म घेतला आहां. तुम्हांला अटकाव कोठेही नाही अशी तुमची कीर्ती आहे. तेव्हां तुम्ही किती अंतर उड्डाण करून कापू शकाल एवढे तरी सांगा!"

तेव्हां काही वानरवीरांनी आपापल्या शक्तिसामर्थ्याचे वर्णन केले. गज म्हणाला–"मी दहा योजन दूर उडी मारू शकेन." गवाक्षाने तो वीस योजन उड्डाण करू शकेल असे सांगितले. गवाक्ष तीस योजन म्हणाला. शरभ चाळीस योजन म्हणाला. गंधमादन पन्नास योजन म्हणाला. मैंद साठ योजन म्हणाला. द्विविद सत्तर योजन म्हणाला तर सुषेण ऐंशी योजन म्हणाला.

त्यानंतर जांबुवंत म्हणाला–"मी एके काळी उड्डाण करण्यात फार पटाईत होतो. परंतु आतां वार्धक्य आल्या कारणाने माझा धीर खचला आहे. तरी हे रामाचे कार्य आहे म्हणून अंग चोरून चालणार नाही. मी जोखीम घ्यायला तयार आहे. तुम्ही मला उड्डाण करायला सांगितलेत तर मी नव्वद योजन नक्कीच उड्डाण करू शकेन."

सर्व म्हणाले ते शांतपणे ऐकून घेऊन अंगद म्हणाला–"शंभर योजने उड्डाण मी करू शकेन. परंतु मी परत येऊ शकेन की नाही. एवढीच शंका मला आहे."

ते ऐकून जांबुवंत म्हणाला–"होय रे, तुझ्या शक्ति सामर्थ्याची कल्पना आम्हांला नाही का? शंभर योजनेच काय हजार योजने सुद्धां तू उड्डाण करू शकशील आणि परत सुद्धा येऊ शकशील. आम्हांला त्यांत शंका किंवा संदेह मुळीच नाही. परंतु तू किती झालास तरी युवराज आहेस. म्हणून तुला कोणत्याही परिस्थितीत जाऊ देता येणार नाही. तू आमच्या पैकी पाहिजे त्याला पाठव, परंतु स्वत: जाऊ नकोस! तुझे कुशल सुख पाहणे आमचे कर्तव्य आहे. तूच लंकेला गेलास तर आम्हांला इकडे कोण संभाळील? आमच्या हातून कोणतेच काम होणार नाही!"

ते ऐकून अंगद म्हणाला–"तुम्ही म्हणता त्याप्रमाणे मी समुद्र पार जायचे नाही, तुमच्यापैकी कोणी जाऊ शकत नाही, तर मग आपण उपोषण करून प्राणत्याग करावयाचा का? काम पूर्ण केल्याशिवाय किष्किंधेला परतलो तर जिवंत राहणे शक्य आहे का? तो सुग्रीव आपल्याला जिवंत सोडील का? तेव्हां जांबुवंता! तूच सांग काही मार्ग आहे का? तूच आमच्यातला वयाने वृद्ध आहेस, तुला माहीत नाही, म्हणून तूच बोल!"



तेव्हां जांबुवान अंगदाला म्हणाला–"काम होणार आणि नक्की होणार! हे कार्य पुरे करू शकणारा, हा पहा येथे आहे, शांतपणे काही बोलल्याशिवाय एका बाजूला गप्प बसला आहे." असे म्हणत त्याने एका बाजूला गप्प बसलेल्या हनुमानाच्या खांद्यावर हात ठेवला आणि म्हणाला–



"हनुमंता! तू सर्व वानरात महाबली म्हणून प्रसिद्ध आहेस. तू सर्व शास्त्रांचा अभ्यास केला आहेस. तुला सर्व माहीत आहे, तरी असा गप्प कां बसला आहेस? त्या गरुडाच्या पंखात जेवढे बळ आहे तेवढे बळ नक्कीच तुझ्या अंगात आहे. पराक्रमात तू सुग्रीव व लक्ष्मणाची बरोबरी करू शकशील इतका शूर आहेस. इतर प्राण्यांशी तुझ्या पराक्रमाची तुलना करणे हास्यास्पदच ठरेल. बाबा! तू विसरलास का, जन्मल्याबरोबर तू फळ समजून सूर्याला खायला धावला होतास. तेव्हां उड्डाण करण्यात तुझी बरोबरी कोण रे करू शकेल? तू आतां आपल्या त्या शक्तीचा उपयोग कर आणि समुद्र पार करून जाऊन ये."

ते ऐकतांच अत्यद्भुतपणे हनुमानाचा देह अमर्याद वाढू लागला. हनुमान समुद्र पार करण्यास तयार झालो आणि त्याचे शरीर आकाशाला भिडलेले पाहून सर्व वानरांना अत्यानंद झालेला आणि त्यांनी हनुमानाची स्तुती व प्रशंसा सुरू केली. त्यांची ती स्तुती चालू असता हनुमान वामनासारखा लघु रूप सोडून विराट रूप धारण करू लागला. त्याबरोबर त्याचे बळ व पराक्रमदेखील वाढू लागल्याचे दिसले त्याचे रूप त्यावेळी धुराशिवायचा प्रज्वलित अग्नी जसा असतो तसे दिसत होते.

हनुमान नम्रपणे सर्व वृद्ध वानरवीरांना वांकून नमस्कार केला. तो म्हणाला—"वायू जसा सहज आणि अति वेगाने समुद्र ओलांडतो तसा मी पार हा समुद्र करतो. मी वाटेत कोठेही थांबणार नाही. मी सकाळी उदयगिरीवरून सूर्याबरोबर निघतो आणि त्याला भेटायला परत समोरा त्याच्या आधी अस्ताचलावर पोचतो आणि येतो. मी आकाशांतून उड्डाण करीन तेव्हां त्या वेगाने समुद्र माझ्याबरोबर येईल की काय असे वाटते आहे. मी आकाशात उडत असतां आकाशातल्या ढगांची पांगापांग होईल. पर्वत हादरून जातील. मी सीतेला पाहून नक्कीच परतेन. मला शुभशकून दिसत आहेत. जरूर वाटल्यास सर्व लंकाच उचलून घेऊन येतो." हनुमान ते बोलत असतां वानरांना आनंद होत होता. त्याचबरोबर त्यांना आश्चर्यही वाटत होते.

जांबुवान त्याला म्हणाला—"बाबा रे! तुझ्या शक्तीची कल्पना मला नाही का? पण तुलाच आपल्या शक्तीचा विसर पडतो. कोणी आठवण करून दिल्यावरच तुला आठवते. तू काय वाटेल ते कर आणि आमची काळजी व चिंता दूर कर. तुला तुझ्या कार्यात सिद्धी प्राप्त होवो, यासाठी आम्ही ध्यान धरून बसतो. आमच्या आशीर्वादाने तुला समुद्र पार करण्यात यश प्राप्त होवो! आम्हा सर्वांचे जिणे मरणे तुझ्या हातात आहे."

"मी आकाशात उड्डाण करीन तेव्हा जमीन जागच्या जागी राहणार नाही, नक्कीच हलू लागेल. म्हणून मी या महेंद्रपर्वतावर चढतो.

त्याने उड्डाण करण्यापूर्वी हातांनी व पायांनी पर्वताला दाबून चाचपून पाहिले. पर्वताला आपण अचल म्हणतो व मानतो. परंतु हनुमानाने उड्डाण केले त्या वेळी पर्वत बराच वेळ हादरत राहला. त्याच्यावरचे अनेक वृक्ष हलू लागले आणि त्यांची फुले गळून पडली. दगड व खडक गडगडत



गुहांत राहणारे पशुपक्षी आक्रोश करून ओरडू लागले. पर्वतावर राहणारे ऋषी व मुनी आणि त्यांचे विद्यार्थी पृथ्वी दुभंगली तर नाही या विचाराने घाबरून गेले. विद्याधर आपल्या स्त्रियांना घेऊन आकाशात उडून संचार करू लागले. त्यांना महाबली हनुमानाचा विराट देह दिसला.

हनुमानाने उड्डाण करीत असतां आपली शेपटी उंच उभारली, मुठी आवळल्या, पायखाली सोडले आणि श्वास रोखून ठेवला आणि आकाशमार्गे आक्रमित असतां वानरांना संबोधन करून म्हणाला—"मी लंकेला निघालो आहे. तेथे मला सीता



लोकात जाईन, तेथे देखील सीता दिसली नाही तर परत लंकेला येऊन रावणाला बांधून घेऊन येईन. नाही तर रावणासह लंकेलाच उचलून घेऊन येईन."

असे सांगून हनुमानाने आकाशात उड्डाण केले. त्याच्याबरोबर अनेक वृक्ष उडू लागले. त्याचा सर्व देह आणि सर्व समुद्र फुलांनी झांकला गेला. हनुमान पुढे दोन्ही हात करून जात असतां पांच फडांचे दोन नाग वेगाने जात असल्यासारखे भासत होते. त्याचे दोन्ही डोळे उगवणाऱ्या सूर्यचंद्रांसारखे दिसत होते. त्याची शेपटी ताठ आकाशात उभी होती.

हनुमान आकाशात अति वेगाने उडत असतां त्याच्या बोटाच्या आघाताने वाऱ्याचा आवाज घनगर्जनेसारखा ऐकू येत होता. लंकेच्या दिशेने जात असतां तो शेंडे नक्षत्रासारखा भासत होता. त्याची सावली समुद्रावर दूरवर पसरली होती व ती अति वेगाने धावत होती. तो जात होता त्या दिशेला समुद्र उफाळून वर येत असलेला भासत होता.

अशातऱ्हेने हनुमानाला जात असलेला पाहून समुद्र विचार करू लागला—"मी या हनुमानाला सहाय्य करणे आवश्यक आहे. हा ईक्ष्वाकु कुळात जन्मलेल्या रामाच्या कार्यासाठी जात आहे. माझा उद्धार करणारा सगर राजासुद्धा ईक्ष्वाकु कुळातच जन्मला होता. त्याच्या नावावरूनच मला सागर हे नाव मिळाले. म्हणून या हनुमानाला अर्ध्या वाटेवर थोडी विश्रांती लाभेल असा प्रयत्न करतो."

असा विचार करून समुद्राने मैनाक पर्वताला बोलाविले व म्हणाला—"हे मैनाक पर्वता! तुला इंद्राने राक्षसांना पाताळ लोकात दाबून ठेवण्याची आज्ञा देऊन पाठविले होते, नाही का? आतां तू समुद्राच्या तळापासून समुद्राच्या पातळीवर आले पाहिजेस. हनुमान तू आहेस त्या वाटेने लंकेला उडत जातो आहे. तो तुला ओलांडून पुढे जाण्यापूर्वी तू आपले सुवर्ण शिखर समुद्राच्या पातळीवर येईल असा

उंच हो, म्हणजे हनुमानाला थोडी विश्रांती घेण्यास सोयीचे होईल."

लगेच मैनाक पर्वत वाढू लागला व समुद्राच्या पातळीवर दिसू लागला. तो पर्वत आपली वाट अडवायला येत आहे असे वाटून हनुमानाने त्याला आपल्या एका खांद्याने बाजूला सारण्यासाठी धक्का दिला. तेव्हां ते शिखर तुटले.

हनुमानाचे ते अतुल्य बळ पाहून मैनाक पर्वत घाबरून गेला आणि मानवरूप धारण करून पर्वताच्या शिखरावर उभा राहून म्हणाला–"हे हनुमंता! तुझ्या बळाची व पराक्रमाची कोणाला कल्पनातरी होणे शक्य आहे का? कोणत्याही प्राण्याला शक्य नाही अशा समुद्राला पार करून तू जात असतां तुला कोणत्याही प्रकारचा थकवा वाटला नाही, उलट तू मला धक्का देऊन पाडलेस. तू काही वेळ या माझ्या शिखरावर विश्रांती घे. समुद्र रामाचा पूर्वज राजा सगर याच्या कृपेने व त्याच्या मुलांच्यामुळे नावा रूपास आला व कृतकृत्य [illegible] रामकार्यासाठी तू जात असतां मी तुला विश्रांती घेण्यासाठी थोडी सोय करावी आणि अशातऱ्हेने सगराने केलेल्या उपकाराची फेड अल्प का होईना व्हावी. म्हणून मी त्याच्या वतीने तुला थोडा वेळ येथे विश्रांती घेण्यास विनंती करीत आहे!"

त्यानंतर मैनाकपर्वत हनुमानाला आणखी पुढे म्हणाला–"तू वायुसुत आहेस म्हणूनही मी तुझी थोडी सेवा केली पाहिजे. त्याला कारण आहे. त्रेतायुगात पर्वतांना पंख होते. ते आकाशात उडत. ते खाली पडले तर प्राणहानी होईल अशी भीती ऋषी मुनीना व देवांना वाटली. म्हणून देवेंद्राने आपल्या वज्रायुधाने सर्व पर्वतांचे पंख तोडून टाकले. देवेंद्र येत असतां वायुदेवाने मला दूर ओढून नेऊन वज्रायुधाच्या हातून वाचविले आणि समुद्रात उतरविले. म्हणून मी वायुदेवाचा फार ऋणी आहे. म्हणून तू माझे आतिथ्य स्वीकार कर. तुझ्या दर्शनाने मला अपार आनंद झाला आहे."






य एव नैव कुप्यंते,
न लुभ्यन्ति तृणेष्वपि,
तएव नः पूज्यतमाः
ये चापि प्रि[illegible]दिनः ॥ १ ॥

[ज्यांना राग येत नाही, ज्यांना गवताच्या काडीचादेखील लोभ नाही आणि जे गोड बोलतात, ते आपल्याला आवडतात.]

यस्समुत्पतितं क्रोधं
क्षम यैव निरस्यति
यथोरगस्त्स्वचं जीर्णां
स वै पुरुष उच्यते ॥ २ ॥

[जो कोणी आपला क्रोध आपल्या सहन शक्तीने, साप आपली कात टाकतो तसा, सोडतो तोच खरा पुरुष होय!]

क्षमा शस्त्रं करे यस्य
दुर्जनं किं करिष्यति?
अतृणे पतितो वह्निः
स्वयमे वोपशाम्यति ॥ ३ ॥

[क्षमा हे ज्याचे शस्त्र आहे, त्याच्याविरुद्ध दुर्जन काय करू शकणार? गवत नसलेल्या जागी पडलेला अग्नी आपोआप विझतो.]



# मित्रभेद

[ २६ ]

बुद्धिमान मनुष्य, त्याने सांगितलेल्या गोष्टीकडे दुर्लक्ष करणाऱ्या माणसाला, जुगाऱ्याला, दारुड्याला, किंकर्तव्य विमूढाला, हारलेल्याला, आशाभंग झालेल्याला हितोपदेश करण्यात स्वत:चेच नुकसान करून घेण्यासारखे आहे असे मानतो. म्हणून जो विचारील त्यालाच त्याच्या हिताचे असेल ते सांगावे, विश्वास, श्रद्धा, निष्ठा नसणाऱ्याला सांगू नये.

एक रानात एक चिमणीचे जोडपे एका झाडाच्या फांदीवर एक सुंदरसे घरटे बांधून रहात असे. हिवाळ्यात ऐन शिशिर ऋतूत थंडीबरोबर पाऊस पडू लागला. तेव्हां एक माकड पावसात भिजून थंडीमुळे कुडकुडत त्याच झाडाखाली येऊन उभे राहले. त्याचे सर्व अंग थरथर कापत होते. त्याचे दांत कटकट वाजत होते.

त्यावेळी घरट्यात एकटी चिमणीच होती. तिने त्या माकडाला त्या केविलवाण्या स्थितीत पाहून विचारले– "काय रे, तुला माणसासारखेच तोंड, हात, पाय आहेत नाही का? त्यांच्या-सारखं घर बांधून कां नाही घेतलेस रे? अक्कल शून्यासारखा कुडकुडत कां उभा आहेस?"

माकड संतापून मनात म्हणाले– "माझ्यासाठी मी घर बांधले नाही ही गोष्ट खरी आहे, परंतु अशातऱ्हेने हिणवणाऱ्या दुष्टाची घरे मोडून पाडून टाकणे मला माहीत आहे!" आणि त्याने बिचाऱ्या चिमणीचे घर मोडून टाकले.

आपला जीव वांचविला.

त्याचप्रमाणे सुईमुखी पक्षीण कोणी स्वत: होऊन माकडाला उपदेश करायला निघाली तेव्हां माकडाला फार राग आला व रागाच्या भरात त्याने तिला धरून दगडावर आपटून ठार केले.

करटक दमनकाला ही गोष्ट सांगून म्हणाला–"मूर्खाला उपदेश करणे व्यर्थ असते. अशा मूर्खांना उपदेश करणे म्हणजे दिवा लावून तो बरणीत ठेवण्यासारखा मूर्खपणाच ठरेल. जन्मपासूनच मागे एक दुष्टबुद्धी होऊन गेला तसा आहेस."

"कोणती रे ती गोष्ट?" दमनकाने विचारले.

करटकाने दुष्टबुद्धीची गोष्ट सांगितली ती अशी:

### दुष्टबुद्धीची कथा

एका गावी दुष्टबुद्धी व धर्मबुद्धी नावाचे दोन वैश्य मित्र रहात असत. धर्मबुद्धी नावा-प्रमाणेच चांगल्या स्वभावाचा व सत्यवादी होता. परंतु दुष्टबुद्धीला वाईट संवयी होत्या. परंतु ती गोष्ट धर्मबुद्धीला माहीत नव्हती.

अनेक व्यसनात बुडलेला असल्या कारणाने पुष्कळ पैसे मिळविण्याच्या हेतूने दुष्टबुद्धीने धर्मबुद्धीला व्यापारासाठी दूर देशात जाण्याची सूचना केली. म्हणाला–



"नवनवीन देश पहायला मिळतील खूप फायदा मिळेल आपल्याला अशी संधी हातची दवडून भागणार नाही. तरुण वयात जग पाहयचं नाही तर काय म्हातारपणी पहायचं? म्हातारपणी आपण मुलांना सांगणार तरी काय? आपण जगात कोठे कोठे हिंडलो आणि काय काय पाहिलो? हवा की नाही आयुष्यातला जगाचा अनुभव वांगायला? जगात किती तऱ्हेची माणस भाषा आहेत, वस्त्राभूषणे आहेत, रीती आहेत, किती तऱ्हेचे रिवाज आहेत हे पाहिलं नाहीतर जगून उपयोग तरी काय? परदेश प्रयाणाशिवाय ज्ञान, कला व संपदा विकास पावत नाहीत. चल तर निघू या!"

धर्मबुद्धीने होकार दिला.

दोघे चांगलासा मुहूर्त पाहून निघाले आणि एका अनोळखी देशात सुखरूप येऊन पोचले. त्या देशात फिरत असता धर्म-बुद्धीला एक शंभर सोन्याची नाणी असलेला हंडा सापडला.

तो दुष्ट बुद्धीला म्हणाला–"आपलं नशीब चांगलं आहे. आपण घरी परत जाऊया, चल! धनासाठी विद्येसाठी किंवा कलेसाठी जो परदेशात जातो त्याला त्यातले जे मिळते ते घेऊन स्वदेशी परतणे मनुष्यस्वभावच आहे नाही का रे?"

दुष्टबुद्धी लगेच 'हो' म्हणाला. दोघे स्वदेशी परतले.

दोघे आपल्या गावाच्या जवळ पोचले असता धर्मबुद्धी दुष्टबुद्धीला म्हणाला– "मित्रा! जे मिळालं आहे त्यात तू अर्धे घे. आपण लौकरच आपल्या सर्व नाते-वाइकांना बोलावून एक मेजवानी करू या."

परंतु दुष्टबुद्धीच्या मनात स्वार्थ शिरला होता. तो म्हणाला–"मित्रा! आपण अ[illegible] आपल्या या प्राप्तीचे इतक्या लवकर प्रदर्शन करणे बरोबर होणार नाही. त्यांच्या मनात लोभ उत्पन्न होईल. याशिवाय जो विवेकवान असतो तो आपल्याजवळच्या संपत्तीचे प्रदर्शन करण्यात शहाणपण मानीत नाहीं. पैसा हा पापकर्माला मूळ कारण होतो. तपस्वी मुनींचे चित्तसुद्धा पैसे पाहून चलबिचल होते. ते राहू दे, हे सोने आपल्या दोघांच्या मालकीचे असेपर्यंत आपली मैत्री जास्तजास्त वाढत जाईल. म्हणून आपण प्रत्येकाने एकेकशे नाणी घेऊन उरलेले आठशे त्या भांड्यासह कोणत्यातरी गुप्तस्थानी जंगलात पुरून ठेवू या. तसं केलं तर हा खजिना आपल्याला लाभतो की नाही तेदेखील कळेल. आपल्याला गरज असेल तेव्हां येऊन आपण घेऊन जात राहू या."

धर्मबुद्धीला त्यात काही संशय आला नाही. दोघे रानात एका निर्जन स्थानी गेले आणि तेथे आपला तो सांठा पुरून ठेवून आपापल्या घरी परतले.





# तिळ्या बहिणी

[ १४ ]

[ राक्षसाने विहिरीत टाकून दिल्यावर उदयन त्याच्याजवळच्या जादूच्या पंख्याच्या सहाय्याने वर आला. नंतर तो श्रावस्तीला गेला आणि राजाला, राजकन्या सुरक्षित असल्याचे कळवून परतल्यावर त्याला एक भयंकर दृश्य दिसले. झाडाच्या एका फांदीला पांच फास बांधून लोंबकळत सोडले होते व राक्षस तेथे उभा होता. पुढे–]

ते भयंकर दृश्य पाहूनच उदयनचे सर्वांग हादरले. हे सर्व कशासाठी आहे हे त्याला कळेना. स्वत: अदृश्य रूपे राहून संकटात सांपडलेल्यांना सोडवावे म्हटले तर तेदेखील शक्य नव्हते. कारण श्रावस्ती-हून परत येते वेळी दुर्दैवाने त्याच्याजवळचे पांढरे भस्म कोठेतरी पडले. म्हणून आपली भावंडे क्षणभराने फाशीवर लटकणार हे माहीत असूनसुद्धा उदयनला आड उभे राहून हात चोळीत बसण्याव्यतिरिक्त काही करतां येईना. प्रत्येक क्षण एकेका युगा-सारखा वाटत होता आणि तरी निरुपाय व असहाय होऊन पहात राहण्याव्यतिरिक्त काही करतां येण्यासारखं नव्हते.

इतक्यात राक्षस त्यानं बांधून ठेवलेल्या पांचही जणांना झाडाजवळ घेऊन गेला. त्याने त्यांच्या मानेभोंवती ते फास टाकले. उदयन अधीर होऊन पुढे जाणार एवढ्यात



"थांबा! असा आवाज त्याला ऐकू आला. उदयन थबकला व आवाजाच्या दिशेने पाहू लागला. तो कोणाचा आवाज होता बरे! तो दाढीवाल्याचा! आवाज होता. उदयनने ते ओळखले. दाढीवाला राक्षसाला सांगत होता–"यांना वाचविण्याच्या हेतूने मी यांचे एक गुपित तुला सांगितले नव्हते. परंतु ते लपवूनसुद्धां मी यांना वांचवू शकत नाही, हे पाहून सांगतो आहे. याशिवाय मी तरी कोठे वांचणार आहे? म्हणून सर्व खरं ते सांगतो. इतके दिवस तुला व मला फसवीत आलेली ही तिघी पोरे तिळी भावंडे आहेत." असंच आणखी काही तो पुढे बोलण्याच्या प्रयत्नात होता.

म्हणाला–"काय, ही तिळी भावंडे आहेत? तू मला पुन्हां फसविण्यासाठी हे बोलतो आहेस, सर्व गप्पा आहेत तुझ्या! ही तिळी भावंडेच आहेत तर ती आजवर मला कशी नाही सांपडली?"

दाढीवाला म्हणाला–"तू स्वत: होऊन यांना सोडलेस." असे सांगून तिळ्या भावंडांच्या दृष्टीत जो दोष होता तो त्याने सांगितला आणि त्यानेच मंत्रवलेले अंजन लावून त्यांचे डोळे बरे केल्याचे ही सांगितले.

ते सर्व ऐकून राक्षस आनंदाने ओरडला–"तरमग मला पाहिजे असलेली पन्नास जुळीमुळे पुरी झाली! तू म्हणतो आहेस हे मी खरे मानू का मग? ही मुले जुळी किंवा तिळी आहेत हे कसे समजायचे? त्यांनाच विचारतो थांब!" असे म्हणत राक्षसाने संध्या व निशीथ दोघांकडे वळून विचारले–"हा म्हणतो आहे ते सर्व खरे का रे? खरे लपवायचा प्रयत्न केलात तरी तुम्ही वांचणार नाही, म्हणून खोटे बोलू नका. तुम्ही खरोखरीच तिळी मुले असाल तर एका फार मोठ्या कार्यासाठी तुम्ही प्राणार्पण केल्याबद्दल तुमच्या मनाचे नक्कीच समाधान होईल."

संध्याकुमार व निशीथ दोघांनी ते खरोखरच तिळी भाऊ असल्याचे कबूल केले.

हा दुष्ट दाढीवाला लबाड निघाला तर! त्याला आपण जीवदान दिले. त्याचा प्रत्युपकार त्याने असा केला काय? लगेच जाऊन त्याचे मुंडके उडवावेसे त्याला वाटले. परंतु तेवढ्यात राक्षसाने दाढीवाल्याला विचारले–"काय रे मग तो तिसरा कोठे गेला?"

दाढीवाला म्हणाला–"तो घरी जाऊन येतो, असे सांगून गेला त्या गोष्टीस एक आठवडा होत आला. आतापर्यंत यायला पाहिजे होता खरा! वाटेत कोठे संकटात सापडून अडकला की काय कळत नाही! इतक्यात तो येईल असेदेखील मला वाटत नाही."

"बरं ते सोड, जास्त उशीर करतां कामा नये. उद्यांच बली देऊन देवीला प्रसन्न करावे, म्हणतो. त्यासाठी तयारी केली पाहिजे. परंतु तुझ्यावर विश्वास करून सोडून देईन असे मात्र समजू नकोस." राक्षस म्हणाला. नंतर त्याने दाढीवाल्याला संध्याकुमार व निशीथला आणि दोघां शिपायांना एकेका झाडाला बांधून ठेवले मोठ्याने हसत पुन्हां घारीचे रूप घेऊन आकाशमार्गे उडाला.

राक्षस निघून गेल्याबरोबर राग आवरून इतका वेळ पहात राहलेला उदयन तलवार उपसून समोर आला आणि सर्वात आधी दाढीवाला होता तेथे जाऊन त्याचे मुंडके उडवायला निघाला.





"थांब! अशी घाई करून चालणार नाही. मी म्हणतो आहे ते सर्व शेवटपर्यंत ऐकून नंतर तुला जे वाटेल ते कर." दाढीवाला म्हणाला.

"काय रे ऐकायचे? ऐकले ते पुरे झाले. तुला जीवदान दिले त्याचे ऋण चांगलेच फेडलेस! तुझ्या अंगाची खांडोळी करून टाकली तरी पाप लागणार नाही. आणि आतां थांब कशाला रे म्हणतो आहेस?" असे म्हणत उदयनने त्याची मुंडी धरून विचारले.

"मुला! तुझा गैरसमज झाला त्यात आश्चर्य नाही. तरी मी सांगतो आहे ते ऐक! फक्त या क्षणाला जीव वांचवून

सांगितली. ती मला सांगावी लागली. सुटायला मला दुसरा उपाय दिसलाच नाही. तू माझ्या जागी असतास तर तुलादेखील काही करता आले नसते. माझी ती युक्ती साधली आणि वेळ टळली. तो दुष्ट उद्यांपर्यंत थांबला हे आपले महद्भाग्यच समज!" दाढीवाला म्हणाला.

उदयन विचारात पडला. थोडे नमते घेऊन म्हणाला—"तू म्हणतोस ते खरे मानले समज, उद्या उजाडण्यापूर्वी त्याच्या हातातून निसटून कसे जायचे, सांग!"

दाढीवाला म्हणाला—"त्याही गोष्टीचा मी विचार केला आहे, सांगतो. पहिल्याने या सर्वांना सोडू या!" असे म्हणत उदयनने आणि दाढीवाल्याने संध्याकुमार व निशीथला आणि शिपायांना बंधन मुक्त केले. नंतर त्यांना बरोबर घेऊन सरोवराजवळ गेला. सर्वांना पाहून राजकन्या सरोवरातून बाहेर आल्या.

दाढीवाला उययनला म्हणाला—"ते तांबडे अंजन आण पाहू!"

उदयनने अंजन दिल्याबरोबर दाढीवाल्याने राजकन्यांना जवळ बोलाविले. त्या आल्यावर सुहासिनीच्या हाताला त्याने ते लावले. तिचा तो हात अदृश्य झाला. नंतर सुभाषिणीला बसायला सांगून तिच्या

पाय अदृश्य झाला. आणखी थोडे अंजन घेऊन सुकेशिनीच्या दोन्ही डोळयांत त्याने घातले. तिचे दोन्ही डोळे गेले. अशा तऱ्हेने तिघीं राजकन्या विकलांग झालेल्या पाहून उदयन म्हणाला—"हा किती भयंकर युक्ती आहे रे? तू युक्ती करतो म्हणालास ती हीच वाटते?" उदयन संतापाने थरथर कांपत म्हणाला.

"अद्याप तुझी घाई आणि राग संपले नाहीत तर! प्रत्येक गोष्टीविषयी अशी शंका करीत राहलास तर कसं चालायचं?" असं म्हणत दाढीवाल्याने उदयनच्या कानात काहीतरी सांगितले. उदयन थोडा शांत झाल्यासारखा म्हणाला—"तरमग आजपर्यंत कोणत्याही अवयवात व्यंग नाही हे त्याला माहीत असतांना उद्यां आल्यावर त्याला ही व्यंगे दिसली तर त्याला तुझ्यावर संशय येणार नाही का? त्याचा आपल्याला काय फायदा?" उदयनने विचारले.

"ते सर्व नंतर पाहून घेऊ. तूर्त तरी याशिवाय दुसरा मार्ग दिसत नाही. उद्यां राक्षस येण्यापूर्वी आम्ही सर्वांनी, आम्हांला त्याने बांधून ठेवले होते तसे झाडाला बांधून राहले पाहिजे. फक्त तू स्वतःवर पांढरे भस्म टाकून अदृश्यपणे सर्व पहात रहा." दाढीवाला म्हणाला.



उदयनला काय बोलावे सुचेना. म्हणाला—"ते भस्म असते तर इतके कष्ट सहन करण्याची गरजच नव्हती. श्रावस्तीहून परत येत असतां माझ्या हातून ते कोठेतरी पडले आणि हरवले."

"ते म्हणजे हरवले? काही हरकत नाही. तू आम्हांला थोडे देऊन गेला होतास ते आम्ही वापरले नव्हते. हे बघ ते!" असे म्हणत त्याने भस्माची पुडी दिली.

नंतर उदयनने पांचही जणांना पहिल्यासारखे झाडांना बांधून ठेवले आणि स्वतः अदृश्य रूपे तेथेच बसून राहला.

* * *



दुसऱ्या दिवशी उजाडतांच वक्री वादळ सुरू झाले. राक्षस येण्याची सूचना होती ती सर्वांना. संध्याकुमार, निशीथ, दोघे शिपाई व दाढीवाला झाडाला बांधून राहल्याने अगदी दमून भागून गेल्यासारखे सोंग करून बसले होते. थोड्या वेळाने राक्षस आलाच. त्याच्याबरोबर खांद्यावर कुऱ्हाडी घेऊन दोघे चांडाळ येत होते. त्यांच्या पाठीमागून दासदासींची एक मिरवणूकच हातात फुलांच्या माळा वगैरे घेऊन येत होती.

राक्षस संध्याकुमार, निशीथ वगैरे होते त्या जागी आल्याबरोबर त्याच्यासाठी बसायला तयार करून ठेवलेल्या सिंहासना- [illegible] आणि [illegible] आपले. त्या दासदासींना म्हणाला— "[illegible] सर्वांना स्नान वगैरे घालून, नवी वस्त्रे नेसायला अंगात घालायला द्या आणि त्यांना सजवून एकेक करून घेऊन या."

सर्व आपापली कामें करण्यात गर्क होऊन गेले. एकजण स्नान घालीत होता तर आणखी एकजण वस्त्रालंकार घालून सजवण्यात गुंतला होता. नंतर प्रत्येकाला आणून राक्षसासमोर उभे करण्यात येत होते. राक्षसाच्या आनंदाला पारावारच नव्हता. आज त्याच्या आयुष्यातला अत्युत्तम दिवस उजाडला होता. समोर उभे असलेल्या राजकुमारांना व राजकन्यांना पाहून राक्षस नाव गांव सांगून तो त्यांना चांगला ओळखत असल्याचे दर्शवीत होता. म्हणत होता—"तू कनकपुरीची राजकन्या नाही का? तू अवंतीशाच्या राजभवनाची कांती वाढवणारी, होय ना? आणि तू काय रे मणिपूरचा युवराज नाही का?"

इतक्यात एक दासी एका राजकन्येला घेऊन येत म्हणाली—"हे काय मालक? या आंधळीला कशाला आणून ठेवलेत येथे? देवीला ही मान्य होईल का?"

राक्षस थक्क होऊन पहात गरजला—"आंधळी!" आणि सिंहासनावरून उतरून [illegible] इतक्यात आणखी एक दासी येऊन विचारू लागली—"या मोडक्या हाताच्या मुलीला कसे काय घेऊन आलात प्रभो? आणि एका राजकन्येला समोर उभे केले.

आतां मात्र राक्षस स्वतःला आवरू शकला नाही. डोळ्यांतून आग पाखडत ओरडला—"लबाडी, लुच्चेगिरी! विश्वासघात!" त्याच्या आवाजाने सर्व आसमंत हादरले.

इतक्यात आणखी एक दासी एका राजकन्येला घेऊन आली व म्हणाली—"हीला तर पायच नाहीत, मालक!" असे म्हणत तिने बरोबर उचलून आणलेल्या राजकन्येला दाखविले.

राक्षसाच्या सर्वांगाचा भडकाच उडाला. तो सरळ दाढीवाल्याजवळ गेला व झाडा सकट त्याला गदगदा हालवीत—"हा काय रे विश्वासघात? मी या मुलींना हसत खेळत असलेल्या, कोणतेही व्यंग नसलेल्या पाहून आणून ठेवले होते आणि आतां ही व्यंगे कोठून आली रे? हे तुझेच काम आहे. खरं काय ते बोल नाहीतर तुलाच पहिल्याने बलिस्तंभावर उभा करतो."

दाढीवाला न घाबरतां अगदी शांत आवाजात म्हणाला—"ओरडून आदळआपट करून काय मिळणार? मीच हे काम केलं असलं पाहिजे, असाच संशय आहे ना तुझा माझ्यावर? एक क्षणभर धीर धरलास तर सांगतो. ऐक आणि नंतर तुला वाटेल ते कर."



"बस बस! पुरे कर! सर्व तयारी करून आलो आणि तू यात विष कालवलेस! तरी लवकर बोल काय म्हणायचे आहे ते!" राक्षस म्हणाला.

"त्यांच्या अंगात हे व्यंग कसे आले, हे मला माहीत नाही. परंतु एक गोष्ट झाली असेल, असे मला वाटते. हे सर्व करण्याची युक्ती आणि शक्ती एकट्या त्या उदयन मध्ये आहे, एवढे मी नक्कीच सांगू शकेन. त्या तिघांचा मी दृष्टिदोष दूर केला तेव्हां त्यांना माझे सर्व गुपित कळले. त्या वेळी माझ्याजवळची अंजने वगैरे त्याच्याकडे राहून गेली होती. तो जिवंत असेल तर तो कोठे तरी तुला सापडेलच. तेव्हां त्याच्याचकडून यांची ही व्यंगे तुला दूर करवून घेता येतील. तोंपर्यंत या पोरांना असेच झाडाला बांधून ठेव. मी एवढाच सल्ला या वेळी देऊ शकत आहे. नंतर तुझी मर्जी!" दाढीवाला म्हणाला.

"ठीक! तरमग या खेपेस तो कोठे सापडला तर माझ्या हाती मेलाच समज! [illegible]"

असे म्हणत राक्षस सन्ध्याकुमार, निशीथ, शिपाई व दाढीवाला सर्वांना एका दोरखंडाने बांधून आपल्याबरोबर ओढून घेऊन गेला.

उदयन ते सर्व गुप्त रूपे पहात राक्षसापाठीमागून जात होता. राक्षस एका पाचोळ्याच्या ढिगाजवळ थांबला. घारीचे रूप घेऊन त्याने आपले पंख पसरले व जोराने हलविल्याबरोबर सर्व पाचोळा उडून गेला आणि त्या जागी जमिनीत एक दार निघाले. त्या दारातून राक्षसाने आपल्या कैद्यांना आत कोंबले आणि पाचोळ्याच्या ढिगाऱ्याखाली दार झांकून ठेवून दिले.

जुळ्या राजकन्यांवर कडक नजर ठेवायला सांगून सर्व दासदासींना दरडावून बजावून निरनिराळ्या कामावर नेमले आणि अंगात व्यंग्य असलेल्या सुहासिनी, सुभाषिणी व सुकेशिनी तिघींना घेऊन घारीच्या रूपे निघून गेला. (क्रमशः)





# श्रेष्ठ दान

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो परत झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौनपणे स्मशानाच्या दिशेने चालू लागला, तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा! तू जे कष्ट सहन करीत आहेस त्याचा पुण्यलाभ तुला किती होईल, कोणाला सांगता येणार नाही. पुण्य कार्यात कोणते मोठे व कोणते लहान, हे निश्चयपूर्वक सांगता येणे कोणालाही शक्य नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला एक गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फारपूर्वी एका देशात एका गावी श्रीपती नावाचा एक वाणी आणि रघुनाथ नावाचा एक शेतकरी रहात असत. दोघांची बरची स्थिती चांगली होती. दोघे चांगल्या स्वभावाचे होते. श्रीपती पुष्कळ दानधर्म

वेताळाच्या गोष्टी



करी. तो गावात एक उदार दानी म्हणून प्रसिद्ध होता.

एकदा श्रीपतीचे घर ज्या रस्त्यावर होते त्या रस्त्याने एक तरुण जात असतां कडक उन्हामुळे आणि भुकेमुळे भोवळ येऊन रस्त्यात पडला. श्रीपतीने धावत जाऊन त्याला सावलीत आणले. त्याच्या तोंडावर पाणी शिंपडल्यावर त्याला शुद्ध आली. नंतर त्याने त्याला तो कोण, काय व भोवळ कां आली, सर्व विचारुन घेतले.

तो तरुण एक भिकारी होता. त्याला दोन-तीन दिवस खायला काही मिळाले नव्हते. श्रीपतीने त्याला पोटभर खायला घातले आणि झोपून रहायला एक चटई दिली. [illegible] आणि झोपून उठल्यावर दुसऱ्या दिवशी त्याचा निरोप घेऊन निघून गेला.

तो तरुण दिवसभर गावात फिरला, परंतु त्याला कोठे काही खायला मिळाले नाही. रात्री तो पुन्हां श्रीपतीकडे आला आणि जेवून खाऊन झोपला.

रघुनाथने श्रीपतीला भेटून विचारले– "काय रे, श्रीपती! गेले दोन दिवस तुझ्याकडे एक जण जेवतो खातो आहे, कोण तो?" श्रीपतीने सर्व सांगितले. तिसऱ्या दिवशी उजाडल्याबरोबर रघुनाथ त्या तरुणाला भेटून म्हणाला–"तु दिसतो आहेस तरुण. तुझे हातपाय तर धडधाकड दिसत आहेत. तेव्हां काहीतरी काम करून स्वत:चे पोट भरण्याचे सोडून तू भीक मागायला काय लागला आहेस?"

तो तरुण म्हणाला–"हे पहा दादा! मी आपल्या आईवडिलांचा एकुलता एक मुलगा असल्याकारणाने त्यांनी मला लाडात वाढविले. मला कोणतेही काम येत नाही की कोणते कसब माझ्यात नाही. काल परवांपर्यंत आईवडिलांची सावली होती. दोघं अकस्मात् गेल्यावर भीक मागण्या खेरीज दुसरा मार्ग राहला नाही मला!"

रघुनाथ थोडा वेळ विचार करून म्हणाला–"भल्या माणसा! मग भीक [illegible] त्याची सुद्धा गरज नाही. तुझ्यासारखे माझ्याजवळ पुष्कळ काम करीत आहेत. शेण्या गोवऱ्या लावून त्या विकायला शिकवितो मी." असे सांगून रघुनाथ त्या तरुणाला गोठ्यात घेऊन गेला. तेथे शेण्या कशा लावायच्या त्या तरुणाला दाखविल्या, वाळलेल्या शेण्या गावात नेऊन कशा विकायच्या त्याला समजावून सांगितले.

त्या तरुणाला थोड्याच दिवसात त्या कामाची चांगली संवय झाली. तो दररोज शेण्या लावून वाळलेल्या गावात नेऊन विकू लागला. जे पैसे मिळत त्यातले अर्धे रघुनाथाला देई आणि अर्ध्यांवर त्याचा उदरनिर्वाह चांगला चाले.



काही दिवसांनी एकाएकी दुष्काळ पडला. त्या देशाच्या राजाने भटांब्राह्मणांना बोलावून त्या परिस्थितीत काय करायचे असे विचारले. तेव्हां ते म्हणाले–"दानधर्म करून श्रेष्ठ पुण्य संपादन केलेल्या एखाद्या पुण्यवान माणसाने आपले अर्धे पुण्य दान केल्यास पाऊस पडेल आणि दुष्काळ जाईल."

परंतु श्रेष्ठ दान कोणते हे कसे ओळखायचे ते मात्र कोणी सांगू शकला नाही. तेव्हां राजाने राज्यभर दवंडी पिटविली की देशात दानधर्म करून जर कोणी पुण्य संपादन केले असेल त्याने आपले अर्धे पुण्य पणाला लावून दुष्काळ टाळायला पुढे यावे. म्हणून अनेक पुण्यवान राजवाड्यात येऊन

पुण्यदान यज्ञात आपल्या अर्ध्या पुण्याची शास्त्रोक्त आहुती टाकू लागले. परंतु दुष्काळाच्या परिस्थितीत थोडादेखील बदल झाला नाही.

परंतु राजाने कोणत्याही प्रकारे कंटाळा न करता दानयज्ञ चालू ठेवला. पुण्यदान यज्ञाची बातमी श्रीपती व रघुनाथ दोघांच्या कानावर आली व उशीर झाला होता तरी दोघे राजधानीत दाखल झाले. श्रीपतीने प्रथम आपल्या अर्ध्या पुण्याची आहुती वाहिली. नंतर रघुनाथाने आपल्या अर्ध्या पुण्याची आहुती टाकली आणि आश्चर्य म्हणजे त्या पाठोपाठ आकाशात ढग दिसू लागले. थोड्याच वेळाने मोठा पाऊस पडला आणि दुष्काळाने पाठ फिरविली.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा! श्रीपतीने आयुष्यभर दानधर्म करून थोर दानी म्हणून एवढा नावलौकिक संपादन केला होता. परंतु त्याच्या पुण्याई-पेक्षा रघुनाथाची पुण्याई कशी काय मोठी ठरली? अन्नदानापेक्षा थोर पुण्यकार्य दुसरे [illegible] [illegible] परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

तेव्हां विक्रमादित्य म्हणाला– "श्रीपतीने भूक लागताच अन्नदान करून आणि उपाशी माणसावर फार उपकार करून पुण्य संपादन केले हे खरे आहे. परंतु रघुनाथाने तर अनेकांना स्वकष्टार्जित पैशाने उदरनिर्वाह करायला शिकविले. एक दोन वेळा नव्हे तर आयुष्यभर त्यांना पोटा पाण्याची काळजी उरली नाही. म्हणून रघुनाथाचे पुण्यकार्य निःसंशयच जास्त थोर म्हटले पाहिजे. ते विद्यादान होते. विद्यादान हे सर्वांत श्रेष्ठ दान आहे, ह्यात कोणतीही शंका असण्याचे कारणच नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# डोळे उघडले

रामपूर नावाच्या गावी बापूरावांना गावातले एक प्रतिष्ठित नागरिक म्हणून लोक ओळखत. घरात सर्व सुखसोयी करून घेण्यास खूप ऐश्वर्य होते आणि बायको तर सुग्रीणच होती. म्हणून बापू-रावांना कोणत्याही गोष्टीची काळजी म्हणून नव्हती. त्यांना मूल नव्हते, परंतु ईश्वराच्या कृपेने मदनाच्या पुतळ्यासारखा मुलगा झाला. पण मुलगा वाढू लागला तसतशी त्यांची काळजी वाढू लागली.

त्यांचा मुलगा नारायण लहानपणा-पासूनच व्रात्य व खोडकर निघाला. अजून लहान आहे, पुढे सुधारेल या विचाराने बापूरावांनी थोडे दुर्लक्ष केले. परंतु मुलगा वाढत गेला तशी त्याला शिंगें फुटत गेली. तो कोणाचे ऐकत नसे. दहावे वर्ष लागले होते, पण 'ओ ना मा' सुद्धा येत नव्हता. त्याचं मन खेळातून काढून अभ्यासाकडे लावण्याचा बापूरावांनी खूप प्रयत्न करून पाहिले. परंतु त्यांना यश आले नाही. पुढे त्याचे कसे होणार या विचाराने बापू रावांना झोप येईनाशी झाली.

अकस्मात् त्यांच्या घरी एक थोर विद्वान व मुलांना शिकविण्यात अत्यंत हुशार असे त्यांचेच गुरुवर्य विद्यानाथ आले. त्यांच्या कृपेनेच आपल्याला एवढे ऐश्वर्य लाभले असे बापूरावांना वाटत असे. असे गुरुवर्य संकटसमयी आपल्या घरी देवासारखे धावून आले असे बापूरावांना वाटले. विद्यानाथ कोणत्यातरी कामासाठी त्या गावी आले होते. तेव्हां आपल्या शिष्याला भेटून जावे असे सहाजिकच त्यांना वाटले. बापूरावांनी मन मोकळे करून आपल्या गुरूसमोर मुलाचा प्रश्न काढला.

विद्यानाथ हसून म्हणाले– "लहानपणी मुले लाडात वाढली, म्हणजे असे होते.



बरं तर, मी तुझ्या मुलाची गाडी रुळावर येते का, पाहतो."

त्या दिवशी संध्याकाळी नारायणाला बोलावून ते त्याच्याशी बोलत बसले. त्याला कोणी नवा नवखा माणूस असला म्हणून भय किंवा भीती वाटत नसे. कोणी मोठा वडीलधारा आला म्हणजे त्याच्याशी नम्रपणे वागावे, त्याला याचे ज्ञान नव्हते. 'मला खेळाशिवाय काही आवडत नाही,' असे नारायणाने विद्यानाथाला सांगितले.

"अस्सं! तर बरंच झालं! तू कोण कोणते खेळ खेळतोस, मी पाहणार आहे. मला आवडले तर मीदेखील खेळेन. काही वाच लिही असा उच्चारही तुझे बाबा करतो." विद्यानाथ म्हणाले.

ते ऐकून नारायणाचा उत्साह वाढला. तो त्यांना म्हणाला—"घरात बसून खेळायचे खेळ मला नाही आवडत. माझे खरे खेळ पहायचे असतील तर गावाबाहेर डोंगरावर जावे लागेल."

विद्यानाथ म्हणाले—"एवढेच ना? चल!"

दोघे गावाबाहेरच्या डोंगराच्या वाटेने निघाले तेव्हां वाटेत गावकरी भेटत. ते विद्यानाथांना वाकून नमस्कार करू लागले. ते पाहून नारायणाला आश्चर्य वाटले व त्याने, "हे लोक असे नमस्कार कां करताहेत हो?" विचारले.

"ते सांगतो, पाठीमागून. पहिल्याने मी तुझे खेळ पाहणार आहे!" विद्यानाथ म्हणाले.

डोंगराजवळ बरीच मुले होती आणि निरनिराळे खेळ खेळत होती. नारायणाला पाहून उत्साहाने पुढे धावत आलेली मुले, बरोबर विद्यानाथांना पाहून थबकली.

"काही हरकत नाही रे! हे आपले खेळ पहायला आले आहेत. या आपण सारे खेळू या!" असे सांगून नारायणाने त्यांच्या मनातली भीती काढून त्यांना खेळायला बोलाविले.

खेळ खेळत राहली. विद्यानाथांना एकही खेळ आवडला नाही. राग आला असूनही विद्यानाथ शांतपणे सर्व पहात राहले.

काही वेळाने त्यांनी नारायणाला बोलावून विचारले—"काय रे, तू मघां मला विचारलेस की लोक मला असा नमस्कार कां करतात? तुला कोणी असा नमस्कार केलेला आवडेल का?"

"आवडेल, कां नाही? पण त्यासाठी काय करावे लागेल हो?" नारायणाने बेफिकीरपणे विचारले.

"त्यासाठी तुला हे खेळ बंद करावे लागतील, कदाचित्! सर्व तुला आदराने नमस्कार करू लागतील, असा तुला करू शकेन मी. आहेस का तयार, बोल!" विद्यानाथांना विचारले.



पण नारायण सामान्य होता का? त्याने बेफिकीरपणे उत्तर देत विचारले—"मी खेळायचं बंद केलं समजा, पण लोक माझा आदर करू लागतील असा तुम्ही मला करू शकाल कशावरून?"

"या जागात मला अशक्य असाध्य असे काहीच नाही. माझ्या मनात एकदा आलं की कोणत्याही वस्तूला किंवा व्यक्तीला गौरव किंवा आदर नक्की मिळालाच पाहिजे!" विद्यानाथ आत्मविश्वासाने व निःसंदिग्धपणे म्हणाले.

नारायण ते थट्टेत उडवून देत हसत इकडे तिकडे पहात काही अंतरावर जमिनी-

वर पडलेला काळा दगड पायाने विद्यानाथांच्या बाजूला ढकलीत म्हणाला–"या दगडाचा गौरव वाढवू शकाल का?"

विद्यानाथ थोडीदेखील माघार न घेता म्हणाले–"या दगडाचा केवढा आदर होतो हे तू उद्यांच पहा, स्वतःच्या डोळयांनी!" असे सांगून ते तो दगड घेऊन निघाले.

"वेडा पीर दिसतो आहे!" अशा तऱ्हेने सर्व मुले खदखदां हसली.

मात्र नारायण विद्यानाथांना तो दगड उचलून नेतांना पाहून थक्कच झाला.

दुसऱ्या दिवशी नारायण झोपून उठला तेव्हां त्याच्या घरातल्या माजघरात त्याला कोणत्यातरी उत्सवाची गडबड दिसली. तो पहायला गेला तर एका मेजावर श्रीकृष्णाच्या सजीवनमूर्तीसारखी मूर्त होती. एकेक जण येऊन पाळीपाळीने नमस्कार करून जात होता. विद्यानाथ तेथेच होते. त्यांनी नारायणाला तेथे आलेला पाहून खुणेने बाहेर यायला सांगितले. "काल तू पायाने ढकललास तोच हा दगड. त्याला काळा अ[illegible] सर्व नमस्कार करू लागले आहेत. आता तरी तुला माझ्या हाताची किमया कळली की नाही?" त्यांनी नारायणाला विचारले.

नारायण तोंड थोडे बारीक करून म्हणाला–"तो दगडच होता म्हणून तो तुम्ही म्हणालात तसे ऐकून तुमच्या समोर वांकला. मी इतक्या सहज वांकणार नाही. दहा जणांकडून माझा गौरव करविणे तुम्हांला शक्य होणार नाही."

विद्यानाथ आतां मात्र जोराने हंसले व म्हणाले–"वेड्या! सर्व तुझा गौरव करू शकतील असा मी तुला करू शकलो नाही तर त्यात माझा अपमान काहीच नाही. तुझ्यापेक्षा तो दगड शतपटीने बरा असे लोक म्हणतील, त्याचा विचार कर."

ते ऐकून मात्र नारायण निरुत्तर झाला. त्याचे डोळे उघडले. तो वडिलांचा निरोप घेऊन विद्यानाथांबरोबर विद्याभ्यास करण्यासाठी निघाला.





# भुतांच्या लग्नाची मेजवानी

एका गावाच्या दक्षिणेकडील दाट जंगलात एका चिंचेच्या झाडावर काही भूत पिशाच झालेल्या महिला रहात होत्या. त्यांच्यांत एक लहान तरुण भुतीण होती. संसारसुख उपभोगायला मिळण्यापूर्वीच तिला मरण आले. म्हणून तिला वाटे की पुन्हां मनुष्य होऊन लग्न करावे आणि संसारसुख अनुभवावे. तशी तीव्र इच्छा तिच्या मनात उत्पन्न झाली.

एकदा तिला मुळीच राहवले नाही, तेव्हां तिने मनांतली इच्छा इतर भुतिणीजवळ व्यक्त केली. ते ऐकून सर्व भुतिणी हंसू लागल्या. म्हणाल्या–"वेडे! पुन्हा कशाला ग, त्या विहिरीत उडी घ्यायचा विचार तुझ्या मनात आला? सुटलीस त्या संसाराच्या जाळ्यातून, त्याबद्दल खूष व्हायच्याऐवजी, तुला हे काय ग, सुचले?"

"सासूचा छळ, तरुण नणदेचा सोसावा लागणारा त्रास, हा सर्व असह्य झाला तेव्हां मी गळयाला फांस लावून घेऊन सुटले!" आणखी एकजण म्हणाली.

"सासूनणंद कोणी नसेल असेच घर पाहून लग्न करीन म्हणजे झालं!" तरुण भुतीण म्हणाली. दुसऱ्या दिवशी काळोख पडू लागताच ती तरुण भुतीण एका सुंदर तरुणीचे रूप घेऊन काही अंतरावरच्या एका पडक्या धर्मशाळेच्या पडवीत रडत बसून राहली.

थोड्या वेळाने एक तरुण व सुंदर युवक तिला येत असलेला दिसला. त्याला पाहून ती तरुण भुतीण खूष झाली व त्याची नजर आपल्याकडे वळावी यासाठी आणखी जोरजोराने रडू लागली.

"कोण हो तुम्ही? इतका काळोख पडला आहे आणि येथे एकट्या बसला आहां?" त्या तरुण युवकाने विचारले.



ती तरुण भुतीण ओक्साबोक्शी रडत हुंदके देत म्हणाली–"मी शेजारच्या गावची राहणारी. आईवडील एकाकी मला अनाथ सोडून निघून गेले. पुढलं आयुष्य कसं चालवायचं...!"

तो तरुण युवक सहानुभूती दर्शवीत म्हणाला–"कोणाशीतरी लग्न करून घे म्हणजे झालं!"

"म्हणायला सोपं आहे हो, परंतु हुंडा द्यायला नसल्यावर माझ्याशी लग्न करायला कोण तयार होणार?" तरुण भुतीण म्हणाली. "तुला हरकत नसेल तर मी आहे तुझ्याशी लग्न करायला तयार!" तो तरुण युवक म्हणाला.

[illegible] त्रास मुळीच सहन होणार नाही, सांगून ठेवते!" तरुण भुतीण म्हणाली.

"मला या जगात कोणी नाही. मी एकटा आहे. मोठा थोरला वाडा आहे स्वत:चा!" तो तरुण युवक म्हणाला.

"तरमग चला आपण आपल्या घरी जाऊ!" असं म्हणत ती उभी राहली.

त्या तरुणाचे घर गावाच्या वेशीबाहेरच होते. दुसऱ्याच दिवशी दोघांनी लग्न करून घेतले आणि त्या घरात राहू लागली. त्यांचा संसार थाटला.

. मध्यरात्रीच्या सुमारास नवरा चांगला झोपला असल्याची खात्री करून घेऊन ती ज्या चिंचेच्या झाडावर रहात होती तेथे आली.

"ते पहा कोण आलं आहे ते. पकडा तिला आणि फाडून खा!" भुतिणी तरुण भुतिणीला मानव रूपात असल्यामुळे न ओळखून ओरडू लागल्या.

तरुण भुतिणीने त्यांचा आरडाओरडा ऐकला. काही वेळ हसली आणि स्वस्व रूपात प्रगट झाली.

सर्व भुतिणी तिला पाहून विचारू लागल्या–"हात तिच्या तूच का? तू ज्या कामासाठी गेली होतीस त्यात काही यश आलं का?"

[illegible] सासू नाही की नणंद नाही. खूप मोठा वाडा आहे." तिखटमीठ लावून तरुण भुतीण अशा लांबलांब थापा मारू लागली.

"कसा आहे ग तुझा नवरा? संसार कसा काय चालला आहे?" एका भुतिणीने विचारले.

"माझे यजमान म्हणतेस? एक माणिक आहे माणिक! माझ्यासाठी जीव द्यायला तयार होईल? आमचा संसार निर्विघ्न चालू झाला आहे. आमचं खूप जमतं आहे. बरं तर मी येते आता. त्यांची झोप मोडली व मी जवळ नसले तर काय विचार करतील कोणास ठाऊक?" म्हणत तरुण भुतीण जायला घाई करू लागली.

"हो ग! जा की, कोण अडवितो आहे तुला? पण, आम्हांला लग्नाची मेजवानी नाही का देणार?" भुतिणींनी विचारले.

तरुण भुतीण काही वेळ विचार करून म्हणाली–"हो, देते! उद्यांच देते! उद्यां संध्याकाळ झाल्यावर तुम्ही सर्व माणसाचे रूप घेऊन माझ्या घरी या. मी तुमची ओळख माझ्या मैत्रिणी म्हणून यजमानांना करून देईन. मध्यरात्रीच्या सुमारास त्यांना कळू दिल्याशिवाय आपण आपल्या परीने मेजवानी करू या." असे सांगून पुन्हां मनुष्य रूपात घरी परत आली.

दुसऱ्या दिवशी काळोख पडल्यावर सर्व भुतिणी तरुण भुतिणीच्या घरी आल्या.



तरुण भुतिणीने तिला काहीच माहीत नसल्याचे सोंग करीत दार उघडले व म्हणाली–"अरे, तुम्ही एकदम सगळ्या जणी गट करून आल्यात की ग!" नंतर तिने त्या सर्वांची नवऱ्याला बोलावून ओळख करून दिली.

"नंतर आपल्या नवऱ्याला म्हणाली–"आज तुम्ही खाली झोपा. मी मैत्रिणीं-बरोबर वर माडी वर झोपते!" असे सांगून सर्वांना घेऊन ती माडीवर गेली.

मध्यरात्र उलटण्याची वेळ होती. नवरा छान झोपला असेल असे समजून तरुण भुतिणीने मेजवानीची तयारी बराबर केली.

"आम्हांला हा मानवदेह उचलून नेणे नको झालं बाई!" सर्व भुतिणी म्हणाल्या आणि त्यांनी भूत रूप घेतले.

मेजवानीची सर्व तयारी झाली सर्व भुतिणी टाळया वाजवून तालावर आरडा-ओरडा करीत नाचू लागल्या. नंतर त्या सर्व मेजवानीला बसल्या. तेव्हां एक म्हातारी भुतीण म्हणाली–"आपला हा आरडा-ओरडा ऐकून तुझ्या नवऱ्याची झोप मोडली असली तर आपलं बिंग फुटलंच. म्हणून तू हळूच खाली जाऊन पाहून कां नाही येत?"

तरुण भुतीण उठून जिन्यापर्यंत गेली व थांबून कानांवर दोन्ही हात ठेवून मोठ्याने ओरडली. खाली अंगणात सुमारे तीस चाळीस भुते नाचत होती. सर्व पुरुष होते. तीदेखील मेजवानीला बसायला तयार होती.

तिचे ज्या तरुणाशी लग्न झालं होतं तोसुद्धां तिच्या सारखाच भूतयोनीत पोचलेला तरुण होता, हे तिने ओळखलं. तिच्या सर्वांगाचा भडका उडाला. सर्व भूत मैत्रिणींना बरोबर घेऊन नरभूते नृत्य करीत होती त्यांच्यावर तिने हल्ला केला.

सर्व भुते आनंदाने ओरडत नाचू लागली. मेजवानीचे जेवण जेवल्याशिवायच सर्व आपापल्या स्थानी निघून गेली.

त्यानंतर त्या तरुण भुतीणीने कधी पुन्हां लग्नाची गोष्ट काढली नाही.



# १६४. नाइल नदीचे उद्‌गमरूप

**सा**त हजार वर्षांपूर्वी इजिप्त देशाची सभ्यता सुरु होण्यास कारणभूत झालेली नाईल नदी व्हिक्टोरिया सरोवरात उद्‌गम पावून डोंगरात वहात जात अल्बर्ट सरोवराला जाऊन मिळते. अल्बर्टजवळ तिचा जो धबधबा आहे तो चित्रात दिसत आहे.





# कन्यापूरचे कोडे

कन्यापूरचा राजा सुपर्ण याला मूलबाळ नाही म्हणून तो व राणी फार काळजीत पडले. लग्न होऊन वीस वर्षे लोटली होती. परंतु मुलगा किंवा मुलगी काहीच प्राप्त नव्हते. एकदा राजवाड्यात एक मुनी आले व त्यांनी विष्णूचे वाहन जो गरूड त्याला तपश्चर्या करून प्रसन्न केल्यास त्याच्या कृपेने नक्की संतानप्राप्ती होईल असे सुपर्ण राजाला सुचविले. सुपर्ण राजाने पर्वतावर जाऊन गरुडाचे स्मरण करून घोर तपश्चर्या केली. सुदैवाने त्याला यश आले आणि एका आठवड्याने गरूडमंतचा राजाला साक्षात्कार झाला. त्याने राजाला विचारले–"काय रे बाबा! मला आळवण्याचे कारण काय? कोणता वर पाहिजे तुला?"

सुपर्ण म्हणाला–"प्रभो! मला मूलबाळ नाही. तुझा अनुग्रह झाला तर संतान प्राप्ती होईल!"

गरूडाने त्याला एक फळ दिले व म्हणाला–"हे तू आपल्या राणीला खायला दे. ती गरोदर होऊन तिच्या पोटी जे काही जन्मेल त्याला हात लावल्या शिवाय तसेच राहू द्यावे लागेल."

ते फळ खाल्यावर राणी गरोदर असल्याचे कळले. दहाव्या महिन्यात तिच्या पोटी एक अंडे जन्मले. ते एखाद्या बदकाच्या अंड्या एवढे मोठे होते. राजाने ते तसेच जमिनीवर राहू दिले. दररोज त्याची थोडी थोडी वाढ होऊ लागली.

अशीच काही वर्षे लोटली. एके दिवशी राजाला एकाएकी मरण आले. त्या वेळे-पर्यंत ते अंडे बरेच मोठे झाले होते. राजा मरण पावला त्याच्या बरोबर सहाव्या दिवशी ते अंडे फुटले आणि त्याच्यातून दोन सुंदर राजपुत्र बाहेर आले. त्यांच्या अंगावर राजकुमारांना साजेल अशीच सुंदर वस्त्रे होती. एकाचा पोशाख निळ्या रंगाचा होता, त्याचे नाव नीलकुमार असे होते. एकाच्या अंगावर तांबड्या रंगाची वस्त्रे होती, त्याचे नाव रक्तकुमार होते. दोघे एकदम म्हणाले–"आम्ही सुपर्णाचे राजकुमार आहोत." निळी वस्त्रे धारण करणारा म्हणाला–"माझे नाव नीलकुमार!" दुसरा तांबड्या रंगाची वस्त्रे असलेला राजकुमार म्हणाला–"माझे नाव रक्त-कुमार!"

प्रधान राणीला बोलावून घेऊन आला. राणीने दोघांना आशीर्वाद दिला.

दोघे म्हणाले–"आम्ही या राज्याचे वारस दार आहोत, आम्हांला गादीवर बसवावे नाही तर अर्धे अर्धे राज्य दोघांना वाटून द्यावे."

प्रधान विचारात पडला. दोघे एकाच वेळी जन्मले. लहान कोण आणि मोठा कोण ठरविणे अशक्य होते. दोघांचा हक्क गादीवर समान होता. म्हणून प्रधानाने विचारले–"राज्य तर एकच आहे. एकच सिंहासनही आहे. दोघे एकाच वेळी कसे काय राज्य करणार?"

"तरमग राज्याचे दोन सारखेसारखे वाटे करा. प्रत्येकजण आपापल्या वाटयाच्या राज्यावर राज्य करील." दोघे म्हणाले.

"राज्य मुळात फार लहान आहे. प्रजेला ते कदाचित आवडणार नाही." प्रधानाने शंका केली.





"प्रजेची आवड आणि नावड बघण्याचे कारणच काय? राजे आम्ही दोघे होणार, आमची ती इच्छा पूर्ण झालीच पाहिजे. नीलकुमार होय की नाही रे?" रक्त-कुमाराने त्याला विचारले.

नीलकुमाराने त्या गोष्टीस होकार देत म्हटले–"त्या सर्वांचा विचार आम्ही करावयाचा आहे. तुम्ही किंवा प्रजेने नाही.

प्रधान म्हणाला–"ठीक! ते मान्य! पण दोन वांटे करायला थोडा अवधी लागेल. निदान तीन महिने तरी लागतीलच. त्याहून कमी अवधीत सर्व कामे पुरी होणे शक्य नाही."

मात्र तूर्त आमच्या राहण्याची व्यवस्था निरनिराळ्या वाड्यात करून द्या." दोघे राजकुमार म्हणाले.

प्रधानाने दोघां करितां दोन सुंदर राजवाड्यांची व्यवस्था करून दिली आणि राज्याचे वाटे एकसारखे कसे करून द्यायचे याविषयी विचार करू लागला.

"राज्याचे दोन वांटे करून देता येतील. परंतु सरोवर कसे वांटून द्यायचे?" उप प्रधानाने विचारले.

राज्याच्या उत्तरेला एक फार मोठे व सुंदर सरोवर पूर्वेकडून पश्चिमेपर्यंत पसर-लेले होते. त्याच्या मधोमध दक्षिणोत्तर बांधासारखे दगडाचे ढिगारे होते. परंतु एका जागी सुमारे शंभर वाराची जागा फक्त पाणीच होते. तेवढ्या भागावर दगडाचा बांध घातला तर सरोवराचे दोन भाग करता येण्यासारखे होते.

परंतु तसे करण्यात एक फार मोठा धोका होण्याची शक्यता होती. सरोवराच्या तळाला दोन कोसाच्या अंतरावर दोन मोठे झरे होते. त्या झऱ्यातून सरोवरात काही खनिज द्रव्याचे विषारी क्षार येत होते. तूर्त सरोवराचे पाणी एकत्र असल्याने पाण्याच्या एकत्र साठ्यामुळे त्या विषारी झऱ्यांमुळे काहीच नुकसान होत नव्हते.

त्या सरोवराचे दोन वांटे केले तर दोन्ही सरोवरांचे पाणी विषारी होऊन प्रजेच्या जिवाला धोका निर्माण होण्याची शक्यता होती. फक्त माणसेंच नव्हे, तर प्राणी व वृक्षवनस्पतींना देखील धोका होता. हिवाळ्यात दरवर्षी एक महिनाभर त्या सरोवराचे पाणी गोठून जाई. म्हणून झजेला पाण्याचा साठा करून ठेवावा लागे. तो सांठा पुन्हा बर्फ वितळेपर्यंत पुरवावा लागे.

हिवाळा तोंडावर होता. प्रधानाने राजकुमारांकडे जाऊन सरोवराचे दोन वांटे केल्याने उत्पन्न होणाऱ्या धोक्याची सूचना दिली. तेव्हां, काय वाटेल ते झाले तरी सरोवरीचे दोन, वांटे झालेच पाहिजे असा त्यांनी हट्ट धरला.

प्रधानाने आणखी दोन दिवसांचा अवधी मागून घेतला आणि परत येते वेळी राणीच्या दर्शनास गेला.

"प्रधान! मला अशी मुले होतील, असे कधीच वाटले नाही. देशाचे तुकडे करून राज्याचा नाश करणाऱ्या मुलांना जन्म देण्यापेक्षां माझी ओटी वांझ राहली असती म्हणून काही बिघडले असते का? असली मुलं मरत कां नाहीत कोण जाणे?" राणी दु:खाने म्हणाली.

"महाराणी! आपला दरबारी मांत्रिक शंकरलाल आहे ना त्याचा सल्ला घेऊन काय वाटेल ते करून ह्या सरोवराचे दोन



नावे लिहून दानपत्र घेऊन या." नबाव साहेबांनी हुकूम जारी केला.

दीवाणसाहेब दानपत्र लिहून घेऊन आले. नवाबसरकारने त्यावर सही करून चेन्नैया-च्या हातात ते देत म्हणाले—"जा, गावाच्या पाटलाला दाखवून जमीन घे ताब्यात."

आपण घरून चांगल्या मुहूर्तावर निघालो होतो, असा विचार करीत चेन्नैया आपल्या गावी आला. कामैया नावाच्या पाटलाला तो हुकूम दाखविला. कामैया तो सरकारी हुकूम पाहून व थोडा विचार करून म्हणाला—"चेन्नैया! नंतर केव्हां तरी येऊन भेट!"

चेन्नैया निघून गेल्याबरोबर कामैयाने भूषैया नावाच्या माणसाला बोलावून चेन्नैयाने आणून दाखविलेल्या हुकुमाची गोष्ट सांगि-तली. भूषैयाला चेन्नैयाचा राग आला. म्हणाला—"त्या बेटयाची नजर मी नांगरतो आहे त्या शेतावर आहे म्हणावयाची. शेत त्याच्या आज्याने नांगरले होते की बापाने? कापड विणण्याचा धंदा करायचा सोडून शेत नांगरणार आहे वाटते हा?"

कामैय्या पाटील म्हणाला—"भूषैय्या! असे तापून संतापून काय मिळणार? चेन्नैया नवाबसाहेबांचा हुकूम घेऊन आला आहे."

"म्हणून मी जमीन सोडू म्हणतां? आमच्या बापाने असले धंदे कधी केले पाहातो तो त्या जमीनीत कसा पाऊल ठेवतो ते!" भूषैय्या म्हणाला.

"फुकट रे भूषैय्या हा आरडाओरडा. ती सरकारी जमीन आहे!" कामैया म्हणाला.

ते ऐकून भूषैया नरमला. दोघे परस्प-रांचा सल्ला घेऊ लागले.

इतक्यात शेषैया नावाचा गवळी रिकामी कासंडी दाखवीत म्हणाला—"म्हशीने दूध दिले नाही हो. गाभण आहे, दूध आतां नाही द्यायची!"

भूषैय्या लगेच म्हणाला—"काही हरकत नाही, पाटील! मी दुसरी म्हैस आणून बांधतो तुमच्या गोठ्यात!"

पाटलाने खूष होऊन भूषैयाला त्या जमिनीविषयी एक युक्ती सुचविली. भूषैया "ठीक, ठीक!" म्हणत नमस्कार करून तिथून निघून गेला. पाटलाच्या घराबाहेर पडल्याबरोबर त्याला चेन्नैया दिसला. त्याच्याकडे डोळे वटारून पहात भूषैया पुढे निघून गेला.

चेन्नैयाला थोडी शंका वाटली तरी तसाच पाटलाच्या घरी गेला.

पाटील म्हणाला—"हे पहा, चेन्नैया! तू भूषैयाशी उगाच कशाला वांकडे करून घेतो आहेस? तुला शेत नांगरायचं नाही, पीक काढायचं नाही. मग कशाला ही डोके दुखी? पाहिजे तर भूषैयाकडून तुला काही तरी मोबदला देववितो."

ते ऐकून चेन्नैयाच्या मनातला संशय बळावला. कामैया लाच खाऊ प्रसिद्धच होता. ते आतां खरे ठरले. चेन्नैया आणखी








जास्त काही बोलल्याशिवाय बाहेर निघून आला. वाटेत भूषैयाचा गडी म्हशीला घेऊन येत असलेला भेटला. "कोठे रे?" चेन्नैयाने त्याला विचारले.

"कामैयाच्या गोठ्यात बांधून ये, म्हणून मालकांनी सांगून पाठविले आहे." तो म्हणाला. त्यानंतर कामैया व भूषैयांनी दोघांनी मिळून चेन्नैयाला धमकावून ठोकून काढले आणि ती जमीन भूषैयाला विकली असल्याचे खोटे विक्रीपत्र लिहून त्याची त्यावर सही घेतली.

सालाबादप्रमाणे पुन्हां रमजान सण जवळ येऊ लागला. सणाला दोन दिवसच उरले होते. नबाब सरकारांना जरीचा पटका आठवला. त्यांनी चेन्नैयाकडे निरोप पाठविला. चेन्नैया रिकाम्या हाताने आलेला पाहून नबाबाने विचारले–"काय रे, या खेपेस रुमाल फेटा विणला नाहीस वाटते?"

"सरकार रागवणार नसतील एक विनंती करावी म्हणतो. श्रमाचे फळ नशिबी नव्हते सरकार!" चेन्नैया म्हणाला.

[illegible] आहेस की रे! मी दिलेली जमीन तू दिलेल्या पटक्याच्या किमतीची नव्हती का रे?" नबाबाने विचारले.

"माझी विनंती ती नाही, सरकार! तो रुमाल म्हशीने खाल्ला! जमीन नव्हती माझ्या नशिबात!" चेन्नैया म्हणाला.

"काय म्हणतोस? जमीन नशिबात नव्हती? माझ्या हुकमाचे पालन झाले की नाही?" नबाबाने थोड्याशा रागात विचारले.

चेन्नैयाने घडलेले वृत्त सांगितले. नबाबाने तावडतोब कामैयाला व भूषैयाला बोलाविले. लांच खाल्याबद्दल कामैयाची पाटिलकी की काढून घेतली आणि लांच दिल्याबद्दल भूषैयाला शंभर रुपये दंड करून ती जमीन चेन्नैयाला देवविली.

त्यानंतर चेन्नैया आपल्या शेतात पीक काढू लागला. त्याच्या बायका मुलांना पोटभर खायला मिळू लागले. तो दरवर्षी नबाबाला रुमाल विणून देऊ लागला.



# गोड कां बोलावे?

रामशर्मा नावाच्या एका वैद्याने वैद्यकशास्त्राचा अभ्यास करून त्यात प्राविण्य संपादन केले. परंतु वैद्यकीच्या धंद्यात त्याला यश प्राप्त झाले नाही.

तो आपल्या एका ज्योतिषी मित्राला भेटला आणि म्हणाला–"माझ्या जन्मकुंडलीतच काही तरी दोष आहे. जरा पाहून सांग. माझ्या हाताला गुण आहे. कोणताही आजार मी बरा करून दाखविला आहे. परंतु आमच्या गावकऱ्यांना माझ्यावर विश्वासच बसत नाही."

ज्योतिषी मित्र म्हणाला–"बाबा रे! तुझ्या जन्मकुंडलीत काहीच दोष नाही. तुझ्या तोंडाचा दोष आहे. तू आपल्या रोग्यांना घाबरवून सोडतोस. म्हणून कोणी तुझ्याकडे येत नाही. तू महिनाभर मौनव्रत घेऊन माझ्याबरोबर ये. पहा, काय फरक पडतो तो."

रामशर्माने तसेच केले. तो ज्योतिष्याला बरोबर घेऊन रोग्यांना पहायला जाऊ लागला. ज्योतिषी रोग्यांना निरनिराळे प्रश्न विचारून धीर देई. रामशर्मा औषध देई. रोग बरे होत.

एका महिन्यात रामशर्माचा नावलौकिक वाढला. आता रोग्यांशी कसं बोलायचे हे त्याने चांगले शिकून घेतले.





# दिवसा ढवळ्या चोरी

एका गावी सोमूशेट नावाचा एक जव्हेरी रहात असे. तो सचोटीने आणि प्रामाणिकपणाने व्यापार करी. त्याने लक्षावधी रुपये संपादन केले होते. तरी कोणी त्याच्याविरुद्ध बोट दाखविणे शक्य नव्हते. तो दानधर्मही फार करी. तो 'दानवीर कर्ण' म्हणून प्रसिद्ध होता.

त्या गावात दोन अट्टल चोर होते. ते दिवसाढवळ्या चोरी करण्यात पटाईत होते. वाटेल तो वेष बदलून ते लोकांना फसवून चोरी करीत. असे चोर आहेत हे सर्व लोकांना माहीत होते. परंतु त्यांची भामटेगिरी पकडून देऊन चोरांना धरणे कोणाला शक्य झाले नाही.

त्या दोघां चोरांपैकी धाकटा ज्योतिष्याचे सोंग घेऊन एकेदिवशी सोमुशेटच्या घरी गेला, सोमुशेटने सर्व प्रकारे विचारपूस करून त्याचे चांगले आतिथ्य केले. चोराने सोमूशेटच्या जन्मापासून त्याच्या आयुष्यात घडलेल्या सर्व गोष्टींचे रसभरित वर्णन केले आणि वर्तमान काळात घडणाऱ्या गोष्टीदेखील सांगितल्या.

"ज्योतिषीबुवा! माझ्या आयुष्यातल्या सर्व गोष्टी तुम्ही कशा बरोबर सांगितल्यात. भविष्यकाळात होणार असेल ते देखील सांगण्याची कृपा करावी." सोमुशेट म्हणाला.

"लवकरच तुझ्या घरी एक थोर साधू येईल व त्याच्या कृपेने तुझे धन दहापट वाढेल." धाकटा चोर म्हणाला.

सोमुशेट चोराला काही बक्षिस देऊन निरोप देण्याच्या विचारात होता. परंतु चोराने काही घेतले नाही. अशात्ऱ्हेने सोमुशेटचा ज्यास्त विश्वास संपादन करता येईल असे त्याला वाटत होते.

एक आठवडा लोटला. मुसळधार पाऊस पडू लागला. मोठा चोर एका योगीपुरुषाचे सोंग करून व धाकटा चोर त्याच्या शिष्याचे सोंग करून सोमूशेटच्या घराबाहेर ओसरीत येऊन उभे राहले. काही वेळाने त्यांनी दार खडखडवले, ते ऐकून सोमुशेटने दार उघडले.

मोठा चोर म्हणाला—"मोठा पाऊस आहे, ही रात्रभर तुझ्या घरी आसरा मिळू शकल्यास फार उपकार होतील, बाबा आमच्यावर!

"अगदी खुशाल रहा. या, आत या." सोमुशेट नम्रपणे म्हणाला.

सोमुशेटने दोघां चोरांच्या जेवणाची व्यवस्था केली. जेवणे झाल्यावर धाकटा चोर सोमुशेटला म्हणाला—"आमच्या गुरुवर्यांनी खडतर तपश्चर्या करून सुवर्णयोगाची साधना केली आहे. त्यांनी ठरविले तर एक वराहाचे दहा वराह करून दाखवितील. उद्यां सकाळी ते आपल्याला आपल्या तपोबलाचा महिमा दाखवितील."

सोमुशेट मोठ्या चोराला म्हणाला—"बुवा! आपल्या आगमनाची वार्ता आम्हांला एका आठवड्यापूर्वी एका ज्योतिष्याने सांगितली होती.

त्या दिवशी रात्री सोमुशेटने त्यांना झोपायला एका खोलीत व्यवस्था करून दिली. नंतर नोकरां करवी त्या खोलीला बाहेरून कुलूप लावून ठेवले. दोघां चोरांचा विचार सोमुशेटच्या घरात रात्री चोरी



करण्याचा होता. परंतु खोलीला बाहेरून कडी असल्या कारणाने तो डाव फसला.

दुसऱ्या दिवशी सोमुशेटने आपल्या नोकरांना सावध करून त्यांना जागोजागी नेमले आणि चोर रात्री राहले होते त्या खोलीचे दार उघडले.

उजाडल्यावर चोरांनी सोमुशेटला घरा-मागच्या बाजूस नेले आणि तेथे अग्निहोत्र करून एक यज्ञ सुरू केला. मोठा चोर मोठमोठे मंत्र म्हणत होता आणि त्यावेळी धाकटा चोर सोमुशेटला म्हणाला–"तुम्ही काही सोन्याची नाणी घेऊन या."

सोमुशेट नाणी आणायला घरात गेलेले पाहून मोठ्या चोराने आपल्या पिशवीतून खोट्या सोन्याची एक हजार नाणी काढून जमिनीत पुरून ठेवून दिली.

नंतर सोमुशेटने शंभर सोन्याची नाणी आणून दिली. मोठ्या चोराने ती नाणी त्याच जागी पुरून ठेवली. नंतर बराच वेळ मंत्र म्हणून हजार नाणी काढून दाखविली. सोमुशेटने पाहु या तुमची पिशवी असे म्हणत चोराची पिशवी घेत म्हटले–"अद्‌भुत शक्ती आहे तुमच्या मंत्रात. पण मी फार लोभी नाही. तूर्त मला मिळाले तेवढे सोने पुरे आहे."

आपल्या मंत्राचा पराक्रम पाहून सोमुशेट सर्व धन समोर आणून ठेवील असे मोठ्या चोराला वाटले होते. परंतु सोमुशेटने तर मुळातच घात केला. दोघांनी एकदम सोमुशेटवर हल्ला केला आणि त्याच्या हातातली पिशवी ओढू लागले. परंतु झाडा आडून राजाच्या शिपायांनी पुढे येऊन चोरांना पकडले.

सोमुशेट, त्यांना म्हणाला–"तुम्हांला वाटले होतं तेवढा मी भोळा नाही. भोळ्या भाबड्या लोकांना फंसवायची संवय तुम्हांला आहे. सर्व जगालाच तुम्ही भोळे मानू लागला होतां. तर मग चला राजाकडे.

राजाने त्यांना योग्य ती शिक्षा करून सोमुशेटच्या चातुर्याबद्दल त्याची वाखाणणी करून त्याचा सत्कार केला.



# संन्याशाचे डोळे उघडले

रामूला बायको व दोन मुले होती तरी एकदा त्याच्या मनात संन्यास घ्यायचा विचार आला. बायकोने "आम्हांला कोणावर सोडून जाणार हो?" म्हणून विचारले. परंतु त्याने आपला हट्ट सोडला नाही.

तुला बायको व दोन मुले आहेत. त्यांना काही मार्ग दाखवून मग जा वाटेल तिकडे." चार चौघांनी त्याला सांगितले. पण रामूने तिकडे लक्ष दिले नाही.

एके दिवशी उजाडतांच रामू घर सोडून निघायची तयारी करू लागला तेव्हां बायको म्हणाली–"मी थोडा शिळा भात बांधून देते, घेऊन जा बरोबर!"

रामू, बायकोने बांधून दिलेली पुरचुंडी घेऊन निघाला. तो दुपार होईपर्यंत चालत राहला. ऊन डोक्यावर आल्यावर एका झाडाखाली बसून त्याने पुरचुंडी सोडून पाहिली. परंतु पुरचुंडीत लाकडाचा चुरा होता.

रामूच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. घरी जाऊन बायकोवर ओरडला.

"संन्याशाला बंधने, इच्छा आकांक्षा असतां कामा नयेत. मनावर ताबा असावा लागतो." बायको म्हणाली. रामूने लगेच संन्यास घ्यायचा विचार सोडला.





# ज्ञानोदय

एकदा धारानगरीत शूरसेन नावाचा राजा राज्य करीत असे. प्रत्येक गोष्टीत आपणच मोठे व बरोबर आहो, हे दर्शविण्यासाठी तो अनेक प्रयत्न करी. राज्यात कोणती ही गोष्ट त्याच्या आज्ञेशिवाय होता कामा नये असा हट्ट तो दाखवीत असे.

त्या राज्यात आनंद नावाचा एक शिवभक्त रहात असे. तो गोरगरिबांना खुल्या हाताने मदत करी. त्यामुळे त्याचा नावलौकिक राज्य भर पसरला होता. त्याने एक शिवालय बांधायचे ठरविले आणि चार लोकांजवळ चंदा गोळा करून त्याने एक सांबाचे देऊळ बांधले.

देऊळ बांधून झाल्यावर शंकराच्या मूर्तीची प्राणप्रतिष्ठा व्हायला पाहिजे. त्यानंतर पहिली पूजा कोणी करावी हा प्रश्न होता. तसे देऊळ लहानच होते. देवळाच्या बांधकामाला चंदा देणारे लोक होते व थोर शिवभक्त देखील अनेक होते. परंतु असल्या बाबतीत तो मान आपल्याला मिळावा, असा राजाचा हट्ट असे. म्हणून महाराजांच्या हस्ते पहिली पूजा व्हावी, नाहीतर त्यांना राग येईल असे आनंदला वाटले.

तो शूरसेनला जाऊन भेटला व निवेदन केले—"महाराज! आपल्या कृपाप्रसादाने मी नीलकंठाचे एक देऊळ बांधले आहे. देवळातली प्रथम पूजा आपल्या हस्ते व्हावी या हेतूने विनंती करायला आपणांकडे आलो आहे."

ते ऐकून राजाला फार आनंद झाला. त्याने आनंदला विचारले—"केव्हां ठेवली आहे पूजा आणि आम्ही केव्हां यायला पाहिजे?"

"उद्या बरोबर आठ वाजतां प्राण प्रतिष्ठा होईल, महाराज! आपण त्यावेळी आल्यास, पहिली पूजा आपल्या हस्तेच होऊ शकेल." आनंद म्हणाला.

"ठीक! मी नक्की येतो!" असे सांगून राजाने आनंदला निरोप दिला.

दुसऱ्या दिवशी बरोबर आठ वाजतां प्रथम पूजेसाठी सर्व तयारी करून ठेवण्यात आली. सर्व लोक महाराजांच्या आगमनासाठी आतुरतेने वाट पहात होते. परंतु महाराज आले नाहीत.

महाराजांकरिता बराच वेळ वाट पहात राहल्यावर मुहूर्त टळला तर ते अशुभ होईल असे समजून आनंदने आपली पूजाच प्रथम प्रारंभ करून इतरांकडून त्यानंतर करवायला सुरवात केली. आपल्या आगमनासाठी लोकांनी आतुरतेने वाट पहावी, तशी ते पाहतात की नाही हे पाहण्यासाठी राजा जाणून बुजून उशिरां आला. तोपर्यंत अनेक नागरिक पूजा करून निघून सुद्धा गेले होते.

राजाला ते सर्व कळले. त्याला कमालीचा राग आला. त्याने करड्या आवाजात विचारले—"या देवळात प्रथम पूजा कोणी केली, बोला!"

"मीच केली महाराज! मला क्षमा करावी. मुहूर्त टळणे अशुभ मानले जाते, म्हणून प्रथम पूजा करणे मला भाग पडले." आनंदने अगदी नम्रपणे ती गोष्ट राजाला सांगितली.

"नीच माणसा! प्रथम पूजेचा मान मला द्यायचा सांगून मला त्याप्रमाणे



बोलावून तू माझा असा अपमान करायला धजलास कसा? याला देवळासमोरच फाशी द्या!" राजाने हुकूम सोडला.

दुसऱ्या क्षणाला देवळाच्या गर्भगृहातून आवाज ऐकू आला.

"मूर्खा! माझ्या देवळासमोर माझ्या भक्ताला तू फाशी देणार? आपल्या मूर्खपणाने तू आपल्या प्रजेचा छळ चालविला आहेस. तुझा व तुझ्या वंशाचा मी नाश करतो, पहा!"

देवाचा कोप झाला असल्याचे सर्वांनी ओळखले.

राजा थरथर कापत हात जोडून देवाला म्हणाला—"महादेवा! माझी चूक झाली, माफ कर! मी आपल्या मूर्खपणाने कधी प्रजेला त्रास देणार नाही."

दुसऱ्या क्षणाला आतून आवाज आला. "शूरसेना! तुझा थोरपणा इतरांनी मानून तुझं गुणगान केले पाहिजे. तूच आपले मोठेपण मिरवीत फिरण्यात अर्थ नाही. तू नियमितपणे माझे ध्यान धरीत जा. मी तुझे आणि तुझ्या राज्याचे भले करतो."

शूरसेन आपली पूजा संपवून नम्रपणे निघून गेला.

ते सर्व पाहून आनंदला फार आश्चर्य वाटले. सर्व निघून गेल्यावर त्याने गर्भगृहात जाऊन पाहिले. शिवलिंगाखालच्या ओटचा आडून त्याचा शिष्य हसत बाहेर आला. म्हणाला—"तुम्ही पहिल्याने पूजा केलीत तेव्हां राजा आपल्याला शिक्षा करील हे ओळखून मी तसे केले. राजाची कानउघाडणी कोणीतरी कधी तरी करायला हवीच होती नाही का?"

आनंद क्षणभर आश्चर्याने पहात म्हणाला—"होय रे! ते काम तू केलेस!" असे म्हणत त्याने आपल्या शिष्याला पोटाशी धरले.

त्या दिवसापासून शूरसेनाच्या मनात बदल झाला. प्रत्येक गोष्टीस 'पाहिला मान माझा' असा हट्ट सोडून त्याने पुढे चांगले राज्य केले.





# दुष्काळातले दर

एका गावातली शेती सर्व तलावाच्या पाण्यावर चालत असे. त्या गावात धनशेट नावाचा एक व्यापारी रहात असे. त्या गावात जेवढी शेती व मळे होते त्यातल्या अर्ध्याहून अधिकाची मालकी धनशेटकडेच होती.

एका वर्षी पाऊस मुळीच पडला नाही आणि तलावांचे पाणी वाळून गेले. रोपे वाळून गेली आणि लावणीची कामे झाली नाहीत. धनशेटने त्याच्याजवळ सांठवून ठेवलेले सर्व धान्य दर वाढवून विकले.

गावातल्या तलावाच्या तळाजवळ एका खड्डयात पाणी होते. परंतु त्याचा उपयोग होणे शक्य नव्हते. धनशेटने ते पाणी पिंपे भरून वाहून नेऊन आपल्या आंब्याच्या मळ्याला घातले. त्या वर्षी खूप आंबा लागला.

खायला अन्न नव्हते म्हणून गावकरी धनशेटच्या बागेतले आंबे विकत घेऊन खाऊ लागले. धनशेटने एकेक आंबा अर्ध्या रुपयाला विकला. हाच आंबा त्याने दोन रुपये शेकडयाने विकला होता. लोकांनी विचारल्यावर धनशेट म्हणाला—"दुष्काळातले दर असेच असतात."

परंतु गावकऱ्यांकडे आंबे विकत घ्यायला तरी पैसे कोठ होते.

धनशेट म्हणाला—"पैसे नसतील तर कर्जरोखे लिहून आंबे विकत घ्या."

जिवंत तर राहिलेच पाहिजे. म्हणून नाइलाजाने लोकांनी कर्जरोखे लिहून दिले आणि धनशेटकडून आंबे विकत घेतले. मनाला आलं ते व्याज लावून धनशेटने कर्जरोखे लिहून घेतले.

दुष्काळ संपला. पाऊस पडला आणि नदी तलाव पाण्याने तुडुंब भरले. पिके

चांगली आली व बागा मळे फळांनी भरून आले. परंतु गावकऱ्यांची काळजी धनशेटच्या कर्जामुळे थोडीदेखील कमी झाली नाही. जे पीक निघाले आणि फळफळावळ आणि भाजी पाला विकून जे पैसे मिळाले ते धनशेटजी बाकी फेडण्यात खर्च होऊन गेले. ज्यांच्याकडे शेतीभाती नव्हती त्यांच्याकडून धनशेटने वेठबेगारीने कामे करून घेतली.

शेवटी नाइलाजाने गावकरी गावाच्या पाटलाकडे धावले. पाटलाने धनशेटला बोलावून म्हटले–"हे पहा शेटजी! हे लोक आयुष्य भरात तुमचं कर्ज फेडू शकणार नाहीत. तेव्हां कमी जास्त ठरवून याचे कर्जरोखे यांना परत देऊन टाका कसे?"

धनशेट कबूल झाला नाही.

"तरमग तुमच्यावर गावकऱ्यांचं कर्ज आहे त्याची फेड प्रथम करून घ्यावी लागेल!" पाटील म्हणाला.

धनशेटने विचारले–"कसलं कर्ज पाटील?"

"गावातले सर्व मळे वाळून गेले तेव्हां तलावाचे पाणी पिपे भरून नेऊन तुम्ही आपली बाग वांचविली. म्हणून तुमच्या-वरच गांवकऱ्यांचे कर्ज राहून गेलं." पाटील म्हणाला.

"ते कसं काय?" धनशेटने विचारलं.

"तलावाचं पाणी सर्व गावाच्या मालकीचं होतं. एकेका पिपभर पाण्याची किंमत दहा रुपयेप्रमाणे तुम्ही जितकी पिपे भरून नेलीत त्याचे पैसे भरा पहिल्याने!" पाटील म्हणाला.

"हा तर अन्याय आहे! एक पिपभर पाण्याची किमत दहा रुपये?" धनशेटने विचारले.

"दुष्काळातले दर तसेच असतात शेटजी!" पाटील म्हणाला.

निरुपाय होऊन धनशेटने सर्व कर्ज वसूल झाल्याच्या पावत्या लिहून देऊन सर्व कर्जरोखे परत केले. वेठबेगारीने ज्यांच्याकडून कामे करविलीं होती त्यांचे कर्जरोखे पण परत केले.





# महाबली हनुमान

मैनाकाने अत्यंत आदरपूर्वक विश्रांती घेऊन पुढे जाण्यास विनंती केल्याबद्दल हनुमानाला फार आनंद झाला व म्हणाला–"तू इतक्या प्रेमाने विश्रांती घेऊन पुढे जायला सांगितलेस त्याबद्दल मी तुझा अत्यंत आभारी आहे. परंतु ते मला शक्य नाही. याबद्दल तू रागावू नकोस. मला मुळीच वेळ दवडून चालायचे नाही. मी संध्याकाळच्या आत लंकेला सरळ पोचण्याचे वचन देऊन निघालो आहे. तेव्हां मला वाटेत थांबता येणार नाही."

असे सांगून हनुमानानी मैनाकाला हाताने स्पर्श केला आणि आकाशमार्गे पुढे निघाला. मैनाक पर्वताने आणि समुद्राने त्याला यशस्वी होण्याचा आशीर्वाद दिला. हनुमान मैनाक पर्वताकडे पहात आकाशात वरवर उडत जाऊ लागला.

सिद्ध, देव, महर्षी, देवेंद्र आदिकांनी मैनाक पर्वताची स्तुती केली व म्हणाले–"मैनाक पर्वताची इतकी आदरपूर्वक केलेली विनंती न मानून पुढे जाणे आणि त्याचा कोणत्याही प्रकारे अपमान न करता ही गोष्ट हनुमानाशिवाय इतर कोणाला साध्य होईल का?"

इंद्र मैनाक पर्वताने आपली कामगिरी उत्तम बजावली असल्याने त्याला म्हणाला–"मैनाका! तुला पाहून मला अत्यंत आनंद होत आहे. तुझ्यावरचा माझा सर्व राग गेला. यापुढे तुला माझे भय राखण्याचे मुळीच कारण नाही." ते ऐकून मैनाक



पर्वत ही, आता यापुढे इंद्राचे भय उरले नाही, असा विचार करून खूष झाला.

तिकडे हनुमान समुद्रावरून पुष्कळ दूरवर गेला. त्याला कोणत्याही प्रकारचे विघ्न आले नाही. तो वायुसुतच होता. म्हणून वाऱ्याचा विरोध असणेच शक्य नव्हते. उलट वारा अनुकूलच होता. मध्यंतरी देव आणि गंधर्ववगैरेंना हनुमंताची शक्ती पुरेशी आहे की नाही याची शंका वाटली. म्हणून त्याच्या शक्तीची परीक्षा घेण्यासाठी त्यांनी सर्पांची आई सुरसा हिला भेटून ते काम करायला सांगितले. म्हणाले–"हनुमंत तुला भितो की तुला

आपला पर्वताकार देह वाढवून हनुमानाची वाट अडव."

सुरसा देवांच्या इच्छेला मान देऊन हनुमंताची वाट अडवून उभी राहली. तिचा तो भयंकर देह पाहून हनुमान एक क्षणभरच थांबला असेल. सुरसा त्याला म्हणाली–"छान! देवांनी मला आहार म्हणून तुला पाठविले आहे. मी तुला खाणार आहे. मुकाट्याने माझ्या तोंडात प्रवेश कर."

ते ऐकून हनुमानाच्या तोंडावर मंदहास्य दिसू लागले. तो हात जोडून सुरसेला म्हणाला–"तुला माहीतच असेल, दशरथाचा युवराज श्रीरामचंद्र आपला धाकटा भाऊ लक्ष्मण याच्यासह आणि आपली बायको सीता हिला घेऊन दंडकारण्यात आला. तो राम कामनिमित्त घराबाहेर गेला असता रावणाने सीतेला उचलून नेलें. मी रामाचा दूत म्हणून सीतेच्या दर्शनास जात आहे. तेव्हां या कामी मला तुझ्या मदतीची गरज आहे. तुला ते मान्य नसेल तर मी तुला वचन देतो की मी सीतेचे दर्शन करून रामाला तिचा निरोप पोचता केल्यावर तुझ्या मुखात प्रवेश करतो. हे मी अगदी खरे बोलतो आहे."

ते ऐकून सुरसा म्हणाली–"मी ते

माझ्या इच्छेविरुद्ध कोणाला ही जाता येणार नाही. असा मला वर आहे."

सुरसा आपले विशाल तोंड उघडून आडवी उभी राहली. ते तोंड एका मोठ्या गुहेसारखे होते. हनुमंताने प्रसंग ओळखून आपल्या अणिमाशक्तीने आपले शरीर बोटा एवढे लहान केले आणि अत्यंत वेगाने तिच्या तोंडात प्रवेश करून बाहेर आला. म्हणाला–"हे दक्षसुते! मी नमस्कार करतो आहे. मी तुझ्या तोंडात प्रवेश करून बाहेर आलो. आतां मला सीतेच्या शोधार्थ जाऊ दे."

सुरसेने आपले राक्षसी रूप सोडले व सामान्य शरीर धारण करून म्हणाली–"आतां तू आनंदाने जा. तुला आपल्या कामात यश मिळेल. सीता व राम दोघांची भेट होईल."

हनुमान परत लंकेच्या दिशेने उडू लागला. तो आकाशमार्गे जात असतां समुद्रातून सिंहिका नावाच्या राक्षसिणीने त्याला पाहिले आणि आता आपले पोट भरायला एक चांगला प्राणी मिळतो आहे, असे समजून ती त्याची समुद्रावर पडलेली सावली धरून ओढू लागली.

तेव्हां समुद्रात एखादे जहाज जात असता उलटा वारा आला म्हणजे जहाजाचा



वेग जसा कमी होतो तसे हनुमानाला वाटले. त्याने चारीबाजूला व खालीवर सर्वत्र पाहिले तेव्हां त्याला समुद्रात एका प्राण्या-सारखे काहीतरी दिसले. दक्षिण समुद्रात एक अद्भुत प्राणी आहे व तो सावली धरतो, असे त्याला मागे सुग्रीवाने सांगितेले होते, ते आठवले. तोच हा प्राणी असावा असे हनुमानाला वाटले.

हनुमानाने आपला देह वाढविला. ते पाहून सिंहिकेने स्वतःचा देह वाढविला व आपले तोंड उघडून ते हनुमानाच्या देहाहून मोठे करून त्याला गिळायला निघाली. तेव्हां हनुमानाने सिंहिकेच्या अंगातले मर्मस्थान पाहून घेतले. अणिमा











शक्तीने तो तिच्या देहात शिरला आणि तिच्या मर्मावर आघात करून ते फाडून फेकून दिले आणि तिने तोंड मिटायच्या आत बाहेर आला. सिंहिकेचा देह पाण्यावर तरंगू लागलेला पाहून व ती मेल्याचे ओळखून हनुमान पुन्हा पुढे निघाला.

आता हनुमानाला पलीकडचा समुद्र-किनारा दिसू लागला. किनाऱ्यावर दूरवर पसलेली अरण्ये दिसू लागली, लंका द्वीप, मलय पर्वतावरील वने व नद्या व त्यांची मुखे स्पष्ट दिसू लागली.

तेवढ्यात त्याच्या मनात एक विचार

राक्षसांनी पाहिला तर आपण ज्या कामासाठी आलो आहो तेच कदाचित बिघडेल. म्हणून त्याने आपले शरीर सूक्ष्म करून घेतले आणि समुद्र किनारावरच्या एका पर्वत शिखरावर उतरून देवेंद्राच्या अमरावतीशी चढाओढ करणाऱ्या लंकापुरीला पाहिले.

लंकानगरी त्रिकूट शिखरावर होती. हनुमानाने लंकानगरीकडे जातांना फुलाफळांनी गदगदलेल्या वृक्षांखाली झांकून गेलेली पर्वत शिखरे आणि उद्याने व उपवने पाहिली. त्याला निरनिराळ्या रंगांची व वासांची फुले असलेली फुल झाडे, चित्रविचित्र रंगाचे व विविध प्रकारे बोलणारे पक्षी, राजोद्याने आणि अशीच अनेक सुंदर दृश्ये दिसली.

लंकेच्या चारीबाजूला खंदक होते. त्यांत खोल व स्वच्छ पाणी होते. त्या पाण्यात कमळे व कुमुदे सुंदर फुललेली होती. लंकेचा तट सोन्याचा होता. लंकेत कोणाला प्रवेश करता येऊ नये म्हणून सशस्त्र राक्षसांचा सतत पाहारा होता. दुतर्फा उंच इमारती असलेले रस्ते व मार्ग होते. किल्ल्याला मोठमोठे बुरूज होते आणि जागोजागी ध्वजस्तंभांवर झेंडे फडकत होते. त्रिकूट शिखरावर लंका नगरी



निर्मिल्यासारखी भासत होती. विश्वकर्म्याने ती स्वहस्ते निर्माण केली होती.

हनुमान हळूहळू लंकेच्या उत्तर द्वाराजवळ आला आणि रावणाचा प्रताप व शक्तिसामर्थ्य किती आहे ह्याची माहिती करून घेण्याचा प्रयत्न करू लागला.

या महानगरीस जिंकणे कोणास साध्य होईल? एके काळी ती कुबेराची राजधानी होती. परंतु आज कुबेराला सुद्धा या नगरीत पाऊल टाकता येणे शक्य नव्हते. गुहेचे रक्षण जसे साप करतात तसा रात्रंदिवस सशस्त्र राक्षस चौकसपणे पाहारा देत होते. त्याशिवाय अपार समुद्र त्या नगरीचे रक्षण

पार करून येणे म्हणजे अशक्यच होते. येता आले तरी काय फायदा? कारण लंकेला जिंकणे देवांनादेखील अशक्य होते. राम किती पराक्रमी असला तरी काय उपयोग? आत प्रवेशच करू शकला नाहीतर या लंकेवर अधिकार कोठून स्थापन करणार? राक्षस जात्याच क्रूर, सामनीतीने त्यांना जिंकणे असाध्य. ऐश्वर्यात लोळत असलेल्या या लंकेच्या नागरिकांना दाम दाखवून भुलविणे तेही कसे शक्य होईल? त्यांना स्वतःच्या शक्तीचा व बळाचा गर्व आहे. यांच्यात आपल्या राक्षस जातीचा फार अभिमान आहे. मग फूट व फितुरी आणणेदेखील कठीण. हे राक्षस इतके शक्तिशाली आहेत की यांना युद्धात जिंकणेदेखील सोपे नाही. नंतर समुद्र पार करून लंकेत येण्याची शक्ती फक्त चौघांच्याच अंगात आहे—एक आपल्यात, अंगदात, नील वानरात व सुग्रीवात! इतर कोणी येऊच शकणार नाही.

हनुमान बराच वेळ याच विचारात असता आपण हा विचार करतो आहो तो व्यर्थच नाही का असे हनुमानाला वाटले. "हे विचार आताच कशाला? प्रथम सीता जिवंत आहे की नाही हे नको का पहायला? जिवंत असेल तर तिचे दर्शन घेतले

विचार करून हनुमानने शोध चालू ठेवायचे ठरविले.

लंकेत कोठून व कसा प्रवेश करावयाचा, हा त्याच्यासमोर प्रश्न होता. आपल्या विशाल काय देहाने प्रवेश केल्यास आपण राक्षसांच्या हाती सापडू हे त्याला कळत होते. फार लहान रूप घेऊन प्रवेश करावा तर एवढे मोठे लंका नगर फिरायला फार वेळ लागणार. म्हणून त्याने फार मोठे किंवा फार लहान रूप घेण्याऐवजी मध्यम रूप घेतले आणि रात्री लंकेत प्रवेश करायचे ठरविले. सीतेचा शोध लागण्यापूर्वी राक्षसांच्या हाती सापडणे धोक्याचे आहे, ते आपल्याला रावणासमोर उभा करतील व रावण रामाचा दूत म्हणून क्षमा तर करणारच नाही, उलट शिक्षाच करील, हे त्याला माहीत होते.

म्हणून हनुमानाने सूर्यास्त होण्याची वाट पाहिली. मांजरा एवढे आपले शरीर लहान करून घेतले. नंतर सामान्य माकडासारखा उड्या मारीत तो लंकेकडे निघाला.

सर्व रस्ते कसे मोकळे होते आणि स्वच्छ होते. सर्व इमारतींना व वाड्यांना चारीबाजूला उंच भिंती होत्या. सोन्याच्या खिडक्या होत्या. इमारती सात आठ मजली तरी असतील. जिकडे पहावे



माणिक्ये वगैरे रत्ने बसविलेली होती. लंकानगरी गंधर्व नगरीसारखी सजवलेली होती. भयंकर मोठे राक्षस नगराच्या संरक्षणास हजर असता वानर लंका कशी जिंकणार? हनुमानाला ही काळजी वाटत होती. परंतु आपण सीतेच्या शोधार्थ जात आहो, या विचाराने बाकी सर्व गोष्टी तो विसरला.

इतक्यात चंद्रोदय झाला. लंकिणी नावाची राक्षसीण एका भयंकर स्वरूपात हनुमानासमोर उभी राहून म्हणाली—"कोण रे तू? इकडे येण्याचे कारण? तुझ्या सारख्या माकडाला या लंकानगरीत पाऊल टाकायला

हनुमान म्हणाला—"तुला काय हवे ते मी सांगतो. प्रथम तू कोण हे सांग. मला नगरद्वारात अडवणारी तू कोण?"

"महापराक्रमी रावणाची मी दासी आहे. त्याच्या आज्ञेने मी लंकेचे रक्षण करते आहे. मला जिंकल्याशिवाय नगरात पाऊल टाकणे कोणालाही शक्य नाही. तुला मी आतांच ठार करते. मीच लंका आहे. आतां तू कोण ते बोला." लंका म्हणाली.

"सहज लंका पाहून यावे, म्हणून मी आलो आहे!" हनुमान म्हणाला.

"परंतु मला जिंकल्याशिवाय तुला आत प्रवेश मिळणार नाही." लंकिणी म्हणाली.

लंकेने भयंकर आवाज काढून हनुमानावर प्रहार केला. हनुमानाने आणखी जोराने ओरडून डाव्या हाताने लंकेला ठोसा दिला. त्या पाठोपाठ लंका 'ओय ओय' करीत ओरडत जमिनीवर आदळली. म्हणाली—"मला ठार करू नकोस! तू बलवान आहेस. आता मला आठवले, ब्रह्मदेवाने मला एकदा सांगितले होते की मला एक वानर जिंकेल त्या दिवसापासून राक्षसांच्या सत्तेला धोका आहे. रावण सीतेला घेऊन आला म्हणून हा धोका आला असावा असे वाटते. तू आत प्रवेश कर आणि वाटेल तिकडे जा."

तेव्हां हनुमानानें लंकेत प्रवेश केला, परंतु एखाद्या मित्राला शोभेल अशातऱ्हेने द्वारातून प्रवेश न करतां तटावरून उडी मारून प्रवेश केला. त्याने प्रथम डावे पाऊल आत टाकले. तो रस्त्याने जात असतां त्याला वाद्यसंगीताचे सूर ऐकू येत होते. नागरिकांच्या हसण्या खिदळण्याचा आवाज ऐकू येत होता. स्त्रिया मद्यपान करून गात होत्या. काही राक्षसांच्या घरातून वेदोच्चार ऐकू येत होता. काही राक्षस जोरजोराने ओरडत होते. राक्षसांचे सैन्य जागोजागी जमून गप्पा गोष्टीत रमलेले दिसले.

"दुर्मिळ प्रवेश असलेल्या लंकेत मला प्रवेश मिळाला आहे तेव्हां सीतेचा शोध नक्कीच लागणार!" हनुमान स्वतःशी विचार करू लागला.





# अमरवाणी

यथा कंदुकपातेनो
त्वत्यार्य: पतन्नपि
तथा त्वनार्य: पतति
मृत्पिडपतनम् यथा ॥ १ ॥

[थोरपुरुष खाली पडला तरी चेंडूसारखा पुन्हा वर (टुण्णदिशी) उडतो (उठतो). नीच माणूस खाली पडला तर मातीच्या गोळ्यासारखा खालीच पडून राहातो.]

य दचेतन्योपि पादै:
स्पृष्ट: प्रज्वलति सवितु
रिनकांत:, तत्तेजस्वीपुरुष:
परकृतविकृति: कथम् सहते? ॥ २ ॥

[सूर्यकांतमणी चैतन्य रहित असूनही सूर्यकिरणांचा स्पर्श होतांच चमकतो. अशा परिस्थितीत जो थोर मानव असतो तो इतरांकडून झालेला अपमान कसा सहन करील!]

पादाहतम् यदुत्थाय
मूर्धान मधिरोहति
स्वस्था देवावमानेपि
देहिन स्तद्वरम् रज: ॥ ३ ॥

[पदाघाताने (लाथमारली तर) धूळ डोक्यावर येऊन पडते. अपमान झाला तरी अचेत राहणाऱ्या मानवापेक्षां ती धूळच श्रेष्ठ नव्हे काय?]



जन्म ५-८-१९०८ मृत्यु २४-९-१९७५

**चं**दामामाचे संचालक श्री चक्रपाणी २४ सप्टेंबर या दिवशी सकाळी अकस्मात् निवर्तले, ही दुःखद वार्ता चांदोबाच्या वाचकांना कळविण्यास आम्हांला फार वाईट वाटत आहे.

चंदामामा (चांदोबा) हा श्री चक्रपाणी यांचा मानसपुत्र होय. ते या मासिकाची स्वप्ने कित्येक दशके पहात होते. त्यांना श्री नागिरेड्डी यांचे सहकार्य लाभल्यावर या मासिकाला मूर्तरूप मिळाले. १९४७च्या जुलै महिन्यात,—भारताला स्वातंत्र्य लाभले त्याच्या दीडच महिन्यापूर्वी,—चंदामामा दोन भाषांत (तेलुगु व तामीळ) निघू लागला, त्यानंतर इतर भाषांत विस्तार पावून आज अद्वितीयपणे त्याची जी वाटचाल चालू आहे, त्याला मुख्य कारण चक्रपाणी यांनी 'चंदामामा'वर राखलेली निरंतर आस्थाच म्हटले पाहिजे.

श्री चक्रपाणी यांच्या कार्याचा व्याप फार मोठा व बहुमुखी होता. श्री चक्रपाणींच्या मागे चंदामामाचा व्याप एकच नव्हता. त्याशिवाय सिनेसृष्टीतही नागिरेड्डी व चक्रपाणी या दोघांची जोडी नरनारायणासारखी गाजली. मध्यंतरी चक्रपाणी 'आंध्र ज्योति', 'संचारी', 'किनेमा' व 'युवा' मासिक या तेलुगु भाषेतील नियतकालिकांच्या, मुख्यत्वे करून 'युवा' मासिकाच्या आणि युवा प्रेसच्या व्यवस्थेचे कार्य पहात होते. कामाचा एवढा मोठा व्याप असूनही चंदामामाच्या अभिवृद्धी व उन्नतीसाठी ते नित्य कार्यतत्पर होते.

श्री चक्रपाणी यांनी फार मोठे विद्यार्जन केले नसूनही त्यांनी स्वतः परिश्रमपूर्वक अभ्यास करून इंग्रजी, हिन्दी, बंगाली व संस्कृत भाषा उत्तम प्रकारे अवगत करून घेतल्या. १९४० साली त्यांचे सिनेसृष्टीत पदार्पण झाले, तेव्हांपासून त्यांनी अनेक प्रमुख बंगाली कृतींचे तेलुगु रूपांतर केले. तेलुगु भाषिकांना शरद साहित्याची श्री चक्रपाणी यांनीच ओळख करून दिली. त्यापूर्वी एका दोघांनी बंगाली साहित्य तेलुगूत भाषांतर करून आणले असले तरी चक्रपाणी यांच्या रूपांतरांमुळेच शरच्चंद्र चट्टोपाध्याय यांच्या लेखनाचा ठसा आंध्र मनावर उमटला.

श्री चक्रपाणी यांचा जन्म ५ ऑगस्ट १९०८ या दिवशी तेनाली जवळच्या ऐतानगरप्पाडु या गावातील एका सामान्य शेतकरी कुटुंबात झाला. त्यांचे मूळ नाव आलूरि वेंकट सुब्बाराव असे होते. चक्रपाणी हे त्यांचे साहित्यिक उपनाम होते. तरुण वयातच त्यांना क्षयरोगाने ग्रासले. औषधोपचारासाठी ते मदनपल्लीच्या सॅनेटोरियममध्ये असतांना त्यांची एका बंगाली बाबूंशी मैत्री झाली. त्यांच्या प्रोत्साहनानेच चक्रपाणी यांना बंगाली भाषा शिकून घेण्यास उत्साह वाटला.









राष्ट्रीय चळवळीच्या काळात हिन्दी शिकून ते अनेक हिन्दी परीक्षांत उत्तीर्ण झाले. एवढेच नव्हे तर त्यांनी इतरांना हिन्दी शिकवून परीक्षेत उत्तीर्ण करविले. श्री चक्रपाणी यांच्या स्वभावातले विशेष हे की कोणतेही काम हाती घेतले की ते मन लावून पूर्ण करावयाचे. त्यांनी केलेली बंगाली रूपांतरे वाचल्यावर एकाने त्यांना विचारले–"तुम्ही कलकत्याला किती काळ राहलात?" परंतु चक्रपाणींनी "मला बंगाल प्रांत कसा आहे, हेदेखील माहीत नाही," असे म्हटल्यावर ती व्यक्ती आश्चर्यचकित झाली.

श्री चक्रपाणी यांचे स्वतःचे लेखनही काही पुस्तकरूपे प्रसिद्ध झाले आहे. त्यांचा हास्य विनोद त्यांच्या साहित्यिक कृतीत आढळतो. तो विनोद त्यांनी निर्मिलेल्या चित्रपटांतही आपणास दिसून येतो. 'पेळ्ळि चेसि चूडु' (लग्न करून पहा), 'मिसम्मा', 'अप्पु चेसि पप्पु कूडु' (ऋणं कृत्वा घृतं पिबेत), मुख्यत्वे करून 'गुंडम्मा कथा' चित्रपटांत चक्रपाणींचा हास्य विनोद प्रकार उत्कृष्ट तऱ्हेने दृष्टोत्पत्तीस येतो.

विजया प्रॉडक्शन्स् यांच्या ध्वजावर "क्रियासिद्धि स्सत्वे भवति" हे ब्रीदवाक्य चक्रपाणी यांचीच कल्पना. यशःसिद्धी ही माणसाच्या सामर्थ्यावरच अवलंबून असते. या गोष्टीवर त्यांचा दृढ विश्वास होता.

त्यांनी सुरू केलेले पुस्तक प्रकाशनाचे कार्य असो अगर नियत कालिकांच्या व्यवस्थेचे कार्य असो किंवा चित्रपट निर्मितीचे कार्य असो अथवा इतर कितीही कार्ये असोत, प्रत्येकात मानव प्रयत्न व शक्तीवरच श्री चक्रपाणी अवलंबून राहिले. दोन भाषांत पांच हजार प्रतींनी प्रारंभ झालेला 'चंदामामा' आज ११ भाषांत साडे पाच लाखांनी प्रचारात आहे तर त्याच्या मागे माणसाच्या 'सत्वनिष्ठे' व्यतिरिक्त इतर कोणतीही वस्तु नाही.

चंदामामाच्या भावी विकास वाढीच्या योजना अजून अपुऱ्या असतांनाच श्री चक्रपाणी वैकुंठवासी झाले हा केवळ दैवदुर्विलासच म्हटला पाहिजे. परंतु गेल्या सुमारे २८ वर्षांहून जास्त काळ श्री चक्रपाणी यांनी चंदामामाचा घातलेला पाया बळकट व भक्कम आहे. म्हणून चंदामामाचे पुरोगमन यथावत् चालू राहील. चंदामामाला चिरायु करण्यासाठी ते अहर्निश झटले. चंदामामा चिरायु होवो; श्री चक्रपाणी अमर होवोत.

# चांदोबा

संस्थापक : 'चक्रपाणी'

संचालक : नागिरेड्डी

बालमित्रांनो! या वर्षाची दिवाळी गेल्या काही दिवाळ्यांपेक्षा जास्त गोड होणार. या वर्षी परमेश्वराने आपल्या-वर कृपा केली आहे. चांगला पाऊस पडला व पिकेंपण चांगली आली आहेत. सर्व वस्तू बाजारात मिळू लागल्या आहेत आणि पहिल्या इतक्या महागपण नाहीत. तेव्हां ही दिवाळी नक्कीच मजेची होणार. दरवर्षी अशीच दिवाळी साजरी करण्यास परमेश्वराचा अनुग्रह होत राहो, अशी आपण सर्व त्याच्या जवळ प्रार्थना करू या.

वर्ष : २५ नव्हेंबर १९७५ अंक : ५





# मित्रभेद

[ २७ ]

दुष्ट बुद्धीने लवकरच आपली शंभर सोन्याची नाणी खर्च करून टाकली आणि पैशासाठी हावऱ्यासारखा धर्मबुद्धीकडे गेला. त्याला बरोबर घेऊन तो, त्यांनी सोन्याच्या नाण्याचा हंडा पुरून ठेवला होता तेथे गेला. दोघांनी प्रत्येकी शंभर शंभर नाणी काढून घेतली. परंतु वर्ष पुरे व्हायच्या आत दुष्टबुद्धीजवळचे सर्व पैसे खर्च होऊन गेले.

दुष्टबुद्धीचा विचार होता की तीन चार वेळां धर्मबुद्धीबरोबर जाऊन ते गुप्त धन घ्यायचे आणि त्याचा आपल्यावर पूर्ण विश्वास बसल्यावर सर्व पळवायचे. आतां फक्त सहाशेचीच ठेव उरली होती. ती सर्व गिळंकृत करायचे ठरवून तो एके दिवशी मध्यरात्रीच्या सुमारास ते गुप्त धन पुरून ठेवले होते तेथे गेला. त्याने सहाशेच्या सहाशे नाणी काढून घेतली. भांड्यावर पुन्हां झाकण बांधून ठेवून देऊन ते जमिनीत पुरून ठेवले आणि घरी परत आला.

एक महिना लोटल्यावर तो धर्मबुद्धीकडे येऊन म्हणाला–"मित्रा! उरलेली नाणी वांटून घेऊन मोकळे होऊ या." धर्मबुद्धीने होकार दिला.

दोघे ठेवा पुरून ठेवलेल्या जागी आले. खणून पात्र बाहेर काढून उघडून पाहिले तर रिकामे! दुष्टबुद्धी त्या भांड्यावरच आपले डोके आपटीत म्हणाला–"काय रे धर्मबुद्धी! तू सर्व पैसे पळविलेस वाटते, लबाडा! निमूटपणे माझा वांटा मला दिलास तर ठीक नाहीतर न्यायाधिशाकडे तुझ्याविरुद्ध फिर्याद करतो."

"चल रे, दुष्ट कोठला! मी असली चोरी करायला धजणारा दुष्ट व नीच नाही, समजले!" धर्मबुद्धी म्हणाला.

दोघांचे भांडण विकोपाला गेले आणि दोघे न्यायालयात गेले आणि परस्पराविरुद्ध दोघांनी फिर्याद केली. दोघांजवळ साक्षीदार नव्हते. म्हणून न्यायाधिशाला तावडतोब निवाडा देणे शक्य झाले नाही. म्हणून त्याने तिघांना पांच दिवस अटकेत ठेवले.

सहाव्या दिवशी न्यायाधिशाने दोघांना अग्निपरीक्षेसाठी समोर उभे केले. तेव्हां दुष्टबुद्धी त्याविरुद्ध म्हणाला–"हा काय धर्म झाला? दस्तावेज, साक्षीपुरावा काही नसला तरच अग्निपरीक्षा घ्यावी असे धर्मशास्त्रे सांगतात. या बाबतीत ज्या जागी आम्ही आपली ठेव पुरून ठेवली होती त्या परिसरातील वृक्ष वनस्पती नक्कीच साक्ष देऊ शकतील. वृक्षदेवता आमच्यापैकी खरा अपराधी कोण आहे, हे सांगेल. ती साक्ष ऐकून आपण न्यायनिवाडा करावा."

न्यायाधिशाने ती गोष्ट मान्य केली. दुसऱ्या दिवशी ठेव ठेवली होती त्या जागी दोघांना हजर रहायला सांगून, वृक्षदेवतेची साक्ष ऐकण्याचे ठरवून व दोघांना त्या गोष्टीची खात्री करून देऊन अटकेतून मुक्त केले. दुष्टबुद्धी सरळ घरी गेला व आपल्या बापाला म्हणाला–"बाबा! मीच ते धन काढून आणले. तुम्ही मी सांगतो तसे बोललात तर ते सर्व धन आपल्याला मिळेल. आज रात्री मी तुम्हांला झाडाजवळ नेतो. तुम्ही



झाडाच्या ढोलीत लपून बसून उद्या त्याया-धीश येऊन पैसे कोणी चोरून नेले असे विचारील तेव्हां 'धर्मबुद्धीने' एवढेच म्हणा!"

तेव्हां त्याचा बाप म्हणाला–"बाबा रे! अशा दुष्ट कामाच्या फंदात पडून आपणा दोघांचे नुकसान होईल. शहाण्या माणसाने कोणतेही असे काम करण्यापूर्वी त्यातल्या खाचाखळग्यांचा विचार करावयाचा असतो. नाहीतर सारस पक्ष्यांची झाली तशी गत व्हायची."

"सारस पक्ष्यांची काय गत झाली, ती गोष्ट ऐकू दे तरी, सांगतां कां?" दुष्ट-बुद्धीने विचारले.

तेव्हां बापाने सारस पक्ष्यांची गोष्ट सांगितली.

"एका जंगलात एका वडाच्या झाडाच्या ढोलीत एक सारस पक्ष्यांचे जोडपे रहात असे. त्या झाडाच्या मुळात एका बिळात एक साप रहात असे. तो एकदां झाडाच्या ढोलीत चढून एक पंख न फुटलेले सारस पक्ष्याचे पिल्लू गिळून निघून गेला.

ते पाहून सारस जोडपे तलावाच्या काठावर बसून रडू लागले. ते पाहून एक खेकडा विचारू लागला–"मामा, काय हो झाले तुम्हांला रडायला?"

"एक पापी साप आम्ही राहतो त्या झाडाच्या बुंधातल्या बिळात राहतो. त्याने आज माझ्या एका पिल्लाला खाल्ले रे! उद्यां इतर पिल्लांची तीच गत होणार. मग मी रडू नाही तर काय करू? तूच सांग!" सारस पक्षी म्हणाला.

सारस पक्षी आपला शत्रू आहे, त्याचे उट्टे काढण्याचे ठरवून खेकडा म्हणाला–"हे पहा, मामा! मुंगूस राहतो त्या बिळापर्यंत माशाचे तुकडे टाकून ठेवा. मुंगूस ते तुकडे खात सापाच्या बिळापर्यंत येऊन त्याला मारून टाकील." खेकड्याने ही युक्ती सुचविली.

त्यात काय नुकसान आहे याचा विचार केल्याशिवाय मूर्ख सारस पक्ष्याने तसेच केले. मुंगुसाने सापाला तर ठार केलेच आणि झाडाच्या ढोलीत उरलेल्या सारस पक्ष्याच्या पिल्लांना खाऊन निघून गेले.





# तिळ्या बहिणी

[१५]

[राक्षसाला वाटत होते की त्याला हवी होती तेवढी जुळी भावंडे सापडली. त्यांना बळी देऊन देवीला प्रसन्न करता येईल. परंतु ऐन वेळी तिघींच्या अंगात व्रणे असल्याचे आढळले. आपल्या दासदासींना सावध करून तो गरुड रूपे तिळ्या बहिणींना घेऊन आकाशमार्गे निघून गेला. पुढे–]

उदयन अदृश्य रूपेच ते सर्व पाहून पुढे काय करायचे या विचारात पडला. भुयारातल्या घरात जाऊन पहावे, असा विचार त्याच्या मनात आला. परंतु जवळची भस्मे वगैरे तेथे कामाची नाहीत हे त्याला राजकन्यांनी सांगितले होते ते आठवले. तरी पाहूया तर काय होते ते असा विचार करून त्याने पाचोळयाचा ढिगारा बाजूला सारून पाहिले.

उदयनला तेथे भले मोठे भुयार व त्यात जाण्यासाठी जिना दिसला. तो एकेक पायरी उतरू लागला. दहा पायऱ्या उतरून गेल्यावर त्याचे अदृश्य रूप जाऊन सामान्य रूप आले. तरी तो थांबला नाही. आणखी दहा पायऱ्या उतरून गेला. परंतु त्यापुढे मात्र त्याचे पाऊल पडले नाही. जिन्याच्या पायथ्याला दोन सिंह त्याच्याकडे पाहून गुर-गुरत असलेले दिसले. त्याहून जास्त भयंकर











गोष्ट म्हणजे त्या सिंहांच्या गळयाला बिळखा घालून दोन मोठे नागसाप फूत्कार सोडीत होते. ते पाहतांच तो उलट पावली मागे फिरला आणि भुयाराबाहेर येऊन त्याने त्याचे दार बंद केले. नंतर पाचोळयाचा ढिगारा करून ठेवला. त्याला पुन्हा अदृश्य रूप प्राप्त झाले होते.

तेथून तो सरळ सरोवराच्या काठी आला. सरोवराच्या चारी बाजूला आगीचे वेष्टन करून ठेवलेले त्याला दिसले. राक्षसाचे दासदासी पाहारा देत उभे होते. विकलांग झालेल्या राजकन्यांना राक्षस उचलून घेऊन गेल्याचे उदयनला माहीत नव्हते. त्याने सरोवरातले हंस मोजून पाहिले तेव्हां अठ्ठेचाळीस हंसाऐवजी त्याला फक्त पंचेचाळीसच हंस दिसले. तेव्हां तो विचारात पडला. तीन कमी असलेले हंस त्या तिघी राजकन्याच असल्या पाहिजेत व त्यांच्यावर कोणते तरी भयंकर संकट ओढवले असले पाहिजे असे त्याला वाटले. परंतु आतां काय करायचे? विचारलं तर सांगणार तरी कोण? अदृश्य रूप सोडून सामान्य रूपात तो दिसला तर राक्षस पाहरेकरी त्याला नक्कीच धरतील हे त्याला माहीत होते. निदान सरोवरात शिरून हंसरूपे काही माहिती काढता येईल म्हणावे तर विस्तवाचे कुंपण चारी बाजूला होते.

तिकडे राक्षस सुहासिनि, सुभाषिणी व सुकेशिनी या तिघां बहिणींना उचलून घेऊन गेला होता त्याने त्या तिघींना एका अरण्यात सोडले. त्याने तेथून निघून जाण्यापूर्वी त्यांना त्याच्या माया भवनाचे गुपित सांगता येऊ नये यासाठी त्यांना मुक्या करून टाकले. मुळातच त्या विकलांग झाल्या होत्या. आतां त्यांना बोलणेदेखील अशक्य होते. कपाळावर हात मारून त्या आपल्या भाग्याला दोष देऊ लागल्या. काय करावे, त्यांना सुचेना. त्या अरण्यातून कसे तरी बाहेर निघून जावे तर सुभाषिणीचे पाय गेलेले आणि सुकेशिनीचे डोळे गेलेले. त्यांना बाहेर घेऊन जाणे सुहासिनीला अशक्य वाटू लागले.

सुदैवाने त्या होत्या त्या बाजूला एक राजा शिकार करीत आला. त्याला राजकन्या दिसल्या. त्या अत्यंत सुंदर अशा राजकन्यांना विकलांग स्थितीत पाहून त्याला फारच आश्चर्य वाटले.

त्याने पुढे होऊन त्यांना मृदु शब्दात विचारले–"कोण तुम्ही? ह्या भयंकर अरण्यात कशा काय संचार करायला आलात?" परंतु राजकन्या मुक्या असल्या कारणाने काहीच बोलू शकल्या नाहीत. त्यांनी हाताने खुणा करून आपल्या त्या स्थितीचे वर्णन करून सांगण्याचा प्रयत्न केला.

राजकन्यांना त्या स्थितीत पाहून राजा म्हणाला–"म्हणजे तुम्ही मुक्या सुद्धा आहांतर!"

नंतर राजा त्यांना म्हणाला–"मुलींनो! तुम्ही थोर कुटुंबात जन्मल्यासारख्या दिसतां आहां. काहीतरी फार मोठे कारण असले पाहिजे तुमच्यावर हा घोर प्रसंग ओढायला! आतां तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. मी तुम्हांला बरोबर घेऊन जातो. तुम्ही आपल्या घरात जितक्या मोकळेपणी रहात आलात तितक्याच मोकळेपणी माझ्या किल्यात रहा. मी मालव देशाचा राजा आहे. माझे नाव प्रतापसिंह. कदाचित तुम्ही माझे नाव ऐकले असेल." असे म्हणत त्याने तिघींना धीर दिला.





राजाचे ते सहानुभूतीपूर्वक म्हटलेले गोड शब्द ऐकून राजकन्यांच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा झळकली. राजाने त्यांना आपल्या घोड्यावर बसविले आणि तो स्वतः घोड्याबरोबर चालू लागला.

काही वेळाने तो राजा तिळ्या विकलांग बहिणींना घेऊन आपल्या राजवाड्यात पोचला. त्याने आपल्या दरबारातल्या एका थोर पंडिताला बोलावून त्या तिघींचे आईवडील कोण, त्या कोठून आल्या असाव्या याचा शोध काढायला काही मार्ग आहे का विचारले.

त्या विद्वान पंडिताने बराच वेळ विचार केला आणि एक युक्ती करून पहावी असे ठरवून त्याने वाळू मागवून ती जमिनीवर पाटीसारखी पसरून ठेवून सुहासिनीला तिघी तेथे कोठून कशा आल्या आणि त्या कोण, कोणाच्या याविषयी लिहायला खुणेने सांगितले. सुहासिनीने डोळ्यात पाणी आणून खुणेनेच त्यांना लिहितां वाचतां येत नसल्याचे सांगितले. आपण किती सुंदर युक्ती काढली होती, परंतु ती सुद्धा फोल ठरल्याबद्दल तो विद्वान निराशासूचक डोके व हात हलवीत गप्प झाला. थोड्या वेळाने तो म्हणाला—

"महाराज! मी पुष्कळ विचार करून हा एक शेवटचा उपाय करून पहावा म्हणून प्रयत्न केला होता, परंतु तो सुद्धा फुकट गेला. याहून निराळा मार्ग मला आत्तां तरी सुचत नाही." असे सांगून तो विद्वान पंडित राजा त्यावर काय म्हणतो ते पाहू लागला.

राजाने त्या विद्वानाला निरोप दिला आणि दासींना बोलावून म्हणाला—"या तिघींना घेऊन जा. यांना कोणत्याही गोष्टीची उणीव भासू नये, याची काळजी घ्या. पापण्या डोळ्यांचे रक्षण करतात तशी सतत यांच्यावर नजर ठेवा."

तिघी सुखपूर्वक राजाच्या अंतःपुरात कोणत्याही प्रकारची फिकीर न करतां राहू लागल्या.

* * *

उदयन मागे श्रावस्ती नगरीला जात असतां त्याला कोणत्या तरी राजाच्या राज्यातून जावे लागले होते. तेथें त्याने अंजन लावून एका आंधळ्याला डोळस केले होते. ते पाहून त्या देशाच्या राजाने त्याला आपल्या दरबारात रहायला आग्रह केला होता. योगायोग की राजकन्यांना अरण्यातून आपल्या अंतपुरात आदरपूर्वक आणणारा राजा तोच मालव देशाचा राजा प्रतापसिंह होता.

वचन दिल्याप्रमाणे उदयन कधीतरी येईल, तेव्हां त्याच्या मदतीने या तिघींचे अंगवैकल्य दूर होईल, हा विचार राजकन्यांना त्या स्थितीत पाहिल्यापासूनच राजाच्या मनात आला होता.

अपेक्षेप्रमाणे बरोबर एका आठवड्याने उदयन आला. अगदी आपल्याला तो हवा होता तेव्हांच नेमका आलेला पाहून राजाला फार आनंद झाला. तो आतां आपल्या दरबारात कायम राहाण्यासाठी आला असावा, असे राजाला वाटले.

आलास? फार छान! तू केव्हां येतोस म्हणून मी वाट पहात होतो. तू यायला हवा होतास बरोबर त्यावेळीच आलास. फार आनंद वाटतो आहे मला. तू ज्या कामासाठी गेला होतास ते पुरे झाले का?" राजाने विचारले.



उदयन म्हणाला—"महाराज! माझ्या शिरावर ज्या कामाची जबाबदारी आहे, ते काम अद्याप पुरे झाले नाही. म्हणून आपलं सहाय्य मिळेल या आशेने आलो आहे."

"माझी मदत? काय बुवा? निःसंकोच माग! कोणत्याही प्रकारची मदत असू दे, मी ती करायला तयार आहे." राजा म्हणाला.

तेव्हां उदयनने स्वतःविषयी, आपल्या दोघां भावंडांविषयी सर्व राजाला सांगितले आणि एकाएकी अदृश्य झालेल्या राजकन्यांच्या शोधार्थ असल्याचे सांगितले. त्याने त्याच्याजवळ असलेल्या भस्मांचे व अंजनांचे वर्णन देखील थोडक्यात सांगितले.



सर्व ऐकून घेतल्यावर राजाने विचारले— "तर मग, माझ्याकडून तुला कोणत्या तऱ्हेच्या मदतीची अपेक्षा आहे?"

"आपल्या दरबारी चित्रकाराला एकदां माझ्याबरोबर पाठवू शकाल का? आम्ही दोघे एका आठवड्यात परत येऊ." उदयन म्हणाला.

राजाने होकार देत चित्रकाराला बोलाविले आणि उदयनची व त्याची ओळख करून देऊन त्याच्याबरोबर त्याला जायला सांगितले. दुसऱ्याच दिवशी दोघे राक्षसाच्या मायाभवनात दाखल झाले. त्याने तेथे चित्रकारावर व स्वतःवर अदृश्य होण्याचे भस्म टाकले. दोघे अदृश्य रूपे सरोवराच्या काठी काही दिवस राहून मालव देशात परत जायला निघाले.

बरोबर एका आठवड्याने उदयन व चित्रकार मालव महाराजांच्या महालात पोचले. चित्रकाराने काढून आणलेली चित्रे क्रमाने पहात उदयनकडे पहात राहिला, मध्येच एक चित्र पाहून तो थांबला व ते चित्र उदयनच्या जवळ ठेवून पहात म्हणाला—"ठीक! हे तुम्हांला बरोबर दिसते आहे. हा वेष करून तुम्ही गेलात तर तुम्हांला कोणी ओळखू शकणार नाही."

"बरोबर म्हणता आहां!" उदयन आनंदाने म्हणाला. त्यानंतर लगेच चित्रकाराने उदयनला त्या चित्रातल्या राक्षसासारखी वस्त्रे घालून त्याला आरशात पहायला सांगितले. उदयनने आपले रूप व वस्त्रे त्या चित्राशी जुळवून पाहिली व आपण आतां राक्षसाच्या नोकरासारखे दिसू लागल्याची खात्री करून घेतली. नंतर दुसऱ्याच दिवशी राजाचा निरोप घेऊन तो मायाभवनाजवळच्या सरोवराकडे निघाला.

उदयनने सरोवराच्याकाठी पोचल्याबरोबर आपल्याजवळच्या भस्मांजनासाठी सवयीप्रमाणे कपड्याच्या खिशात चाचपून पाहिले. परंतु भस्म नव्हते. आता काय करायचे, असा विचार थोडा वेळ केल्यावर उदयन घाबरून गेल्याशिवाय काळोख पडेपर्यंत कोणाच्या दृष्टीस न पडतां एका झुडपाआड लपून बसला.

संध्याकाळ झाल्यावर चांगला काळोख पडला. राक्षसाच्या नोकरांचाकरांपैकी आणखी काहीजण सरोवरानजीक आले आणि त्या वेळेपर्यंत पाहारा देणाऱ्यांना विश्रांतीसाठी पाठवून त्यांच्याजागी पाहाऱ्याला बसले. पाळी संपवून आलेले नोकरचाकर भुयारातल्या घरात एक एक करून जाऊ लागले. अगदी शेवटचा नोकर आत प्रवेश करण्यापूर्वी उदयन चातुर्याने त्याच्याबरोबर आत शिरला.

आपले सोंग उघडकीला आलं तर मरणच हे ओळखून उदयन मनात भीतच होता. परंतु दैवयोगानें त्याचे ते सोंग कोणी ओळखू शकला नाही व सर्व सुरळीत झाले. कारण उदयनचा वेष पाहून तो आपल्या पैकींच एक आहे असे इतर नोकरांना वाटले. म्हणून कोणताही प्रसंग त्याच्यावर आला नाही.

या खेपेस उदयन सर्व पायऱ्या उतरून त्या सिंहांच्या अगदी जवळून पुढे निघाला. आपण इतर पाहरेकऱ्यांच्या घोळक्यात त्यांच्याच सारखे कपडे घालून जात असल्याने सिंह आपल्याला ओळखू शकणार नाहीत असे त्याला वाटले होते. परंतु सिंहांनी नव्या माणसाला तत्क्षण ओळखले आणि उदयनवर तुटून पडले आणि त्याला ठार करण्याच्या बेतात होते.















त्याच वेळी उदयन किंकाळी फोडून खाली पडला.

ते पाहून इतर राक्षस नोकर धावले व आपल्या तलवारीच्या एकेका वाराने त्यांनी सहांना ठार केले. नंतर उदयनला घेऊन जाऊन सर्व त्याच्या चारी बाजूला घोळका करून उभे राहाले. "आपल्यालाच खायला धावले का हे? मस्ती चढली होती बेटयांना! चांगली शिक्षा मिळाली गुलामांना!" असे म्हणत सर्वांनी सिंहांना ठार करणाऱ्यांची पाठ थोपटली.

नंतर त्यांनी उदयनला मलमपट्टी वगैरे केली आणि आपल्या पाळीच्या वेळेला जाण्यापूर्वी उदयनला सहानुभूती दर्शवीत म्हणाले–"मित्रा! तुझी तब्येत ठणठणीत चांगली होईपर्यंत दोन दिवस तू येथेच विश्रांती घे. तोपर्यंत पाहाऱ्याचे काम आम्ही पाहून घेतो."

तेव्हां उदयन म्हणाला–"आणखी एक कृपा कराल का? मला जागचे हालतां येणार नाही. म्हणून माझ्या खाण्यापिण्याची व्यवस्था करून ठेवा आणि मग जा. तुम्हांला पुण्य लागेल."

त्याला होकार देऊन त्यांनी पाहाऱ्याला जाण्यापूर्वी उदयनसाठी मांस, पेये वगैरे आणून ठेवली. आणि सर्व निघून गेले.

उजाडले, आणि दिवसपाळीच्या पाहरेकऱ्यांनी रात्रपाळी करणाऱ्यांना सोडविले. काही वेळाने रात्रपाळीचे लोक उदयनजवळ आले व म्हणाले–"तू मोठा भाग्यशाली आहेस बाबा! म्हणून वाचलास!" रात्रभर पाहारा देत राहिल्यामुळे थकून गेलेले सर्व पाहरेकरी जमिनीला अंग लागतांच घोरू लागले.

मध्यरात्रीच्या सुमारास राक्षस आला. पायऱ्या उतरत असतांच जिन्याच्या पायथ्याशी दोन्ही सिंह मरून पडलेले त्याला दिसले. त्याला भयंकर राग आला. "हे कोणाचे काम? बोला!" म्हणून मोठमोठयाने ओरडू लागला आणि उदयन पडून होता त्या जागी आला.

(क्रमशः)





# सौंदर्य पिपासा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! तू इतके परिश्रम करून शेवटी आपल्या प्रयत्नात यशस्वी झालास तर चंद्रकुमारासारखा हातात आलेले फळ घालवून बसू नकोस म्हणजे झाले. तुला मी त्याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी सत्राजित नावाचा एक यक्ष राजा होता. त्याला तेजोवती नावाची एक रूपवती कन्या होती. सत्राजिताजवळ त्याच्या दोन्ही हातासारखे सतत त्याच्या सेवेस हजर असणारे दोन यक्षकुमार होते. त्यांच्यापैकी एकाचे नाव रुद्रकुमार होते व दुसऱ्याचे चंद्रकुमार होते.



सत्राजिताचे रुद्रकुमारावर फार प्रेम होते, कारण तो त्याची मनोभावाने सेवा करी. कारण सत्राजिताचे कन्या तेजोवती होती. सत्राजिताची तिच्यावर फार प्रेम होते. सत्राजिताची सेवा करून त्याला खूष केले तर तो तिच्याशी आपले लग्न करून देईल असे रुद्रकुमाराला वाटे. परंतु त्याला तेवढे सौंदर्य प्राप्त नव्हते. तसा तो फार पराक्रमी देखील नव्हता. परंतु चंद्रकुमारात ते दोन्ही गुण मोठ्या प्रमाणात होते. तेजोवती त्याच्या सौंदर्यावर भाळली होती. लग्न करायचे तर त्याच्याशीच असे तिला वाटे. सत्राजितावरच्या स्वामिभक्तीमुळे चंद्रकुमार त्याची फार सेवा करी. तेजोवतीचे प्रेम कोणावर आहे ते तो चांगले ओळखत असे. म्हणून रुद्रकुमाराला तिचा हात मिळणार नाही, याबद्दल त्याला वाईट वाटे.

सत्राजित मुलीच्या विवाहासाठी योग्य वर पहात असल्याचे कळताच रुद्रकुमाराने आपल्या धन्याला भेटून मनातली इच्छा व्यक्त केली. सत्राजितला फार आनंद झाला. त्याने तेजोवतीला त्याच्याशी लग्न करून घ्यायला सल्ला दिला.

परंतु तिला त्याच्या सारख्या रूप रंग नसलेल्या तरुणाशी लग्न करावयाचे नव्हते. पण तसे स्पष्ट सांगणे उद्धटपणाचे होईल या विचाराने ती वडिलांना म्हणाली– "बाबा! माझ्याशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्याने एक अट-पूरी केली पाहिजे."

"ऐकू दे तरी ती अट." सत्राजितने तिला विचारले.

"गंधर्ववनात एक सरोवर आहे. त्यांत सुवर्ण कमळे आहेत. त्याचा रस पिऊन व सर्वांगाला लावून घेणाऱ्याचे सर्व रोग बरे होतात व त्याला कधी कोणताही आजार येत नाही. याशिवाय त्याला गंधर्वतुल्य नैसर्गिक सौंदर्यलाभ होतो. गंधर्वांवर विजय मिळवून ते कमळ आणणाऱ्याशीच मी विवाह करीन." तेजोवती म्हणाली.

सत्राजितने आपल्या दोघां सेवकांना ती परीक्षा देण्यास प्रोत्साहित करून पाठविले. दोघे गंधर्व लोकात जायला निघाले. चंद्रकुमार शूर व साहसी होता. तो वाटेत आलेल्या सर्व संकटांना हसतहसत तोंड देऊन आपल्या गम्य स्थानी म्हणजे गंधर्वांच्या त्या सरोवराच्या काठी येऊन पोचला. सरोवरात सुवर्ण कमळे पाहून तो एक कमळ तोडून आणण्यासाठी पाण्यात उतरला.

दुसऱ्या क्षणाला त्याला पाठीमागून कोणीतरी येत असल्यासारखे वाटले. तेथे अदृश्य रूपे असलेल्या एका गंधर्वाने सिंहाचे रूप घेऊन मोठ्याने गर्जना करीत चंद्रकुमारावर उडी मारली. चंद्रकुमाराने दोन्ही हातांनी त्याची नरडी धरून दाबली. जीव कंठाला आल्यावर गंधर्व स्वस्वरूपात प्रकट होऊन गयावया करीत पाय धरून माफी मागू लागला.

चंद्रकुमाराने येण्याचे कारण सांगितल्यावर त्या गंधर्वाने सरोवरातील एक सुवर्ण कमळ आणून दिले. ते कमळ मिळाले त्या वेळी काळोख पडू लागला होता. म्हणून चंद्रकुमाराने रात्रभर शेजारच्या एका गुहेत रात्र काढण्याचे ठरविले.

थोडी रात्र उलटल्यावर चंद्रकुमाराला एक सिंहगर्जना ऐकू आली. तो धावत सरोवरावर गेला तेव्हां तेथे त्याला एका



पाडल्याचे दिसले. तो बिचारा जमिनीवर तडफडत होता.

लगेच चंद्रकुमाराने रुद्रकुमाराला उचलून गुहेत आणले आणि आपल्या जवळच्या सुवर्ण कमळाचा रस त्याच्या सर्वांगाला चोळला आणि आश्चर्य म्हणजे रुद्रकुमाराला गंधर्वासारखे सौंदर्य लाभले. त्याने चंद्रकुमाराचे आभार मानले.

दोघे सुवर्ण कमळाशिवायच रिकाम्या हाताने परतले. तरी तेजोवतीने वडिलांच्या इच्छेप्रमाणे रुद्रकुमाराशी विवाह करून घेतला.

येथवर गोष्ट सांगून वेताळाने विचारले–

रुद्रकुमाराशी विवाहास तयार झाली यात नवल नाही. परंतु चंद्रकुमाराने एवढे कष्ट सहन करून मिळविलेले यश रुद्रकुमारासाठी खर्ची कां घातले? दोघे तेजोवतीने घातलेली अट पुरी करायला गेले होते ना? मुळात तेजोवतीने चंद्रकुमाराशीच लग्न करावयाचे ठरविले असल्याचे न सांगता ती अट घालावीच कां? या शंकाचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"रुद्रकुमारानेच नाही का सत्राजिताला तेजोवतीशी लग्न करून द्यायला विचारले होते? चंद्रकुमारने नव्हते विचारले तसे. त्या दोघांपैकी पाहिजे त्याचे वरण कर, असे बाप म्हणाला असता तर तेजोवतीने चंद्रकुमाराला वरले असते. परंतु लग्न करण्याची इच्छा स्वतः व्यक्त करणाऱ्याशी ती लग्नाला तयार नसल्याचे कसे म्हणणार? म्हणून तिने ती अट घातली. चंद्रकुमार त्या चढाओढीत भाग घेईल व ती अट पुरी करील व रुद्रकुमार हारेल, याची तिला खात्री होती. चंद्रकुमार सुवर्ण कमळाच्या रसाने आणखी जास्त रूपवान होईल असे तिला वाटत होते. परंतु तिचा तो हेतू पूर्ण न होण्यास कारण चंद्रकुमारच झाला. सत्राजिताच्या आज्ञेने तो त्या चढाओढीत उतरला होता, तेजोवतीच्या इच्छेने व प्रेमामुळे नाही. रुद्रकुमाराचा त्याने हेवादेखील केला नाही, रुद्रकुमाचे तेजोवतीवर जिवापेक्षा जास्त प्रेम असल्याची गोष्ट चंद्रकुमाराला माहीत होती. त्या दिवशी रात्री तो गुहेत थांबला तेसुद्धा कदाचित् रुद्रकुमाराच्या नशिबात काय आहे हे पाहण्यासाठी असेल! म्हणून चंद्रकुमाराने मिळविलेले यश त्याच्या पदरात पडले नाही. त्याने त्याचा सदुपयोगच केला."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# हेवा

फार पूर्वी रामपूर नावाच्या गावी चित्रे करणारा एक सुप्रसिद्ध कारागीर रहात असे. त्याला रामदत्त व सोमदत्त नावाचे दोन मुलगे होते. दोघे वयात आल्यावर वडील वारले. तोपर्यंत सोमदत्ताने बापाकडून चित्रे कशी करायची हे चांगले शिकून घेतले होते. बापाचे दुकान तोच उत्तम प्रकारे चालवू लागला होता. त्याच्या मिळकतीवरच कुटुंबाचा उदर निर्वाह चांगल्या प्रकारे चाले.

दुसरा मुलगा सोमदत्त चित्रे तयार करणे शिकला नाही. त्याचे लक्ष विद्याभ्यासाकडे जास्त होते म्हणून तो विद्याभ्यास करू लागला. सोळाव्या वर्षापर्यंत त्याने गावातल्या विद्वानांजवळ शिकून घेतले. धाकट्या भावाच्या मनात पुढे विद्याभ्यास चालू ठेवण्याची इच्छा असल्याचे ओळखून रामदत्ताने त्याला मथुरेला जगन्नाथ पंडित नावाच्या एका विद्वानाकडे पाठविले.

जगन्नाथ पंडिताकडे शिष्यवर्ग मोठा होता. परंतु सोमदत्ताने आपल्या सर्व सहपाठ्यांत सर्वात हुशार म्हणून नांव मिळविले. म्हणून त्याच्या मनात थोडा गर्व व अहंकार वाढला.

मध्यंतरी जगन्नाथ पंडिताकडे शिकायला आनंद नावाचा एक नवीन शिष्य आला. तो कुशाग्रबुद्धीचा व सुस्वभावाचा व गोड विद्यार्थी होता. सर्व त्याचा आदर करू लागले.

आनंद सर्वप्रकारे आपल्याहून हुशार असल्याचे व सर्वांच्या आदराला पात्र होऊ लागल्याचे पाहून सोमदत्ताच्या मनात हेवा उत्पन्न झाला. एके दिवशी सोमदत्त आनंदच्या गळ्यात गळा घालून त्याला इतर सहपाठ्यांपासून दूर जंगलात एका निर्जन



स्थानी घेऊन गेला. त्याने आनंदच्या पायाला पाठीमागून जोराने लाथ मारून जमिनीवर उताणा पाडले व जवळच एक मोठा दगड दिसला तो उचलून आनंदच्या डोक्यात घालीत म्हणाला–"आजपासून माझ्या वाटेवरचा काटा दूर झाला."

इतक्यात दूरून काही शिष्यांनी ओरडून म्हटले–"थांब रे! कोठे निघालास? काय झाले?" ते धावत जवळ आले.

परंतु सोमदत्ताने तो दगड उचलून दूर फेकला व अंगातली सर्व शक्ती एकवटून तेथून पाय काढला.

घाबरलेल्या अवस्थेत घरी आलेल्या धाकट्या भावाला पाहून रामदत्ताने विचारपूस केली. "काय रे झाले असे घाबरायला? तुझा विद्याभ्यास संपला का?" त्याने विचारले.

सोमदत्ताने आपल्या वडील भावाला घडलेले वृत्त काही लपवालपवी केल्याशिवाय जसे होते तसे सांगितले. सर्व ऐकून घेऊन रामदत्ताने सोमदत्ताला सहानुभूती दाखवून शांत केले.

काही काळ लोटल्यावर कोठून तरी एक नवीन माणूस रामपूरला आला व त्याने रामदत्ताच्या दुकानासमोरच एक चित्रांचे दुकान काढले. नवीनासमोर जुन्याला कोण विचारतो. रामदत्ताचे सर्व गिऱ्हाईक नव्या दुकानातली चित्रे विकत घेऊन जाऊ लागले. परंतु काही काळ गेल्यावर लोकांचे डोळे उघडतील असे सोमदत्ताला वाटले.

त्याच्या भावाने केलेली चित्रे चांगली नाहीत असे लोकांना वाटू लागल्याचे सोमदत्ताच्या कानावर आले. नवा चित्र करणारा हुशार असू शकेल. परन्तु त्याने केलेली चित्रे आपल्या भावाच्या चित्रापेक्षा जास्त चांगली असतात हे मानायला सोमदत्ताचे मन मानेना.

एके दिवशी सोमदत्त घरून आपल्या भावाच्या दुकानाकडे जात असतां एक जण समोरच्या दुकानदाराकडून काही चित्रे विकत घेऊन समोरून येत असलेला भेटला. त्याने त्या माणसाला विचारले–"ही चित्रे कोठून हो विकत घेतलीत?"

"एक नवीन दुकान निघाले आहे ना? त्या दुकानात घेतली." तो मनुष्य म्हणाला.

सोमदत्ताने ती चित्रे हातात घेऊन पाहिली. ती त्याच्या भावाच्या चित्रांसारखीच, जणुकाही त्यानेच केल्यासारखी दिसली. लोक या नव्या दुकानाकडे कां वळले हे सोमदत्ताला कळेना.

तो दुकानात पोचला तेव्हां रामदत्त नवीन चित्रे तयार करीत होता. त्याचे हात कामात गुंतले होते खरे, परंतु त्याची दृष्टी समोरच्या दुकानात चित्रे खरेदी करणाऱ्यांवर होती. त्याचे चित्त हातातल्या कामावर नसल्याचे सोमदत्तला दिसत होते. त्याच्याजवळ काही चित्रे ठेवलेली होती. ती सर्व विकृत दिसत होती. रामदत्ताचे हात थरथर कापत असावेत से सोमदत्ताला वाटू लागले. त्यामुळेच चित्राची अशी स्थिती झाली असावी. सोमदत्ताला आयुष्यात निराशा वाटू लागली ती बरोबर असल्याचे वाटले.

रामदत्त सोमदत्ताकडे पाहून विचारू लागला–"काय रे, कोणी आपल्या दुकानाकडे वळत नाही हे पाहून तुला वाईट वाटते आहे का? पण हे किती दिवस चालणार? मी पाटलाचे हात गरम करून त्या दुकानदाराला गावाबाहेर हाकलून लाववितो. पहा तर! त्यानंतर लोकांना आपल्या दुकानात यावेच लागेल."



नव्या माणसाच्या प्रतिस्पर्धेमुळे आपल्या एवढ्या सुशील भावाचे एवढे मन पालटले, म्हणून त्याच्या हातून चांगली चित्रे होत नाहीत, असे सोमदत्तला वाटले. दुसऱ्या क्षणाला कोणीतरी त्याच्या थोबाडीत मारल्यासारखे त्याला भासले. लगेच तो उठला आणि सरळ मथुरेला गेला.

जगन्नाथ पंडिताचे पाय धरून त्याने त्यांची क्षमा मागितली व आपली सर्व चुकी कबूल करून पुढे शिकविण्यास विनंती केली. आनंदच्या मनांत सोमदत्ताविरुद्ध वैरभावना मुळीच नव्हती. दोघांची परस्पर मैत्री वाढली. पुढे काही वर्षांनी आपला विद्याभ्यास पूर्ण करून सोमदत्त आपल्या गावी परत आला.

आपला धाकटा भाऊ सर्व विद्याभ्यास पूर्ण करून एक पंडित होऊन घरी परतलेला पाहून रामदत्ताने विचारले–"विद्याभ्यास सोडून तू आला होतास आणि मग पुन्हां कसा काय शिकायला गेलास रे?" तेव्हां सोमदत्त म्हणाला–"मी आयुष्यात बोध होईल अशी एक गोष्ट शिकलो आपल्याहून कोणी थोर, हुशार व परिश्रमी आहे हे पाहून त्याचा हेवा वाटणे मनुष्य स्वभाव आहे. परंतु तो हेवा जर आपण सन्मार्गी लावला आणि परिश्रम केले तर आपला उद्धार होऊ शकतो. परंतु हेवादावा ठेवून क्रोधाने आपण दुसऱ्याचे बरे वाईट करायला निघालो तर आपलंच अहित होते. मी आनंदाच्या द्वेषाने त्याला ठार करायला निघालो होतो. परंतु त्या प्रयत्नात स्वत:चेच नुकसान करून घेतले. मला ही चूक तुझ्या उदाहरणावरून कळली. समोरच्या दुकानदाराने केलेली चित्रे चांगली नव्हती. तुला त्यांच्याहून चांगली करता आली असती. परंतु......"

रामदत्त स्मित करून म्हणाला–"बाबा रे! तुझे डोळे उघडावे म्हणूनच मी ते सर्व नाटक केले होते. तो समोरचा दुकानदार शेजारच्या गावचा माझा मित्रच होता व त्याच्या दुकानात ठेवलेली सर्व चित्रे मीच केलेली होती."





# १६५. प्राचीन रोमन नगरे

**इ. स.** ७९ मध्ये व्हेसुव्हिअस हा ज्वालामुखी लाव्हा ओकू लागला तेव्हां पॉम्पे व हर्क्यूलिनियम् नावाची दोन नगरे त्याच्या खाली बुडाली. त्यांच्या दुर्दैवाची कथा त्या काळाच्या लोकांना चांगली माहीत होती. परंतु त्यानंतर १८व्या शतकापर्यंत त्या नगरांचा पत्ताच कोणाला नव्हता. इ. स. १७१० मध्ये विहीर खणण्याचे काम चालू असतां एका शेतकऱ्याला हर्क्यूलिनियम् नगराचा अचानक शोध लागला. लोकांचे विशेष करून इतिहास संशोधनाचे कार्य करणाराचे औत्सुक्य वाढले पुढे जास्त शोधार्थ खोदकाम झाल्यावर दोन्ही नगराचा शोध लागला. आश्चर्याची गोष्ट म्हणजे ही नगरे व त्यांतील शिल्पकला सुरक्षित राहली.

हर्क्यूलिनियम् नगरात सर्वात प्रथम शोध लागला तो महाल ज्यूलियस सीझरच्या सासऱ्याचा आहे. ती एक भव्य इमारत आहे. समोर व जी कोरलेली चित्रें दिसत आहेत ते पॉम्पे नगरातील ज्युपिटरचे देवालय आहे. मागच्या बाजूला रात्रंदिवस धूर, राख व वाफ ओकणारा व्हेसुव्हिअस पर्वत दिसत आहे.





# जिवावरचे संकट टळले

"तू कालीमातेच्या लाडक्या रघूबरोबर युद्ध करणार, नाही का रे?" असे म्हणत चोरांच्या सोनेरी टोळीचा नायक रघू याने आपली तलवार खेडूत तरुण अजित याच्या पाठीला टेकीत विचारले.

हातपाय रानटी लतावेलींनीं बांधलेले होते, म्हणून अजित काहीच बोलला नाही.

"हे चरबी चढलेले डोके तलवारीच्या एका वाराने उडवू का काय म्हणतोस दादा?" एका अनुयायाने रघूला विचारले.

"नको, नको, चुकूनसुद्धां तसं काही करू नकोस. येत्या अमावास्येला शनिवार आहे ना, तो एक पर्वदिन आहे. कालीमातेने स्वत: होऊन याचा बळी घेण्यासाठी याला इकडे पाठविले आहे. हा ब्राह्मणही आहे. याच्या सारख्याचा बळी आपण तिच्या चरणी वाहला तर ती कालीमाता आपल्यावर खूष होईल." असे म्हणत तो अट्टल चोर तेथून निघून गेला. अजितला एका झोपडीत बांधून ठेवण्यात आले आणि चार चोर पाहऱ्याला उभे राहले.

अजित आपल्या गावच्या काही खेडुतां-बरोबर पुरी यात्रेला निघाला होता. त्या काळात आगगाड्या नव्हत्या. म्हणून दहा-वीस मिळून पायी प्रवास करीत. जंगलांतून व डोंगराळ प्रदेशातून प्रवास करतांना श्वापदांचा व चोरांचा त्रास होत असे. एकेका पैशासाठी लोक कोणाचा जीव घ्यायला मागे पुढे पहात नसत.

अजितबरोबरच्या यात्रेकरूंचे प्रयाण आतापर्यंत निर्विघ्न पार पडले. गावी पोचायला फक्त तीन दिवसांचा प्रवासच उरला होता. परंतु एकाएकी एका सोनेरी टोळीने त्यांच्यावर हल्ला केला. त्या सोनेरी टोळीचा नायक रघू होता.

अजित लाठी फिरविण्यात पटाईत होता. त्याने लाठी फिरवीत चोरांच्या टोळीला सुमारे अर्धा पाऊण तास एक पाऊल ही पुढे टाकू दिले नाही. चोर सहा जण होते व त्यांच्या हातात तलवारी व भाले होते. परंतु त्या सर्वांना त्याने एकट्याने अडविले होते. त्याच्या बरोबरचे साथी यात्रेकरू एका सुरक्षित स्थानी पळून गेले होते.

अजित एकटा होता. दमला व शेवटी अगदी दमून भागून खाली पडल्यावर चोरांनी त्याचे हात पाय बांधले आणि त्याला आपला नायक रघू याच्याकडे नेले.

आपण आतां जगत नाही हे अजितने रघूच्या बोलण्यावरून ओळखलेच होते. तरी त्याने आशा सोडली नाही. आपल्याला त्यांनी कालीमातेच्या चरणी ठार केले तरी आपण आपल्या साथी यात्रेकरूंना वांचवू शकलो, या गोष्टीचा त्याला आनंद झाला.

त्याला झोप लागेना. मध्य रात्रीच्या सुमारास त्याची झोप मोडली. चोरांच्या हातातून सुटण्याचा काही मार्ग आहे का, तो विचार करू लागला. त्या झोपडीला एकच एक खिडकी होती. खिडकीला लोखंडी गज होते. ते गज जागचे हालत नव्हते. खिडकीतून त्याने बाहेर पाहिले. अंधुक चांदणे पडले होते. त्याला चार चोर



तलवारी घेऊन पाहरा देत असलेले दिसले. जीव वांचण्याची आशा उरली नाही.

उजाडू लागले. त्याबरोबर जगण्याची आशा त्याच्या मनात उदयास येऊ लागली. खिडकीतून त्याने बाहेर पाहिले. पक्षांची किलबिलाट चालू होती. त्याला बाहेर लाल जास्वंदीची फुले दिसत होती. डाव्या बाजूला एक लिंबाचे झाड होते. झाडाला खूप लिंबे लागली होती. लिंबाची एक डाहाळी खिडकीला चिकटलेली होती.

ती पाहून त्याला एक युक्ती सुचली. आपला जीव नक्कीच वांचणार असे त्याला वाटले. त्याला थोडी जादू व मंत्रतंत्र



पाहण्याचा उत्साह त्याच्या मनात वाढला. त्याचा मामा कंदमुळे व रसायने यांच्या मदतीने जादूचे अनेक प्रयोग करून दाखवीत असे. त्याच्याबरोबर बरेच दिवस राहिल्या-मुळे अजितनेदेखील काही जादूचे प्रयोग शिकून घेतले होते.

अजितने मनातली भीती काढून टाकली. स्वतःला वाचविण्यासाठी प्रयत्न करून पहायचे ठरवून त्याने ती युक्ती कशी यशस्वी होईल याचा पूर्ण विचार केला.

अमावास्येचा शनिवार आला. चोर आपल्या दैवताला प्रसन्न करण्यासाठी तयारीला लागले. शनिवारी उजाडताच रघु आला. म्हणाला–

"मुला! तुझे धैर्य आणि साहस खरो-खरच वाखाणण्यासारखेच होते रे! तुझी लाठी पाहून मी तर थक्कच झालो होतो. त्यात तुझी बरोबरी कोणी करू शकणार नाही. तू जिवंत राहिला असतास तर तुझा आम्हांला किती उपयोग करून घेता आला असता. पण तुझं मरण आतां टळत नाही. ती कालीमातेची आज्ञा आहे. तिला तुझे रक्त हवं आहे. तुझं डोकं तिला अर्पण करणार आहे. तिनेच तुला तुझा बळी घेण्यासाठी या अरण्यात आणलं. तू ही त्या कालीमातेचीच इच्छा आहे!"

अजित अत्यंत आवेशपूर्ण शब्दात म्हणाला–"ते अशक्य! रघू, तुला कदाचित माहीत नसेल, मी कालीमातेचा एक मोठा भक्त आहे. तिने मला इकडे बोलाविले ते मरायला नव्हे, तुझ्यात जी पशुवृत्ती आहे ती निर्मूल करण्यासाठी!"

"रघू "हा हा हा!" करून जोराने हसला व म्हणाला–"बराच वस्ताद दिस-तोस की! जिभेची वटवट बंद कर. तुझी जीभ मी छाटून टाकली असती. परंतु तू विकलांग होशील. मग तुझा बळी दिला तर ते मातेला खपणार नाही."

"रघू! मी बोलतो आहे ती तुला वटवट वाटली का रे! तू सावध व्हायला अजून संधी आहे. आपला हा क्रूरपणा सोड. दुसऱ्याचा माल चोरून न्यायचे सोड. ही पापाची वाट सोड. मी पुन्हां पुन्हा सांगतो. कालीमातेने मला स्वप्नात दर्शन देऊन सांगितले की मी तिचा खरा भक्त असेन तर तुझ्या सारख्या तिच्या भक्ताला सन्मार्गावर आणण्याची जबाब-दारी घेतली पाहिजे. तू तिच्यासमोर जे बळी दिलेस ते घोर कृत्य तिला मुळीच आवडले नाही." अजित म्हणाला.

"तू कालीमातेचा भक्त आहेस, हे साबित करून दाखविशील काय?" रघूने विचारले.

"हो, दाखवीन!" अजित म्हणाला.

"कसं काय?" रघूने विचारले.

"त्याला तशी मोठी सामग्री नको. एक सामान्य वस्तूच हवी आहे." असे म्हणत अजितने त्या झोपडीत पडलेला एक चुर-गळलेला पांढरा कागद उचलला. त्याने त्या कागदाचे फाडून दोन तुकडे केले. त्याने एक तुकडा आपल्याजवळ ठेवून घेतला आणि दुसरा रघूला देत म्हणाला– "हे पहा, रघू! आतां मला देवीच्या देवळात घेऊन चल. तीच जागा बरोबर होईल ही गोष्ट साबीत करून दाख-वायला."

अजितला पुन्हां वेलालतांनी छान बांधून घेऊन कालीच्या देवळात रघु व त्याचे



साथीदार घेऊन गेले. त्याच्या मागे पुढे सशस्त्र चोर चालत होते.

अजितने देवळात पोचताच देवीला साष्टांग नमस्कार केला.

नंतर तो म्हणाला–"रघू! देवीच्या पायावर वाहिलेल्या जासवंदीच्या फुलापैकी एक घेऊन त्यातले अर्धे आपल्याजवळ ठेवून घे. मी तुला दिलेला कागदाचा तुकडा जमिनीवर अंथरून त्यावर ते फूल चोळ. माझ्या कागदावर सुद्धां मी चोळतो. मी कालीचा खरा भक्त असेन तर माझ्या कागदाला तांबडे डाग पडतील व तुझ्या कागदाला निळे डाग पडतील. जय भवानी! आता कागदावर चोळ!"









रघूने जासवंदीच्या पाकळ्या दोन्ही कागदाच्या तुकड्यांवर चोळल्यावर त्याच्या तुकड्यांवर तांबडे डाग दिसले. ते पाहून रघूचे व त्याच्या साथीदार चोरांचे एकदम डोळे उघडले.

"जय भवानी कालीमाते!" अजितने जयघोष केला.

चोरांनी त्याच्या सुरात सूर मिळवून कालीमातेचा जयजयकार केला आणि अजितचे पाय धरून त्याची क्षमा मागू लागले. म्हणाले–"गुरू! आम्हांला वांचवा! आम्ही पापी आहो. आमच्या हातून न कळत किती पापे घडली? क्षमा करा!"

त्यांनी अजितची सर्व बंधने सोडून त्याला मुक्त केले. त्याच्या सल्लयाप्रमाणे त्यांनी चोरीचा धंदा सोडून दिला आणि त्यांनी चोरी करून जो माल व पैसे जमा केले होते ते सर्व गोरगरिबांना व साधू संन्याशांना वाटून टाकले. जंगलातच शेतीभाती करून ते पुढील आयुष्य घालवू लागले.

जासवंदीची फुले व लिंबे पाहताच अजितला त्याच्या मामाने हातचलाखीने करून दाखविलेले जादूचे खेळ आठवले. अजितजवळ एक पांढरा कागद होताच. आपल्या पूर्वजांची नांवे लिहून पुरीला गेल्यावर श्राद्ध तर्पण करण्याच्या हेतूने त्याने तयारी ठेवली होती. तो कागद त्याने आपल्याजवळ घडी करून ठेवला होता. त्या कागदाच्या अर्ध्या बाजूला त्याने लिंबाचा रस लावून ठेवला व सर्व कागद चुरगळून झोपडीच्या एका कोपऱ्यात टाकून ठेवला होता. त्यात जादू अशी होती की जासवंदीच्या पाकळ्या साध्या कागदावर चोळल्या तर निळा रंग व लिंबाचा रस लावलेल्या जागी चोळला तर लाल रंग होतो हे अजितने मामाच्याकडून शिकून घेतले होते.

एका सामान्य लिंबामुळे अजित स्वतःचा जीव वांचवू शकला, एवढेच नव्हे तर एका कुप्रसिद्ध अट्टल चोराला तो सन्मार्गी लावू शकला.



# कवच परीक्षा

एका सैनिकाचा बाप कवचे तयार करीत असे. त्याने एकदां एक चांगले कवच तयार करून ते राजाला दाखविले.

राजा ते पाहून म्हणाला–"चांगलं दिसतं आहे, परंतु हे किती टणक व बळकट आहे प्रत्यक्ष पाहिले पाहिजे."

त्याने ते एका दगडी खांबाला घातले आणि त्यावर तलवारीने आणि गदेने वार करू लागला. कवच तुटून त्याचे तुकडे तुकडे झाले.

ते पाहून राजा कवच करणारास म्हणाला–"दुष्ट माणसा! हे कवच अंगात घालून मी युद्धाला गेलो असतो तर काय झाले असते पाहिलेस का?"

ते कळल्यावर कवच करणाऱ्याच्या मुलाने बापाकडून दुसरे कवच तयार करवून ते राजाला नेऊन दाखविले. राजाने ते पुन्हां दगडी खांबाला घालू लागला. परंतु राजाला थांबवून तो म्हणाला.

"महाराज! कवचाची परीक्षा तशी करीत नाहीत." असे म्हणत त्याने ते स्वतः अंगात घातले व परीक्षा करायला सांगितले. राजा तलवार उपसून पुढे गेला. सैनिकाच्या मुलाने सुद्धा तलवार उपसली.

ते पाहून राजा संपताला. सैनिक म्हणाला–"क्षमा करावी महाराज! कवच दगडाला घालायचे नसते. शूर योद्धयांनी ते धारण करावयाचे असते. ते आत्मरक्षण करते.

ते ऐकून राजाचे डोळे उघडले कवचाचे महत्व ओळखून राजाने चांगली किंमत देऊन ते विकत घेतले.





# दोघे मित्र

एका गावी रामू व शामू नावाचे दोघे मित्र रहात होते. त्यांना आपला म्हणण्यासारखा कोणी नव्हता. दोघे नेहमी बरोबर एकाच घरात रहात. त्यांना काम असे काहीच नव्हते. कधी मनात आले तर दोघे रानात जाऊन लाकडे तोडून ती विकून जे मिळे त्यावर उदरनिर्वाह चालवीत. आळस वाटला की कोणाच्या तरी परसात किंवा मळयात शिरून केळयाचा घोस नेऊन तो विकीत.

रामूजवळ त्याच्या आज्याच्या वेळेपासून आलेली एक चांदीची थाळी होती. शामूजवळ एक जुनी खाट होती. दोघे त्या चांदीच्या थाळीत जेवत आणि त्या खाटेवर पडून रहात.

एकदां पावसाळयातली रात्र होती. मुसळधार पाऊस पडत होता. दोघां मित्रांनी चांदीच्या थाळीत जेवून घेतले आणि खाटेवर येऊन बसले. रामूच्या वांटयातला थोडा भात उरला आणि शामूच्या वाटयातली थोडी भाजी उरली. उद्यां सकाळी खाऊ, असा विचार करून त्यांनी थाळीवर एक पान झांकून ठेवून दिले.

रामू आपल्या या अवस्थेचा विचार करीत दुःखाने म्हणाला—"किती दिवस रे असे दिवस काढावे लागणार? उद्यां आपण लग्न केले तर बायकोला काय घालणार आणि स्वतः काय खाणार?"

तेव्हां शामू म्हणाला—"अशा पावसाळया रात्री कोणी महापुरुषाने येऊन दार वाजविल्याचे आणि रात्रभर विश्रांती घेऊन त्याला आश्रय देणाऱ्यावर प्रत्युपकार म्हणून काही केल्याच्या गोष्टी आपण ऐकतो. परंतु कां कोणास ठाऊक, आपल्या या दरिद्र झोपडीत कोणी महापुरुष येऊन आपली पायधूळ झाडीत नाही."

"उगीच विचार करीत बसण्यात काय अर्थ आहे? मध्यरात्र उलटली. चल, झोपू या." रामू म्हणाला.

इतक्यात कोणीतरी दार खडखडवले. रामूने चटदिशी उठून दार उघडले. बाहेर भगवी वस्त्रे धारण केलेला एक म्हातार थंडीने कुडकुडत उभा असलेला दिसला.

रामू रागाने उठून दार उघडीत त्याला म्हणाला—"कोण रे तू? तुझ्या बापाने की आजाने हे घर बांधलं आहे का, अर्धी रात्र उलटल्यावर येऊन दार खडखडवू लागलास?"

"मी एक म्हातारा साधू आहे! भुकेने जीव कासावीस झाला आहे. ही रात्र आपल्या झोपडीत काढू दिलीत तर पुण्य लागेल तुम्हांला!" साधू दीनवाणीने म्हणाला.

ते ऐकून शामू उठून पुढे आला व म्हणाला—"यावे साधूबुवा! आपल्या पादधूलीने आमची झोपडी पावन झाली. पण आज खायला थोडा भात व थोडी भाजी तेवढी उरली आहे." असे म्हणत त्याने त्या साधूला आदरपूर्वक आत बोलाविले.

साधू अत्यंत प्रेमाने त्याच्याकडे स्मित करून पहात म्हणाला—"बाबा रे! या जळत्या पोटात तापलेली राख माती पडली तरी ते शांत होईल. तुझे मन मोठे आहे!" साधूने झोपडीत येऊन शामूने वाढलेला



थोडासा भात व भाजी खाऊन मनाचे समाधान झाल्यासारखे दाखविले.

नंतर साधू शामूला म्हणाला–"बाळ! तुझी स्वत:ची अशी एखादी वस्तु असेल तर दाखव. त्यात मी अद्भुत शक्ती उत्पन्न करून मी आपल्या वाटेने जातो."

"ही खाट माझी आहे, बुवा!" रामू म्हणाला.

साधू त्या खाटेवर पाणी शिपडून हात फिरवीत म्हणाला–"जा, बेटा! तुला आतां कसली काळजी उरणार नाही. तू या खाटेवर पडून घट्ट डोळे बंद करून काही वेळ पडून रहा, तुला जमिनीत कोठे तरी पुरून ठेवलेला धनाचा साठा दिसेल. तू सुखी होशील!" तो रामूला म्हणाला.

हे पाहून शामूला रामूचा राग आला व त्याला त्याचा हेवा वाटू लागला. तो म्हणाला–"ही गोष्ट न्यायाची नाही, बुवा! तुम्ही जेवलात तो भात मी बगळलेला होता. त्याने फक्त भाजीच बगळली होती. म्हणून आपण अनुग्रह केलात त्यातला जास्त वांटा मला मिळाला पाहिजे. या शिवाय ही खाट तर माझीच आहे. तो लोभाने ती खाट त्याची म्हणून म्हणाला. ते सपशेल खोटे आहे."

ते ऐकून रामू चिडला. दोघे 'ही खाट माझी' असे भांडून शेवटी मारामारी करू लागले. परस्परांचा जीव घ्यायला तयार झाले.

साधूने त्या दोघांना सोडवून दूर उभे केले. म्हणाला–"तुम्ही भांडण करणे बरोबर नाही मुलांनो! तुम्ही दोघे खाटेवर डोळे मिटून पडून रहा, मी सांगितलेला धनाचा सांठा दोघांना दिसेल कदाचित! ज्याला दिसेल तोच त्या धनाचा मालक होईल!"

दोघे खाटेवर डोळे घट्ट बंद करून पडून राहले. बराच वेळ त्यांनी तो धनाचा सांठा दिसेल म्हणून वाट पाहिली. परंतु कोणालाच तो दिसला नाही. शेवटी कंटाळून त्यांनी डोळे उघडून पाहिले तेव्हां तेथे तो साधू नव्हता की ती चांदीची थाळी देखील नव्हती.



# नासिरुद्दिनाची चेलागिरी

एका उस्तादाने (मौलवी) आपल्या मकतबेत (शाळेत) कांही नवीन विद्यार्थ्यांना घ्यायचे जाहीर केले. ख्वाजा नासिरुद्दीन त्याच्याकडे जाऊन म्हणाला–"मला आपला चेला करून घ्या!"

नासिरुद्दिनासारखा चलाक तरुण आपल्या शिष्यवर्गात सामील होणार हे ऐकून मौलवी साहेबांना आनंदाबरोबर एक तऱ्हेचा अभिमान वाटू लागला.

नासिरुद्दीन दुसऱ्या दिवशी शाळेत गेला. सर्व विद्यार्थी कुदळी व फावडी घेऊन माती खणत होते. उस्ताद फक्त हातात छडी घेऊन विद्यार्थी जे काम करीत होते त्यावर नजर ठेवीत मागेपुढे फिरत होते. ख्वाजा नासिरुद्दिनाने तेथे दुसरी एक काठी होती ती हातात घेतली आणि उस्तादांच्या बाजूने मागेपुढे त्यांची नक्कल करीत चालू लागला. तेव्हां त्याला उस्तादांनी विचारले–"नासिरुद्दीन तू येथे शिकायला आला आहेस ना? मग इतरांसारखे काम कां नाही करीत?"

नासिरुद्दीन म्हणाला–"मौलावी साहेब! मी आपल्याजवळ शिकायला आलो होतो, आपल्या विद्यार्थ्यांजवळ नाही!"





# वाण्याची युक्ती

एका गावी रघू नावाचा सामान्य वर्गातला एक शेतकरी रहात असे. एकदा त्याच्या शेतात भाताचे पीक छान झाले. म्हणून रघू दररोज शेतातच पडून राखण करायला राही.

एके दिवशी रात्री चार चोर शेतात शिरले. दोघांनी जमल्या तेवढ्या लोंबी भराभरा कापून पोत्यात कोंबायला सुरवात केली आणि दोघे हातात काठ्या घेऊन रघूच्या आजूबाजूला उभे राहले.

रघू सर्व पहात होता, बोलला ओरडला तर डोक्यात काठ्या बसणार हे त्याला माहीत होते. म्हणून तो झोपेचे सोंग करून तसाच पडून राहला. आपले काम झाल्यावर चोर पळून गेले.

उजाडल्यावर रघूने पाहिले त्याच्या अर्ध्या शेताचा फडशा उडालेला होता. गांवात सर्वत्र ती बातमी पसरली. सर्वांना वाईट वाटले. सर्व म्हणाले–"या चोरांना चोरी करायला सांपडला तो हा गरीब रघूच का? पण चोरी करणाऱ्यांना गरीब काय आणि श्रीमंत काय सगळे सारखेच.

गावकरी व गावातली प्रमुख वडीलधारी मंडळी जमून चोरांपासून गावाला कसे वांचवायचे याचा विचार करू लागली. आज रघूच्या शेतावर त्यांची धाड आली उद्या कोणाच्या शेतावर येते कोणास ठाऊक? चोरांना गांवात पाऊल टाकता येऊ नये, असे काही तरी केले पाहिजे या गोष्टीचा विचार चालू होता.

त्या गावातला एक गरीब वाणी उतारवय झाले होते तरी हुशार होता. तो गावप्रमुखाला म्हणाला–"तुम्ही बेफिकीर रहा. मला चार दिवसांचा अवधी मिळाला तरी पुरे. मी चोरांना धरून तुमच्यासमोर हजर करतो.

"तुलाच तो पुण्यलाभ होऊ दे बाबा! तू चोरांना पकडून दे, आम्ही सर्व चंदा करून तुला एक दुकान काढून देतो गावात." सर्व गावकरी म्हणाले.

तो काय करणार वाण्याने कोणाला काही सांगितले नाही.

रघूच्या शेतातले पीक चोरून नेणारे चोर आपल्या गावात पोचले. त्यांना दोन पोती भात मिळाले. ती गोष्ट चोर रहात त्या गावच्या सर्वांना कळली. गावच चोरांचे होते. म्हणून दुसऱ्या दिवशी आणखी पांच चोर पुन्हां रघूच्या गावातच चोरी करायला निघाले.

हातात एक विळा घेऊन व बरोबर दोन रिकामी पोती घेऊन वाणी चोरांची वाट पहात शेताजवळ बसला होता. चोरांना येत असलेले पाहून त्याने शेतातले पीक कापीत असल्याचे सोंग केले. त्याला पाहून चोराला फार आनंद झाला. वाण्याच्या जवळ जाऊन चोरांनी विचारले–"कोण रे बाबा तू? कोठला राहणारा?"

"आमचे विचारतां मैसाळ, गाव आणि तुमचे?" वाण्याने त्यांना उलट विचारले. त्यांनी आपल्या गांवाचे नाव सांगितले.

"आपली कामे झपाझप आटपा, काय नेम कोणी यायचा!" वाणी म्हणाला.

चोर भराभरा लोंब्या कापून पोत्यात भरू लागले. त्यांनी वाण्याला विचारले–"काय दादा! या शेतावर तर कोणी



पाहऱ्याला सुद्धा दिसत नाही? इतके बेफिकीर?"

"या शेताचा मालक फार श्रीमंत आहे. त्याला मूलबाळ काही नाही. सोने घरात इतके आहे की कोठे ठेवू काय करू असे झालं आहे त्याला. बायकोला घरात एकटी ठेवून शेत राखायला कशाला येतो तो? मी एकटा पडलो नाही तर त्याच्या घरातले सर्व धन सोने आलं नसतं का माझ्या घरी!" वाण्याने एक लोणकडी थाप मारली.

"हात तिच्या! दादा तुम्ही या म्हणा-लात तर आम्ही नाही का येणार हात लावायला? तुम्ही म्हणाल त्या दिवशी त्या वक्ताला हजर होऊ, गावातल्या इतरांना सुद्धा बोलावून घेऊन येऊ." चोर म्हणाले.

वाण्याने एक दिवस ठरवून त्यांना यायला सांगितले. चोर आनंदाने निघून गेले.

वाण्याने सांगितले होते त्याप्रमाणे चोर एके दिवशी रात्री सर्व मिळून आले आणि वाण्याला ठरलेल्या जागी भेटले. वाणी त्यांना एका घरी घेऊन गेला आणि पहिल्या-पासून व्यवस्था करून ठेवल्याप्रमाणे दार खडखडवले.

घराच्या मालकाने दार उघडल्याबरोबर चोरांनी त्याच्या तोंडात बोळे कोंबले आणि त्याला एका जागी बांधून ठेवले. इतक्यात एक बाई घरातून आली.

तिला दहाळीत वाणी म्हणाला—"खबरदार! ओरडलीस तर!" असे सांगून सुरा दाखविला आणि चोरांना म्हणाला—"चला, शिरा आत आणि घेऊन या जे मिळेल ते. मी पाळत ठेवतो हिच्यावर!"

चोर आत गेल्याबरोबर वाण्याने बाहेरून दार लावून कुलूप लावून ठेवले. नंतर त्याने गावकऱ्यांना जमा करून चोर पकडल्याचे सांगितले. उजाडल्यावर गावकऱ्यांनी चोरांना पकडून पोलीस ठाण्यावर नेले. गावकऱ्यांनी वचन दिल्याप्रमाणे वाण्याला चंदा करून दुकान काढून दिले.



# सवतीमत्सर

वज्रेश्वर नावाच्या व्यापाऱ्याला दोन बायका होत्या. दोघी रात्रंदिवस आपसात भांडत. आपला दिमाख दाखविण्यासाठी दोघी मनाला वाटेल तितका खर्च करीत. नवऱ्याच्या मनाला शांती नव्हती. त्याने आपल्या गोपाळ नावाच्या मित्राला या बायकांची भांडणे थांबवायला काही मार्ग आहे का विचारले. गोपाळने त्याला एक उपाय सुचविला.

एके दिवशी गोपाळ एका श्रीमंत सावकाराचे सोंग घेऊन वज्रेश्वराच्या घरी आला आणि म्हणाला—"मी माझ्या एकुलत्या एका मुलीच्या लग्नासाठी दोन प्रयत्न केले आणि त्यात अपयश मिळाले. पाटावर पाय ठेवताच दोघे वर एकामागून एक गतप्राण झाले. परंतु ज्योतिष्याने मुलीची लग्नकुंडली पाहून दोन जिवंत लग्नाच्या बायका असलेला एखादा वर मिळाला तर त्याच्याशी लग्न करून दिल्यास हे गंडांतर टळेल, असे सांगितले. म्हणून मुलीला करून घेऊन आमचा उद्धार करा, म्हणून विनंती करायला आलो आहे."

"मी कळवितो विचार करून!" असे सांगून वज्रेश्वरने गोपाळला निरोप दिला.

वज्रेश्वराची होणारी तिसरी बायको श्रीमंत घरची पोर आहे हे कळल्यावर दोघी सवतींनी नवऱ्याची सेवा करण्यात चढाओढ लावल्यासारखे वज्रेश्वरला दुसऱ्या दिवसापासून दिसत आले. त्यांचे भांडण थांबले व वज्रेश्वराची डोकेदुखी थांबली.





# खूण ओळख

एका गावात एक गरीब शेतकरी रहात असे. तो इतरांच्या शेतात मजुरी करी व तीवर त्याचा उदरनिर्वाह चाले. शेताची कामे नसत त्यावेळी तो आपल्या गाईंचे दूध विकी आणि त्या मिळकतीवर आपला व आपल्या मुलांचा खर्च भागवी.

त्या शेतकऱ्याला पांडू व खंडू नावाचे दोन मुलगे होते. त्यातला पांडू बापरागावला म्हणून घर सोडून निघून गेला. खंडू घरी लहानाचा मोठा झाला.

उतारवय आले व अगदी खाटेला टेकल्यावर त्या शेतकऱ्याने खंडूला जवळ बोलाविले व म्हणाला—"आपली इस्टेट काय ती या दहा गाई आहेत! कधी तुझा थोरला भाऊ परतला तर त्याला त्याच्या वांटयाच्या पांच गाई देऊन टाक. पांडू गेला तेव्हां तू लहान होतास. म्हणून त्याची खूण ओळख म्हणून सांगून ठेवतो, त्याच्या नाकावर अर्ध्या इंचाचा उभा वण आहे." बापाने आपली शेवटची इच्छा मुलाला सांगून डोळे मिटले.

बाप गेल्यावर खंडूने कोणी नवा मनुष्य गावात आला की तो त्याचे नाक न्याहाळून पाही. कोणी विचारले की तो उत्तर देई, "काही नाही हो, बारा वर्षांपूर्वी माझा थोरला भाऊ घरून पळून गेला. त्याच्या नाकावर उभा वण होता. तो भेटल्यावर त्याला पांच गाई द्यायच्या आहेत."

"वेडया! बारा वर्षांआधी गेलेला मनुष्य परतलाच समज, तर तू आपल्या गाई द्यायलाच हव्या असे कोठे आहे? गप्प बैस झालं!" खंडूला त्याचे हितैषी शेजारी सांगत.

एकदां खंडू शेतावर कामाला जात असतां त्याच्या घरापासून थोडया अंतरावर एक भिकाऱ्यासारखा मनुष्य जमिनीवर लोळत पडला होता.

खंडू त्याच्याजवळ गेला व सहानुभूती दाखवीत त्याने विचारले—"कोण रे बाबा तू? काय झालं तुला?"

"भूक लागली आहे, बाबा! तीन दिवस झाले भाताचे एक शीत तोंडांत गेलं नाही. भोवळ येऊन पडलो होतो जमिनीवर!" तो माणूस म्हणाला.

खंडूला त्या माणसाच्या नाकावर उभा-वण दिसला. त्याने विचारले—"तुझे नांव काय बाबा?" आपले नाव "पांडू" असे सांगून तो म्हणाला—"मी घरून पळून गेलो होतो, त्याला कित्येक वर्षे झाली. नाइलाज झाला तेव्हां आज बापाकडे परत जात होतो."

"अरे मग मी तुझा धाकटा भाऊ खंडू. बाबांनी हे जग सोडण्यापूर्वी मला सांगितलं होतं ते सांगतो." असे म्हणत खंडू बापाने सांगितले होते ते सर्व सांगून त्या माणसाला आपल्या घरी बोलावून घेऊन गेला.

दुसऱ्या दिवशी उठून पाहाले तर तो मनुष्य नव्हता व गोठयात पांचच गाई होत्या.

आपल्या मोठया भावाला धाकटया भावाबरोबर राहणे आवडले नसेल म्हणून निघून गेला असावा, असा खंडूने विचार केला. पण सांगून जायला काय हरकत होती? शेवटी त्याला वाटले की, हा आपला भाऊ नाही. कोणीतरी चोर होता.



आणखी काही दिवस लोटल्यावर खंडूच्या घरासमोर एक गाडी येऊन थांबली. गाडीतून श्रीमंतासारखा कोणी तरी उतरला. गाडीवानाने काही पेटया, एक फळांची करंडी व इतर बरेचसे सामान उतरून ओटयावर ठेवले.

खंडूने आश्चर्यचकित होऊन विचारले—"कोण तुम्ही? कोण पाहिजे तुम्हांला?"

"अरे, तू खंडूच ना रे? मी पांडू, केवढा मोठा झालास रे? बाबा बरे आहेत ना?" त्या श्रीमंताने विचारले.